न. चिं. केळकरकृत

# 'गतगोष्टीं'ची पुरवणी

( पत्रव्यवहार )

संपादक :

काशीनाथ नरसिंह केळकर



१९४१

किं[illegible]

प्रकाशक
काशीनाथ नरसिंह केळकर
१३२ ३४-२७ एरंडवणें, पुणें

# निवेदन

या पुस्तकांतील पत्रांची निवड, कालक्रमानुसार रचना, मराठी पत्रांचे संक्षेप, आणि इंग्रजी पत्रांचें संक्षिप्त भाषांतर या सर्वांची जबाबदारी मजवर आहे.—( ता. १।५।१९४१ ).

का. न. केळकर

मुद्रक
आत्माराम रावजी भट,
केसरी प्रेस, ५६८ नारायण पेठ, गायकवाडवाडा, पुणें.

# निवडक पत्रव्यवहार

माझ्या रोजच्या कामापैकीं पत्रव्यवहार हा एक बराच मोठा भाग अखेरपर्यंत होऊन राहिला होता. पाश्चात्य देशांतील साहित्तिकांना खाजगी पत्रें सजवून खुलवून लिहिण्याची संवय इतकी होती व आहे कीं, त्या संवयींतून एक कलाच निर्माण झाली असे म्हणण्यास हरकत नाहीं. यामुळें तिकडील वाङ्मय ग्रंथांत 'पत्रव्यवहार' या सदराला एक स्वतंत्र स्थान लाभलें आहे. त्यांत गुरु-शिष्य, मित्र-मित्र, पति-पत्नी, प्रणयी-प्रणयिनी अशांनीं परस्परांना लिहिलेलीं पत्रें मोठी वाचण्यासारखीं उतरलेलीं आढळतात. परंतु आमच्या इकडे पत्रव्यवहार हा लेखनप्रकार केवळ व्यवहारापुरता आहे. अगदीं अठराशें नव्वदपर्यंत होऊन गेलेल्या पिढ्यां-तील प्रमुख महाराष्ट्रीयांनीं केलेला पत्रव्यवहार एकत्र करता आला असता तर त्याचें एक लहानसें पुडकें झालें असतें इतकेंच. आणि त्यांतहि व्यवहाराबाहेर जाऊन विचारांना वाङ्मयाचें स्वरूप आलेलें ज्यांत दिसून येईल अशीं पत्रें तर फारच थोडीं आढळलीं असतीं.

सार्वजनिक कार्यें व चळवळी ही महाराष्ट्रांत सुरू झाली तेव्हांपासूनच पत्रव्यवहाराची प्रथा थोडी वाढली. पण त्यांतहि कांहीं विषयविवेचन, कांहीं वादविवाद, कांहीं व्यवहार यापलीकडे मजल गेलेली नाहीं. लोकमान्य टिळक, रानडे, गोखले हे महाराष्ट्रांतील अलीकडचे अत्यंत मोठे पुढारी. पैकीं कोणाचाहि पत्रव्यवहार फारसा उपलब्ध नाहीं. महादेव गोविंद रानडे यांचा पत्रव्यवहार उपलब्ध झाला असता तर तो फार बोधप्रद ठरला असता. पण स्वतः त्यांनीं तो नीट संभाळून ठेवला नसावा, किंवा ठेवला असला तरी त्यांच्या पश्चात तो कोणी जतन करून ठेवला नसावा असे वाटतें. सार्वजनिक व्यक्तींचा पत्रव्यवहार त्यांच्या बरोबर चितेवर जाळण्यांत येत नाहीं इतकेंच काय तें! पण त्यांच्या अस्थींच्या सावडासावडी-नंतर घरांतील तत्संबंधी वस्तूंची व्यवस्था मागें उरलेले लोक करतात त्यांत त्यांचे कागदपत्र ही अडगळ समजून रद्दी म्हणून प्रथमच निकालांत काढीत अस-तील! त्याचें कारण अशा व्यक्तींच्या मागें त्यांच्या कार्याला दस्तऐवजी महत्त्व देणारा कोणी गुणग्राहक त्यांच्या कुटुंबीयांत सहसा निघत नाहीं. मग एखादा आस्थेवाईक तिऱ्हाईत निघाला तरी त्याचीहि निराशा होते.

रानडे व गोखले यांचीं चरित्रें निघावीं त्या प्रतीचीं निघालींच नाहींत. तथापि जीं निघालीं त्यांत त्यांचा पत्रव्यवहार म्हणून कितीसा छापला गेला हें त्या चरित्रांच्या वाचकांना दिसून आलेंच आहे. रानड्यांच्या कामाचा व्याप अत्यंत मोठा. तथापि, पत्रव्यवहार संभाळून ठेवण्याची आवड त्यांना बहुधा नसावी. गोपाळराव गोखले यांना ही आवड अधिक होती; व त्यांचें सर्व काम व्यवस्थित असल्यामुळें त्यांच्या पत्रव्यवहाराच्या फाईली त्यांच्यामागें उरल्या असतील अशी माझी परवांपर्यंत अपेक्षा होती. परंतु नुकतीच एका प्रसंगानें मला अधिकृतरीत्या मोठी विस्मयकारक माहिती मिळाली! गोखले यांचें चरित्र सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या लोकांनीं लिहावयास पाहिजे होतें व तें त्यांनीं लिहिलें नाहीं, म्हणून मी त्यांना परवांपर्यंत मनांतून दोष देत होतों. परंतु वर सांगितलेल्या प्रसंगीं गोखले यांच्या अत्यंत निकटवर्ति अशा एका गृहस्थाशीं या विषयीं चर्चा निघाली तेव्हां तो म्हणाला, "तुमची अपेक्षा बरोबर होती. आणि गोखले यांचा पत्रव्यवहार त्यांनीं अखेरपर्यंत नीट संभाळून ठेविलाहि होता. परंतु आतां आपण दोन दिवसांनीं मरणार असें त्यांना निश्चित वाटल्यावर त्यांनी पहिली गोष्ट केली ती ही कीं, त्यांचे सेक्रेटरी डॉ. देव यांना बोलावून घेऊन, त्याजकडून स्वतः संबंधीचे सर्व कागदपत्र त्यांनीं जाळून टाकले! हयात असतांहि आपले कागदपत्र आपल्या कुलुपाबाहेर कोणाच्या हातीं लागू नयेत अशी दक्षता ते बाळगीत." याचें कारण मी विचारलें तेव्हां त्यांनीं सांगितलें तें असें कीं "आपण परकीय राज्याखालीं आहों. आणि तें राज्य असें घातक आहे कीं कोणाच्या कोणत्या कागदाचा उपयोग केव्हां कसा करतील, हे कोणीहि सांगू शकणार नाहीं. लोक आम्हाला नेमस्त म्हणून सरकारच्या विश्वासाला पात्र झालेले समजतात. पण जहाल लोकांप्रमाणें आमच्याहि सोसायटीवर त्यांची फार बारीक नजर असून, निरनिराळ्या निमित्तांनीं आमच्या इमारतीचे कानेकोपरे धुंडाळण्याला त्यांनीं अनेक लोक पाठविल्याचा संशय येत असे." वरील हकीकत ऐकून मला आश्चर्य वाटलें. आणि गोखले यांचें चरित्र न लिहिण्याचा दोष त्यांच्या अनुयायांना मी देत होतों तो मनांतून काढून टाकला. कारण पत्रव्यवहारच मुळीं जाग्यावर नाहीं तर ते चरित्र काय लिहिणार! मात्र गोखले यांचें कृत्य व विचारसरणी मला मान्य झाली नाहीं.

टिळकांच्या हयातींत त्यांच्या पत्रव्यवहाराची व्यवस्था काय होत असे याचा स्वतः मीच साक्षीदार आहे. त्यांना नित्य इतकीं पत्रें येत कीं त्या सर्वांचीं उत्तरें, आस्थेवाईक रीतीनें किंवा शिष्टाचारानें, देण्याचें त्यांनीं मनांत

आणलें असतें तर त्यांची अर्धी सकाळ किंवा अर्धी संध्याकाळ रोज त्यांत खर्ची पडली असती. शिवाय आपल्या हातानें लिहिण्याचा टिळकांना कंटाळा. यामुळें प्रायः होई काय कीं, अगदीं जरूरीचीं व महत्त्वाचीं वाटणारीं पत्रें टेबलावर एकाद्या वजनाखालीं किंवा बुकाखालीं ते ठेवून देत आणि बाकीचीं फाडून टाकीत. पण बाजूला काढून ठेवलेल्या पत्रांचीं उत्तरें वेळेवर न गेलीं म्हणून कांहीं वेळानें तींहि शिळीं ठरलीं ! मग त्यांना उत्तर देऊन काय उपयोग ? अशा रीतीनें पहिल्या झटक्यासरशी फाडून टाकलेलीं, त्यानंतर ठेवून घेतलेलीं पण शिळीं झालेलीं म्हणून फाडून टाकलेलीं, अशा क्रमानें पुष्कळ पत्रें रद्दीच्या टोपलींत जात. टिळकांच्या मरणोत्तर त्यांचें चरित्र लिहिण्याचीं साधनें मी जुळवूं लागलों तेव्हां एकदोन लहान ट्रंका भरलेले कागदपत्र माझ्या स्वाधीन करण्यांत आले. त्यांत फुटकळ अशीं कांहीं पत्रें मला मिळालीं. याशिवाय गटानें एकत्र असे मिळालेले पत्रसंग्रह दोनच. पैकीं टिळकांनीं मंडालेहून धोंडोपंत विद्वांस यांना लिहिलेलीं महिनेवार पत्रें, आणि होमरूल लीगच्या कचेरींत फाईल करून ठेविलेलीं टिळकांनीं विलायतेहून लिहिलेलीं पत्रें. मला उपलब्ध झालेल्या या पत्रव्यवहाराचा उपयोग मी त्रिखंडात्मक लिहिलेल्या त्यांच्या चरित्रांत कसोशीनें केल्याचे वाचकांना विदितच आहे.

संभाळून ठेवला गेला असता तर टिळकांचा इतर कांहीं पत्रव्यवहार छापण्यासारखा असा प्रयत्नानें मिळाला असता. परन्तु गोपाळराव गोखले यांनीं जी शंका घेतली ती टिळकांच्या संबंधानें किती पटीनें अधिक यथार्थ होती हें सांगावयास नकोच. त्यांच्या वाड्यावर दोनतीनदां पोलीस झडती झालीच. पण इतर कांहीं प्रसंगीं ती होणार अशी नुसती बातमी आल्यामुळें त्यांना व इतरांना आपल्या जवळचे कागदपत्र नाहींसे करावें लागले. असें करण्यांत फौजदारी खटल्याची भीति असली तरी त्यापेक्षां अधिक भीति ही कीं, ज्या लोकांचीं पत्रें या झडतींत सांपडतील त्यांच्या पत्रांत आक्षेपार्ह असें कांहीं नसले तरी त्यांचीं नांवें सरकारी 'ब्लॅकलिस्टांत' जाणार ! अर्थात हा इतर लोकांना होणारा उपद्रव टाळावा या सदिच्छेनेंहि कागदपत्रांचा नैमित्तिक संहार होत असे. मात्र जो पत्रव्यवहार मी टिळक चरित्रांत छापूं शकलों त्यावरून हें दिसून येईल कीं, केवळ चरित्र लेखनाच्या दृष्टीनें पहातां अशा पत्रव्यवहाराला ऐतिहासिक माहितीच्या दृष्टीनें फार महत्त्व असतें. आणि व्यक्तिचरित्रावरहि त्यांतून पुष्कळ प्रकाश पडूं शकतो.

इतकें सांगितल्यावर मी माझ्या पत्रव्यवहाराकडे वळतों. मी रोजनिशी लिहीत नसे याविषयीं या ग्रंथाच्या पहिल्या विभागांत सविस्तर सांगितलेंच आहे. परंतु बाहेरून आलेलीं पत्रें एखाद्या तारेला लावून ठेवण्याची संवय मात्र मला प्रथमपासून होती. यामुळें १८९२ सालचींहि एक—दोन पत्रें मला उपलब्ध होऊं शकलीं ! परतु पत्रें संभाळून ठेवण्यात वेळोवेळीं हलगर्जीपणाहि झाला असावा. यामुळें कांहीं कांहीं सालांतील पत्रें अपेक्षेइतकीं मिळालीं नाहींत. तार भरली म्हणजे पत्रांचें पुडकें दोरी बांधून ठेवावें अशीहि संवय लागत गेल्यानें अशा पुडक्यांनीं शेवटीं एक दोन मोठ्या ट्रंकाहि भरल्या. अर्थातच आत्मचरित्रासारखें कांहीं लिहावें अशी इच्छा मनांत येऊं लागली तेव्हां सवडीप्रमाणें तीं पत्रें मी चाळूं लागलों. आणि सरस-निरस या भेदानें कांहीं ठेवून कांहीं टाकून देऊं लागलों. मग गतवर्षीं खरी विश्रांति मिळाल्यावर, घरांतील पुस्तकें कागद-पत्र वगैरेंची अडगळ काढून टाकावी म्हणून मी मजजवळचीं शेंकडों पुस्तकें केसरी ग्रंथ—संग्रहालयाकडे देणगीदाखल पाठवून दिलीं आणि हा पत्रव्यवहार पुढें घेऊन बसलों. तो वर्षानुक्रमानें व तारीखवारहि लावला. हें करितांना मला सुमारें ८-१० हजार पत्रें चाळावीं लागलीं, आणि शेवटीं त्यांतील ज्या कांहीं पत्रांत घेण्यासारखा कांहीं मजकूर आढळला तेवढींच वेगळीं काढून, फिरून त्यांतील कांहीं टाकून देऊन, उरल्या पत्रांचा उपयोग मी या खालीं सारांश रूपानें केला आहे.

मी केसरीचा कायम संपादक होईपर्यंत माझा पत्रव्यवहार अगदीं थोडा होता. त्यानंतर तो वाढला. पण तेव्हां पासून पत्रोत्तरें लिहिण्याला मला हस्तकहि मिळूं लागला. कोणाचें पत्र आलें आणि त्याला उत्तर न गेलें तर त्यामुळें शिष्टाचार बिघडतो अशी माझी समजूत असल्यामुळें माझा पत्रव्यवहार वाढूं लागला. होमरूल लीगच्या स्थापनेपासून पण विशेषतः टिळकांच्या पश्चात तो आणखी पुष्कळ वाढला. मात्र एक गोष्ट नमुद करावयाची ती ही कीं, मी या ग्रंथांत उपयोगांत आणलेलीं बहुतेक पत्रें मला लोकांकडून आलेलीं अशीच आहेत. मी लोकांना पाठविलेलीं अशी फारच थोडीं पत्रें मजजवळ आहेत. कारण विशेष महत्त्वाच्या कामाशिवाय बाहेर पाठविलेल्या पत्रांची स्थळप्रत करून ठेवणें प्रायः अशक्यच होतें.

मी जो पत्रव्यवहार या पुढें दिला आहे त्यांत विषय संकीर्ण आहेत. एकाच पत्रांत अनेक विषयांचा उल्लेख झालेलाहि आढळेल. आणि तसें होणारच.

पण त्यावरून मी केव्हां काय करीत होतों, माझ्याशीं संबंध आलेले लोक काय करीत होते, माझा त्यांचा विचार विनिमय काय चाले, आणि समकालीन वृत्त काय घडत असे इत्यादि गोष्टींवर आजूबाजूनें व तिरकस प्रकाश पडतो. एरवीं या पत्रांतील प्रत्येक मुद्दा स्वतंत्र विषयरूपानें मांडण्याइतक्या महत्त्वाचा नसणार हें उघड आहे. कोणतेंहि चित्र रंगतें त्याचा रंग ठिपक्या ठिपक्यांनींच किंवा बिंदु-बिंदूंनींच बनलेला असतो. हें एक एक पत्र म्हणजे असा एक एक ठिपका किंवा बिंदु होय.

माझ्या सारख्या एका सामान्य मनुष्याच्या जीवनक्रमाला महाराष्ट्राच्या समकालीन इतिहासांत कितीसें स्थान असणार ? तथापि कोणत्याहि समाजाचा इतिहास म्हणून तयार होतो तो अशा अनेक बिंदुमात्र कणमात्र कागदपत्रांतूनच तयार होतो. मग ते कागदपत्र कोणत्याहि स्वरूपाचे व प्रसंगाचे असोत. मी स्वतः इतिहास संशोधक नसलों तरी अशा संशोधनाचा भोक्ता आहे. अस्सल समकालीन कागदपत्रांना इतिहासाचें साधन या नात्यानें मी फार महत्त्व देतों. या दृष्टीनें टिळक चरित्राच्या दुसऱ्या व तिसऱ्या खंडांत मला उपलब्ध झालेल्या कागदपत्रांचा उपयोग मी केला आहे. आणि त्याच धोरणाला अनुसरून पुढील निवडक पत्रें या आत्मचरित्रांत, ग्रंथाचाच एक भाग म्हणून, छापीत आहे.

  

१

**२३ जुलै १८९२—ग. बा. मोडक, डेक्कन कॉलेज, पुणें**

कॉलेजांत गणवेष घालण्यासंबंधानें, म्हणजे त्याविरुद्ध, बरीच चळवळ चालू आहे. जिमखान्याला अधिक पैसे आम्ही मागतो ते मिळत नाहींत असें दिसतें. माझ्याविरुद्ध बरेच काहूर उठलें आहे. नवीन निवडणुकींत बहुधा जुनेच लोक निवडून येतील. हल्लीं क्रिकेटच्या सामन्याविषयीं कोणांत फारसा उत्साह नाहीं. परंतु मी आपली अकरा लोकांची टीम घेऊन कोल्हापुरास जाणार आहे. बाक्रे, कोल्हटकर वगैरे लोकांना नमस्कार सांगा.

२

**११ फेब्रुवारी १८९३—ग. बा. मोडक, डेक्कन कॉलेज, पुणें**

डेक्कन कॉलेजांतील लोक एप्रिलच्या प्रारंभीं शाकुंतल किंवा मुद्राराक्षस नाटक बसविणार आहेत. पण त्यांच्यांत गाणारे कोणी नाहींत म्हणून कोल्हटकर

किंवा ओक यांना बोलावण्याचा विचार आहे. दांत तुटक्या गर्द्यांना ते मुख्य नायकाचें काम देणार यावरून प्रयोग कसा काय रंगेल हें दिसतच आहे ! तुमचे मेव्हणे केतकर हे माझ्याशीं मनमोकळे वागतात. त्यांची प्रकृति बरी आहे.

३

५ ऑगस्ट १८९६—गणेश गोपाळ दीक्षित, जयपूर

आपलें पत्र पोंचलें. त्याबद्दल अत्यंत आभारी आहे. तें पत्र पंडित विश्वेश्वर-शास्त्री द्रवीड यांनीं वाचलें व त्यांना फार आवडलें. आणि त्याचा योग्य तो परिणाम होईलच. येथें जयपुरास दूर ठिकाणीं, आपल्या गरीबीमुळें आप्तेष्टापासून अलग झालेल्या, एका तरुण मुलावर तुम्ही फार मोठा उपकार केला तो मी केव्हांहि विसरणार नाहीं. जयपूर शहर किती सुंदर आहे याचें वर्णन करवत नाहीं. मात्र येथें एकहि छापखाना किंवा वर्तमानपत्र नाहीं. आमच्या तिमाहि परीक्षेच्या प्रश्न-पत्रिका आग्रयाहून छापून आणाव्या लागल्या. सरकारी कॉलेजांत शिक्षण मात्र मोफत दिलें जातें ही केवढी कृपा !

४

२० ऑक्टोबर १८९७—ग. बा. मोडक, कोल्हापूर

इकडील चमत्कारिक गोष्टी तुम्ही ऐकिल्या असालच. त्यांना आधार इतकाच दिसतो कीं महिन्या दीड महिन्यामागें कर्नल रे, पोलिटिकल एजंट, यांनीं कोल्हापुरच्या जुन्या राजवाड्यांतून कांहीं चांगलीं हत्यारें नेलीं व तीं परत दिलीं नाहींत. श्रीमंत महाराज हे माझ्या नोकरीच्या कामीं कांहीं वांधे घालतील असें सहसा वाटत नाहीं.

५

१७ जानेवारी १८९८—दिनशा एदलजी वाच्छा, मुंबई

करन्सी कमिटीपुढें माझें स्टेटमेन्ट पाठवावयाचें त्याची एक प्रत तुम्हाला पाठविण्याविषयीं मुन्शी यांस सांगितलें आहे. मात्र तें इतक्यांत प्रसिद्ध करण्याचें नाहीं. टिळक हे दक्षिण हिंदुस्थानांत फिरावयास व यात्रेस गेले असे ऐकिले. ते केव्हां परत येणार आहेत हें कळवावें.

६

**१४ फेब्रुवारी १८९८—महादेव चिंतामण केळकर, कऱ्हाड**

तुम्ही लॉ क्लास बंद केला हें फार चांगलें झालें. त्यामुळें तुम्हाला मुख्य व्यवसायाला अधिक वेळ मिळेल. तुमच्या म्युनिसिपल निवडणुकीचा निकाल काय झाला ? तुम्ही निवडून यावे आणि लोकादरास अधिक पात्र व्हावें अशीच माझी इच्छा आहे. राजाराम अभ्यंकर यास दोन वर्षांची शिक्षा झाल्याचें तुम्हांला कळले असेलच. या मूर्ख मुलानें स्वतःचा नाश तर केलाच पण आपल्या घराण्याचेंहि नांव दूषित केलें. आपले आप्त म्हणून वाईट वाटतें इतकेंच.

७

**३ मार्च १८९८—सखाराम गणेश देऊसकर, कलकत्ता**

परिचय नसतां पत्र लिहीत आहे. अच्युतराव साठे यांनीं तुमच्या स्वभावाविषयीं व परोपकार–तत्परतेविषयीं सांगितलें म्हणून तुम्हांला लिहिण्याचें धाडस करितों. मी बंगाली भाषेंत शिवाजीचें चरित्र लिहिण्यास घेतलें आहे. तरी १९ आक्टोबरच्या केसरींत मराठे लोकांविषयीं कोणा मॅक्लीन नामक साहेबाच्या अभिप्रायाचा उल्लेख आला आहे तो मला मिळेल काय ? टिळकांचें चरित्र मी हितवादी पत्रांत लिहावें अशी संपादकांची इच्छा आहे. त्याकरितां जगद्धितेच्छुतून प्रसिद्ध झालेलें टिळक चरित्र आणवून पाहिलें. त्यानें काम भागणार नाहीं. तरी आणखी माहिती कोठें कशी मिळवावी तें कळवाल काय ?

८

**६ मार्च १८९८—रघुनाथराव पंतसचीव, युवराज भोर**

माझा अभ्यास जोरांत चालला आहे. आणि यंदा परीक्षा पास होईल अशी खात्री वाटते. तुमच्या नाटकाचें पुस्तक पोंचलें तें वाचलें. तुमचे बंधु नाना हल्लीं कोठें आहेत तें कळवावें.

९

**१७ मार्च १८९८—वि. गो. विजापूरकर, कोल्हापूर**

केसरी छापला जात होता तो छापखाना जळाल्याची वार्ता ऐकिली. वाईट वाटलें. पण संकटें हींच माणसाची परीक्षा करतात. केसरीवर लोकांचें प्रेम आहे

म्हणून अशा संकटांतून तुम्ही पार पडावें अशी प्रार्थना आहे. केसरीच्या मदतीकरितां या वर्षी वाटल्यास लोक दुप्पट वर्गणी देतील. एखादें नवें छपाईचें मशीन घेऊन केसरीनें स्वतःचाच छापखाना आतां काढावा.

१०

३ एप्रिल १८९८—भा. रा. नानल, वकील, रत्नागिरी

तुम्ही या मोठ्या दिव्यांतून शीरसलामत चांगले बाहेर पडलां हें पाहून मला आनंद झाला. मी मुंबईकडे गेलों तर तुम्हाला भेटेन. तुमचा लॉ क्लास चालू आहे कीं बंद पडला ? सखारामपंत बाकरे यांनीं सावंतवाडी हायस्कुलांत शिक्षकाची नोकरी धरली आहे. तात्या कोल्हटकर हे उमरावतीस राहून वकिली करणार असे ऐकतों.

११

३ एप्रिल १८९८—महादेव चिंतामण केळकर, सातारा

यंदा कलेक्टर महाबळेश्वरास जाऊं शकत नाहींत. वाराणशीस मुलगा झाल्याचें समजतें. तुम्हास जागच्या जागींच बढती मिळणार असें समजतें. खरें काय ? तुम्ही दोन्हीं पत्रांचें काम फारच चांगलें चालविलें आहे त्याबद्दल फार आनंद वाटतो. प्लेगसंबंधी बिनसरकारी व्यवस्था चालू आहेत. त्यांतील कामामुळें प्लेग अधिकाऱ्यांच्या मनांत तुमच्याविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झाली आहे असे येथील अधिकारी मला सांगतात. तारीख २० मार्चच्या केसरींतील मुंबईंतील दंग्यावरचा लेख फारच कडक होता असें मला वाटलें. पण तुम्ही त्या गोष्टीचा विचार केला असेलच.

१२

१५ एप्रिल १८९८—सी. एन्. सल्धाना, लंडन

इंडियन एमिग्रेशन क्वॉर्टर्लीच्या अंकांत मी पत्रें लिहिलीं तीं तुम्ही पाहिलीं असतील. तुर्को-ग्रीशिअन युद्ध आतां संपलें. त्यांत हिंदी–मुसलमानांना बराच त्रास झाला. मी कोणत्याहि पक्षाचा नाहीं. परंतु हिंदी लोकांना अन्याय होऊं नये याविषयीं खटपट करीत असतों. हिंदी लोकांचा सामाजिक दर्जा कोठेंहि कायम रहावा अशी माझी इच्छा आहे. कायद्याप्रमाणें सर्वांची योग्यता एकच राहिली पाहिजे.

असो. टिळकांना शत्रू कां निर्माण झाले हे मला माझ्या इकडच्या अनुभवावरून लक्षांत येतें. माझे लेख तुमच्या उपयोगी पडण्यासारखे असल्यास पाठवीन. त्यांना मराठ्यांत किती जागा मिळेल हें कळवावें.

१३

**२५ एप्रिल १८९८—आर. जी. प्रधान, मुंबई**

वर्तमानपत्राच्या धंद्यांत प्रवेश करावा व एकाद्या अनुभविक संपादकाच्या हाताखालीं शिक्षण घ्यावें अशी मला इच्छा आहे. तरी मराठ्याचा मुंबईचा बातमीदार म्हणून किंवा इतर रीतीनें तुम्ही मला कांहीं काम देऊं शकाल काय ? मी बी. ए. होऊन मराठा एज्युकेशन सोसायटीच्या शाळेंत शिक्षकाचें काम करीत असतो. माझीं राजकीय मतें मराठ्याच्या मताशीं जुळणारींच आहेत.

१४

**७ मे १८९८—श्रीधर विठ्ठल दात्ये, छावणी बोलारम, हैद्राबाद**

पुण्यांत हल्लीं प्लेग कमी झाला आहे म्हणून वामनराव बापट, एल्एल्. बी. व त्यांचे बंधु हैद्राबाद रेसिडेन्सीहून पुण्यास जात आहेत. त्यांना ओळखीकरितां हें पत्र देत आहे. हैद्राबादच्या या भागांत प्लेग नव्हता. मी स्वतः कांहीं डॉक्टर नाहीं. तरी तुम्ही तुमच्या हाताखालच्या स्वयंसेवकांना सांगून कपडे डिसइन्फेक्ट केल्याशिवाय सोडून देण्यास सांगण्याची कृपा करावी. पावसाळा सुरू झाला म्हणजे मी पुण्यास येईन व भेटेन.

१५

**१९ मे १८९८—स. ग. देऊसकर, हितवादी कचेरी, कलकत्ता**

हितवादी वर्तमानपत्रकार हे टिळकांचे एकनिष्ठ भक्त आहेत. त्यांनीं टिळक डिफेन्स फंडाकरितां बरीच वर्गणी गोळा केली. पत्रिकेपेक्षांहि हितवादीमध्यें याविषयीं लेख अधिक आले. टिळकांच्या शिक्षेनिमित्त सर्व पत्रांनीं काळ्या रेघा घालून एक अंक काढावा असें कलकत्ता प्रेस असोसिएशननें ठरविलें. पण हितवादीशिवाय एकानेंहि तें काम केलें नाहीं. अच्युतराव साठे कलकत्त्यास होते त्यांना हे माहीत आहे. हितवादीकर्ते कालिप्रसन्न काव्यविशारद यांनीं कलकत्ता डिफेन्स फंड कमिटीच्या मागें हिशेब प्रसिद्ध करण्याचा तगादा जाहीररीतीनें केला म्हणून

त्यांच्यावर कांहीं लोकांचा राग झाला. आणि त्यांच्याविरुद्ध इकडे कांहीं पत्रांत मजकूर आला त्याचें भाषांतर तिकडे ज्ञानप्रकाशांत छापलें गेलें, त्यानें गैरसमज होऊन तुम्ही मराठ्यांत कालिप्रसन्न बाबूविरुद्ध टीका केली हे बरें झालें नाहीं. तरी त्यांचें समग्र पत्र मराठ्यांत छापावें.

१६

८ जून १८९८—सखाराम गणेश देऊसकर, कलकत्ता

तुम्ही मला लिहिलेलीं पत्रें हितवादींचे संपादक कालिप्रसन्न बाबू यांना दाखविलीं. आणि त्यांनीं टिळकांच्या पत्रावर अब्रुनुकसानीची फिर्याद करण्याचे रहित केलें. 'टिळक तुरुंगांतून परत आल्यावर त्यांजकडेच माझें गाऱ्हाणें काय तें सांगेन' असें ते म्हणाले. तरी तुम्हीहि हा वाद आतां मिटता घ्यावा. कांहीं हिंदी भाषेंत लिहिलेले ग्रंथ छापण्याची इच्छा आहे. तरी निर्णयसागरच्या टाईपासारखा हिंदी टाईप मुंबईंत कोठें मिळू शकेल काय हे कळवावे.

१७

१० जून १८९८—म. रा. बोडस, मुंबई

पुण्याचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट व तुम्ही, म्हणजे मराठ्याचे संपादक, यांच्या दरम्यान झालेल्या मुलाखतीची हकीकत वाचली. लँब साहेबांच्या परवानगी शिवाय तुम्हाला ती प्रसिद्ध करितां येणार नाहीं. पण त्यांनीं ती परवानगी न दिली तर तुम्हाला त्याविषयीं जाहीररीतीनें रीतसर तक्रार करतां येईल. कॉलेजां-संबंधी सरकारानें प्रसिद्ध केलेला ठराव ' नेटिव्ह ओपीनियन ' पत्रांत पहिल्याच पानावर दिला आहे. मान्यता दिलेल्या संस्थांतून मि. करकेरिया यांचीं कॉलेजिएट इन्स्टिटयूट आणि सेटलवाड यांचे लॉ कॉलेज ही वगळली आहेत ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

१८

१६ जून १८९८—बाबू कृष्णलाल बागची, कलकत्ता

हितवादी प्रकरणाला तुम्ही नसतें महत्त्व दिलें आहे. एका सभ्य स्त्रीची बदनामी केल्याबद्दल या संपादकाला तुरुंगाची शिक्षा झाली होती हें तुम्हास माहीत नसेल. तो उघडपणें स्वतःला नास्तिक म्हणवितो. सर्वांना शिव्या देत

सुटणें हाच त्याचा धंदा. येऊन जाऊन सुरेंद्रनाथ बानर्जी यांना तेवढे तो शिव्यां-
तून वगळतो. आपल्या कांहीं लाभाकरिता त्यांना तो हल्लीं जळूसारखा चिकटून
राहिला आहे.

१९

१८ जून १८९८—ओमोर क्रे, रेसिडेंट, एडन

तुमचें पत्र पोंचलें. पुण्यांतील प्लेगसंबंधानें त्यांतील हकीकत वाचून बरें वाटलें. आतां डॉ. रीड म्हणतात त्याप्रमाणें फिरून येत्या ऑगस्टापासून पुन्हा प्लेग न येण्याची खबरदारी घेतली पाहिजे. पण माझी भीति खोटी ठरो व तुमचा अद-मास खरा ठरो! प्लेगचा कारभार त्रासाचा पण शेवटीं तो सुखाचाच ठरेल. मी आपला फोटो तुम्हाला पाठविला तो मिळाला असेलच मला येथें पुष्कळ काम पडतें. येथें उष्णता फार आहे. सरकारी कारभारांतहि चांगल्या लोकांच्या ओळखी समक्ष झाल्या म्हणजे पुष्कळ गैरसमज दूर होतात. कलकत्त्यांत झालेला दंगा टाळता येण्यासारखा होता असे मला वाटते. पुण्यांत परिचय झालेल्या लोकांची मला फार आठवण येते.

२०

२० जून १८९८—प्रो. मोरो केशव दामले, कॉलेज उज्जयिनी

नाशिक येथें धाकट्या बंधूचें लग्न करून नुकताच परत आलों. मध्यंतरीं हें काम अवचित निघाल्यानें मला माझा लेख मराठ्याकरितां लिहिलेला अर्धाच टाकावा लागला. माझ्या पुस्तकाला अद्यापि हवी तितकी प्रसिद्धि मिळाली नाहीं. पैसे मिळण्याचा प्रश्न नाहीं. परंतु ग्रंथ लोकांपुढें यावा अशी इच्छा. माझ्या मागील पत्रांतील कांहीं वाक्यांवरून तुमचा गैरसमज झाला आणि म्हणून तुम्ही अलीकडे पत्र पाठविलें नाहीं असा संशय येतो. तसे असेल तर तुम्ही मला आपल्या सौजन्य-पूर्ण स्वभावानें क्षमा केली पाहिजे.

२१

६ जून १८९८—वासुदेव वामनशास्त्री खरे, मिरज

इतिहास-संग्रहावरील केसरींतील तुमचे दोनहि लेख लक्षपूर्वक वाचून पाहिले. तुमच्या मताप्रमाणेंच माझें मत आहे, तें असें कीं, १ ऐतिहासिक साधनें

प्रसिद्ध करणें व २ उपलब्ध झालेल्या साधनावरून इतिहास तयार करून तो प्रसिद्ध करणें, ह्यांपैकीं, प्रस्तुतच्या स्थितीकडे लक्ष देतां, पहिलाच मार्ग चांगला. साधनांचें वैपुल्य प्राप्त झाल्यावर इतिहास लिहिणें योग्य होईल. अजून कशास कांहीं ठिकाण नाहीं तोंच, चार सटरफटर पत्रें मिळालीं तेवढ्यावरच, लिहिलेला इतिहास काय उपयोगी ? एकाच विषयावर निरनिराळ्या स्थितींतील व निरनिराळ्या पक्षांच्या लोकांचें म्हणणें काय आहे हें ताडून पाहिलें पाहिजे. त्यांत पक्षाभिमानाचा व विकारवशतेचा, तत्कालीन स्थितीमुळें उत्पन्न झालेला, जितका अंश असेल तितका हल्लींच्या इतिहास-शोधकांनीं गाळून नंतर कोणच्याहि विषयासंबंधानें आपलें विचारपूर्वक ठाम मत ठरविलें पाहिजे. पटवर्धनांचें दप्तर म्हणजे ऐतिहासिक साधनांची बरीच मोठी व महत्त्वाची एक बाजू झाली; परंतु जितकीं साधनें उपलब्ध होणें इष्ट आहे तितकीं झालीं आहेत असें एवढ्यावरून मानावयाचे नाहीं. बुंदेलखंड, रोहिलखंड, गुजराथ, माळवा, कर्नाटक, कोंकणपट्टी किंबहुना बंगाल व पंजाब येथील सुद्धां मराठ्यांच्या इतिहासाचे मिळावयाजोगे कागदपत्र प्रसिद्धीस येतील तेव्हांच फक्त पेशवाईच्या इतिहासाचीं साधनें मिळालीं म्हणावयाचीं. या कामीं मोठ्या आस्थेनें श्रम करणारे व तदभिज्ञ असे लोक एव्हांपासून असलीं साधनें मिळविण्याच्या उद्योगास लागतील तर दहापांच वर्षांत हें काम तडीस जाईल. तेव्हां खटपट व्हावयाची ती आधीं याच दिशेनें झाली पाहिजे. इतिहास लिहिण्याचे मागाहून पहातां येईल. इतिहासांतील प्रसिद्ध गोष्टी व व्यक्ति यांच्या संबंधानें लोकांचे गैरसमज कसे होतात हें दोनचार उदाहरणें देऊन तुम्ही सिद्ध केलेंच आहे. आणखीं उदाहरणें देण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं.

## २२

### ८ जुलै १८९८—डोराबजी पदमजी, अध्यक्ष, पुणें म्युनिसिपालिटी

प्लेगच्या कारभारासंबंधानें तुमचें समालोचन इतकें भरपूर झालें आहे कीं त्यांत अधिक भर घालावयाला मजजवळ कांहींच नाहीं. डॉ. बॅरी यांनीं मूर्खपणानें सार्वजनिक पैसा किती नासला याचें उदाहरण सांगतों. एक आठवडाभर, दररोज एक हजार रुपयेप्रमाणें, त्यांनीं जमीनीखालच्या गटारांतून क्लोराईड ऑफ मरक्युरीचे सोल्युशन ओतले. जमिनीखालच्या मोऱ्यांतून अशी औषधें ओतून वरच्या हवेचें शुद्धिकरण होत नाहीं याविषयीं अमेरिकेंतील हेल्थ नामक पत्रानें किती समर्पक

टीका केली आहे हें कुमठेकर तुम्हांला दाखवितील. पण पैसा आमचा मग तो नासायला डॉ. बॅरी यांचें काय जातें? त्यांना हवें तें शुद्धीकरणाचें कार्य स्वतः म्युनिसिपालिटीनें केलें असतें तर पन्नास टक्के बचत झाली असती. हल्लींचा प्लेग-कायदा व नियम नसते तर हव्या त्या अवश्य गोष्टी मोकळ्या हातानें स्वतः म्युनिसिपालिटीनें केल्या नसत्या काय? हें आठ हजाराचें औषधी द्रव्य जमिनीवर खर्चल्यानें अधिक उपयोग झाला असता.

२३

९ जुलै १८९८—गो. स. सरदेसाई, राजकुमार विद्यालय, बडोदें

हिंदुस्थानच्या इतिहासांतील मुसलमानी रियासतीचा भाग मी नुकताच प्रसिद्ध केला. त्याची एक प्रत मी मोठ्या आनंदानें तुमच्याकडे पाठवीत आहे. पुढील दोन भाग असेच क्रमानें निघतील. माझें पुस्तक फार मोठें असल्यामुळें तें मराठी शाळांतून लावतां येणार नाहीं. परंतु शिक्षकवर्गाला तरी त्याचा उपयोग होईल. हल्लीं ग्रंथकार काय किंवा प्रकाशक काय यांना किती झगडावें लागत आहे हें तुम्ही पहाताच. मी कोणी मोठा जाडा पंडित नाहीं. किंवा माझ्या ग्रंथांत नवीन स्वतंत्र शोध असे कांहीं नाहींत. टेलरच्या हिंदुस्थानच्या इतिहासाच्या धर्तीवर मी माझा ग्रंथ लिहिला आहे. त्यांतील नामावळी व कांहीं वर्णनें कंटाळवाणी वाटतील. परंतु मनोरंजक होतील असेहि कांहीं भाग आहेत असें वाटतें. इतिहासाचा अभ्यास शास्त्रशुद्ध रीतीनें वाढवावा अशी माझी इच्छा आहे.

२४

? —वासुदेव वामनशास्त्री खरे, मिरज

टिळक कारागृहवास भोगीत आहेत तेथें त्यांची प्रकृति कशी काय आहे, त्यांस कसे काय वागविण्यांत येते, व प्रिव्ही कौंसिल अपिलांत यश येण्याचा कितपत संभव आहे या विषयीं तुम्हास काय माहिती असेल ती सविस्तर कळवावी. हल्लीं दोन्हीं पत्रें तुम्ही चालविता त्यांत तुम्हास कोणाची मदत आहे कीं नाहीं? टिळकांच्या गैरहजेरींत पत्रें चालविण्याचें जोखमीचें काम तुम्ही शिरावर घेतलेत याबद्दल काळजी वाटते. पण फार आनंदहि होतो. सध्यांचे वावटळ कधीं शांत होईल तें होवो. मी ऐतिहासिक लेखसंग्रह मासिक पुस्तक सुरू केलें तेव्हां प्लेग व व दुष्काळ यांची ऐन गर्दी होती. यामुळें या महत्त्वाच्या कृत्यास लोकाश्रय जसा

मिळावा तसा अद्याप मिळाला नाहीं. जाहिरातीचे पैसे कोणाकडे पाठवावयाचे हें कळवावें. कारण केसरीच्या व्यवस्थेचें काम आतां बदललेलें दिसतें.

२५

? —वि. गो. विजापूरकर, कोल्हापूर

टिळकांची युनिव्हर्सिटींतील पदवी काढून घेणार म्हणतात—खुशाल घेवोत. राष्ट्राची भावना टिळकांच्या बाजूला आहे ती तरी कोणी काढून घेत नाहीं ना? सरकार कांहीं करो, आपल्या देशांतील आपल्या लोकांना शिक्षण देण्याचें काम आपलें आपण केलें पाहिजे. टिळकांना अन्न चांगले देत नाहींत म्हणून देशांतील हजारों लोकांनीं आपण अन्नत्यागाचा सत्याग्रह करूं असा सरकाराला धाक घालावा. या कामीं वैद्यकसंस्था संघ, विमा कंपन्या, कॉंग्रेसचे अध्यक्ष इत्यादि लोकांनीं पुढें होऊन खटपट केली पाहिजे. असो. तुमच्यासंबंधानें असें म्हणावयाचें कीं टिळक परत आल्यावर तुम्ही कोल्हापूरसारख्या ठिकाणीं येऊन संस्थानी प्रजेच्या हक्कासंबंधानें कांहीं चळवळ कां करूं नये? समजा, तुम्ही व अच्युतराव साठे अशा दोघांनीं वकीलीची सनद घेतली, वकीली शिक्षणाचा एखादा वर्ग काढला, तर तुमचें चांगलें चालेल व सार्वजनिक कामहि होईल. पुण्याखालोखाल कोल्हापूर ही जागा चांगली आहे. येथेंहि पोलिटिकल एजंट आहे, पण सुशिक्षित पुढारी लोकांच्या अंगावर त्याचा हात सहसा पडणार नाही. साने यांनीं येथील सनद काढलीच आहे.

२६

९ ऑगस्ट १८९८—रामभाऊ टिकेकर, बार्शी

आजच्या डाकेंतून मराठा पत्राकरिता कांहीं मजकूर पाठवीत आहे. सध्यां आपल्या तरुण लोकांची स्थिति अत्यंत भयावह व कारुण्यास्पद झाली आहे. पोटापाण्यासाठीं त्यांचा जीव जिगजिगीस आलेला. तेव्हां अशा प्रसंगीं त्यांना दिशा दाखवून कामास लावणें या पलीकडे महत्त्वाचें काम दुसरें नाहीं. केसरीकडे कोणी असले विषय घेऊन गेले असतां तो मागें ढकलतो. मराठींत व्यापारी भूगोल नांवाचें एक पुस्तक मी लिहिलें आहे, तें बडोदें कलाभुवनांत छापलें आहे. त्याचाहि पुरस्कार करावा. केसरींत सायन-निरयन वाद व महाभारत चर्चा ही मात्र येते, पण अशा औद्योगिक विषयांची मातबरी केसरीला वाटत नाहीं

अशी समजूत होत चालली म्हणून ही विनंति केली आहे. त्याचा राग नसावा. कोष्टयांच्या धंद्यावरील लेख परत पाठवावा.

२७

## १५ ऑगस्ट १८९८—श्री. कृ. कोल्हटकर, अकोला

केसरीच्या गेल्या अंकांत 'संगीतोत्कर्षेच्छु' या टोपण नांवानें कोणी गृहस्थानें लिहिलेलें पत्र तुम्ही प्रसिद्ध केलें याबद्दल मी तुमचा फार आभारी आहे. कारण मला माहीत आहे कीं माझ्या नाटकांवर केसरींत अनुकूल अभिप्राय प्रगट झाल्यानें जें कार्य होईल तें इतर कशानेंहि होणार नाहीं. हें पत्र लिहिणाराचें खरें नांव कळावे अशी फार इच्छा आहे. पण तुम्हा वर्तमानपत्रकारांच्या या गुप्त गोष्टी! त्या विषयीं अधिक पृच्छा करणें योग्य होणार नाही. असो. गेल्या सप्टेंबरांत पुणे डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्स्लेशनचे चिटणीस रा. ब सोहनी यांचें पत्र मला आलें. त्यांत "तुम्ही सोसायटीच्या परीक्षकांपैकीं एक व्हाल काय?" असें मला विचारण्यांत आलें. त्याला मी होय असें उत्तर पाठविलें होतें. या नंतर एका आठवड्यानें रा. ब. सोहनी हे वारले. पुढें रा. हरी नारायण आपटे यांना पत्र लिहून याविषयीं चौकशी करण्याची विनंति केली. परंतु रा. आपटे किंवा सोहनी यांच्या मागाहून झालेले चिटणीस, यांच्याकडून कांहींच जबाब आला नाहीं. तरी हें गूढ काय आहे या विषयीं मला सत्वर माहिती द्याल तर आभारी होईन.

२८

## २४ सप्टेंबर १८९८—बा. ना. भाजेकर, हायकोर्ट वकील, मुंबई

गोवळकोंड्यांहून मुसलमानांची पोलो टीम आली तिनें युरोपियन खेळाडूंचा पराभव केला. त्यांना सार्वजनिक सभेमार्फत तुम्ही पानसुपारी कां करूं नये? दहा पंधरा रुपये फार तर लागतील. डेक्कनसभा मृतवतच आहे. तिला काय लिहावें! तुम्ही स्वतः अशा खेळांचे चीज करणारे आहा म्हणून तुम्हाला लिहिलें. तरुण पिढीचें लक्ष लागण्यास उत्तेजन दिलें पाहिजे. विद्याधिकारी जाईल्ससाहेब किंवा गव्हर्नरचे प्रायव्हेट सेक्रेटरी जॅक्सनसाहेब यांनीं अशा कामीं लक्ष घालण्याविषयीं उचल केली पाहिजे. रा. ब. अच्युत भास्कर देसाई यांनीं मदत करण्याचें मजजवळ कबूल केलें आहे.

२९

**२ ऑक्टोबर १८९८—गो. स. सरदेसाई, राजकुमार विद्यालय, बडोदे**

मी हल्लीं हिंदुस्थानचा इतिहास लिहीत असल्याचें तुम्हांला माहीत असेलच. हल्लीं मराठेशाहीच्या कालाचा इतिहास लिहीत आहे. तुम्ही रानड्यांच्या निबंधाचें परीक्षण केसरींत केलें तें वाचलें. ज्ञानप्रकाशांतील जिंजीच्या वेढ्यासंबंधीचा भाग मी वाचला होता परंतु तुमच्या परीक्षणांतील कांहीं उतारे मला त्यांत आढळले नाहींत. इकडील माने निंबाळकर वगैरे कांहीं मराठे घराण्यांतल्या कैफियती प्रासिद्ध झाल्या, त्या तुम्ही वाचल्या काय ? माझ्या पहिल्या खंडाचें परीक्षण तुम्ही केव्हां करणार?

३०

**२१ ऑक्टोबर १८९८—विष्णु रघुनाथ लेले, वकील, सोलापूर**

टिळकांच्या बंधमुक्ततेपासून त्यांच्या आयुष्यक्रमांतील अगदीं वेगळा भाग सुरू झाला आहे. कोल्हापूर प्रकरणापर्यंत टिळकांची व्यक्तिविशिष्टता स्थापन झाली. तेथून परवाच्या रँड प्रकरणापर्यंत त्यांचा मराठेपणा स्थापन झाला. आणि या नंतर हिंदुस्थानचें चक्रवर्तीपणाचें अग्रगण्यस्थान मिळविण्याला त्यांची सुरुवात होणार. जो आजपर्यंत आमचा नायक होता तो आतां हिंदुस्थानचा पुढारी होणार. सार्वजनिक काका, त्यानंतर विष्णुशास्त्री चिपळूणकर, आणि त्यानंतर टिळक. एकाची सार्वजनिक सभा, दुसऱ्याची निबंधमाला, आणि तिसऱ्याची मूर्तिमंत देशभक्ति. तुम्ही टिळकांचें चरित्र लिहिण्यास घ्यावें. हें काम करण्यास तुम्हाला सर्व उपकरणें अनुकूल आहेत. आणि तें करण्यास तुमच्याशिवाय योग्य पुरुष मला दिसत नाहीं. आपण लेखनपटु आहात.

३१

**२ नोव्हेंबर १८९८—दिनशा एदलजी वाच्छा, मुंबई**

दादाभाई नवरोजी यांनीं करन्सी कमिटीकडे जे स्टेटमेंट पाठविलें त्याची एक प्रत यीं सोबत पाठवीत आहे. त्याचा उपयोग तुम्ही आपल्या पत्रांत करावा. मात्र तूर्त त्यांचें नांव प्रासिद्ध करूं नये अशी त्यांची इच्छा आहे. करन्सी कमिटीकडून त्यांना साक्षीला केव्हां बोलावणें येतें तें पहावें.

## ३२

### ६ नोव्हेंबर १८९८—ग. ब. मोडक, वऱ्हाण

टिळकांकडे कायम रहाण्याचें वचन देण्यापूर्वी नीट विचार करा. आज तुम्हाला लोकप्रियता लाभलेली आहे. पुण्यांत पुष्कळ लोक तुम्हाला चहातात. तुम्ही टिळकांच्या गैरहजेरींत, सरकारी विरोध असतां, केसरी—मराठा पत्रें चांगली चालविलीं. परंतु एकंदर सार्वजनिक जीवन हें मोठें अवघड असतें. त्यांतून कोणचीहि गोष्ट मनाला लावून घेण्याचा तुमचा स्वभाव आहे. म्हणून कोणचाहि विचार पक्का करण्यापूर्वी सावधगिरी ठेवा. एकदां पुढे टाकलेलें पाऊल मागें घेतां येणार नाहीं. जपानची स्कॉलरशिप अवघी पन्नास रुपयाची म्हणून मी तिच्या करितां खटपट करीत नाहीं. माझ्या मनांतून एखादें पुस्तक लिहून, हिंदुस्थाना-बाहेर जाऊन वसाहत करून राहिलेल्या लोकांसंबंधी त्यांत माहिती द्यावयाची आहे. त्या कामीं रा. ब. रानडे यांच्या निबंधाचा मला चांगला उपयोग होईलसे वाटतें.

## ३३

### ८ नोव्हेंबर १८९८—जी. सुब्रह्मण्य अय्यर, त्रिप्लीकेन, मद्रास

नुकताच माझा बंधु वारला व इतरहि कांहीं गोष्टी घडल्या, यामुळें मला तुमच्या पत्राचें उत्तर लवकर धाडतां आलें नाहीं. 'हिंदु' पत्राचा संबंध सोडतांना मला किती दुःख झालें हें सांगतां येत नाहीं. पितापुत्र वियोग किंवा पतिपत्नी वियोग यांसारखेंच तें दुःख आहे असें समजा. परंतु मला 'हिंदु' पत्राशीं संबंध सोडल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. कारण व्ही. राघवचारीयर यांनीं त्या पत्रावर एक लक्ष रुपये कर्जाचा बोजा करून ठेवला! दोन वर्षेपर्यंत मी दुसरें वर्तमानपत्र न काढण्याचें कबूल केलें आहे. हीं दोन वर्षें म्हणजे एकप्रकारें बिनपगारी रजाच असें मी समजतों. आणि मला ही रजा हवीच होती. कारण आज वीस वर्षे मला मुळींच विश्रांति मिळाली नव्हती. दोन वर्षांनंतर मात्र मी स्वतःचें वर्तमानपत्र काढणार आहे. तेव्हां माझे स्नेही व हितचिंतक मला पूर्वीसारखीच सहानुभूति दाखवितील अशी आशा आहे.

३४

## २५ नोव्हेंबर १८९८—म. रा. बोडस, मुंबई

तुमचें चंदावरकरांवरील आर्टिकल उत्तम होतें. या विषयावर पुनः लिहाल तेव्हां ‘ टाइम्स ऑफ इंडियावर ’ सडकून टीका करा. चंदावरकरांनीं मिशनरी लोकांची केलेली स्तुति अयोग्य आहे असे लिहा. परदेशांतील मिशनरी लोका-संबंधानें विलायतेंतील राजकारणी मुत्सद्यांचेंहि मत चांगलें नाहीं. डॉ. विल्सन मिशनरी यांच्या चरित्रांत ते आणि लॉर्ड नॉर्थब्रुक यांच्यामधील, सन १८७५ सालीं झालेला पत्रव्यवहार दिला आहे. त्यांत डॉ. विल्सन यांनीं सुशिक्षित हिंदी लोकांवर प्रतिकूल टीका केली आहे. ते म्हणतात, “हे पुढारी व त्यांचे अनुयायी आजच बंड करण्याला उद्युक्त होणार नाहीत. पण कालांतरानें सरकाराविरुद्ध लोकांना ते चेत-विल्याशिवाय रहाणार नाहींत. ते नसतील तीं गाऱ्हाणीं उकरून काढतात व रय-तेचीं मनें कलुषित करतात. देशी वर्तमानपत्रांवर नियंत्रण घालण्याची सूचनाहि डॉ. विल्सन यांनीं केली आहे. १८७५ चें हें बीज १८९८ मध्यें अंकुरलें असें ठरत नाहीं काय ? गुल्बर्गा समाचार पत्रावर निर्बंध घातला तो रेसिडेंटाच्या सांगण्यावरूनच !

३५

## ६ डिसेंबर १८९८—वा. प्र. भावे, सुप., नेटिव्ह इन्स्टि. हायस्कूल, पुणें

महाराष्ट्र कॉलेज यापुढें चालवावयाचे नाहीं, म्हणून तें चालविण्याचा अर्ज पाठवावयाचा नाहीं, असे सोसायटीच्या चेअरमननी ठरविले आहे. सरकारी विद्या-धिकाऱ्यांनीं सांगितल्याप्रमाणें शिक्षक मंडळींनीं वर्तणूक ठेविल्यास पुढें केव्हां तरी युनिव्हर्सिटी सिनेटकडे कॉलेजबद्दल अर्ज करतां येईल. कॉलेजकरितां फरासखाना मिळविण्याची खटपट केली. त्यासंबंधीं माझ्या एका युरोपियन मित्रानें आपण लॉर्ड सँढर्स्ट यांजकडे खटपट केली परंतु नकार मिळाला असे सांगितले. पुण्यांत आधींच दोन कॉलेजें आहेत यामुळें तिसऱ्या कॉलेजला सरकार मदत करूं इच्छित नाहीं असेंहि त्यांनीं मला कळविलें.

## ३६

### ८ डिसेंबर १८९८—जगन्नाथ मोरेश्वर सामंत, वकील, सोलापूर

सोलापूर येथील वकील मंडळी तुमची फार आभारी आहे. तुम्हास पाठविलेलें पत्र छापण्याकरितां नव्हतें, परंतु आतां छापलें तरी हरकत नाहीं. प्रॅटसाहेब हे स्वतः कोणा वकीलाशीं बोलले नव्हते. परंतु दावर वकील यांनीं प्रॅटसाहेबाचें नांव सांगून आपलें कार्य करून घेतलें. पार्शी लोकांनीं आपल्या धर्माध्यक्षाच्या अध्यक्षतेखालीं सभा भरवून भावनगरी यांना मानपत्र दिलें. परंतु चक्रदेव वकील हे सभेला गेले होते त्यांनी मानपत्राला विरोध केला. टाईम्सकडे या विरोधाचें पत्र आम्ही पाठविलें, परंतु त्यानें तें न छापता ब्राह्मण-ब्राह्मणेतर असा भेद काढून टीका केली.

## ३७

### २२ जानेवारी १८९९—टी. श्रीनिवास, मद्रास

माझें नांव तंजावर श्रीनिवासराव असें सांगितलें म्हणजे माझी ओळख तुम्हांला पटेल. मला वाटतें कीं इकडील महाराष्ट्रीय ब्राह्मणांनी एक संघ स्थापावा. म्हणजे त्याच्याद्वारें मराठी भाषेचा अभ्यास आणि सर्वसाधारणपणें संघटन अधिक होईल. तुमच्या वर्तमानपत्रांना इकडे कांहीं वर्गणीदार मिळवावे असें मनांत येते. तसें झाल्यास वर दर्शविलेल्या संघटनेला मदतच होईल. आणि तुम्हा महाराष्ट्रीयांच्या अंगचे देशाभिमान वगैरे गुणहि इकडील आम्हा लोकांत उतरतील.

## ३८

### ३१ जानेवारी १८९९—जी. परमेश्वरम् पिल्ले, संपादक, मद्रास स्टँडर्ड, मद्रास

मद्रासेस नुकतीच तुमची ओळख झाली. फार आनंद वाटला. या ओळखीचें रूपांतर स्नेहांत व्हावें अशी इच्छा आहे. तुमचें प्रेस कमिश्यावरील कॉंग्रेसमधील भाषण मी माझ्या मद्रास स्टँडर्डमध्यें छापलें आहे. क्वॉर्टरली रिव्हयुच्या ताज्या अंकांत हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रें या विषयावर मी एक लेख लिहिला आहे तो वाचाल काय ?

३९

**३ फेब्रुवारी १८९९—ग. बा. मोडक, कोल्हापूर**

येथील कॉलेजांत मला नोकरी मिळाली आहे. अजून बस्तान पुरें बसलें नाही. पण वडव्हाणपेक्षां बरें आहे. मी येथून मराठ्याकरितां बातमीपत्रें किंवा इतर मजकूर पाठवूं शकेन. हे संस्थान असल्यामुळें येथें सर्व खटपट अनेक प्रकारची फार चालते. अबुबकर याच्या खुनासंबंधानें प्रथम कोणास कांहीच माहिती कळली नाहीं. केडबा कुलकर्णी यांचें पत्र पहावयास पाठवावें. येथें नोकरी मिळाली तरी एखादी स्कॉलरशिप घेऊन जपानला जावें आणि कांच तयार करण्यासारखा एखादा धंदा शिकावा असें अजून मनांत येतें. स्कॉलरशिप मात्र शंभर रुपयाची तरी हवी. याविषयी तुम्हाला कोठें कांही खटपट करतां आली तर पहा.

४०

**३ फेब्रुवारी १८९९—ब. रा. उर्फ बाळासाहेब नातु, बेळगांव**

मराठा वर्तमानपत्राच्या बातमीदारानें मुलाखत घेतली त्याला हकीकत सांगितली. त्यातली कोणती छापावी न छापावी हे अण्णासाहेब पटवर्धन यांना विचारून ठरवावे. मी सरकारची माफी मागावी असें येथील कलेक्टर मला म्हणाले ही गोष्ट खरी आहे. पण तें तोंडीं असल्यामुळें कदाचित् नाकारतील तर खरें खोटें करणें अवघड जाईल. साहेब बोलण्याप्रमाणें कायम राहतील तर ठीक. परंतु हल्लीचे साहेब लोक पूर्वीच्यासारखे बाणेदार नाहीत. तुरुंगांत माझें वजन केलें तें दोनशें सहा पौंड होतें. हल्लीं तें २०८॥ इतकें भरलें. आपणा सर्वांनीं आम्हाकरितां फार खटपट चालविली त्याबद्दल आपले आभार मानावे तेवढे थोडेच आहेत.

४१

**६ फेब्रुवारी १८९९—रा. ब. वि. ना. पाठक, हेडमास्तर सर. हायस्कूल, पुणें**

एका मित्रानें मला असे सुचविले आहे कीं, जमशेटजी टाटा यांनीं उच्च प्रतीच्या संशोधनाची युनिव्हर्सिटी काढण्याकरितां तीस लक्ष रुपये देऊं केले त्याकरितां त्यांचें अभिनंदन करावें, आणि सरकारानें त्या कार्याला सढळ हातानें मदत करावी, अशा प्रकारचें लोकमत प्रकट करण्याकरितां पुणें शहरच्या नागरिकांची एक जाहीर सभा भरवावी. या विषयीं तुम्हांला काय वाटते ? या विषयीं गोपाळराव गोखले यांनाहि मी स्वतंत्रपणें लिहीत आहे. तुम्हीहि आपल्या स्नेहीमंडळींचा

सल्ला घेऊन कळवा. राजकुमार रणजितसिंगजी यांच्या पुण्यांतील सत्कारासंबंधानें कोल्हापूरच्या महाराजांनीं मजकडे शंभर रुपयांची वर्गणी पाठविली त्यांतली मजकडे उरलेली बाकी यासोबत तुमच्याकडे पाठवीत आहे.

### ४२

### ८ फेब्रुवारी १८९९—मुकुन्दराव गुर्जर, बडोदें

'सयाजी विजयां'त आधुनिक कवीस विनंति या मथळ्याखालीं एक जाहिरात घातली आहे. ती तुमच्या पाहाण्यांत आली आहे काय ? नसल्यास पहावी. ती दत्त कवी घाटे यांच्या सहीवर आहे. त्या विनंती-पत्राप्रमाणें तुम्ही घाटे यांना आपल्या कांहीं कविता पाठविल्यास ते फार आभारी होतील. केसरींतूनहि या प्रयत्नास आपण सहाय्यता द्यावी. घाटे यांच्या कविता कवि दत्त या नांवानें कोठें कोठें प्रसिद्ध झालेल्या तुम्ही पाहिल्या असतीलच.

### ४३

### २६ फेब्रुवारी १८९९—कर्नल ओमोर क्रे, रेसिडेन्सी बंगला, एडन

मी पुण्यास आलों होतों परंतु अंदाज होता त्याहून दोन दिवस आधीं मी पुणें सोडलें. यामुळें मला कोणाच्या गांठीं घेतां आल्या नाहींत. तुमची गांठ पडती तर बरें झालें असतें. पडली नाहीं याबद्दल वाईट वाटतें. कारण हिंदुस्थानांत मी यापुढे केव्हां येईन आणि तुमच्या आमच्या गांठीं केव्हां पडतील हें सांगवत नाही.

### ४४

### २७ फेब्रुवारी १८९९—अच्युत सिताराम साठे, चांदा, नागपूर

येथें मी आपल्या चुलत्याकडे आहे. त्यांना मी तुमचें पत्र दाखविलें. तुम्ही केलेल्या सर्व सूचना त्यांना पसंत पडल्या, आणि तुम्ही हें सर्व प्रांजलपणें लिहिलें याचे त्यांनीं फार कौतुक केले. त्यांचें म्हणणें मी आठ-दहा वर्षे सतत वकीली करावी. मी पुण्यास येईन तेव्हां तुमच्याशीं अधिक चर्चा करीन. तुम्ही 'नवरदेवाची जोडगोळी' हें नाटक प्रसिद्ध केलें, पण त्याची कांही बातमी आम्हाला लागू दिली नाही हें कसें ? असो; विविधज्ञानविस्तार, केरळकोकिळ, वगैरेंच्या टीकेच्या तावडींतून सुटता कीं काय तें पहावें. प्रो. शिवरामपंत परांजपे यांना

पत्र लिहून 'काळ'पत्राच्या योजनेविषयी त्यांचें अभिनंदन केलें आहे. टिळक सुटणार अशी बोलवा आहे. मग त्यांत तथ्य कितपत आहे कांहीं माहीत आहे काय? तुमचे ते दुसरे कृष्णाजीपंत हरि केळकर हे काय करीत असतात? त्यांनीं सभेंत राजद्रोहापर्यंत मजल नेली! शंकरराव लवाटे यांनाहि पत्र लिहिलें आहे.

४५

## १२ मार्च १८९९—प्रो. वि. गो. विजापूरकर, कोल्हापूर

साल अखेरचा वृत्तांत या सोबत तुम्हांकडे पाठवीत आहे. महिना दोनशें पृष्ठांचें मासिक पांच रुपये वर्गणीला देतां येईल. पण वर्गणीदारांची संख्या निदान एक हजार पाहिजे. आतांपर्यंत आम्ही नाहीं म्हटलें तरी साडेचार हजार पृष्ठें वर्गणीदारांना दिली. श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन यांनीं आपला ग्रंथ पुरा केला. दुसरा लिहीत आहेत. श्रीमंत अप्पासाहेब यांच्या ग्लॅडस्टनच्या चरित्राचीं १८० पानें आतांच लिहून झालीं आहेत. तरी या सर्वांसंबंधानें तुम्ही केसरींत लिहा. पुढच्या अंकापर्यंत लोकांकडून कांहीं उत्तेजन मिळालें तर त्याचा उपयोग त्यांत करतां येईल. याहून मतप्रसाराचा प्रसिद्धीचा तुम्हाला आणखी कांहीं मार्ग सुचल्यास कळवा. जाहिरातींपेक्षांहि केसरीतील परीक्षणानें आमचें काम अधिक चांगलें होईल.

४६

## ११ एप्रिल १८९९—म. रा. बोडस, मुंबई

हायकोर्टातील खटल्याबद्दल तुमचा माझा मतभेद दिसतो. माझ्या मतें कायद्याच्या दृष्टीनें न्या. मू. पार्सनस् यांचें म्हणणें बरोबर असून न्या. मू. रानडे यांचें म्हणणें बरोबर नाहीं. बाळकृष्ण चाफेकर याजवरचा पुरावा पहाता त्याला सात वर्षांहून अधिक शिक्षा मिळणें योग्य होणार नाहीं. चँपियन पत्रानें तर सर्व आरोपींना सरकारनें माफी द्यावी असें लिहिलें आहे. तसें मराठ्यालाहि अवश्य म्हणतां येईल. टिळक व त्यांचा पक्ष यांना कॉंग्रेसमधून हुसकून लावण्याचा मेथा प्रभृतींचा विचार दिसतो. मुंबई कमिटीचें हें धोरण, त्याला दोष देऊन, जनतेपुढें मांडलें पाहिजे. कोणत्या वर्तमानपत्रांत काय येतें यांत कॉंग्रेस कमिटीला लक्ष घालण्याचा

काय अधिकार ? सातान्याच्या कॉंग्रेस कमिटीकडून परस्पर अशा अर्थाचा ठराव करून मग पुणें कमिटीनेंहि त्याला दुजोरा द्यावा. म्हणजे मग कलकत्त्याच्या कमिटीलाहि जोर येईल. परांजपे यांच्या काळपत्रांत काय लिहिलें जातें त्याचें भाषांतर मला पाठवा.

४७

२ मे १८९९—हरि सिताराम दीक्षित, सॉलिसिटर, मुंबई

अर्ज हातीं येतांच त्याबरोबर एक पत्र लिहून रेल्वे एजन्टाकडे पाठवितों. मी हल्लीं या प्रश्नाचा विचार करीत आहे कीं तारमास्तर असोसिएशनच्या लोकांनीं राजिनामे दिले त्यामुळें त्यांनीं कांहीं गुन्हा केला असें होईल कीं काय ? तरी पिनलकोडचें कलम १६६ आणि रेल्वे ॲक्टाचें कलम १३७ ही वाचून त्यांचा विचार करा. या विषयीं बॅरिस्टरचा सल्ला घ्यावासा वाटेल तर आपण ब्रॅन्सन-साहेबाचा घेऊं.

४८

८ मे १८९९—हरि सिताराम दीक्षित, सॉलिसिटर, मुंबई

संपवाले तारमास्तर टिकून आहेत. ते असेच राहिल्यास कांहीं तडजोड होईल. तुम्ही आम्ही तयार केलेली तारमास्तरांची कैफियत टाईम्स व गॅझेट या दोन्ही पत्रांत छापिली आहे. मात्र टाईम्सनें त्यावर सडकून प्रतिकूल टीका केली आहे.

४९

११ मे १८९९—दोराबजी पदमजी, अध्यक्ष, पुणें शहर म्युनिसिपालिटी

वैद्य सॉलिसिटर यांजकडून पुणें नेटिव्ह जनरल लायब्ररीला देण्याच्या देणगीच्या अटींचा मसुदा हातीं आला. माझा मित्र तीन हजार रुपये देण्यास तयार आहे. त्यांतून वर्तमानपत्रें मासिकें यांच्या वर्गण्या पुष्कळ भरतां येतील. तो देणार ते दुसरे पंधरा हजार रुपये एन्डौमेन्ट फंड म्हणून ठेवण्यांत यावेत. त्याची इच्छा पुण्याची ही लायब्ररी संपन्न व चित्ताकर्षक करावी अशी आहे. तो गृहस्थ जून महिन्यांत विलायतेस जाऊं म्हणतो. तरी लायब्ररीच्या सभासदांची सभा ताबडतोब बोलवा. नाहींतर हातचें घबाड जाईल.

५०

१७ मे १८९९—हरि सिताराम दीक्षित, सॉलिसिटर, मुंबई

जी. आय्. पी. रेल्वे एजंट हा फार रागांत असून 'संपवाल्यांना चांगली शिक्षा लावतो,' असा निश्चय करून बसला आहे. उलट तारमास्तर मंडळीहि नेटानें टिकाव धरून आहेत. त्यांना आतांपर्यंत जनतेचें सहाय्य बरेंच झालें. संपावर कसरींत तुम्ही लेख लिहिला त्याचा फार उत्तम परिणाम झाल्याशिवाय रहाणार नाहीं. मी संपवाल्यांना सहाय्य करितों या विषयीं तुम्ही माझी स्तुति केली तिला मी पात्र नाहीं, पण ती वाचून अंगावर मूठभर मास चढले. मुंबईची जनता या संपाच्या प्रकरणांत लवकरच लक्ष घालील अशी चिन्हें दिसत आहेत.

५१

११ जुलै १८९९—ए. एफ्. वुडबर्न, कमिशनर, मध्यभाग, पुणें

परवां तुम्हाला पत्र लिहिलेच आहे. पुण्यांत कांहीं कामाकरितां माझा एक दोन दिवस मुक्काम होणार आहे. तरी उद्यां दुपारी कचेरींत येऊन मला भेटाल काय?

५२

२४ जुलै १८९९—म. रा. बोडस, मुंबई

मवाळ व नेमस्त पक्षांच्या पुढाऱ्यांची दिलजमाई होणें दुर्घट दिसतें. एकमेकांनीं एकमेकाला केलेल्या जखमा फार खोल आहेत. दोघांच्या धोरणांतहि महदंतर आहे. सरकाराकडे मागावयाचें तें दान म्हणून कीं हक्क म्हणून हाच मुख्य प्रश्न आहे. टिळक पक्षाच्या वर्तमानपत्रकारांनीं या मतभेदावर कमी भर व जोर दिला तरच कदाचित् दिलजमाई होईल. पण त्यांतल्या त्यांत या मत-भेदांना बगल देऊन कांहीं न लिहिलें तर अधिक बरें. कारण लिहावयाचें तर स्पष्टच लिहावें लागतें. थिओडर मॉरिसन यांचें पुस्तक मी तुम्हाला पाठविलें. त्यावर तुम्ही एखादी लेखमाला लिहावी. सार्वजनिक सभेविषयीं स्वतः टिळकांनाच वेगळें लिहीत आहे.

५३

२७ जुलै १८९९—ए. एफ्. वुडबर्ड, कमिशनर, पुणें

तुम्ही मराठा पाठविला तो पोचला. प्लेगच्या कारभाराविषयीं तुम्ही ज्या तक्रारींच्या उल्लेख त्यांत केला आहे त्यांतील एकच कलम सुधारण्याचें राहिलें आहे.

तें म्हणजे पुणें सोडून जाणाऱ्या प्रवाशांच्या सामानाचें शुद्धिकरण. मी शोध करता असें समजलें कीं, कांहीं उतारूंना या शुद्धिकरणाकरितां सबंध रात्र स्टेशनवरच काढावी लागली. पण अशी गोष्ट पुढें होणार नाहीं. हें शुद्धिकरण मात्र अजीबात बंद करता येत नाहीं. कारण आम्ही करितो तें व्हावें तितकें पुरें व कसून होत नाहीं, अशी उलट मुंबईचे लोक तक्रार करतात. तेव्हां आतां पुण्याचें ऐकावें कीं, मुंबईचें ऐकावें ? दोहोंकडून अडचणच. तथापि प्लेग कारभारा-संबंधानें लोकांच्या कोणत्याहि तक्रारी असतील त्या तुम्ही मला अवश्य कळवाव्या.

## ५४

## १५ सप्टेंबर १८९९—डॉ. आर. राव, एम्. डी., पुणें

प्लेग-प्रतिबंधक असें कांहीं औषध मी तयार केलें आहे; परंतु त्याची प्रसिद्ध-पणें वाच्यता मला इतक्यांतच करता येत नाहीं. माझी ही अडचण तुमच्या ध्यानांत आल्याचें तुमच्या ता. १२ च्या पत्रावरूनच दिसत आहे. तथापि उद्यां संध्याकाळीं सात वाजता तुम्ही मला नेपियर हॉटेलमध्यें येऊन भेटण्याची कृपा कराल तर माझ्या संशोधनाची माहिती व माझी उपपत्ति मी तुम्हाला मोठ्या आनंदानें दाखवीन. मात्र ती माहिती केवळ तुमच्या खाजगी उपयोगाकरितां आहे, प्रसिद्धिकरितां नाहीं असें समजावें.

## ५५

## २ ऑक्टोबर १८९९—हरि सिताराम दीक्षित, सॉलिसिटर, मुंबई

खडकाळा येथील खटल्यांत शिक्षा झालेल्या स्टेशनमास्तरच्या वतीनें कोणी मजकडे अद्यापि आलेले नाहींत. कदाचित् अपील करण्याचा त्यांचा विचार नसेल. नोकरींतून काढलेल्या तारमास्तरांचा प्रॉव्हिडंट फंड रेल्वे कंपनीकडून वसूल करण्याकरितां नमुन्याचा म्हणून एक दावा हायकोर्टांत लावण्यास मी तयार आहे. त्याकरितां फंड तयार आहे. परंतु ज्याचा प्रॉव्हिडंट फंड पांचशें रुपयाहून अधिक आहे असा कोणी तारमास्तर भंडारे यांनीं मजकडे पाठविल्यास मी तें काम लवकर सुरू करीन. तारमास्तर गिरण्यांतून काम करण्यास तयार होतील तर त्यांना पुष्कळ जागा मिळण्यासारख्या आहेत. कांहींनीं तें काम प्रथम पत्करलें पण तें फार कष्टाचें म्हणून पुढें सोडून दिलें.

५६

**२७ ऑक्टोबर १८९९—एन्. बी. वागळे, लंडन**

मी होऊन तुम्हास पत्र पाठवून तसदी देत आहे याबद्दल क्षमा करा. मी केसरी नेहमीं आस्थेनें वाचतों. मुंबई युनिव्हर्सिटीनें दिलेली फेलोशिप घेऊन मी गेल्या फेब्रुवारीत इकडे आलों. कांहीं उद्योगधंदा शिकावा अशी इच्छा आहे. इकडील सर्व वर्गांच्या लोकांत मी मिसळतों. तिकडे इंग्रज लोकांविषयीं आपणाला जी माहिती असते ती बरोबर नसते. येथे आल्यावर प्रत्यक्ष उलटसुलट म्हणजे अधिक बरेवाईट असें वस्तुस्थितीचे दोन्ही प्रकार कळतात. तरी त्याविषयी तुम्हाला हवे असेल तर केसरी-मराठ्यांत मी मधून मधून लिहीत जाईन. इकडील व्यापारी हिंदुस्थानांत जाहिराती देण्याला वर्तमानपत्र कोणती चांगली असें विचारतात. त्यांत मी केसरीचें नांव सांगितलें आहे. त्यांनीं कोणी लिहिल्यास विचारल्यास केसरी मॅनेजरकडून ताबडतोब उत्तर जाईल अशी व्यवस्था करा. कारण ही तत्परता न राखली तर इकडील लोकांकडून फार नांवें ठेवण्यांत येतात. परवांच सर जॉर्ज बर्डवुड यांच्या घरीं गेलों. तेथें पाहिलें तों स्वस्तिक, नक्षत्रमाला, देव्हाऱ्यांत देवतार्चन इत्यादिविषयीं पुष्कळ संभार मला दिसला! हा म्हातारा हिंदुधर्माचा मोठा भोक्ता आहे. त्यानें लिहिलेलें जगन्नाथ शंकरशेट यांचें चरित्र आल्फ्रेड वेब यानें नुकतेंच प्रसिद्ध केलें आहे. येथें मी करण्यासारखें कांहीं कामकाज असेल तर कळवीत जावें.

५७

**८ नोव्हेंबर १८९९—भा. रा. नानल, वकील, रत्नागिरी**

तुम्ही आपल्या पत्रांत मी दिलेल्या वचनाची आठवण केली ते लक्षांत आहे. परंतु रत्नागिरी मागसलेली यामुळें इकडून मराठ्याकरितां लिहून पाठविण्या-सारखे राजकीय स्वरूपाचे कांहीं नाहीं. तथापि तुम्ही होऊन कांहीं विषय सुच-वाल, नेमून द्याल, तर मी आनंदानें लिहीत जाईन.

५८

**२३ नोव्हेंबर १८९९—श्री. अ. छत्रे, कौन्सिल सभासद, बेळगांव**

म्युनिसिपल बिलाची सिलेक्ट कमिटी केव्हां बसणार कळत नाहीं. कमिटी-करिता आलेले कागदपत्र तुमच्या वाचनाकरितां पाठवीत आहे. कमिटीवर सरकारी

लोकांचेच बहुमत आहे. मी व गोकुळदास पारेख एवढेच दोघे स्वतंत्र सभासद आहों.

५९

**२३ नोव्हेंबर १८९९—बाबू मोतीलाल घोष, संपादक, अमृत बझार पत्रिका**

पुण्यांतील कोणी एक गृहस्थ मला बहुधा रोज पत्रें लिहीत आहे. त्यांवर नांव नसतें. त्यांतील मजकूर पुण्यांतील प्लेग अंमलदारांच्या जुलमी कारभाराविषयीं असतो. केसरींतील लेखांचाहि त्यानें उल्लेख केला आहे. तरी अशा जुलमाचीं उदाहरणें तुम्हास माहीत असतील तीं पाठविल्यास अमृत बझार पत्रिकेंत प्रसिद्ध करीन. मराठा येतच आहे पण केसरींतील टीकेचेहि भाषांतर पाठवीत जा. तात्पर्य या विषयाची सांगोपांग माहिती इकडे कळेल असे करा. पंडिता रमाबाई यांचा पत्ता कळवाल काय ? त्या यांत कांही लक्ष घालतील काय ? लोकांना सक्तीने शहराबाहेर रहाण्यास लावण्यानें निष्कारण जुलूम मात्र होतो. × × × × × × टिळकांचे माझे संबंध तुम्हाला माहितच आहेत. ते असे कीं, मी त्यांचा थोरला भाऊ व ते माझे पाठचे धाकटे भाऊ. त्यांच्या माझ्या दरम्यान गुप्त असें कांहींच नाही. म्हणून त्यांच्या खाजगी पत्रांतील मजकुराचाहि उपयोग योग्य तसा, त्यांची संमतीहि न घेता, करण्याचा मला अधिकार मिळाला आहे. पूर्वी कांहीं काळ मराठ्याचे संपादक केळकर म्हणून कोणी होते त्यांचे तुम्ही आप्त आहा काय ? कसेंहि असो, तुम्ही मराठा पत्र फार चांगल्या रीतीनें चालविता याबद्दल मी तुमचें अभिनंदन करितों. मराठ्यांतील लेखांचे उतारे मधून मधून पत्रिकेत घालीत जावें असें मी माझ्या दुय्यम संपादकांना सांगून ठेविले आहे. तुम्ही पुण्याचे आमचे बातमीदार म्हणून केव्हां केव्हां पत्रें लिहाल तर चांगलेंच. पण निदान मधून मधून तारा तरी पाठवाव्या. त्याकरितां तारखात्याकडे लिहून तुमचें नांव नोंदवून घेत आहे.

६०

**८ डिसेंबर १८९९—म. रा. बॉडस, मुंबई**

कोर्टांत येथील कांहीं वर्तमानपत्रांवरील खटला आज निघणार. बहुधा आरोपी माफी मागतील व ती स्वीकारली जाईल. तुम्ही लखनौ कॉंग्रेसला जाणार

काय ! या सोबत अमेरिकन वर्तमानपत्रांतील कांहीं कात्रणें मी पाठवीत आहे. त्यावरून पंडिता रमाबाई तिकडे काय बोलत आहे हें लक्षांत येईल !

६१

**२५ डिसेंबर १८९९—श्रीपाद अनंत छत्रे, बेळगांव**

या सोबत दोन पत्रें पाठवीत आहे. धारवाड जिल्ह्यांतील बामणहळ्ळी आणि इतर पस्तीस गांवें यांतील लोकांकडून ती आलीं आहेत. तिकडे शेतसाऱ्याची माफी तहकुबी सरकार मुळींच देत नाहीं. तरी त्यासंबंधानें काय करावें याविषयीं केसरी-मराठ्यांत लिहा. बाकी सरकार लाज वांटून प्यालें आहे. वर्तमानपत्रांत टीका आली म्हणून ते थोडेच मनावर घेणार.

६२

**? —गोपाळ कृष्ण गोखले, पुणें**

माझ्या इंग्रजी जाहीर पत्रकाचा सारांश तुम्ही केसरीकरितां तयार केला तो मी वाचला. पुष्कळ ठिकाणी तो असावा तसा नाहीं. तो वाचणारे लोक मनांत कदाचित् मला हंसतीलहि. तुम्हांला मी लिहितों याचें कारण मी तुम्हालाच मन-मोकळे करून लिहूं शकतों. त्या सारांशांत काय फेरफार करावें हें सुचविणें कठिण आहे. कदाचित् तो सारांश तुम्ही न द्याल तर बरें होईल. निदान तो प्रथम पुरुषी भाषेंत देऊं नका. तुम्ही काय करावें हे सुचविण्याचा मला अधिकार नाहीं. परंतु तुम्ही स्नेहभावानें खाजगी रीतीनें तो खुलासा पहाण्याकरितां मजकडे धाडला म्हणूनच मी हे इतकें तुम्हाला लिहूं शकतो.

६३

**१ जानेवारी १९००—डब्ल्यु हॉर्थॉर्न, सिनेगॉग स्ट्रीट, पुणें**

रँडसाहेबाच्या खुनाच्या वेळीं हिंदुस्थानांत व विलायतेंतहि अनेक पत्रें व लेख लिहून मी नातु बंधुबद्दल मतप्रसार केला हे तुम्हास माहीत आहेच. त्याबद्दल सरकारचा मजवर किती तरी रोष झाला. हल्ली ते सुटून आले आहेत. आणि माझ्या कंपनीनें याच वेळीं आपलें ऑफिस व काम बंद केलें यामुळें मी मोठ्या अडचणींत सांपडलों आहे. तरी नातु बंधुचे मित्र व माझे परिचित म्हणून मला पैशाची कांहीं मदत त्यांजकडून तुम्ही करविली तर मी आभारी होईन.

६४

**२५ जानेवारी १९००—डॉ. शरद्कुमार मलिक, कॉर्नवॉलिस स्ट्रीट, कलकत्ता**

मी परत येऊन 'नॅशनल मेडिकल कॉलेज' ही संस्था सुरू केली तिला पुष्कळ उत्तेजन मिळालें आहे. जूनमध्यें प्रवेश परीक्षा घेऊं तेव्हां पांचशेंपर्यंत विद्यार्थी संख्या जाईल असे वाटते. हल्लीं राष्ट्रीय भावना खूप जोरांत आहे. आणि तुमच्यासारख्यांच्या सहानुभूतीमुळें हिंदुस्थानच्या सर्व भागांतून विद्यार्थी येतात. तुम्ही पत्र देऊन पाठविलेल्या मुलासंबंधानें मी शक्य ती तजवीज करितों.

६५

**३० जानेवारी १९००—मादुभाई कर्सनजी, सॉलिसिटर, मुंबई**

निवडणुकीचा निकाल लागला व मी निवडून आलों. या कामीं टिळक, तुम्ही स्वतः, व तुमचे बंधु यांची मदत होऊन पुण्यांतील व पुण्याबाहेरील बरींच मतें मिळालीं. माझे वडिल व मी यांच्यावर तुमचे उपकार झाले. आपला स्नेह असाच वृद्धिंगत होवो.

६६

**९ फेब्रुवारी १९००—फ्रेडरिक ग्रब, लंडन**

आज एक पत्र मद्यपान-निषेधासंबंधीं, अँग्लो इंडियन टेंपरन्स संस्थेतर्फे, मराठ्याकरितां पाठविलें आहे. यापुढें आणखीहि पाठवीन. मराठ्याशिवाय इतर कोणत्या वर्तमानपत्रांना तीं पाठविणार नाहीं. या पत्रांकरितां मला तुमच्याकडून कांहीं घ्यावयाचें नाहीं. मी पाठविलेलें पत्र विल्यम केन, एम्. पी. यांस दाखवूनच पाठविलें आहे.

६७

**२३ फेब्रुवारी १९००—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा**

केसरी पत्रांत नाना फडणविसांच्या सांवत्सरिक उत्सवासंबंधानें कांहीं मजकूर आला आहे. त्यासंबंधीं माझी सूचना अशी कीं, या थोर पुरुषाविषयीं माहिती गोळा करून ती या प्रसंगीं छापावी. येत्या निधनतिथीच्या वेळच्या केसरींत मी नाना फडणवीसांचें चरित्र, हकीकती, उतारे इत्यादि सुमारें दहा

कॉलमपर्यंत लेख लिहूं इच्छितों. तरी या संबंधानें तुम्ही काय करूं इच्छिता तें कळवावें. नानांच्या हस्ताक्षराचा कट ( ब्लॉक ) हि मी पाठवून देईन.

६८

**२३ फेब्रुवारी १९००—दा. सा. यंदे, सयाजीविजय, बडोदें**

तुमचें गॅरिबाल्डीचें चरित्र लिहून तयार होतांच पाठवा. पारितोषिकाशिवाय तुम्हाला पुस्तकाच्या प्रती हव्या तितक्या मी पाठवून देईन. हल्लीं टिळक कोठें आहेत ? आमच्या ग्रंथ-मालेसंबंधानें टिळक केसरींत लिहिणार होते. परंतु ते विस्मरणानें अद्यापि राहिले असे दिसते. तरी त्याविषयीं तजवीज करावी. आमचे प्रिय मित्र मुकुंदराव गुर्जर हे मृत्यु पावल्यामुळें आमची बाजू तितकी लंगडी पडल्यासारखी झाली आहे. तरी ती उणीव भरून काढण्यासारखा कोणी मनुष्य मदतनीस तुमच्या प्रयत्नानें मिळूं शकेल काय तें कळवावें.

६९

**२३ फेब्रुवारी १९००—बाबू मो. घोष, संपादक, पत्रिका, कलकत्ता**

सँढर्स्ट गव्हर्नर यांच्या स्मारकाकरितां नेमलेल्या कमिटीचे एक चिटणीस म्हणून फेरोजशहा मेथा यांचें नांव घालण्यांत आलें आहे. याविषयीं टिळकांनीं त्यांना विचारलें तेव्हां मेथा यांनीं ती गोष्ट नाकबूल केली. टिळकांनीं मला सांगितलें कीं, याविषयीं मी केसरी-मराठ्यांत लिहविणार आहे. तरी याबद्दल तिकडील वर्तमानपत्रांत काय काय आलें आहे तें मला कातून पाठवावें.

७०

**२६ फेब्रुवारी १९००—अलियासिंग परिमाल, पाच्छापा कॉलेज, मद्रास**

माझ्या अनेक उद्योगामुळें मी आजारी पडलों आहे. नुकतेच अमेरिकेहून पंडिता रमाबाईचें एक व्याख्यान मजकडे आलें आहे. त्यांत हिंदुधर्म व तत्त्वज्ञान यावर त्यांनीं टीका केली आहे. त्याविषयीं ब्रह्मवादिन् मासिकाचे अमेरिकेंतील ऋणानुबंधी लोक कांहीं कांहीं तिकडून लिहून पाठवितात. सामाजिक सुधारणा व धर्म यांचा घोटाळा तिकडील लोक करतात. स्वतः अमेरिकन लोकांनीं फिलिपाईन्समध्यें कत्तली केल्या हे अमेरिकन लोकांच्या धर्मबुद्धीचें लक्षण म्हणावें काय ? किंवा अमेरिकन पुरुष, बायकांच्या पायाची आणि विधवांची पूजा करितात हा काय

त्यांचा धर्म म्हणावा ? युरोप अमेरिकेंत भ्रूणहत्त्या होते किंवा पाद्री लोक अनैतिक असतात हे काय ख्रिस्तिधर्माला भूषण म्हणावें ? बोलण्यांतलें ध्येय एक व आचरण दुसरें हा जगांतील न्यायच आहे. आमच्या इकडे स्त्रीला माता म्हणून आम्ही मान देतों तर तिकडे पत्नी म्हणून मान देतात. पंडिता रमाबाई ख्रिस्ती लोकांना सुधारील काय ?

७१

**२८ फेब्रुवारी १९००--डी. सी. फर्नांडिस, कोल्हापूर**

कर्नल रे यांच्या बदलीसंबंधानें इकडे बरेच कारस्थान चालू आहे. पुढील महिन्यांत कर्नल रे हे येथून जाणार इतकें मात्र निश्चित आहे. त्यांनीं आपल्यावर विषप्रयोग झाल्याचा बहाणा चालविला आहे. सेटलवाड हे खटला चालविण्याला उद्यां येथें येतील.

७२

**२८ फेब्रुवारी १९००—वासुदेव वामनशास्त्री खरे, मिरज**

पटवर्धनांच्या दप्तरांत मला जी माहिती मिळाली आहे तिजवरून नाना फडणविसांच्या चरित्रांत इतकी फिरवाफिरव करणें अवश्य झालें आहे कीं, तें चरित्र आतां पुनः नवीन लिहिलेलेंच बरें असें वाटूं लागलें आहे. शतसांवत्सरिक उत्स-वास आतां दिवस थोडे राहिले, व ज्या कागदपत्रांतून ही माहिती काढावयाची ते पुष्कळ आहेत. इतक्या सर्वांचें समालोचन करावयास आतां फुरसत राहिली नाहीं व माझ्या मागें नेहमींचे अनेक उद्योग आहेत. त्यामुळें वेळहि फार मिळणार नाहीं. तथापि आपण केसरीचा जादा अंक काढणार आहा त्यांत घालण्याकरितां नवीन माहितिवरून एक त्रोटक चरित्र तयार करून पाठवितों. मात्र तें आपण माझ्या सहीनिशींच प्रसिद्ध करण्यास कबूल असलें पाहिजे. फॅकसिमिलीकरितां आपणास एखादें अस्सल पत्र पाहिजे असेल तर तें देखील मजजवळ मिळेल. पण पुण्यास नानासाहेब मेणवलीकर यांच्याजवळहि कांहीं मिळतील.

७३

**१३ मार्च १९००—डी. सी. फर्नांडिस, कोल्हापूर**

मी मुंबईहून काल परत आलों. कर्नल रे हे मुंबईस तारीख ७ रोजीं होते. ती संधी साधून माझे सॉलिसिटर कामा यांनीं न्या. मू. रसेल यांच्यापुढें माझी

फिर्याद दाखल केली. परंतु प्रतिवादी कर्नल रे हे मुंबई हायकोर्टाच्या हद्दींत कायमचे रहात नाहींत या सबबीवर ती घेतली नाहीं. लगेच आम्ही अपील केलें. कोर्टानें नोटीस काढली. कर्नल रे रागानें ती घेत नाहीं म्हणाले. तेव्हां त्यांचे मित्र केनेडीसाहेब यांनीं त्यांना ती नोटीस न घेणें बरोबर नाही असें सांगितलें. मी येथें आल्यावर पोलिटिकल एजंटकडून इकडील माझ्या अर्जाचें उत्तर मिळालें.

७४

## २७ मार्च १९००—शं. बा. मुजुमदार, किर्लोस्कर मंडळी, पुणें

आपण मोकळ्या मनानें शारदा नाटकांतील पात्रांचें दोष दाखविले याबद्दल किर्लोस्कर मंडळीतर्फे मी आपले आभार मानतों. नाटकमंडळ्या वर्तमानपत्रकर्त्यांकडे बहुमानपूर्वक तिकिटें पाठवितात, त्याचा उद्देश इतकाच असतो कीं, नाटक-पात्रांचे गुणदोष आरशाप्रमाणें वर्तमानपत्रद्वारें प्रतिबिंबित होऊन, नाटकमंडळीस स्वतःच्या बुद्धीनें कदाचित् जे दोष न समजण्यासारखे असतील ते समजण्यांत यावेत. परंतु कांहीं कांही प्रसंगीं नाटकमंडळ्या व वर्तमानपत्रें दोघेहि आपापले उद्देश विसरतात. नाटक मंडळींना वाटतें कीं, या तिकिटानें वर्तमानपत्रांत फक्त आपली शिफारस आली पाहिजे. म्हणजे पत्रकर्त्यास लालूच या अर्थानें तिकिटाचा उपयोग आहे असे ते समजतात. पत्रकर्तेहि टीका करण्याच्या भरांत नाटकासंबंधीं मंडळीस काय सांगावयाचें तें विसरून जाऊन, आपलें नाटकशास्त्राचें अगाधज्ञान दाखविण्याचा हास्यास्पद प्रयत्न करतात. किर्लोस्कर मंडळीनें ' वीरतनय ' नाटक बसविल्यावर असलेच प्रकार फार झाले. सारांश टीका करतांना जितका अधिक सरळ हेतु असेल तितका नाटक मंडळीस फायद्याचा आहे. शारदा नाटक चार अंकपर्यंत जुळून दिसतें व पांचव्या अंकांत रंग कमी पडतो हा तुम्ही दाखविलेला दोष मंडळीस केव्हांच कळून चुकला आहे. परंतु तो दुरुस्त होण्यास आतां मार्ग नाहीं. आणखीहि जे दोष आपण दाखविले ते गायनपात्रें पेटीच्या स्वरावर फार अवलंबून असल्यामुळें झाले आहेत. तीं पात्रें इतर गोष्टींकडे पहात नाहींत. कवींना जसे कांहीं दोष क्षम्य आहेत तसेच संगीतपात्रांना असले कांहीं दोष माफ आहेत असा आमचा आम्ही कायदाच केला आहे ! आपण दाखवून दिलेले दोष मात्र शक्य तितकें सुधारले जातील.

७५

**३० नोव्हेंबर १९००—रघुनाथ पांडुरंग करंदीकर, वकील, सातारा**

'कालिदास' पत्राचे अपील दाखल झालें चांगलें झालें. पंडित मदनमोहन मालवीय हे अपील चालवीत नाहीं म्हणतात तें कां ? XXX मजकडे खर्चाचे शंभर रुपये शिल्लक आहेत. त्याचें काय करावें ? गुरुजी यांचें कुटुंब व त्यांचीं मुलें हीं अडचणींत आहेत. तरी त्यांना त्यांतील पन्नास रुपये किंवा शंभरच्या शंभर पाठवूं काय ? तुम्ही किती मंडळी लाहोरच्या काँग्रेसला जाणार ? येथून फणसळकर व आगाशे जात आहेत.

७६

**९ मार्च १९०२—जी. सुब्रह्मण्य अय्यर**

'हिंदु' पत्र सोडल्यानंतर दोन वर्षांनीं माझें स्वतःचें वर्तमानपत्र मी काढणार असें तुम्हास कळविलेलें आठवत असेलच. त्याप्रमाणें आतां 'युनायटेड इंडिया' नांवाचें स्वतःच्या मालकीचें वर्तमानपत्र मी काढलें आहे. त्याची जाहिरात यासोबत पाठवीत आहे. ती कृपा करून मराठा पत्रांत छापा आणि परत भेट म्हणून मराठा पत्र मला पाठवीत जा.

७७

**११ जून १९०२—प्रो. सिताराम केशव दामले, लष्कर ग्वाल्हेर**

मी हल्लीं ग्वाल्हेर येथें रहात आहे. माझा पूर्वींचा लेख छापलात याबद्दल आभारी आहे. दोन महिन्यांपूर्वी तुम्हाला एक लेख पाठविला होता त्यांत येथील दरबारांत उर्दू भाषेचें प्रस्थ माजल्यासंबंधानें तक्रार लिहिली होती. तिचा उपयोग होऊन हल्लीं उर्दूऐवजीं हिंदीचा उपयोग करण्याविषयीं माधवराव महाराज शिंदे यांनीं आज्ञापत्र काढलें आहे असें मला समजतें. आतां ही गोष्ट केवळ माझ्या लेखानें घडून आली असे मी म्हणत नाहीं. पण कोणच्याहि कारणानें कां होईना जें घडलें तें तुम्हाला कळविलें आहे. बोअर युद्धासंबंधानें कांहीं लेख मी पाठविले तर ते मराठ्यांत घालूं शकाल काय ? कळवावें.

७८

**२८ जून १९०२—रा. वि. पटवर्धन, अथेन्स, ग्रीस, युरोप**

आपलें १२ एप्रिलचें पत्र पोंचलें. तेव्हा मी अलेक्झांड्रिया येथें होतों. छत्रे यांच्या सर्कशीसंबंधानें केसरींत प्रशंसापर लेख आल्यानें प्रो. देवल यांनीं आतां सर्कस घेऊन चीन जपानकडे जाण्याचा विचार केला आहे. सर्कस इजिप्त-ला जाणार यासंबंधानें केसरींत कांहीं मजकूर आलेला दिसला नाहीं. देवल इतक्यांतच इंग्लंडला जात नाहींत. प्रथम माल्टा, इटली, आणि फ्रान्स येथें जाऊन वर्षाअखेर आपला युरोपचा प्रवास संपवितील.

७९

**१० जुलै १९०२—एन्. बी. वागळे, लंडन**

परवां इंडिया ऑफिसमध्यें एक सत्कारसमारंभ झाला त्याची हकीकत पाठविली आहे. मराठा पत्राचा प्रतिनिधि म्हणून मला निमंत्रण होतें. तें लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन, सेक्रेटरी ऑफ स्टेट, यांजकडून आलें होतें. मी मराठा पत्र त्यांना वाचावयास दिलें तेव्हां मी तें यापुढें वाचीत जाईन असेंहि त्यांनीं मला सांगितलें. लॉर्ड जॉर्ज हॅमिल्टन हा माणूस बाहेर लोकमत आहे तितका खरोखर वाईट नाहीं. आजपर्यंत स्टेट सेक्रेटरीचा पगार हिंदुस्थानच्या तिजोरीवर पडत होता तो यापुढें ब्रिटिश बजेटांत दाखल करून पार्लमेंटकडून मंजूर करून घ्यावा, अशाविषयीं विल्यम केन यांनीं त्यांच्यामागें टुमणें लावलें आहे व ती गोष्ट त्यांनीं मान्य केली आहे. काय घडतें तें पहावें. ही कल्पना विल्यम वेडरबर्न यांनीं पुढें आणली हे तुम्हास माहीत असेलच.

८०

**१३ नोव्हेंबर १९०२—श्री. गो. रानडे, युनिव्हर्सिटी, एडिंबरो**

परवां लॉर्ड रोजबरी यांची एक सभा झाली. त्या सभेला मी गेलों पण पैसे देऊनहि मनाजोगी जागा मिळाली नाहीं. शेवटीं वर्तमानपत्राच्या रिपोर्टरांना तेथें उत्तम जागा मिळाली असें पाहून युक्ति सुचली. तरी मला रिपोर्टर नेम-ल्याचें एक अधिकारपत्र पाठवा. त्याचा उपयोग करून सभेंत चांगली जागा मिळूं शकेल, आणि अशा सभांचीं वृत्तपत्रें तुम्हास पाठवीत जाईन त्यांचा मरा-ठ्यालाहि उपयोग होईल. ही योजना बरी नाहीं काय ?

८१

**२७ नोव्हेंबर १९०२—श्री. गो. रानडे, युनिव्हर्सिटी, एडिंबरो**

या सोबत ट्रान्सवालमधून आलेल्या एका वर्तमानपत्राचें कात्रण पाठवून देत आहे. त्यावरून दिसून येईल कीं गेल्या बोअर युद्धांत जे हिंदी लोक मृत्यु पावले त्यांच्या सन्मानाची व स्मृतीची कांहीं व्यवस्था सरकारानें केली आहे. साऊथ आफ्रिकेमध्यें आम्ही होतों, तेव्हां तेथील हिंदी लोक व डॉक्टर यांच्या-संबंधानें कॅप्टन पर्किन्स नांवाचा एक अधिकारी सरकारनें नेमला होता. तो सर्वांशीं भलेपणानें कसा वागत होता याचा मला पुष्कळ अनुभव आला. तो नसता तर आमची व्यवस्था चांगली झाली नसती. त्यानेंच आग्रह धरून हिंदी शिपायांकरितां हा स्मारकस्तंभ उभारण्याची योजना तडीस नेली. त्याची बदली हिंदुस्थानांत होणार आहे. आणि त्याची नेमणूक खुद्द पुण्यासहि होण्याचा संभव आहे असे मी ऐकतों. त्याच्यासंबंधानें वाटल्यास दोन शब्द आपल्या पत्रांत लिहावे. आमचा डेक्कन क्लब कसा काय चालला आहे ?

८२

**१८ मार्च १९०३—जी. कर्टिस, कमिशनर, पुणें**

हिराबागेजवळील तलावांत एक मोठी उद्यानभूमिका तयार करविण्याची योजना तुम्ही चालविली होती तिचें काम कोठवर आलें ? ती योजना तयार झाल्यावर त्या प्रकरणाचा लवकर निकाल करावा असे माझ्या मनांत आहे. यापुढें 'बदलून साऱ्याच्या' बाबतींत सरकार पुणें म्युनिसिपालिटीशीं सलोख्यानें व उदारपणानें वागेल असे मला वाटते. परंतु सरकाराकडून प्रत्यक्ष एखाद्या रकमेची मागणी कराल तर ती गोष्ट हिंदुस्थान सरकाराला विचारावी लागेल, आणि वेळ फुकट जाईल. कारण लँड रेव्हिन्यु हें खातें प्रांतिक व वरिष्ठ या दोन सरकारांच्या अधिकारांत विभागलेलें आहे हें तुम्ही जाणतांच.

८३

**५ ऑगस्ट १९०३—कॅप्टन दिनशा डी. खंबाटा, कँप, पुणें**

तुमचें पत्र मिळालें. तुम्हाला सुचलेली कल्पना मलाहि सुचली होती. म्हणून गेल्या मंगळवारीं गणेशखिंडींत सरकारी गार्डनपार्टी होती तिला गेलों

तेव्हां, मी महाराज साहेबांच्या प्रायव्हेट सेक्रेटरींची ओळख करून घेतली. आणि त्यांना आपल्या क्लबाला भेट देण्याची सवड होईल काय असे विचारले. सत्कार-समारंभाची सर्व जबाबदारी मी सर्व आपल्या शिरावर घेत आहे असे त्यांना सांगितले. प्रायव्हेट सेक्रेटरी भला माणूस दिसला. परंतु माझ्या पत्राचें उत्तर त्यांनीं अजून दिलें नाही. महाराज येणार असे झाले तर आम्हाला एक आठ-वडाभर आधीं कळणें आवश्यक आहे. आणि मुंबईहून पुणें कांहीं फार लांब नाहीं.

८४

## ६ जानेवारी १९०४—गो. कृ. गोखले, कलकत्ता

मला सी. आय. ई. हा किताब मिळाल्याबद्दल तुम्ही व विष्णुअण्णा विजा-पूरकर यांनीं मिळून तारेनें माझें अभिनंदन केलें याबद्दल फार आभारी आहे. कालच वर्तमानपत्रांत वाचलें कीं, पुणें सेशन जज्ज यांनीं टिळकांवर आलेल्या दोन आरोपांपैकीं एकांत त्यांना अपराधी ठरवून शिक्षा दिली. तें वाचून मला फार दुःख झालें. हा खाजगी स्वरूपाचा खटला म्हणजे टिळकांच्या जीवनांत त्यांच्या-वर आलेलें सर्वांत मोठें संकट असें मी समजतों.

८५

## ३१ जानेवारी १९०४—बॅ. एच्. ए. वाडिया, खडकी, पुणें

तुमचें पत्र महाबळेश्वरास पोंचलें. मी गुरुवारीं परत आलों तो कांहीं कोर्ट कचेरीच्या कामाकरितां. आतां मी मोकळा आहे. तरी सोमवारीं मंगळवारीं सवडीनें भेटावें. सर्व जातीचे व धर्मांचे लोक एकत्र जमून परस्परांचीं मतें परस्परास कळलीं व परिचय वाढला तर तें फार चांगलें. तरी तुम्ही याल त्यावेळीं या विषयावर आपण पुष्कळ मनमोकळेपणानें बोलूं.

८६

## २ फेब्रुवारी १९०४—कॅप्टन बी. डी. बसू, सातारा

'चतुर्भाषी' या नांवाचें एक मासिक काढावें असें माझ्या मनांत आहे. त्यासंबंधाचें प्रसिद्धीपत्रक या सोबत तुमच्याकडे पाठवीत आहे. मी प्रिन्सिपॉल रामानंद चतर्जी यांना लिहून असें कळवीत आहे कीं या मासिकापैकीं मराठी विभागाचें संपादकत्व तुम्ही (केळकर) आपल्याकडे घेण्यास तयार आहां. माझें

प्रसिद्धीपत्रक आपल्या स्नेहीमंडळींना दाखवा. येथील मित्रमंडळींशींहि मी याची चर्चा करणार आहे.

८७

४ फेब्रुवारी १९०४—एम्. विश्वेश्वरअय्या, इरिगेशन इंजिनिअर, पुणें

कालव्याखालीं भिजणाऱ्या जमिनीला पाणी देण्यासंबंधानं मी ब्लॉक सिस्टीम नांवाची नवी व्यवस्था केली व इरिगेशन कमिशननेंहि तिला पूर्ण संमति दिली. त्यावर कांहीं टीका केसरींत आली आहे असे मला समजलें. पण मला तुम्हाला असें खाजगी रीतीनें सांगावयाचें कीं तुम्ही स्वतः या नव्या व्यवस्थेचे गुणदोष समजून घेतल्याशिवाय अशी टीका न छापाल तर बरें होईल. माझी खात्री आहे कीं, तुम्ही हा विषय समजून घेतल्यास तुमचीहि खात्री होईल कीं ही व्यवस्था शेतकऱ्यांच्या दृष्टीनें चांगली आहे. ती अंमलांत आणतांना देखील मी कालव्यावर बागायती करणाऱ्या लोकांना समजावून देऊन त्यांची संमति घेतली होती. आणि मगच ती सुरू केली. म्हणून तुम्ही उद्यां ती समजावून घेतल्यावर तुम्हालाच या निष्कारण टीकेविरुद्ध लिहावें लागेल! उद्यां संध्याकाळीं पांचानंतर केव्हांहि तुमच्या सवडीप्रमाणें तुमच्या घरी येऊन भेटेन. बरोबर कागदपत्रहि आणीन.

८८

९ फेब्रुवारी १९०४—रामानंद चतर्जी, बँकुरा, बंगाल

'चतुर्भाषी' मासिकाच्या मराठी विभागाचें संपादकत्व आपल्या हातीं घेण्याला तुम्ही संमति दिल्याचें मेजर बी. डी. बसू यांजकडून कळलें व आनंद झाला. या मासिकांत वादग्रस्त असे राजकीय, सामाजिक, धार्मिक स्वरूपाचे कोणचेहि विषय घालावयाचे नाहींत. इतर म्हणजे मुख्यतः साहित्यिक विषय, गद्यपद्य, दोनहि प्रकारचे घालण्यांत येतील. पहिला अंक मार्च महिन्यांत काढावा म्हणतो. तरी प्रमुख मराठी लेखांपैकीं कांही निवडक उतारे सत्वर पाठवावे अशी विनंति आहे. मी थोड्या दिवसांकरितां इकडे आलों आहे, पण तुमचे पत्र व लेख मला किडगंज, अलाहाबाद, या पत्त्यावर पाठवावें.

८९

## १० फेब्रुवारी १९०४—नटेश अप्पाजी द्रवीड, यवतमाळ

इकडे कपाशीच्या व्यापाऱ्यांनीं केलेली कोंडी फुटली. फेब्रुवारीचे वायदे २५ तारखेपर्यंत निकालांत निघतील. आणि मग परिस्थिति अधिकच निवळेल. हल्लींच कापसाचे भाव खालीं जाऊन उमरा जातीच्या कापसांत २८५ पासून २५० इतकी घट झाली आहे. अर्थात् चढ्या भावानें खरेदी केलेल्या पुष्कळ लोकांचें नुकसान होईल. मी याविषयीं मराठ्यांत लिहिणारच आहे.

९०

## २७ फेब्रुवारी १९०४—गोपाळ कृष्ण गोखले, कलकत्ता

तुमचें कृपापत्र पावलें. युनिव्हर्सिटी बिल २१ मार्चपर्यंत चर्चेला निघत नाहीं. त्या आधीं सरकारी गुप्त बातम्या, कॉ-ऑपरेटिव्ह सोसायट्या, आणि पुराणवस्तु–संरक्षण या विषयींचीं बिलें चर्चेस निघतील. शिवाय वार्षिक बजेट आहेच. त्या संबंधानें मी अद्यापि एकहि ओळ वाचली किंवा लिहिली नाहीं. शिवाय मला कौन्सिलची बैठक समाप्त होईपर्यंत कलकत्त्याहून निघतां येत नाहीं. चालू बैठकींत काम फारच पडलें. आणखी वर वाईट वाटतें तें हें कीं, हल्लींच्या स्थितींत कौंसिलांत काम करणें व न करणें ही दोन्हीं सारखीच असें झालें आहे. कारण सरकार आमचें कांहींच चालू देत नाही. युनिव्हर्सिट्यांच्या सुधारणासंबंधानें सरकारचें धोरण इतकें वाईट आहे कीं त्याचा निषेध करावा तितका थोडा. लिहितां बोलतांना मनाची शांतीच राहूं शकत नाहीं. पण असें आहे म्हणूनच आम्ही लोकांनीं, आमच्या देशाच्या हिताकरितां, त्या प्रमाणानें अधिक परिश्रम केले पाहिजेत व आपल्यांत काय पात्रता व तेज आहे तें दाखविलें पाहिजे. एप्रिल १५ पर्यंत मला रजा देण्याविषयीं मी पुणें म्युनिसिपालिटीला पत्र लिहिलें. ती रजा मंजूर झालीच असेल. मला अशी भीति वाटते कीं यापुढें म्युनिसिपालिटीच्या अध्यक्षाचें काम मला करतां येणार नाहीं. म्हणून जूनअखेर त्या जागेचा राजीनामा

देण्याचा मी निश्चय केला आहे. कारण पुढील जुलै ते ऑक्टोबरपर्यंत मला काँग्रेसच्या कामाकरितां निरनिराळ्या प्रांतांतून हिंडावयाचें आहे.

### ९१

### ८ मार्च १९०४—दिनशा एदलजी वाच्छा, मुंबई

गेला मराठा वाचला. त्यांत तुम्ही टिळकांवर आलेल्या एकंदर संकटाचें वर्णन केलें आहे तें मनावर ठसणारें तर आहेच, पण शिवाय शांत मनानें, न्यायबुद्धीनें आणि युक्तिवादानें परिपूर्ण असेंहि आहे. मला वाटतें कीं त्या अंकाच्या पन्नास प्रती तुम्ही ब्रिटिश काँग्रेस कमिटीला विलायतेस पाठवाव्या. त्या डग्लस हॉल यांच्या नांवें पाठवा. तसेंच एक प्रत विल्यम वेडरबर्न यांच्या नांवें मेरिडिथ ग्लुसेस्टर या पत्त्यावर पाठवावी. टिळक पूर्णपणें निर्दोषी ठरले ही गोष्ट, आणि आमच्या एका स्नेह्याचे सत्यनिष्ठ व सरळ वर्तन, हें लोकांपुढें जितकें अधिक प्रसिद्धीला येईल तितकें इष्ट आहे. सर विल्यम वेडरबर्न यांना मी स्वतःहि वेगळें लिहिणार आहे.

### ९२

### ३ एप्रिल १९०४—जी. कर्टिस, कमिशनर, पुणें

हिराबागेजवळील तळ्यांत पार्क व उद्यानभूमि करण्याची तुमची योजना तुम्हाला मंजूर करवून घेतां आली याबद्दल आभारी आहे. माझ्यामागून माझ्या जागीं येणारे कमिशनर व कलेक्टर माऊंटफर्ड असे मिळून नऊ तारखेला जाग्यावर येऊं. तरी तुम्ही व इतर कोण येणार तेहि या.

### ९३

### ? १९०४—गोपाळ कृष्ण गोखले, पुणें

तुमचें पत्र व तुम्ही पाठविलेले ठराव पोंचले. कुमठेकर यांच्याशीं मी चर्चा केली; त्याप्रमाणें ते स्टेटमेन्ट करून तुम्हाकडे देतील. किंवा तुमचा ठराव कार्यक्रम-पत्रिकेवर घालतील. तुम्ही मॅनेजिंग कमिटीवरील आपल्या जागेचा राजीनामा पाठविला आहे, पण मी म्युनिसिपालिटीचा अध्यक्ष आहे तोपर्यंत तरी

तुम्ही हा राजीनामा देण्याचा आग्रह करूं नये. आणि म्युनिसिपालिटीला तुमचा जो उपयोग होत होता त्यांत उणेपणा आणूं नये. फार तर तुम्ही मार्केट-कमिटीवरील जागेचा राजीनामा द्यावा व तेवढा मी सभेपुढें ठेवीन. तथापि त्याचीहि गरज नाहीं. मी पुण्याहून जाईपर्यंत तुम्ही दोन्ही राजीनामे तहकूब केल्यास मला आनंद होईल.

## १४

### ?　　—वि. का. राजवाडे, मुंबई

आपण गेल्या जानेवारीपासून ऐतिहासिक पत्रें लिहून काढणाऱ्या कारकुनाचा पगार म्हणून दर महिना पंधरा रुपये पाठविता त्याबद्दल अमुक काम झालेंच पाहिजे अशाबद्दल मी आपल्याला जबाबदार आहे किंवा काय तें कळवावें. आज माझ्या वयाला चाळीस वर्षे झालीं. मी कोणाला जबाबदार नाहीं, व पुढें होऊं इच्छित नाहीं. तेव्हां आपल्याला एवढीच विनंति कीं, पंधरा रुपयांचें काय केलें असा जबाब वर्षांअंतीं आपण मला विचारणार असल्यास मला आपले पंधरा रुपये नको. बाकी जबाब विचारण्याचा संकल्प नसल्यास पंधरा रुपयांचें काम काय झालें तें ऐतिहासिक पत्रांच्या प्रकाशनावरून कळून येईल. मी वारंवार दोन दोन चार चार महिने फिरतीवर असतो. त्यामुळें लेखक बंद ठेवावा लागतो. कारण लेखकाला मोडी शुद्ध व खरें वाचतां येत नाही. स्वतः लेखकाकडून पत्रें वाचून घेऊन किंवा स्वतः सांगून लेखकाकडून लिहून घ्यावयाचें असतें तेव्हां माझी स्वतःची हजेरी लेखकापाशीं असावी लागते. सबब लिहावयाचें काम वेळोवेळ तहकूब राहील असा अनुभव येत आहे. तेव्हां आपली मर्जी असल्यास पंधरा रुपये चालू ठेवावें; नसल्यास बंद करावें. म्हणजे तुमच्या आमच्या मधला गोडपणा कायम राहील. पत्रोत्तर जलद व निश्चित यावें. भीड बिलकूल धरूं नये. माझ्या स्वतःखेरीज इतर कोणाला मी जबाबदार होऊं इच्छित नाहीं. काम करावयाचें हा निश्चय आहे. तें काम स्वतःच्या सोईनें उत्तम होतें असा अनुभव आहे. दुसऱ्याची सोय बघून भागत नाहीं म्हणून लिहिलें आहे. आपण मदत करण्यास तयार झाला हे आपणास योग्य आहे. परंतु

ती मदत माझ्या सोईला जुळेल अशी असल्यास घेतां येईल, हे वरील माहिती-वरून ध्यानांत येईल. कळावें बहुत काय लिहिणें लोभ करावा ही विनंति.

९५

? —वि. का. राजवाडे, मुंबई

आपल्या पत्राचें उत्तर पाठविण्यास उशीर लागला याबद्दल क्षमा करावी. एकंदरींत विचार करतां, आपण मला जे पंधरा रुपये पाठवीत होता ते 'महाराष्ट्र इतिहासा'कडे अवश्य पाठवावें. मला त्याचा विनियोग जसा करतां यावा तसा येणार नाहीं हे उघड आहे. आतांपर्यंत मजकडे आपण १०५ रुपये पाठविले. पैकीं १५।२० रुपये अद्याप खर्चण्याचे राहिले आहेत तेहि रा. गद्रे यांच्याकडे पाठ-वितो. बाकीचे रुपये दोन कारकून एका पाठीमागून एक ठेवण्यांत व अनुभव घेण्यांत गेले. मी आजच वीस रुपये रा. गद्रे यांच्याकडे भरण्याची व्यवस्था करतों. यापुढें मला मदत करण्याच्या भानगडींत आपण बिलकूल पडूं नये. मी अव्यव-स्थित एकली माणूस आहे व इतर माणसें निभावून घेण्याचें माझ्या हातून होत नाहीं. ऐतिहासिक पत्रें १५ नाहीं १५०० रुपये पगार देऊनहि शुद्ध लिहि-णारा मनुष्य मिळणें अशक्य आहे अशी माझी खात्री झाली आहे. सबब आप-णांस लिहिलें आहे. आपली कळकळ निःसंशय मनापासूनची आहे. परंतु त्या कळकळीचा उपयोग करून घेण्याचें माझ्यांत नाहीं हें मला मान्य आहे. रा. भावे येथें आले आहेत. त्यांना दोनचार मोरोपंतांचीं नवीन रामायणें सांपडलीं आहेत. ते तीं जमल्यास छापावयास देणार आहेत म्हणतात.

९६

आषाढ शुद्ध १ शके १८२७—वि. का. राजवाडे, मुंबई

पत्र पावलें. पारसनीस किंवा मावजी शेट यापैकीं कोणीहि रा. घारपुरे, हाय-कोर्ट वकील, आंग्रेवाडी गिरगांव यांच्या येथें सर्व कागद जुलै दहा तारखेच्या आंत वाटेल त्या दिवशीं आणून मोजून दिले तरी चालतील. ते दिवस सांगतील त्या दिवशीं मी हजर राहीन. मात्र कागद सर्व असावें. मागें सर्व कागद नव्हते. कांहीं कागद मुळींच नव्हते. सुमारें ५०च होते म्हणून तेव्हां कागद घेतले नाहींत.

९७

**आषाढ वद्य ७ शके १८२७—विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, मुंबई**

आपल्या येथें पुण्यास पत्रें घेऊन पारसनीस येतील त्या दिवशीं मी तेथें येतों. म्हणजे पत्रें मोजून घ्यावयाला बरें. रा. मावजी यांच्या येथें निदान सहा वेळां पारसनीसांच्या हातून पत्रें मोजून घेण्यास मी गेलों. परंतु ठरल्याप्रमाणें ते हजर नसत. कांहींतरी सबब काढून बाहेर जात. पन्नास साठ पत्रें त्या वेळीं नव्हतीं. तीं पत्रें व इतर सर्व पत्रें रा. पारसनीस यास घेऊन येण्यास आपण सांगावें व मला कळवावें. म्हणजे मी नेमल्या वेळीं निखालस पुण्यास येतों. स्वतः पारसनीस पत्रें न्यावयाला जसे तीनदां आले व नानांना घेऊन आले तसेंच पत्रें द्यावयालाहि पारसनीसच आले पाहिजेत. नाहींतर टपालांतून वाटतील तेवढींच पत्रें ते पाठवून देतील व पुढें नामानिराळे होतील. पत्रें मी देत नव्हतों. परंतु केवळ नानांच्या आग्रहास्तव दिलीं. तरी आतां तुम्हांला त्रास देणें भाग आहे. त्याला निरुपाय आहे. पत्रांची याद येथें मजजवळ नाहीं. पुण्यास येतांना कोल्हापुराहून ती मागवितों. त्याप्रमाणें पत्रें असलीं म्हणजे माझें कांहीं म्हणणें नाहीं. पारसनीसांनीं पत्रें नेलीं तीं नीट जपून ठेविलीं असतील असें गृहीत धरतों. ( जनान्तिकम् ) रा. पारसनीस यांनीं राजोपाध्ये यांचीं ऐतिहासिक पत्रें कांहीं कोल्हापुरास व कांहीं कलकत्त्यास म्युझियममध्यें, स्वतःला मोठेपणा मिळविण्याकरितां, पाठविलीं असावीत, कायमची पाठविलीं असावीत, असा मला संशय आहे !

९८

**१२ जानेवारी १९०५—श्री. कृ. कोल्हटकर, तेल्हारा, वऱ्हाड**

पंचांग-शोधनासंबंधाचा निर्णय मला मान्य होण्यासारखा नसल्यामुळें त्याविषयीं लेख लिहिण्यापुरता उत्साह माझ्या अंगी नाहीं. केतकर यांचा करणग्रंथ पंचांगें तयार करण्याच्या कामीं आधारभूत धरण्याच्या योग्यतेचा असतां, नवीन करणग्रंथ करण्याचा ठराव झाला हें चांगलें झालें नाही. तरी पण टिळकांच्या मध्यस्थीनें नवीन बीजसंस्कार घेण्यासंबंधानें हिंदुस्थानांतील प्रमुख ज्योतिष्यांचें एकमत झालें ही गोष्ट त्यांना व एकंदर महाराष्ट्राला फार भूषणप्रद आहे. मात्र युरोपियन ज्योतिष्यांनीं पन्नास शंभर वर्षे वेध घेऊन ठरविलेल्या ग्रहांच्या गतींत आपले हिंदु ज्योतिषी, सदोष यंत्रांच्या जोरावर थोडे दिवस वेध घेऊन, काय काय

सुधारणा करणार आहेत न कळे! या उपद्व्यापीपणामुळें आपणांतहि थोडेसें कार्य-कर्तृत्व येईल असें मात्र वाटतें.

९९

**२४ फेब्रुवारी १९०५—एम्. विश्वेश्वरअय्या, इंजिनिअर, मुंबई**

माझी बदली मुंबईस झाली ती तात्पुरती आहे. पुण्याचा पाणीपुरवठा व ड्रेनेज यांच्याशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. तथापि पुढें केव्हांहि त्या कामासंबंधानें मजकडे जबाबदारीची कामगिरी आली तर, तुम्ही व पुणें म्युनिसिपालिटी यांची मला सर्वसाधारणपणें मदत होईल. तीच गोष्ट पुण्याकडील इरिगेशनचें काम किंवा इतर एखादें सार्वजनिक काम ह्याविषयीं समजावी. सरकारी अधिकाराचें तंत्र संभाळून जितक्या गोष्टींची खुलासेवार चर्चा मला तुमच्याशीं अगर इतर कोणाशीं करतां येईल तितकी मी करीन. मात्र माझे हेतु व माझीं कारणें यांची पूर्ण माहिती झाल्याशिवाय मी एकाद्या गोष्टीला विरोध केला तर तुम्ही रागावूं नये. म्युनिसिपल निवडणुकींत तुम्ही निवडून येणार आणि तिच्या कारभारांत प्रमुखपणें भाग घेणार हे पाहून मला आनंद होतो.

१००

**६ मार्च १९०५—गोपाळ कृष्ण गोखले, कलकत्ता**

म्यु. निवडणुकीचा अखेर निकाल लागल्यावर, सेक्रेटरी कुमठेकर यांच्याकडून सर्व यादी माझ्या हातीं आल्यावर, मुंबई सरकारनें ज्या लोकांना नेमण्याची शिफा-रस करावयाची ती मी येथून करीन. तुम्ही पाठविलेल्या नांवाची यादी पोंचली. विलायतेंतील 'इंडिया' पत्राला वर्गणीदार गोळा करण्याचें काम मी हातीं घेतलें आहे त्यांत कांहीं काम गोपाळराव जोशी यांच्याकडे दिलें आहे. आणि बंगाल सुद्धां इतर प्रांतांतून हिंडण्यास सांगितलें आहे. ते विनंतिपत्राचे मसुदे वगैरे तुम्हास दाखवितील ते छापवून घ्यावे. मुंबई व मध्यप्रांत या भागांत स्वतः तुम्हीं पत्रें देऊन गोपाळराव जोशी यांच्या कामांत मदत करावी.

१०१

**२ मे १९०५—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा**

मे महिन्यांत सातारा येथें विद्याव्यासंगी महाराष्ट्र भाषाभिमानी मित्र-मंडळीचें संमेलन करावें असें येथील प्रमुख मंडळींनीं योजिलें आहे. आपला विद्या-

व्यासंग सर्वश्रुत असून आपण महाराष्ट्रभाषेची चांगली सेवा केली आहे व करीत आहां. म्हणून आपण ह्या संमेलनास येण्याची कृपा करावी अशी आमची फार इच्छा आहे. १७ ते २० ह्या संमेलनाच्या तारखा ठरविल्या आहेत.

१०२

२२ जून १९०५—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा

राजवाडे यांनीं दिलेले कागद मुंबईस शेट पुरुषोत्तमदास यांच्या बंगल्यांत आहेत. प्लेगमुळें शेटजी चार-पांच महिने बाहेर आहेत. यामुळें आणि राजवाडे यांची पुनः भेट न झाल्यामुळें कागद राहून गेले आहेत इतकेंच. हे कागद आम्हास आपल्याजवळ ठेवण्याची बिलकूल इच्छा नाहीं. राजवाडे यांनींच ते व इतर शिवकालीन कागद छापून प्रसिद्ध करावेत. त्यांच्या एका ग्रंथाचा खर्च देण्याचा शेटजींचा हेतु आहे. असे असतां राजवाडे हे आपल्या मनांतील कलुषित ग्रह सोडीत नाहींत याबद्दल दिलगिरी वाटते. शेटजी हे महिन्याचे अखेरीस मुंबईस जातील. त्यावेळीं राजवाडे त्यांना भेटल्यास समक्ष त्यांना कागद देण्यांत येतील किंवा तुम्ही सांगत असाल तर तुम्हांकडे कागद पाठवू.

१०३

६ जुलै १९०५—शंकर बापूजी मुजुमदार, जमखिंडी

जमखिंडी येथें आलों आहोंत. नंतर मिरजेस आठ दिवस काढून किर्लोस्कर मंडळी पुण्यास येईल. ह्या खेपेस मंडळींतील एक दोन पात्रें मेलीं म्हणून आमच्या येण्यासंबंधानें पुणेकरांना आम्हा मंडळीपेक्षांहि अधिक भीति वाटत आहे; पण ती निराधार आहे. घोडा मैदान जवळच आहे. एका बाबतींत आपला सल्ला विचारतों. किर्लोस्कर मंडळी अस्तित्वांत येऊन बरोबर पंचवीस वर्षे झालीं. पूर्वी जी मंडळी कंपनीत होती ती आतां नाहींत व आतां आहेत ती अशीच पुढें पंचवीस वर्षे पुरतील असे नाहीं. तरी यापुढें गाणारी होतकरू तरुण ग्रॅज्युएट किंवा सुशिक्षित मंडळी कंपनीत घ्यावी असा विचार आहे. त्यांना योग्यतेप्रमाणें प्रथम चाळीस ते शंभर रुपये पगार देऊं, व दोन हजार रुपयांचा विमा उतरूं. मुलांच्या शिक्षणाचीहि व्यवस्था कंपनींत केली आहे. मुलांना प्रथम शिक्षण देऊन पगार देऊन काम सांगू. मंडळींतील लोकांना छापखाना, फोटोग्राफी, जरीचीं कामें इत्यादि शिकवून त्यांना पगाराशिवाय आणखी कांहीं देऊ. शिवणकाम व पेंटिंग हीं कामेंहि

शिकवूं. कांहीं लोकांना तरी सरकारी नोकरीपेक्षांदेखील किर्लोस्कर मंडळींत काम करणें अधिक फायद्याचें होईल असे मला वाटते. तरी याविषयीं आपला अभिप्राय कळवावा.

१०४

**२२ जुलै १९०५—बा. ना. भाजेकर, हायकोर्ट वकील, मुंबई**

विधवापुनर्विवाहासंबंधानें उभय विचारांच्या पुढाऱ्यांत कांहीं समेट व एकमत होईल की काय याविषयीं तुम्ही, मी व बोडस यांनीं काल चर्चा केली ती टिळकांना सांगा. ही चर्चा वर्तमानपत्रांतून होऊं नये हें टिळकांचें म्हणणें योग्य आहे. पुनर्विवाहपक्षाचे कांहीं पुढारी अशा प्रकारचा समेट करण्यास तयार आहेत. निदान त्यांपैकीं मी एक तरी तयार आहे हें कळवितों. तुम्ही या चर्चेंत भाग घेण्यास तयार आहां, आणि एकमतानें कांहीं ठरेल तर तें तुम्हालाहि इष्ट वाटते, हें ऐकून पुष्कळ लोकांचें समाधान झालें.

१०५

**२६ जुलै १९०५—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, तेल्हारा, वऱ्हाड**

बक्षिसाच्या बाबतींत बाबाजीराव राणे यांनीं पटवर्धनांची निराशा केली ही हकीकत आपणास माहीत आहेच. त्यासंबंधानें केसरींत प्रसिद्ध करण्याकरितां त्यांचा एक लेख सोबत पाठवीत आहे. नाटक मंडळ्यांनीं केवळ जाहिराती देऊन अनेक नाटकें मागवावीं व नंतर सर्वांच्याच तोंडाला पानें पुसावीं ही गोष्ट फार अयोग्य आहे. या प्रश्नास एकप्रकारें सार्वजनिक महत्त्वहि येतें. तुम्ही सौंदर्य-शास्त्र या विषयावर पुस्तक लिहिणार होता त्याचें काय झालें ?

१०६

**२२ ऑगस्ट १९०५—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, तेल्हारा, वऱ्हाड**

पटवर्धन यांनी राणे यांना परस्पर पत्र पाठविल्यानें हें प्रकरण विकोपास जाण्याचा संभव आहे. बेअब्रुच्या फिर्यादींत कांहीं निष्पन्न होण्यासारखें नाहीं. किर्लोस्करांच्या चरित्रावरील माझ्या टीकेसंबंधानें आपलें व गोविंदराव देवल यांचें बोलणें झालें असें आपण लिहिलें. तें काय झालें हें कळवितां येईल काय ? कारण या टीकेंत त्यांना लागण्यासारखा बराच मजकूर होता. त्यामुळें देवलांना राग आला असेल असे वाटते. हरिभाऊ आपटे यांच्याकडे माझा लेख रजिस्टर्ड पोस्टानें पाठ-

वून पंधरा दिवस झाले तरी प्रुफ-शीट नाहीं किंवा पत्रहि नाहीं. लेखहि परत येत नाहीं. करमणूक पत्राच्या कचेरींत फार अव्यवस्था आहे असें दिसतें. असो. किर्लोस्कर मंडळींतील भांडणाचें अलीकडील स्वरूप विशेष कांहीं कळलें असल्यास मला जरूर कळवावें. कंपनीचे खेळ पुणें येथें चालू आहेत काय ? तेल्हारा येथील कोर्ट बंद झाल्यामुळें येत्या शनिवारीं मी सर्व मंडळींसह खामगांवास जाण्यास निघेन. औरंगाबादेच्या दत्रक प्रकरणाचें दिवाणी काम पुढें चालावयाचें असल्यास इकडे साक्षीकमिशनकरितां याल तेव्हां आपली भेट होण्याचें प्रसंग बरेच येतील अशी आशा आहे.

१०७

### ३० ऑगस्ट १९०५—दत्तात्रय बळवंत पारसनीस, मुंबई

आपण लिहिल्याप्रमाणें सर्व कागदपत्र साताऱ्याहून आपणांकडे पाठवीन. त्यांतील एकहि गहाळ झाला नाहीं. विसुभाऊ राजवाडे यांच्याशीं प्रसंग असल्या-मुळें मी विशेष काळजी घेऊन कागद संभाळून ठेवले आहेत. डॉ. देशपांडे यांचे चिरंजीव बापूराव यांना वऱ्हाडमध्यें वाशीम येथें शंभर रुपयांची मुन्सफीची जागा मिळाली ही आनंदाची बातमी तुम्हाला कळवितों. तुमचे नाना असते तर त्यांना हें ऐकून फार आनंद झाला असता. त्यांच्यामध्यें जें प्रेमळ अंतःकरण होतें तसें थोड्या ठिकाणीं दिसून येतें.

१०८

### २ सप्टेंबर १९०५—बॅ. एस्. सच्चिदानंद सिंह, अलाहाबाद

पूर्वीच्या युद्धानंतर आतां तुमच्याशीं तहाचें बोलणें करतों. आणि जपाननें रशियाला ज्या सवलतीच्या अटी दिल्या तशा उदारपणाच्या अटी तुम्ही मला द्याव्या. तुम्हाला माहितच आहे कीं केवळ सार्वजनिक हितदृष्टीनें मी 'हिंदुस्थान रिव्ह्यु' हें मासिक चालविण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आहे. तरी या संकटकाळीं एखाद्या मराठ्या सरदाराप्रमाणें तुम्ही माझ्या मदतीला धांवून येणार नाहीं काय ? किती तरी वर्षांत तुम्ही लेख पाठविला नाहीं. पूर्वी लेख पाठविले म्हणाल तर ते क्रायस्थ समाचाराला. हिंदुस्थान रिव्ह्युला कोठें पाठविले ? मी हा सूक्ष्म भेद करतों पण तुम्हीहि कायदेपंडित असल्यामुळें तुम्हाला तो कळेलच. टिळकांनाहि लेख पाठविण्याला मी लिहिलें आहे. पण ते कसचे लिहितात ! तरी

तुम्ही पूर्वी त्यांच्याकरितां कोर्टापुढें जशी वकिली केली तशी आतां माझ्याकरितांहि त्यांच्याकडे करणार नाहीं काय ?

१०९

**५ सप्टेंबर १९०५—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव, वऱ्हाड**

पटवर्धन यांच्यावर बाबाजीराव राणे यांनीं मुंबईस बेअब्रुची फिर्याद दाखल केली. त्या कामीं पटवर्धन यांना द्रव्य–सहाय्य करण्याची खटपट मी करीत आहे. या कामाकरितां मुंबईस येईन तेव्हां तुमची गांठ पडेलच. केसरींतील पत्र निनांवी असल्यामुळें त्याचा लेखक सिद्ध करण्याकरितां तुम्हाला किंवा कदाचित् टिळकांनाहि साक्षी-समन्स निघण्याचा संभव आहे ! बालगंधर्व हा किर्लोस्कर मंडळींत दाखल होणार होता तो दाखल झाला काय ? याविषयीं तुम्हाला माहिती असल्यास कळवावी. शंकरराव मुजुमदार आणि किर्लोस्कर मंडळींतील त्यांचे प्रतिपक्षी यांच्याकडून मजकडे अद्यापि लिहून आले नाहीं. आणि माझा सल्ला विचारल्याशिवाय आपण होऊन तो देणें किंवा मध्यस्थीची तयारी दाखविणें यांपैकीं कोणचीहि गोष्ट न करण्याचें मीहि ठरविलें आहे.

११०

**६ सप्टेंबर १९०५—हरिश्चंद्र ए. तालचेरकर, मुंबई**

सोबत कागदपत्र पाठवीत आहे. त्यांत ‘ कल्चर ’ मासिकांतील १८८८ सालचे दोन उतारे आहेत. हें मासिक ब्राह्मो समाजाचें मुखपत्र होतें. तें हल्लीं बंद आहे. तसेंच सुबोधपत्रिकेचा १८८८ सालांतील २१ आक्टोबरचा अंक पहा. डॉ. भांडारकर यांनीं नुकतेंच एका फ्रेंच गृहस्थाजवळ हिंदी नैतिक-जीवनासंबंधानें अनुदार उद्गार काढले असा लोकांचा समज आहे. “हे उद्गार डॉ. भांडारकर यांनीं काढलेले नाहींत आणि डॉ. साहेबांच्या प्रतिपक्षांनीं उगीच ते त्यांना चिकटविले आहेत” असें म्हणून ते प्रतिपक्षावर बरीच टीका करीत आहेत. तरी वरील उतारे वगैरे पाहिल्यास फ्रेंच गृहस्थाजवळ काढलेले उद्गार डॉ. भांडारकर यांनींच काढले या तुमच्या समजुतीचें समर्थन होणारे आहे.

१११

**२२ सप्टेंबर १९०५—रघुनाथ पांडुरंग करंदीकर, वकील, सातारा**

अजून बनारसची काँग्रेस व्हावयाची आहे. विलायतेस जाणाऱ्या डेप्यु-

टेशनचे ठरावयाचे आहे. त्यांत जाणाऱ्या लोकांना खर्च फार येणार. पण मी जावयाचें ठरल्यास त्याचा खर्च करण्याचा मूर्खपणा माझा मी एकटाच करीन ! दुसऱ्या कोणावर तो बोजा न पडावा. मी स्वतःचा खर्च करून जाण्यास तयार आहे एवढ्याच गोष्टीकरितां माझी वाहवा करू लागले आहेत. जमल्यास शिष्ट-मंडळांत माझा समावेश करून घेण्याची मी खटपट करीन. मराठा पत्रानें माझी स्तुति केली तीहि कदाचित् मी आपलाच खर्च करून जाण्याचें ठरविलें म्हणून तर नसेल ना ? मी हें पत्र फक्त माझे मित्र केळकर यांना लिहीत आहे, मराठ्याचे संपादक केळकर यांना लिहीत नाहीं, असें समजावें.

११२

## २९ सप्टेंबर १९०५—कृष्णाजी लक्ष्मण सोमण, किरात

पुण्यास रे पेपर मिल्सचे कागद होतात त्यासंबंधानें कुलाबा जिल्ह्यापुरती एजन्सी आम्हाला मिळण्याबद्दल, म्हणजे रा. पी. बी. डोंगरे यांना मिळण्याबद्दल, आपण कांहीं प्रयत्न कराल काय ? आपण ज्या दिशेनें स्वदेशी चळवळीबद्दल प्रयत्न करीत आहा तो स्तुत्य आहे. पण त्याचें अनुकरण करण्यास इतरांना उत्साह यावा असे आपणास वाटत असेल तर अलिबाग हें एक ठिकाण आपल्यासारख्यांनीं एकवार येऊन जाण्यासारखे आहे. आपण कोणी येण्याचें अभिवचन दिल्यास येथें पसरलेलें शैत्य जाऊन थोडासा उबारा आला तर येईल असे वाटते. आपल्या येण्यानें बराच कार्यभाग होईल.

११३

## ५ ऑक्टोबर १९०५—ए. बी. जठार, मँचेस्टर

मी कांहीं दिवसांपूर्वी लेख पाठविला त्याचे काय झाले ? येथील इंग्रज लोक बहिष्काराच्या चळवळीसंबंधानें बरेच रुष्ट झाले आहेत. त्यांचा विचार असा आहे कीं हिंदुस्थानांतील गिरणी मजुरांना पंधरा तास काम करावे लागते त्याला आळा घालण्याकरितां विलायत सरकारकडे अर्ज करून, हिंदुस्थानांत एखादा कायदा कर-वावा. नामदार गोखले हे सर विल्यम वेडरबर्न यांच्या बरोबर उद्यां येथें येऊन जाहीरसभेंत भाषण करणार आहेत. यासंबंधी हकीकत लिहून पाठवीन.

११४

**१० ऑक्टोबर १९०५—गो. आ. पाटील, वकील, अहमदाबाद**

अहमदाबाद येथील कांहीं लोकांच्या मनांत एक औद्योगिक संघ स्थापावा असे आले आहे. त्याचा एक हेतु स्वदेशी मालाच्या याद्या तयार करण्याचा आहे. तरी तुमच्याजवळ कांहीं याद्या असतील तर त्या पाठवाल काय ! पुण्याचे कोणी मिस्टर संत यांनीं एक स्वदेशी वस्तूंची डिरेक्टरी केली आहे. ती अजून छापली नाहीं म्हणतात. तर तिची हस्तलिखित प्रत आमच्याकडे पाठवावी. तिचा योग्य तो उपयोग करून परत पाठवूं. किंवा येथील एखादा धनिक गृहस्थ पाहून त्याजकडून ती छापविण्याची व्यवस्था झाल्यास करीन. टिळकांना नमस्कार सांगावा.

११५

**१२ ऑक्टोबर १९०५—एस्. सच्चिदानंद सिंह, पाटणा**

तुमचें उत्कृष्ट आर्टिकल पोंचलें. त्याबद्दल फार फार आभारी आहे. तथापि टिळकांकडून खालडिअन वाङ्मयाविषयींचा लेख मिळवून पाठविण्याची तुमची जबाबदारी कमी झाली असे नाहीं हो ! मुंबईच्या कांहीं पत्रांत त्यांनीं पुढें मांडलेल्या सिद्धांतासंबंधानें फार कौतुक प्रदर्शित केलें आहे. तरी तो मिळवा.

११६

**७ नोव्हेंबर १९०५—एस्. सच्चिदानंद सिंह, पाटणा**

मुसलमानांचें शिष्टमंडळ सरकारकडे गेलें. त्या विषयावर तुम्ही लेख लिहून पाठविला तो उत्तम होता. माझेंहि मत तुमच्याप्रमाणेंच आहे. तुमचा लेख डिसेंबरच्या अंकांत म्हणजे काँग्रेसच्या ऐनवेळीं प्रसिद्ध होईल.

११७

**८ नोव्हेंबर १९०५—सरला देवी, लाहोर**

पत्र पोंचलें. गेल्या २३ तारखेस मला मायावतीचा मुक्काम हालवावा लागला. माझ्या जीवनात क्रांति होणार आहे. त्याविषयीं तुम्ही कदाचित् पूर्वीच ऐकले असेल. या पुढील पत्र सरला देवी चौधराणी, C/o पं. रामभुज दत्त चौधरी, लाहोर, या पत्त्यावर पाठवावें. मायावती येथें थंडी फार. पण तिला न भिता येथें

कोणी आल्यास त्यास फार बरे वाटेल. अनेक संन्यासी लोकांची येथें गांठ पडेल. पण हा कार्यक्रम १५ दिवसांचा आहे. खातगुदाम येथून चालत किंवा घोड्या-वर बसून मायावतींस यावे लागते व त्याला तीन दिवस लागतात. तुम्ही मागील पत्रांत मला लिहिलें कीं, या वेळीं तुम्ही बंगाल्यांत किंवा महाराष्ट्रांत असावयास पाहिजे होते. पण आतां हे दोनहि प्रांत सोडून मी पंजाबांतच जाऊन रहाणार ही गोष्ट तुम्हाला कशी काय वाटते ?

११८

? —जानकीनाथ घोसळ, कलकत्ता

आमची कनिष्ठ कन्या श्रीमती सरलासुंदरी देवी हिचें लग्न पंडित रामभुज दत्त चौधरी यांच्याबरोबर लाहोर येथें मंगळवार तारीख १० ऑक्टोबर रोजीं होण्याचें ठरलें आहे. तरी आपण येऊन कार्यसिद्धि करावी.

११९

१७ जानेवारी १९०६—सी. वाय. चिंतामणी, बनारस

तुम्ही बनारसला येऊन गेल्याचे कळलें. पण तुम्ही काँग्रेसला हजर राहूं शकला नाहीं म्हणून भेट झाली नाहीं याबद्दल वाईट वाटते. काँग्रेस फार चांगली झाली. फेरोजशहा मेथा यांच्या भाषणाचें पुस्तक मी काढलें त्याचा परामर्ष तुम्ही घेतला याबद्दल आभारी आहे. नवी गोष्ट म्हणजे मी अखिल भारतीय औद्योगिक परिषदेचा दुय्यम चिटणीस म्हणून रा. ब. मुधोळकर यांच्या हाता-खालीं काम करण्याचें पत्करलें आहे. मात्र तें माझ्या हातून कितपत चांगले होईल याची मला शंका वाटतें. आणि सर्व वेळ या कामांत घालवावा लागणार म्हणून मला वर्तमानपत्राचा संपादक या नात्याचें काम करतां येणार नाहीं याचें वाईट वाटतें. असो. टिळकांना माझा नमस्कार सांगा.

१२०

५ फेब्रुवारी १९०६—रंगनाथ नरसिंह मुधोळकर, उमरावती

अखिल भारतीय औद्योगिक परिषदेच्या कचेरीचें काम मी येथें सुरू करीत आहे. त्याकरितां मला सार्वजनिक सभेचे त्रैमासिक, गणेश व्यंकटेश जोशी यांचें लेख, १८९१–९२ सालीं पुण्यास भरलेल्या औद्योगिक परिषदेंतील निबंध, वगैरे कागदपत्र जितकें मिळतील तितकें पाठविण्याची कृपा करावी.

## १२१

### १८ मार्च १९०६—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विशेष. मराठ्याचे अंक व आपलें पत्र हीं पावलीं. तीं येथें आलीं त्या वेळीं माझे चुलते ती. नानासाहेब येथें होते. त्यांना आपलें पत्र मी वाचून दाखविलें त्यावेळीं ते व मी मनापासून हंसलों. आपले नाटकावरील लेख त्यांना फार पसंत पडले असें दिसलें. आपण इंग्रजी भाषेवर थोड्या काळांत चांगलें प्रभुत्व संपादिलें आहे यांत संशय नाहीं. केसरींतील आपल्या निबधांची मराठी भाषाहि रा. टिळकांच्या भाषेप्रमाणें जोरदार व खुबीदार असते. एकादें संगीत नाटक लिहिण्याचें जर आपण मनावर घ्याल तर त्यांत आपणास चांगलें यश येईल अशी माझी खात्री आहे. हल्लीं किर्लोस्कर मंडळीस नवीन नाटकांची फार आवश्यकता आहे. कचेरीच्या कामामुळें मी हल्लीं निरुपयोगी झाल्यासारखा झालों आहे. रा. देवल यांचा कंपनीशीं संबंध तूर्त तुटल्यासारखाच झाला आहे. रा. डोंगरे व कुलकर्णी यांचीं नाटकें व्हावीं तितकीं लोकप्रिय न झाल्याकारणानें रा. शंकरराव त्यांना कितपत भीड घालतील याची शंका वाटते. अशा स्थितींत आपली मदत कंपनीस झाल्यास सोन्याहून पिवळें होणार आहे. नाटक-लेखन आपणास अपरिचित आहे असे नाहीं. आपण लिहिलेलीं अप्रसिद्ध नाटकें जरी एका बाजूस ठेविलीं तरी आपली 'जोडगोळी' मध्यंतरीं बरीच पुढें आली होती. आपणास पदेंहि चांगली साधतात. निदान माझ्या स्वतःच्या पदांपेक्षां कर्णमनोहर, साधी, व सरळ पदें आपण कराल ही माझी खात्री आहे. याप्रमाणें चांगलें गद्य व चांगलें पद्य अशी संगीत नाटकाची दुहेरी तयारी आपणापाशीं असतांना, केवळ आळसामुळें किंवा संकोचामुळें आपण संगीत नाटकावर परिश्रम करू नयेत ही दिलगिरीची गोष्ट आहे. बालगंधर्वासारख्या नटास तालीम देण्याकरितां कां होईना आपण एखादें संगीत नाटक हातीं घ्यावें अशी माझी सूचना आहे.

मराठ्याच्या वर्गणीदारांत माझें नांव घालून तो या आठवड्यापासून सुरू करण्याची मेहेरबानी करावी.

'मूकनायका'वर आपण जी टीका केली आहे ती बहुतेक यथार्थ आहे. सरोजिनीस बुद्धि नाहीं असें आपण म्हटलें आहे तें मात्र मला समजलें नाहीं! यंदा नाट्य-संमेलन पुणें येथें मे महिन्यांत होणार आहे. त्या प्रसंगीं नाट्य-

विषयाची एक परीक्षा घेण्याचा विचार असून मूकनायक नाटक परीक्षेकरितां नेमलें आहे असें रा. बरव्यांच्या पत्रावरून कळतें.

किर्लोस्कर मंडळी पुण्याहून कोठें गेली हें कळलें नाही. नवीन नाटकाबद्दल रा. मुजुमदारांची पत्रांवर पत्रें येत आहेत. त्यासंबंधानें काय करावें हें मला मुळींच सुचेनासें झालें आहे. मुजुमदार हे 'भारत रंगभूमि' नांवाचे मासिक पुस्तक काढण्याच्या विचारांत असल्याचे आपणांस माहीत असेलच.

गेल्या महिन्यांत येथें व मलकापुरास मिळून दोन Tennis tournaments झाल्या. मलकापूर येथें दोन गाणारणी आल्या असून सावजींनीं व्यवस्था चांगली ठेविली असल्यामुळें दोन दिवस फार आनंदांत गेले. त्या वेळीं गाणीं ऐकतांना आपली फार आठवण झाली. येथील Tournamentsच्या सुमारास त्यांनीं आपणास पाचारण केले होते.

## १२२

### १० एप्रिल १९०६--एम्. विश्वेश्वरअय्या सॅनिटरी एंजिनिअर, पुणें

पुण्याच्या पाणी-पुरवठ्याच्या प्रश्नाची चर्चा मी करीन म्हणतों. एंजिनिअर गोडबोले व वर्तक मजकडे येणार आहेत तरी तुम्हीहि यावें. लष्करच्या कामिटी-चाहि तगादा होत आहे. त्या संयुक्त योजनेला पुणें म्युनिसिपालिटी कबूल होईल कीं नाहीं याचा निकाल ताबडतोब करावयाचा आहे. तरी अवश्य यावें.

## १२३

### २९ एप्रिल १९०६--एस्. एम्. परांडे, मुन्सफ, जबलपूर

माझी विधवा भावजय मला हिंगणें येथें अनाथ बालिकाश्रमामध्यें ठेवावयाची आहे. पण तिनें पुनर्विवाह करूं नये अशी माझी इच्छा आहे. अनाथ बालिकाश्रमांत पुनर्विवाह करण्याला उत्तेजन मिळतें असे माझ्या कानावर आले आहे. स्वतः कर्वे हे स्वार्थत्यागी व सरळ वर्तनाचे आहेत. परंतु आसपासची इतर परिस्थिति कशी काय आहे माहीत नाहीं. या कामीं योग्य सल्ला देणारे तुम्हीच एकटे मला दिसता म्हणून विश्वासानें विचारतों. तरी कृपा करून मला सर्व माहिती द्याल काय ?

१२४

९ मे १९०६—हरिश्चंद्र ए. तालचेलकर, मुंबई

स्वदेशीच्या चळवळींत पोवाड्यासारख्या गाण्यांचा उपयोग अवश्य करावा असें मला वाटते. मी तुम्हाला या सोबत दोन नमुने पाठवीत आहे. ते १८५४ च्या सुमारास एक नेटिव्ह ख्रिश्चन, बाबू शशिचंद्र दत्त, यांनीं लिहिलेले आहेत. एडमंड रसेल हेहि हिंदुस्थानाविषयीं अमेरिकन पत्रांतून लिहितात. ते कवि आहेत. त्यांच्या कवितांचे नमुनेहि उपयोगी पडण्यासारखें आहेत. तुम्ही नाट्य-सम्मेलनाचे अध्यक्ष होणार हें वाचून आनंद झाला. मराठी रंगभूमीवरचे तुमचे लेख मला फार आवडले.

१२५

१७ जून १९०६—एस्. ए. पळशीकर, मामलेदार, खेड, पुणें

आळंदी म्युनिसिपालिटीवर एक सभासद स्वतःचा म्हणून सरकारला नेमावयाचा आहे. तरी ती नेमणूक तुम्ही स्वीकाराल काय ? कारण तुम्ही सभासद झाल्यास या म्युनिसिपालिटीची पुष्कळ सुधारणा कराल अशी मला खात्री वाटते.

१२६

१६ ऑगस्ट १९०६—ग. त्र्यं. जोशी, हेडमास्तर, हायस्कूल, सातारा

बंगालमधील चळवळ खूप जोरांत आहे. इकडेहि ती अधिक व्हावयास पाहिजे. मुंबई शहर बकाली पडलें. म्हणून पुणें अहमदाबादसारख्या एकजीवी समाजाच्या शहरांनीं यांत पुढाकार घेतला पाहिजे. गणपती-उत्सवाचा या कामीं उपयोग करालच. परंतु सर्व जातींचे धर्मांचे लोक जेथें येऊं शकतील अशाहि ठिकाणीं सभा भरवून प्रचार केल्यास अधिक बरें.

१२७

२६ ऑक्टोबर १९०६—त्र्यंबक सीताराम कारखानीस, बार्शी

आपल्या ‘ नवरदेवाची जोडगोळी ’ या नाटकाचा पहिला प्रयोग सोलापूर मुक्कामीं केल्याचें केसरीवरून आपल्याला कळलेच असेल. पहिल्या खेळाचें हस्त-पत्रक आपल्याला पहाण्याकरितां पाठविलें आहे. पहिलाच प्रयोग असून लोकांना तो आवडला. रा. पुरुषोत्तम भास्कर डोंगऱ्यासारख्या मंडळींसहि तो आवडला.

प्रयोगाच्या दृष्टीनें कांहीं कांहीं ठिकाणीं प्रवेशामध्यें फेरफार करणें जरूर वाटत आहे. तरी आपली परवानगी असल्यास करू. कांहीं भाग स्टेज इफेक्टकरितां वाढविला पाहिजे. कारण पहिला अंक अगदींच लहान म्हणजे फसवणूक केल्याप्रमाणें वाटतो. एकंदर नाटकहि लहान होतें. प्रयोग २॥। तासांचा म्हणजे फारच लहान होतो. एवढ्याकरितां कांहीं भाग वाढविला पाहिजे व तो वाढवितां येण्या-सारखाहि आहे. चंपीचें पात्र फक्त पहिल्या अंकांतच आहे. तेंच चटकदार असल्याकारणानें लोकांना शेवटपर्यंत असावेसें वाटतें. तरी त्या पात्राला किंचित् नारायणराव पेशवे या नाटकांतील गजाऊच्या धर्तीवर नेऊन, तिचें व छब्याचें कांहीं प्रवेश घालून, अखेरीस त्यांचें लग्न लाविलें तर बरें होईलसें वाटतें. आपल्या विचारास काय येतें तें कळवावें. येथें त्या नाटकाचा प्रयोग येत्या बुधवारीं करणार आहों. आपल्याला एखादे वेळीं येण्यास सवड होईल तर बरे होणार आहे.

१२८

### २१ नोव्हेंबर १९०६—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

बार्शी येथें माझ्या नव्या नाटकाचें गद्य मात्र लिहिलें होतें. येथें आल्या-पासून ६३ पदें लिहिलीं आहेत. जवळच्या चाली संपल्यामुळें पदरचना तूर्त तहकूब ठेवावी लागली आहे. रा. जोगळेकरांनीं आणखी चाली देण्याचें कबूल केलें आहे त्याप्रमाणें न दिल्यास जुन्या चाली व साक्या—दिंड्याच्यां पलटणींनें ती खिंड भरून टाकावी लागणार आहे ! माझीं पदें मागील नाटकांतल्या पदां-पेक्षां सोपी झाली आहेत असे वाटते. पण तो ज्ञानप्रकाशांतील टीकेचा परिणाम नसून कालाचा आहे. माझी पूर्वीचीं नाटकें हीं उत्तरोत्तर सोपींच होत आलीं आहेत. यावरून त्या टीकेबद्दल मळा वैषम्य वाटत आहे असे समजूं नये. विरुद्ध टीकांविषयीं मी हल्लीं इतका उदासीन झालों आहे कीं, ज्ञानप्रकाशांतील टीकेचें आपणांप्रमाणें मलाहि कौतुक वाटत आहे. शिवाय हास्यरस मला इतका आवडता आहे कीं, कधीं कधीं त्याचा जनक तर कधीं कधीं त्याचा विषय होण्यासहि माझी तयारी असते !

'नाट्यरुक्कुठार' मालेचे लेखक रा. ठोसर असावेत कशी मला शंका होती. ती आपल्या पत्रावरून खरी ठरू पहात आहे. पुण्याच्या एका गृहस्थाचे कांहीं दिवसापूर्वी मला पत्र आलें, त्यावरून रा. वासुदेवराव गांधी व त्यांचे मित्र ग. स. मराठे

हे त्या टीकेचे समायिक लेखक आहेत. त्या मित्रांत रा. ठोसर यांचाहि समावेश होतो. रा. ठोसर यांनीं आपलें नाटक मंडळीकडे पाठविलें होतें. तें मी ग्रंथकर्त्यांच्या आग्रहावरून वाचून पाहिलें. मला त्यांत विशेष कांहीं दिसून न आल्यामुळें मी अनुकूल किंवा प्रतिकूल कांहींच मत दिलें नाहीं, मात्र पदें बरीं वाटलीं त्याबद्दल अनुकूल मत रा. मुजुमदारांस कळविलें होतें. त्याचें पर्यवसान या टीकेंत होणार आहे हें स्वप्न मला त्या वेळीं पडलें नाहीं.

या टीकाकाराचें नाटक किर्लोस्कर मंडळीकडून होण्याचा संभव, या टीके-मुळें, वाढला आहे असा टीकाकाराचा समज असल्यास त्याची चूक आहे. कारण रा. मुजुमदारांचा स्वभाव क्षमाशील नाहीं हें आपणास ठाऊक आहेच. ही टीका त्या नाटकाच्या आड आल्यास मला मनापासून वाईट वाटेल. कारण रा. ठोसरांची कविता खरोखरीच चांगल्यापैकीं असते.

मी दोन-तीन दिवसांत पूर्वीच्या घरीं रहावयास जाईन. माझा विचार दिवाळींत मुंबईस नवीन नाटकाची तालीम पहाण्यास जाण्याचा आहे. न गेल्यास आपण येथें अवश्य यावें. गेल्यास आपणास मुंबईस यावें लागेल.

माझ्या बंधूचा विचार अजून पुनर्विवाह करण्याचाच आहे. एखादी चांगली बधू आढळण्यांत आल्यास कळवावें, व साधल्यास फोटोहि पाठवावा.

माझे प्रकाशक देव हे एक अपशब्दमय लेख मजविरुद्ध प्रसिद्ध करण्याची धमकी देत आहेत. आपणास मुद्दाम कळविलें आहे. कदाचित् फौजदारीहि करावी लागेल.

## १२९

### २० मार्च १९०७—वासुदेवशास्त्री खरे, मिरज

आपलें तारीख १४ चें पत्र पोंचलें. त्यांत लिहिल्याप्रमाणें काम करण्याची माझी योग्यता आहे असें मला वाटत नाहीं. माझें शिक्षण प्रथमपासून एकदेशी झालेलें असून 'इतिहासशास्त्र' म्हणून अलिकडे जो विषय निर्माण झाला आहे त्याचें परिशीलन मी केलेलें नाहीं. ते ग्रंथ वाचून ती योग्यता आणावयाची म्हणजे हें दिनावधीचें व स्वस्थपणाचें काम आहे. जें ज्ञान मला आहे त्याचा तरी देशी कॉलेजास, आपण लिहिल्याप्रमाणें, उपयोग कां करून देऊं नये असें आपण

म्हणाल तर तिकडूनहि पंचाईतच आहे. प्रपंचासंबंधानें मला येथें तीनचार वर्षें राहिले पाहिजे. त्यानंतर पेन्शन मागणार. तें मिळाल्यास कोंकणांत जाऊन वर्ष-भर रहाणार. तेथें मुलामाणसांची सर्व सोय लागली व तेथपर्यंत मुलगाहि पोटा-पुरतें मिळवूं लागला म्हणजे मी मोकळा झालों. मग पाहिजे त्या सार्वजनिक कृत्यांत अंगमेहनत करण्यास सर्वांपुढें मी असणार. तूर्त तर तुम्हास हें शेख-महमदाचें मनोराज्यच भासेल. पण ईश्वरकृपेनें हें सर्व घडून यावें अशी इच्छा मनापासून आहे व तसें घडेल असें वाटतेंहि. मला पेन्शन पाहिजे त्यास तूं अमुक ठिकाणीं किंवा अमुक माणसाकडे काम मरेपर्यंत करशील तर तुला पेन्शन देऊं अशा शर्तीवर पेन्शन नको. स्वतंत्र पेन्शन तीस वर्षे चाकरी केल्याबद्दल पाहिजे आहे. नाहींतर फणसळकरांप्रमाणें गत व्हावयाची! याकरितां मला पेन्शन देऊन पुण्यास पाठविण्याबद्दल श्रीमंत मिरजकर यांजकडे कोणीहि बोलूं नये म्हणजे मोठे उपकार होतील. डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें श्रीमंतामार्फत मला बोलाविले होते पण ते मी कबूल केले नाहीं याबद्दल श्रीमंतांचा मजवर थोडाबहुत रोष आहे. तसाच पुनः प्रसंग आणून मजकडून कोणी नाहीं म्हणविलें म्हणजे हा रोष अधिकच वाढेल. बाकी आपण व रा. रा. द्रवीड व कॉलेजपैकीं मंडळी यांनीं अशी योजना मनांत आणली यानें माझा मोठा बहुमान झाला असें मी समजतों. इतिहासाच्या संशोधनाच्या कामीं मला या योगानें अधिक उत्तेजन आलें. चि. यशवंत आजच्या मेलनें आपणाकडे येत आहे.

हेंच पत्रीं रा. रा. नटेशराव द्रवीड यांस साष्टांग नमस्कार. आज रा. नर-सोपंत यांस सर्व मजकूर सविस्तर लिहिला आहे. त्यावरून कळून येईल.

१३०

५ जुलै १९०७—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

आपल्या वडिलांबद्दलचें वर्तमान ऐकून फार वाईट वाटलें. गेल्या ३-४ वर्षांत आपणांवर दोन मोठें आघात पडल्यामुळें कुटुंबाची बरीच जबाबदारी आपल्या शिरावर आली आहे. आपल्या वृद्ध मातुश्रीवर तर मोठाच प्रसंग गुदरला. अशा-प्रसंगीं आपण विवेक करून स्वतःचें व इतरांचें सांत्वन कराल ही खात्री आहे.

आपण ८-१५ दिवसांनीं सवड करून खामगांवास रहाण्यास याल तर कांहीं दिवस मनास करमणूक होण्यासारखी आहे. मी आपलें जुनें घर सोडून

नवीन व मोठ्या घरांत ( जेथें पूर्वी दिवाणी कचेरी होती तेथें ) रहावयास लव-करच म्हणजे १५-२० दिवसांत जाणार आहे. तें घर सुंदर असून रहदारीपासून दूर आहे. दुसऱ्या मजल्याच्या समोर एक विस्तृत गच्चीहि आहे. अशा ठिकाणीं रा. मुंजे, ( डॉ. मुंजे यांचे बंधू ) गोखले, पटवर्धन ( नाटक्याचे गाण्यांचे कर्ते )* भाऊसाहेब जयवंत ( हे हल्लीं येथें शिरस्तेदार होऊन आले आहेत ) यांच्या सहवासांत आपला वेळ आनंदांत जाईल ही खात्री आहे. लो. टिळकहि आपणास अशा वेळीं रजा आनंदानें देतील असें वाटतें.

'सुभाषित व विनोद' हा लेख आजपर्यंत नियमानें वाचीत आलों आहे. फार मनोरंजक वाटला. उदाहरणेंसुद्धां जॉन्सनच्या कोशांतल्याप्रमाणें सुंदर आहेत. रा. चिंतामणराव वैद्यांचें या लेखांबद्दल अत्यंत अनुकूल मत झालें आहे तें ठीकच आहे. मात्र कांहीं उदाहरणें हास्योत्पादक व कांहीं तशी नाहींत म्हणून आपण दिलीं आहेत त्यासंबंधानें मतभेद होण्यासारखा आहे.

## १३१

### १५ जुलै १९०७—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

आपलें पत्र पावलें. आपण टीका लिहिणार आहात हें वाचून आनंद झाला. आपल्या टीकेनें विरुद्ध टीकास पुष्कळ आळा बसेल. आपण दोष दाखविणार आहात यामुळें टीकेस विशेष महत्त्व येणार आहे. इतरांस कांहीं वाटलें तरी खुद्द कर्त्यास आपल्या टीकेमुळें आनंदच होईल.

जो बंगला मी घेणार होतों तो दुसऱ्यानें घेतला. पण यामुळें आपला बेत मोडण्याचें कारण नाहीं. आपण वाटेल तेव्हां यावें. येण्यापूर्वीं मला पत्र लिहून कळवावें. आपली टीका ज्या अंकांत येणार आहे ते सर्व अंक मजकडे व्ही. पी. नें ताबडतोब येतील अशी व्यवस्था जरूर करावी. मी स्वतः त्याबद्दल लिहिणें चांगलें दिसणार नाहीं.

'अद्भुत रसाचे प्यात्यावर प्याले' या शब्दांमुळें ग्यारिबाल्डीचा चरित्र-लेखक कोण आहे याचा तेव्हांच निर्णय होतो.

'सुदाम्याचे पोह्या'ची एखादी मुष्टि, केवळ राजकीय असल्यास, केसरी-पत्रांत त्या लेखमालेपैकीं म्हणून येऊं शकेल काय ?

१३२

### २३ जुलै १९०७—श्री. कृ. कोल्हटकर

आपली ज्ञानप्रकाशांतील टीका समग्र वाचली. मला व माझ्या मित्र-मंडळीस ती पसंत पडली. ती एकंदरीनें पूर्ण निःपक्षपातबुद्धीनें लिहिली आहे असाच प्रत्येक वाचकाचा ग्रह होतो. गुणापेक्षां दोषांकडे विशेष लक्ष पुरविल्याचें एकाद्यास वाटण्याचा संभव आहे. पण असा समज माझ्या पथ्यावरच पडण्यासारखा आहे.

आपली टीका साप्ताहिक ज्ञानप्रकाशांत एकत्र येईल अशी आशा होती. पण निराशा झाली. न येण्याचें कारण काय असावें हें कळत नाहीं.

आपल्या टीकेसंबंधानें पांगारकर, हरिभाऊ आपटे वगैरे मंडळीचे काय उद्गार निघतात हें आपल्या कानावर आल्यास मला अवश्य कळवावें.

आपला Illustrated Weekly Times मधील लेख मराठ्यांत येण्यापूर्वी मी वाचला होता. हल्लींच्या इतका लेखनव्यवसाय आपल्यासारख्या उद्योगी लेखकाच्या आयुष्यांतहि क्वचित् घडून येत असेल असे आपल्या इंग्रजी व मराठी लेखवैपुल्यावरून म्हणावें लागतें. Times मध्यें आपला जो फोटो आला आहे त्यांतील चेहऱ्यांत कांहींशी कृत्रिमता दिसून आली. तोच प्रकार सहीसंबंधाचा.

रा. रामभाऊ जोश्यांच्या पत्रावरून आपल्या टीकेस आणखी कांहीं फांटे फुटणार कीं काय अशी भीति वाटत होती. पण तें प्रकरण विजल्यासारखें झालें आहे.

मी पुण्यास आर्यभूषण थिएटरामध्यें ज्या गृहस्थांची व आपली ओळख करून दिली होती त्यांची पुनः भेट झाली होती काय ! त्यांचें नाटक करावयाचा नाट्यकला प्रवर्तक मंडळीचा इरादा आहे असें कळतें.

इकडे येण्याचा आपला केव्हां विचार आहे तें कळवावें.

### १९०७—हेन्री नेव्हिन्सन्, विलायतेंतील पत्रांचा स्पेशल बातमीदार, कॉनॉट हॉटेल, पुणें

दोन गोष्टी तुम्हाला विचारावयाच्या त्या अशा. प्रो. गोखले हे उद्यां मला मुलाखत देऊं शकतील काय हें त्याजकडे चौकशी करून कळवावें. कारण

त्यांच्याशीं मोर्ले यांच्या सुधारणांची चर्चा मी करूं इच्छितों. तसेंच तुम्ही मला सांगितलें कीं, 'तुमच्या पुण्यांत एक मोठा जाडा आंकडेशास्त्री आहे. त्याची गांठ पडेल काय ? त्याच्याशीं सरकारचें उत्पन्न, करवसुली, आणि लष्करी खर्च यांविषयीं मला चर्चा करावयाची आहे. माझी पाठ फार दुखत असल्यामुळें मी गव्हर्नरसाहेबांच्या भेटीला जाण्याचें रहित केलें आहे. तुम्ही आम्ही सर्व मिळून बसण्याबोलण्याचें काम रविवार-सोमवारीं अवश्य करूं. मात्र माझें नांव कोठें प्रकट न करण्याची कृपा करावी. तसें झाल्यास माझ्या प्रवासांत अडचणी येतील अशी भीति वाटते.

## १३४

### १९ फेब्रुवारी १९०८—श्री. कृ. कोल्हटकर

आम्ही येथें जानेवारी आरंभापासून 'खामगांव राष्ट्रीय समाज' या नांवाची संस्था स्थापन केली आहे. तिचा उद्देश स्वदेशीस उत्तेजन, अज्ञानी लोकांत विद्येचा प्रसार, मद्यपान प्रतिबंध वगैरे इष्ट गोष्टी व्याख्यानांच्या व इतर द्वारांनीं करण्याचा असून जहाल व मवाळ या दोन्ही पक्षांचा तीस आश्रय आहे. या संस्थेसाठीं एक चांगला व्याख्याता पाहिजे. चांगला इसम मिळाल्यास २५-३० रुपयांपर्यंत पगार देण्याची संस्थेची इच्छा आहे. संस्थेचे अध्यक्ष रा. पेंडसे यांनीं आपणास यासंबंधानें लिहिण्यास सांगितल्यावरून मी हें पत्र आपणांस लिहीत आहे. तरी वर दिलेल्या वर्णनाचा व्याख्याता आपल्या ध्यानांत असल्यास मला ताबडतोब कळविण्याची मेहरबानी व्हावी. आपलें पत्र उलट डाकेनें येणार अशा भरंवशावर मी आपले आगाऊ उपकार मानितों. 'विविधज्ञानविस्तारां'तील जानेवारीच्या अंकांत माझ्या टीकेचा उत्तरार्ध आला आहे. तो आपल्या अवलोकनांत आला असेलच. सवड असल्यास आपलें मत कळवावें.

आपल्यापाशीं पुष्कळ पुष्कळ गोष्टी बोलावयाच्या आहेत. केव्हां संधि येईल ती येवो !

## १३५

### ९ मे १९०८—लाला जशवंतराय, अलमोरा

'पंजाबी' नामक वर्तमानपत्र काढण्याचें निश्चित झालें आहे. मी संपादक मिळविण्याची खटपट करीतच आहे; परंतु तुम्हींहि एकादा विश्वासु व इंग्लीश चांगले लिहिणारा मनुष्य मिळवून द्या. तुम्ही म्हणाल तो योग्य पगार त्याला देईन.

१३६

**२२ जून १९०८—ई. ए. वुडहाऊस, प्रो. डेक्कन कॉलेज, पुणें**

पार्शी लोकांचें एक कॉलेज काढण्याची खटपट सुरू आहे. मीच बहुधा त्याचा पहिला प्रिन्सिपॉल होईन. चालकांचें म्हणणें असें दिसतें कीं, मी प्रथम वर्ष-दीड वर्ष युरोप अमेरिकेंत हिंडून शिक्षणाच्या सुधारलेल्या पद्धतींचा अभ्यास करावा. कारण पार्शी कॉलेजांत दिलेलें शिक्षण इतरांना अनुकरणीय असें व्हावें. अडियार येथें जाऊन मी बेझंटबाईंना भेटून आलों. तेथेंच मला कांहीं काम द्या असें म्हणत होतों. परंतु उलट या पार्शी कॉलेजचें कामच त्यांनीं माझ्या गळ्यांत घातलें. कॉलेज पार्शी लोकांकरितां असले तरी त्यामुळें राष्ट्रांतील ऐक्याचा बिघाड होऊं नये असाच माझा प्रयत्न राहील हें तुम्हास सांगावयास नकोच.

१३७

**९ ऑगस्ट १९०८—सर क्लॉड हिल, ए. कौन्सिलर, पुणें**

तुमचा निबंध वाचला. तुमचें म्हणणे बरोबर दिसतें. मेकॉलेच्या मतांना इंग्लंडांत आतां कोणी मानीत नाहीं. ज्ञान व जीवन दोन्ही वाढल्या प्रमाणावर आहेत; म्हणून ज्याला अद्भुत म्हणता येईल त्याचेहि प्रसंग वाढणारच. अर्थात् काव्य व सुधारणा यांची प्रगति समांतर बरोबरीनेच चालेल. काव्य मागें कां पडावें ! टॉम्सन कवि इंग्लंडांत फारसा वाचला जात नाहीं. कालिदासाच्या मानानें तो कवि कमी प्रतीचाच ठरेल. कालिदासाचें काव्य मात्र अजून जिवंत आहे. तुम्ही जॉन स्टुअर्ट मिल याच्या मताला जो मान इकडे देतां तो विलाय-तेंत आज शिल्लक नाहीं.

१३८

**१० ऑगस्ट १९०८—बाबू मोतीलाल घोष, कलकत्ता**

तुम्ही विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें लिहितों. (१) टिळकांना झालेल्या शिक्षे-विरुद्ध प्रिव्ही कौन्सिलकडे अपील अवश्य करावें. (२) नॅशनॅलिस्ट राष्ट्रीय पक्षाची म्हणून स्वतंत्र कॉंग्रेस भरविण्याची कल्पना मला पसंत नाहीं. आम्ही सात आठ मंडळी बसून या गोष्टीचा विचार केला त्यांत असें ठरलें कीं, प्रथम शक्य तर संयुक्त अशीच राष्ट्रीय सभा भरवावी. कन्व्हेन्शन मान्य नसणाऱ्यां

नॅशनॅलिस्ट लोकांनीं तोंपर्यंत आपापल्या प्रांतांत स्वदेशी, बहिष्कार, इत्यादि कार्य करीत रहावें. आम्ही एक-दोन दिवसांत कन्व्हेन्शन कॉंग्रेस कमिटीच्या चिटणीसांना पत्र लिहून असें सुचविणार आहों कीं क्रीड ( प्रतिज्ञापत्रक ) वर सही करण्याची अट काढून टाकावी. त्याला हे कबूल नसतील तर संयुक्त कॉंग्रेस होणें शक्य नाहीं. आणि तसें न होईल तर बाबू सुरेंद्रनाथ बानर्जी आणि त्यांचे दहाबारा स्नेही मात्र कन्व्हेन्शन कॉंग्रेसला जाऊन मिळणार नाहींत. टिळकांच्या खटल्याच्या हकीकतीचें पुस्तक तुम्ही काढणार म्हणता पण शिक्षा झालेले लेख पुनः कसे छापतां येतील ? इकडे बंगाल सरकारनें अशी नोटीस लाविली आहे कीं, तेच लेख जो कोणी पुनः छापील त्यावर राजद्रोहाचा पुन्हा खटला भरण्यांत येईल. त्यावर आम्ही सरकारला लिहून विचारलें कीं, न्यायकोर्टांत घडलेले इतिवृत्त त्याच्या अनुषंगानें येणाऱ्या लेखांसह छापल्यास काय हरकत ? पण सरकारच्या सेक्रेटरीनें लिहून कळविलें कीं, शिक्षा झालेला लेख, मग तो अशा कोर्टाच्या हकीकतींत आलेला दिला तरी, तो शिक्षेला पात्र होईल. मात्र जो प्रकाशक जें ज्या हेतूनें करील तो हेतु लक्षांत घेतला जाईल. आतां इतक्यांतच खापर्डे यांचें पत्र मिळालें.

## १३९

### ३० ऑक्टोबर १९०८—लाला लजपतराय, लंडन

तुम्ही अजून तुरुंगांत आहा कीं बाहेर आहा हें कळत नाहीं. तुम्ही संकटांत पडला याबद्दल वाईट वाटलें. तथापि तुम्ही त्याला धीरानें तोंड दिलें हें पाहून तुमच्याविषयीं विशेष कौतुक व आदरबुद्धि वाटली. मी इकडे काय चळवळ करीत आहे हें तुम्हाला वर्तमानपत्रांवरून कळतच असेल. येथील तुमचा आमचा एक स्नेही कांहीं न कराव्या अशा चुका करीत आहे. त्यामुळें टिळकांचें काम बिघडेल असें भय वाटतें. मी अर्थातच मला काय करतां येईल तें करीत आहे. वरचेवर पत्र पाठवून समाचार कळवीत जा.

## १४०

### ७ सप्टेंबर १९०८—सी. ए. किंकेड, डिस्ट्रिक्ट जज्ज, पुणें

'सुभाषित आणि विनोद' हा तुमचा ग्रंथ पोंचला. हल्लीं मी स्वतः महाराष्ट्रां-

तील सरदारांच्या घरण्यासंबंधानें कांहीं लिहित आहे. म्हणून तें काम झाल्यावर तुमचें पुस्तक वाचून अवश्य अभिप्राय कळवीन.

१४१

८ ऑक्टोबर १९०८—गणेश अनंत लेले, मामलेदार, चाणस्मा

तारीख २५ चा तुमचा लेख इतका उत्तम लिहिला होता कीं, त्याला कोणीहि शाबासकीच देईल. त्यांत त्वेष होता पण तो साहजिक होता. तुमचें शेवट-पर्यंतचें धैर्याचें वर्तन व एकंदरींत दाखविलेला बाणेदारपणा हा सर्व ठिकाणीं लोकमान्य होईल यांत काडीमात्र संशय नाहीं. तुमच्याविषयींचा आदर आतां शंभर-पटींनें वाढला. तुम्हाला कष्ट पडले पण आम्ही तरी सहानुभूति दाखविण्याशिवाय अधिक काय करणार ? १८९७ सालीं एक पाय तुरुंगांत ठेवून तुम्ही दोन्हीं पत्रें चालविलीं त्यांतच तुमची कर्तबगारी, हुषारी, व धैर्य दिसून आलें. आतांच नवीन तें काय म्हणा ?

१४२

१२ ऑक्टोबर १९०८—गंगाधर नीळकंठ गोखले, उज्जयिनी

तुमच्या खटल्याचा निकाल मला उशीरा कळला. तुम्ही धैर्य व न्यायाची कठोरता दाखविली याबद्दल आनंद होतो. मी बोलूनचालून मूल. मी तुमची स्तुति कशी करावी ? पण इतर लोकांच्या अभिनंदनांत माझें मात्र मुलांचें म्हणून टाकून देऊं नका.

१४३

१३ ऑक्टोबर १९०८—गणेश अनंत लेले, चाणस्मा

तुमची माफी केवळ दंडाच्या रुपयांच्या भरतीदाखल आहे. सबब कोर्टाच्या प्रोसिडिंगच्या कागदाबाहेर माफी हा शब्द वापरण्यालायक नाहीं. तुम्हाला सहानुभूतीचीं असंख्य पत्रें आलीं असतील त्यावरून तुमची खात्री होईल कीं, प्रथम माफी न मागण्यांत व मागाहून सक्तीची माफी वसूल होण्यांत लोकांचा अभिप्राय विरुद्ध नाहीं.

१४४

**४ नोव्हेंबर १९०८--गणेश श्रीकृष्ण खापर्डे, लंडन**

तुम्ही पूर्वी मुंबई विद्यापीठाचे पदवीधर होता, आतां तुरुंगाचेहि पदवीधर झाला आहा. शेवटीं माफी मागावी लागली तरी तुम्हीच जिंकले. टिळक तुरुंगांतून परत येतील तेव्हां तुमची हकीकत ऐकून त्यांना बरेंच वाटेल. तुमच्या शिक्षेची बातमी इकडे आली तेव्हां ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीची सभा होती. तेथें द्रविडांनीं माफी मागून ते सुटतील असें कोणी सांगितलें तेव्हां गोखले यांना तें बरें वाटलें नाहीं. लजपतराय, कॉटन, व ह्यूम हेहि तेथें होते. टिळकांच्या खटल्याचे कागदपत्र मी सर्व छापून घेतले. ते खाजगी लोकांत वाटणार आहे. केरहार्डी यांची नुकतीच गांठ घेतली. टिळक तुरुंगांत गीता लिहिणार याचा अर्थ त्यांना विद्याव्यासंग करण्याला तुरुंगाबाहेर वेळच मिळूं शकत नाहीं ! आमचे बॅरिस्टर रुफस आयझॅक यांची गांठ मी व करंदीकर मिळून घेत आहों.

१४५

**२ डिसेंबर १९०८—एम्. असफअली, दिल्ली**

तुम्ही आपल्या दिव्यांतून पार पडला आणि खूब खंबीरी दाखविली. एखादा दुसराच मनुष्य तुम्ही शेवटीं हायकोर्टाची माफी मागितली याबद्दल नाक मुरडणारा आढळेल. हैदर रेझा यांच्या जामिनकी संबंधानें लिहिलें तें कळलें. तुम्ही त्यांना मदत केली याबद्दल ते सहजच कृतज्ञ रहाणार. मात्र हैदर रेझा हे बोलण्यांत जरा बेसावध असतात. म्हणून त्यांना तुम्ही स्वीकारलेल्या जामिनकीची मी वरचेवर आठवण करून देत असतो. लाला हरदयाळ हे गृहस्थ तुम्हाला कसे काय वाटतात ? विशेषतः हिंदु व मुसलमान यांच्यांतील संबंधाच्या धोरणाविषयीं 'वेदिक मॅगॅझिन'च्या नवव्या अंकांत काय आलें आहे तें वाचा आणि मला लिहा.

१४६

**? १९०८—सौ. गिरिजाबाई केळकर**

आम्हा स्त्रियांना जास्त लिहितां वाचतां येत नाहीं. पण जें येतें त्यावरूनच कधीं काळीं लेख लिहिण्याची स्फूर्ति झाल्यास ते लेख येणारे असें एकहि मासिक पुस्तक नाहीं. लेखन व्यवसाय करण्याची इच्छा असणाऱ्या स्त्रियांचा

उत्साहभंग होतो. माझे कांहीं लेख मनोरंजनाकडे पाठविल्यास वर्ष दीडवर्ष झाले. पैकीं एकच त्यांनीं घेतला. बाकीचे छापीत नाहींत किंवा वाईट म्हणून परतहि पाठवीत नाहींत! मी असा विचार केला आहे कीं, एकादें लहानसें मासिक पुस्तक काढावें. घरांतील अडचणी ह्या आहेतच. परंतु सहा महिनेपर्यंत पुरतील इतकें लेख मी स्वतःच लिहून ठेवले आहेत. त्यांत एका गुजराथी कादंबरीचें, भाषांतर, एका वेदांत ग्रंथाच्या कांहीं भागाचें भाषांतर, एक प्रहसन व एक दोन-तीन अंकीं नाटक इत्यादि आहेत.

१४७

**१३ एप्रिल १९०९--गोविंद सखाराम सरदेसाई, बडोदें**

येथें बडोद्यास मराठी ग्रंथकारांचें संमेलन भरविण्याची वाटाघाट चाल-लेली आहे. त्याला सर्व वरिष्ठ अधिकारी व वजनदार लोक यांची सहानुभूति आहे. हल्लींच्या क्षुब्ध वातावरणांत व बडोदें हें संस्थान असल्यामुळें कांहींना भीति वाटते. महाराज हे हुषार असले तरी खाजगी व्यक्तीपेक्षां अधिक बांधलेले आहेत. म्हणून अध्यक्ष मिळेल तो पोक्त, कायदेबाज, व विद्वान् असावा. संमेल-नाला कांहीं बंगाली लोकहि बोलाविले जाण्याचा संभव आहे. त्यांवरहि महा-राष्ट्राची छाप पडली पाहिजे. वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर, गणेश व्यंकटेश जोशी, काशिनाथपंत साने, रा. ब. पेंडसे हीं नांवें आम्हाला क्रमानें सुचतात. कदाचित् आठ पंधरा दिवसांत महाराजांबरोबर मी निलगिरीस जाईन. तथापि पत्रव्यव-हार चालू राहीलच.

१४८

**५ मे १९०९--गणेश अनंत लेले, चाणस्मा, गुजराथ**

पुण्याच्या वक्तृत्वोत्तेजक सभेंत गंगाधरशास्त्री पटवर्धन यांच्या खुनाचा विषय निघणार आहे. तरी त्याविषयीं तुम्हाला आगाऊच कांहीं लिहितों. १८९४-९५ सालीं बडोद्यांतील सरदार घराण्यांचा इतिहास लिहिण्याचें काम माझ्याकडे होतें. त्यांत पटवर्धन घराण्याचा इतिहास लिहिला आहे. त्याकरितां सर्व खाजगी सरकारी जुनें नवें कागदपत्र व ग्रंथ मी वाचलें आणि माझा ग्रह झाला तो धीटपणें लिहून छापलाहि आहे. माझ्या मतें गंगाधरशास्त्री यांच्या खुनाच्या कामीं बाजीराव पेशवे हे गुन्हेगार नव्हते. शास्त्रीबोवा मेले तर गाय-

कवाडांच्या देण्याचा निकाल लागेल अशी समजूत करून घेण्याइतके पेशवे मूर्ख होते काय ? त्यांना मारण्याचा पेशव्यांचा काय उद्देश असावा ? शास्त्री किंवा त्यांचे वडील हे नाना फडणवीसाच्या पक्षाचे असावे असेंहि मला दिसले नाहीं. म्हणून जुना विरोध असण्याचेंहि कारण नव्हतें. बडोदें येथें रावजी अप्पाजी यांचे चिरंजीव दिवाण झाले त्यांचा अधिकार रेसिडेंट यांनीं काढून घेऊन दुसरे दिवाण केले, त्या वेळीं शास्त्री हे रेसिडेन्सींत नेटिव्ह असिस्टंट होते व सर्व कार-भारांत त्यांचा मुख्य भाग होता. पुढें शास्त्री स्वतः दिवाण झाले व कामगिरीवर पुण्यास गेले. त्यांनीं इकडे जिवंत परत येऊं नये म्हणून सिताराम रावजी व त्यांचे अनुयायी यांची खटपट चालू होती. मी याला प्रमाणें दाखविलीं आहेत. आणि शास्त्र्यांचा खून करण्याची कल्पना बडोद्यास निघून ती पुण्यास द्रव्यद्वारा पोंच-विली गेली व तेथें अमलांत आणली असें मी स्पष्ट लिहिलें आहे.

१४९

## १५ ऑगस्ट १९०९—अनंत नारायण दातार, बडोदें

मराठी साहित्य-संमेलन भरविण्याची खटपट चालू आहे. महाराजसाहे-बांची सहानुभूति पूर्ण आहे. निरनिराळ्या प्रांतांतील लोक बोलवावयाचे आहेत. पुरुषोत्तम विश्राम मावजी हे मुंबईस नवी इमारत बांधून त्यांत ऐतिहासिक कागद पत्र ठेवणार आहेत. त्यांत आपले कागदपत्र ठेवण्याला राजवाडे हे तयार होतील काय ? योग्य त्या कोणाकडून त्यांना विचारवावें. तुम्ही संमेलनाकरितां मराठी रंग-भूमि या विषयावर निबंध लिहून आमच्या कमिटीकडे तारीख १ ऑक्टोबरपर्यंत पाठविल्यास आभारी होईन.

१५०

## २१ ऑगस्ट १९०९—हॅरॉल्ड मॅन, गणेशखिंड, पुणें

महाराष्ट्रांतील शेतकी सुधारण्यासबंधानें एक नवीन संस्था काढण्याचा आमचा विचार आहे. त्यासंबंधानें कागदपत्र पाठवीत आहे. त्यांना येत्या मराठ्याच्या अंकीं योग्य ती प्रसिद्धी द्यावी. ही संस्था दिसण्यांत सरकारी दिसते. पण खरो-खर तशी नाहीं. मी स्वतः त्यांत भाग घेणार तो खाजगी व्यक्ति या नात्यानें. सरकारी नोकर म्हणून नव्हे. केसरींतहि या उपक्रमाला प्रसिद्धी द्यावी. मग तसें करतांना संपादक अनुकूल-प्रतिकूल जे लिहावयाचे ते लिहोत.

१५१

२४ ऑक्टोबर १९०९—वासुदेवशास्त्री खरे, मिरज

पत्र पोंचलें. विचारलेल्या शंकांचीं उत्तरें—

( १ ) थोतांड करणाऱ्या लबाड लोकांस पेशवाईत दंडाची शिक्षा होती. तोतयाचा गुन्हा राजकीय स्वरूपाचा असल्यामुळें त्यास कैदेची शिक्षा जन्मभर देण्यांत आली होती. तो बंड करून राज्यक्रांति करण्याचा उद्योग न करतां तर तो कैदेंत आपल्या मरणानेंच मेला असता. त्यास देहांत शिक्षा होण्याचे कांहीं कारणच नव्हते.

( २ ) जशी १७७६त तोतयाची चौकशी झाली त्याच धर्तीवर पूर्वीं तो पकडला गेल्यावर, म्हणजे १७६५त, माधवराव पेशव्यांनीं चौकशी केली होती. चौकशीचें काम अतिशय सोपें. त्याला लेखी पुरावा अगर साक्षी यांची जरूरच नाहीं. सदाशिवरावभाऊच्या दाट परिचयाचे हजारो लोक होते. त्यांजवळ भाऊची अनेक प्रसंगीं भाषणें झालेलीं होतीं. त्या खुणेच्या भाषणांपैकीं त्यास एकहि सांगतां येईना. कसें येईल ! त्याच्या साथिदारांनीं कांहीं माहिती त्यास चाल-चलाऊ पढविली होती. पण ती कितीशी पुरणार ! तो खोटा ठरला तेव्हां त्यास माधवरावांनीं कैदेंत ठेवलें.

( ३ ) सामान्य सरकारी रिवाजाप्रमाणें तोतयास कैदेंत ठेवलें होतें. पार्वती-बाईच्या रदबदलीमुळें जिवंत ठेवलें होतें असे कांहीं नाहीं; व तिच्या रदबदलीची तादृश किंमतहि नव्हती. जनकोजी शिंद्याच्या तोतयास व बाजीरावशाहींतील चतुरसिंगाच्या तोतयासहि कैदेंतच ठेवण्यांत आले होते. तो ब्राह्मण म्हणून वाचला हेंहि खरें नव्हे. तोतयेगिरीच्या गुन्ह्यास शिक्षाच मुळीं कैदेची होती.

( ४ ) तोतयास पार्वतीबाईच्या नजरेसमोर केव्हांहि—शेवटींसुद्धां—आणण्यांत आलें नाहीं. असे कां केलें याचें कारण उघडच आहे. त्याच्या खोटेपणाबद्दल सर्वांची खात्री होती तशीच, त्याशीं घटकाभर बोलतांच पार्वतीबाईचीहि झाली असती हें खरें. पण हें ९९ हिश्शांनीं खरें आहे. १०० हिश्शांनीं नाहीं. बाय-कांची जात अज्ञानी, पूर्वग्रहाविष्ट, मतलबी लोकांच्या कपटजाळांत सहज गुर-फटणारी असते. भाऊसाहेबांशीं तोतयाचें शरीरसाम्यहि विलक्षण असले पाहिजे. समजा कीं—एक हिश्शानें कां होईना—पार्वतीबाई जर हा माझा नवरा नव्हे

असें तोतयास पाहतांच स्पष्टपणें न म्हणती तर केवढी पंचाईत पडली असती बरें ! कांहीं गोष्टी मोघमांतच राहिलेल्या उत्तम. त्यांची केवळ कड लावून परिणाम लागत नसतो. त्यांतलीच ही गोष्ट आहे ! अव्वल इंग्रजींत मुधोळकर घोरपड्यां-पैकीं एकजण परागंदा झाला. पुष्कळ वर्षांनीं मीच तो परागंदा झालेला असे म्हणणारा कोणी तोतया मुधोळास येऊन दौलतीची वांटणी मागूं लागला. परागंदा झालेल्याची बायको हाच माझा नवरा असें म्हणून त्याजवळ नांदावयास गेली, फसली, बाटली ! तोतयाचें ढोंग बाहेर फुटलें. आणि ब्रिटिश सरकारनें त्यास घालवून लावले. हे प्रसंग फारच नाजूक असतात. नवरा खरोखरीच असला तर सारें ठीकच. नाहीतर राज्यांतल्या अत्यंत नीच मनुष्यानें, अत्यंत श्रेष्ठ कुलांतील स्त्रीच्या नजरेसमोर देखील, असल्या नात्याचें ढोंग करून येणें यांत तिची पराकाष्ठेची किळसवाणी विटंबना आहे !

( ५ ) तोतयास जिवंत ठेवण्यांत नाना अगर बापू यांचा कांहींएक अंतस्थ हेतु नव्हता. राज्यरक्षणाची जबाबदारी त्यांच्या डोक्यावर आल्यातारखेपासून तोतया केव्हांहि आपमरणानें मेला असता तरी देखील त्यास संतोषच झाला असता.

याप्रमाणे आपल्या शंकांचीं उत्तरें आहेत. इतिहासाच्या साधनांवर आपण एक लेखमाला लिहिण्याविषयी मला बोलला होता. त्याचा मी विचार केला. पण असले लेख लिहून तूर्त कांहीं उपयोग होण्याचा रंग दिसत नाहीं. राजवाडे सांपडेल तें चिटोरें छापत सुटतात; तर पारसनीस लहान मुलांस फुलें पिसें पानें दाखवून खेळवितात त्याप्रमाणें मराठी इतिहासांतल्या गमती हुडकून वाचकांस दाखवत असतात. पहिला प्रयत्न निष्कारण यातायातीचा व खर्चाचा आहे तर दुसरा निष्कारण चेंगटपणाचा आहे. मी करतों तें मात्र अत्यंत निर्दोष व उत्तम आहे हें माझें मत आहे ! अर्थात् उपरिनिर्दिष्ट गृहस्थांचें मतहि स्वकृतिसंबंधानें असेच असेल ! जेथें एकवाक्यता होण्याचा कांहींच संभव नाहीं तेथें चर्चा उपस्थित करून कांहीं फायदा नाहीं. माझ्या गांवचा मारुति बळकट कीं तुझ्या गांवचा मारुति बळकट म्हणून चर्चा करतां करतां ज्याप्रमाणें खेडवळांनीं शेवटीं वर्दळीवर येऊन एकमेकांच्या उरावर बसावें त्याप्रमाणें ऐतिहासिक वादांचें पर्यवसान सांप्रत होत असते ! असो. गेल्या तीस वर्षांत साने, खरे, राजवाडे, पारसनीस या सर्वांनीं जे जे केले त्यापासून इतिहासाला उपयोग काय काय झाला आहे, डफ

वगैरे ग्रंथकारांचे ग्रंथ हल्लीं उपलब्ध झालेल्या माहितीवरून कितपत फिरवावे लागतील, या बाजूनें किती काम झालें व किती राहिलें, ही चर्चा विशेष फायद्याची आहे हें खरें. पण ही चर्चा केसरीच्या वाचकांस फारच कंटाळवाणी होईल.

हरिवंशाची बखर आतां आपण वाचून टाकलीच असेल. तिजवर चारसहा ओळी अभिप्राय लिहून मजकडे स्मरणपूर्वक पाठवावा. त्याचा कांहीं उपयोग होण्याजोगा असेल तर मी करून घेणार आहे.

१५२

? १९०९—वि. का. राजवाडे, तळेगांव दाभाडें

ताम्रपट नीट पार्सल करून रा. रा. B. R. Gogte, मिरज, Ed. Inspector यांजकडे Regd. Post Parcel करून पाठवावे. पैसे मी पुण्यास आल्यावर देईन.

आपल्या तोतयासंबंधींचें पत्र परवां २४ तारखेस पाठवलें. तें आपल्यास पोंचलें नाहीं हे आश्चर्य ! दोन पैशाचें तिकिट लावून पाकीट पिवळें पाठविलें होतें. आशयः—दुसरे तोतये त्या वेळीं उठत होते. त्यांना शह म्हणून हा तोतया माधवरावानें व नानानें ठेवला. हा जर खरा, तर ते खोटे. तो खरा तर हा खोटा. सर्व खोटेच. परंतु दुसऱ्याची वासलात लावण्यास हा उपयोगी. पार्वतीबाईचेंहि वेडें प्रेम. ती मेल्यावर व तोतयानें पुनः बंड केल्यावर त्यांना देहान्त शिक्षा दिली.

१५३

२९ ऑक्टोबर १९०९—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

लेख पोंचल्याबद्दलचें आपलें पत्र पावलें. ते लेख परत रा. मित्रांकडे गेल्याचेंहि रा. गुर्जरांकडून कळलें. आपण त्यांत कोणते फेरफार केले आहेत हे कळण्याची फार उत्सुकता आहे. मी याबद्दल रा. गुर्जर यांस लिहिलें आहे. पण त्यांजकडून अजून उत्तर आलें नाहीं. तें उद्यां येण्याची वाट आहे.

‘ म्हातारपणाचे फायदे ’ व ‘ चित्रगुप्ताचा जमाखर्च ’ या दोन नवीन गोष्टी लिहून रा. मित्रांकडे पाठविल्या आहेत. त्या मनोरंजनांत प्रसिद्ध झाल्यावर आपणास पहावयास सांपडतीलच. त्या व इतर लेखांत आक्षेपार्ह कांहीं नाहींच.

तथापि सर्व लेख नजरेखालून जावे अशी आपली इच्छा असल्यास मला कळवावें. म्हणजे मी प्रत्येक लेखाचीं प्रुफें आपणांकडेहि पाठविण्याची रा. मित्रांस सूचना करीन.

बडोद्याच्या साहित्य परिषदेकडून आज नाटक किंवा विनोद या विषयावर एक निबंध लिहिण्याबद्दल विनंतिपत्र आलें आहे. मी पूर्वी आपल्या सूचनेवरून मराठी ग्रंथसंग्रहालयाकरितां जो मराठी वाङ्मयावर निबंध लिहिला होता तोच साफसूफ करून पाठविण्याचा विचार आहे. आपण त्या परिषदेंत काय करावयाचें योजिलें आहे ?

आपण जी प्रस्तावना लिहिणार आहात तींत माझ्या मतें 'जुन्या चालींचें समर्थन मूर्ख धर्माभिमानी कसें करील हें या लेखांत दर्शविलें असून त्यांत समंजस मनुष्यास राग येण्यासारखें कांहीं नाहीं' अशा अर्थाचा मजकूर अवश्य घालावा. शिवाय गेल्या चारपांच वर्षांत राजकीय विचारांत क्रांति झाल्यामुळें धार्मिक समजुतींतहि बदल झाला आहे. व यामुळें हे लेख प्रथम जितके आक्षेपार्ह वाटले तितके आतां वाटणार नाहीत अशीहि आशा प्रदर्शित करावी.

गेल्या आठवड्यांत किर्लोस्कर मंडळीचा नवीन नाटकगृहासंबंधानें चोहोंकडे जो जयजयकार झाला तो पाहून धन्यता वाटली. विशेषतः मराठ्यांतील तुमचे लेख फार चांगले वाटले. रा. मुजुमदारांस जे या प्रसंगीं धन्यवाद मिळाले त्यांस ते सर्वांशीं पात्र आहेत यांत संशय नाहीं. हिंदू पंचाच्या दोषैकदृक् पत्रकारानें मात्र त्यांस शिव्यांची लाखोली वाहिली आहे. पण या बाबतींत ते व आपण समदुःखी आहात ही त्यांतल्या त्यांत त्यांस समाधान वाटण्यासारखी गोष्ट आहे !

रा. मुजुमदारांनीं मला उद्घाटन विधीचा दिवस १५-२० दिवस तरी पूर्वी कळविण्याचे अभिवचन दिलें होतें; तें पार न पाडतां फक्त २-४ दिवसच पूर्वी छापील निमंत्रणपत्रिका धाडिली. माझे चुलते रा. वामनरावजी यांसही निमंत्रण-पत्रिका धाडण्याचे भान राहिलें नाहीं. या गोष्टीवरून त्यांची अखेर अखेर फार धांदल उडालेली दिसते. ईश्वर करो व हा त्यांचा उत्कर्ष कायम राहो !

आपण नाटकें लिहिणार होतां त्याचें काय झालें ?

मी हल्लीं नाटक लेखनाच्या दगदगींतून पूर्णपणें मोकळा झालों आहे. हें स्वातंत्र्य आमरण कायम रहावें येवढीच इच्छा आहे.

१५४

१९०९—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

आपलें पत्र पावलें. आपण जी प्रस्तावना लिहिणार आहात तिच्यांत सुदाम्यानें धर्मातील वाईट गोष्टींचीच थट्टा केली आहे, उदाहरणार्थ—रामचंद्राची किंवा साधुसंतांची टवाळी कोठेंहि केली नाहीं—व मूळच्या लेखांत फेरफार केले आहेत अशा अर्थाचाहि मजकूर मर्जी वाटल्यास घालावा.

प्रसिद्ध झालेल्या पंधरा लेखांत आणखी तीन लेखांची भर घातली आहे. त्यांचे मथळे 'याचक' 'म्हातारपणचे फायदे' व 'चित्रगुप्ताचा जमाखर्च' हें आहेत. यांपैकीं पहिला लेख रा. गुर्जरांना बराच आवडण्यासारखा दिसतो. हे सर्व लेख आपणास स्वतंत्र पुस्तक छापण्यापूर्वी मनोरंजनांत वाचावयास मिळ-तील. अर्थात् स्वतंत्र पुस्तक प्रसिद्ध होण्यास अजून दोन-तीन महिन्याची अवधी आहे.

पुस्तकाचें नांव 'सुदाम्याचे पोहे, अर्थात अठरा धान्यांचें कडबोळें' हें देण्याचा विचार आहे. हें पुस्तक कै. राजाराम रामकृष्ण भागवत यांस अर्पण करण्याचा विचार आहे. दोन्हीं नांवें आपणासहि सार्थ वाटतील अशी आशा आहे.

१५५

१० सप्टेंबर १९०९—गणेश व्यंकटेश जोशी, सातारा

हुगळी कॉन्फरन्समध्यें संयुक्त कांग्रेसबद्दल एक ठराव करण्यांत आला आहे. कमिटी नेमली आहे. त्यावर सुरेंद्रनाथ बानर्जी व अरविंद घोष अशांची नेमणूक केली आहे. पंजाबांत वेगळी कॉंग्रेस भरविण्याविरुद्ध लोकमत आहे. मध्यप्रांताचेंहि लोकमत तसेंच दिसतें. माझें मत असें कीं, पुणें सार्वजनिक सभेनें सहकारिता करावी. तरी या गोष्टीचा तुम्ही खाडिलकर वगैरे मंडळींनीं विचार करावा व तुमचें मत मला कळवावें. सरदार बाळासाहेब नातू व अण्णासाहेब पटवर्धन हे याला विरुद्ध नसतील असें वाटतें.

१५६

१३ नोव्हेंबर १९०९—वि. का. राजवाडे, तळेगांव दाभाडें

रा. किंकेड यांचा लेख अलाहाबाद रिव्ह्यूंत आला होता. त्याचें खंडन मी 'राष्ट्रोदयां'त केलें आहे. तरी तें इंग्रजींत अलाहाबाद रिव्ह्यूंत झाल्याशिवाय

योग्य गोष्ट होणार नाहीं. सर्व हिंदुस्थानभर आपल्या पूर्वजांची निंदा त्या गृहस्थानें केली आहे. ती खोटी आहे हें जगाच्या प्रदर्शनास आणणें हें आपलें कर्तव्य आहे. मी स्वतः इंग्रजींत लिहीत नाहीं, हें आपल्याला माहीत आहे. तेव्हां आपण हें काम करावें अशी माझी आपणाला आग्रहाची विनंती आहे. आपण मजपेक्षां इंग्रजी चांगलें लिहाल. तशांत मी मुळीं लिहितच नाहीं. प्रतिज्ञाच आहे. राष्ट्रोद्धारांतील माझा लेख आधाराला घ्यावा. केसरींतील रा. आठल्ये यांचा लेख चंद्रग्रहणापुरता चुकलेला आहे—ही इशारत लक्षांत ठेवा.

रा. रा. पारसनीस यांच्या 'इतिहाससंग्रहां'तील अशुद्धें व चुका दुरुस्त करण्याला त्यांनीं मला लिहिलें आहे. मूळ लेख पाहिल्याशिवाय शुद्धिपत्र यथाशास्त्र होणार नाहीं म्हणून मी लिहिलें; परंतु उत्तर नाहीं. तर आपण त्यांस लिहा व कागद आपल्या येथें आणा. म्हणजे मी तेथें येऊन तपासून टाकीन. मला कळवा.

१५७

### १५ जानेवारी १९१०—विठ्ठल नारायण पाठक, हेडमास्तर, सातारा

तुम्ही मुंबई कायदे कौंसिलच्या निवडणुकीला उभे रहाणार ते एकाद्या पक्षातर्फे न उभे रहातां स्वतंत्र म्हणून उभे रहाल तर चांगलें होईल असे मी तुम्हाला म्हणालोंच होतों. "तुम्ही माझी कांहीं गैरसमजूत करून दिली आणि म्हणून तुम्हाला मदत करण्याचें दिलेलें आश्वासन मी परत घेतलें" असें कोणी म्हणत असेल तर ते खरें नाहीं. तुम्हाला मी एकट्यानें मत देणें शक्य नाहीं. कारण बरोबरीचे इतर लोक व पुढारी यांचा विचार घ्यावा लागतो, व त्याप्रमाणें करावें लागतें. मग उमेदवाराच्या योग्यतेसंबंधीं स्वतःचें मत कसेंहि असो! ना. गोखले यांनीं धैर्यानें व उदारपणानें पुढें येऊन सरकारानें तुमचें नांव उमेदवारांतून काढून टाकल्याबद्दल सरकारचा तीव्र निषेध केला आहे, ते पाहून खरोखरच आम्हाला आनंद झाला.

१५८

### ३ फेब्रुवारी १९१०—सय्यद हैदर रेझा, लंडन

मुंबई कौंसिलच्या निवडणुकींत सरकारनें तुमचें नांव आपल्या अधिकारांत रद्द केलें असें वाचलें. अशा गोष्टी होणारच. येथील कांहीं इंग्रज मित्र, पार्लमेंटचे

सभासद, तसेंच राजकवि लॉर्ड टेनिसन यांची पुतणी ही मंडळी हिंदुस्थानच्या प्रश्नांत लक्ष घालीत आहेत व एक लहानसें पुस्तक प्रसिद्ध करणार आहेत. पुणें येथें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट यांनीं मजवर खटला भरला, नागपूरच्या पोलीस कमिशनरनी नागपूर काँग्रेसला बंदी केली, इत्यादि गोष्टी त्यांत घालावयाच्या आहेत. तरी यासंबंधीं कागदपत्र पाठवाल तर फार आभारी होईन.

१५९

**२२ मे १९१०—त्र्यंबक बापूजी ठोंबरे, बालकवि, अहमदनगर**

परिचय नसतां पत्र लिहितों याबद्दल क्षमा करा. तीन-चार महिने झाले मी प्रो. गजानन गणेश पेंडसे बडोदें यांच्याकडून अहमदनगर येथें रे. टिळक यांजकडे आलों आहे. परंतु येथें रहाणें मला बरोबर वाटत नाहीं. येथें मी एका वाईट परिस्थितींत सांपडलों आहे म्हणून आपणांस लिहिण्याचें धाडस करीत आहे. करुणा येईल तर पहावें म्हणून हें करीत आहे.

१६०

**२४ मे १९१०—गणेश रघुनाथ अभ्यंकर, सांगली**

तुम्ही देशस्थ-कोकणस्थ विवाह करून ब्राह्मण समाजाला एका सामाजिक सुधारणेचें मोठें अनुकरणीय उदाहरण घालून दिलें याबद्दल मी तुमचें अभिनंदन करितों. असें धैर्य थोडे लोक दाखवितात. समाजांतील तुमचा दर्जा मोठा आहे यामुळें या उदाहरणाचा फार उपयोग होईल.

१६१

**६ जून १९१०—विठ्ठलभाई पटेल, मुंबई**

पत्राबद्दल आभारी आहे. तुम्ही मजकडे द्याल तें काम करण्यास मी तयार आहे. काय काम द्यावयाचें हें तुमचें तुम्ही ठरवा. विलायत सरकार मुग्ध आहे. सुधारणांचें रूपरंग ते कांहींच प्रगट करण्यास तयार नाहींत. आणि आम्हाला मात्र म्हणतात कीं, आनंदानें सरकाराशीं पूर्ण सहकारिता करा ! ती कशी होणार !

## १६२

### ७ जून १९१०—नारायण वामन टिळक, अहमदनगर

'वनवासी फूल' हें माझें काव्य तुमच्याकडे पाठविलें आहे. तुमच्या परीक्षणानें मला योग्य तें मार्गदर्शन होईल आणि यापुढें उच्च प्रतीचीं काव्यें लोकप्रिय होण्यास मदत होईल अशी मला खात्री वाटते. ;या काव्याला साधें साकीवृत्तच मी जाणूनबुजून योजले आहे.

## १६३

### ३ जुलै १९१०—अच्युत बळवंत कोल्हटकर, नागपूर

मी व गाडगीळ वकील यांच्याविरुद्ध सरकारानें हत्यार उचललें आहे. आमची सनद रद्द करण्याचें प्रकरण चालू आहे. माझ्यातर्फे असा एक मुद्दा मी मांडीत आहे कीं, इतर हायकोर्टांनीं अशा गुन्ह्याकरितां वकिली सनदा रद्द केल्या नाहींत. त्यांत लाला लजपतराय, टिळक, व स्वतः तुम्ही यांचीं नांवें मी सांगितलीं आहेत. तुमचें नांव घालण्याचें कारण असें कीं, आपली सनद रद्द व्हावी असें कोणास आवडत नसलें तरी तुमची सनद रद्द झाल्यास तुम्ही फिकीर करणार नाहीं. कोर्ट मला म्हणालें कीं, "तुमच्या मुद्याविषयीं तुम्ही पुरावा काय असेल तो द्या." शेवटीं असें ठरलें कीं, तुम्ही ज्युडिशिअल कमिशनरला पत्र लिहून "माझी सनद हायकोर्टानें रद्द केली नाहीं" असें कळवाल तर तुमची साक्ष समक्ष न घेतां तुमचा पुरावा स्वीकारला जाईल. तुमच्या पत्रांत हेंहि लिहा कीं, "टिळकांना १८८२ व १८९७ सालीं शिक्षा झाली असतांहि त्यांची सनद रद्द करण्यांत आली नाहीं." तुमचें पत्र आल्यानें माझ्या डिफेन्सला मदत होणारी आहे म्हणून पाठवावें.

## १६४

### ९ जुलै १९१०—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

'सुदाम्याच्या पोह्यांची' तुमची लेखी प्रस्तावना पोंचली. त्याबद्दल आभारी आहे. तुम्हाला योग्य वाटल्यास त्यांत अधिक मजकूर घालण्याकरितां कांहीं सूचना यासोबत पाठविल्या आहेत. त्यांचा उपयोग करतां आल्यास पहा. माझ्या ह्या पुस्तकाला प्रस्तावना लिहिणें हें काम तुमच्या सारख्याच्या लोकप्रियतेला कमीपणा आणणारें असतांहि, तुम्ही केवळ स्नेहभावानें आणि उदारपणानें तें काम

पत्करलें. तुमच्या पक्षांतील लोकांना हे आवडणार नाहीं हें मला माहीत आहे. म्हणून मी तुमचे अत्यंत मनःपूर्वक आभार मानतों.

१६५

## २७ जुलै १९१०—धर्मानंद कौसंबी, केंब्रिज

केसरी-मराठा नियमितपणें मजकडे पाठवितां याबद्दल आभारी आहे. मँचेस्टर येथील मजुरांच्या चाळी मी पाहिल्या. त्या असाव्या तशा नाहींत पण हिंदुस्थानांतल्यापेक्षां बऱ्या आहेत. दक्षिण अमेरिकेंत गुलामगिरी बंद झाली तेव्हांपासून सुशिक्षित लोकांच्या सहाय्यानें मजूरवर्गांत नवचैतन्य उत्पन्न झालें. आणि कार्ल मार्क्स यानें या चळवळीला शास्त्रीय स्वरूप दिलें. स्वदेशी चळवळीला मी महत्त्व देतों. तिनें, किंवा परदेशी मालावर जकाती बसविण्याचा अधिकार मिळाल्यानेंहि, गरीब लोकांची उपासमार थांबणार नाहीं. श्रीमंत गरीबांत आज केवढा मोठा विरोध आहे ! सक्तीचें मोफत शिक्षण सुरू केलें तर पन्नास वर्षांत भांडवलवाले व मजूर यांमध्यें भयंकर युद्ध सुरू होईल. पण कलह हा वाईटच ! म्हणून 'हेयं दुःखं अनागतं' असें पतंजलीनें म्हटलें तें लक्षांत घेऊन आपण दूरदृष्टीनें वागलें पाहिजे. पुढाऱ्यांत स्वार्थत्याग पाहिजे. तसेंच अर्थशास्त्राचे नियम लक्षांत आणून वागलें पाहिजे. तुम्ही मराठी भाषेंत हा विषय उत्तम लिहाल.

१६६

## २९ जुलै १९१०—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव

विधवाविवाह उत्तेजक सभेपुढें तुम्ही निबंध वाचला तो फारच उत्तम आहे. त्यांत खोल विचार तर आहेतच; पण विनोदहि आहे. उपमा व रूपकें यांचीं निवड फार चांगली झाली आहे. युक्तिवादाची सांखळी बरोबर आहे. शिवाय मिश्र-समाजावर छाप पडण्याकरितां अशा वादग्रस्त प्रश्नाची चर्चा करतांना जो भाषेचा नेमस्तपणा लागतो तोहि तुम्ही संभाळला आहे. तात्पर्य, सभेचे अध्यक्ष डॉ. भांडारकर यांनीं तुमची जी स्तुति केली ती सर्वथा योग्य आहे. हल्लीं गडकरी कोठें रहातात ? तुम्ही व खाडिलकर यांनीं माझ्या नाटकाच्या तालमी वेळांत वेळ काढून पाहिल्या याबद्दल आभारी आहे.

१६७

**३ ऑगस्ट १९१०—गोपाळ कृष्ण देवधर, ज्ञानप्रकाश कचेरी, गिरगांव, मुंबई**

विधवा पुनर्विवाह विषयावर तुम्ही निबंध वाचला त्या सभेला मी हजर होतों. त्यांतील विचारसरणी योग्य असून निबंध फारच सुंदर आहे. या प्रसंगाचें एक चित्र करून ' कामगार समाचारांत ' छापले आहे. त्यांतील तुमचा चेहरा हुबेहुब साधला नाही; परंतु ठळकपणानें तरी तुम्ही नजरेंत भरताच.

१६८

**७ ऑगस्ट १९१०—अमृतलाल गी. देसाई, मॅडिसन, अमेरिका**

मी तुम्हाला वर्तमानपत्रांतील कात्रण पाठविलें त्याचा तुम्हाला उपयोग झाला हें पाहून बरें वाटलें. मि. कार्पेंटर हे हिमालयावरून परत आल्यावर त्यांची व मिस्टर बेकर यांची मुलाखत होऊन हिंदुस्थानविषयक चर्चा झाली. तिचेंहि एक कात्रण पाठवीत आहे. मी हल्लीं रहातों तें मॅडिसन हें गांव शिक्षणाचें मोठें केंद्र आहे. येथील विद्यापीठांत दोन बंगाली तरुण अभ्यास करतात. त्यांपैकीं एकानें जहाजावरील नोकरी करून खर्चाशिवाय प्रवास केला. तो फार हुषार असून रसायनशास्त्राच्या प्रोफेसराचा आवडता पट्टशिष्य होऊन राहिला आहे. मी येथें बीटशुगरचा अभ्यास करीत आहे. उसाच्या साखरेची कृति लुईसीआना आणि न्युऑर्लिन्स येथें शिकलों. बीटचा हंगाम डिसेंबरपर्यंतच टिकतो म्हणून मी जानेवारींत हवाई बेटांकडून हिंदुस्थानास परत येतों. हिंदुस्थानांतील भांडवल-वाले लक्ष घालतील तर साखरेच्या धंद्याला तिकडे इतर कोणत्याहि देशापेक्षां फारच अधिक वाव आहे. तुमचें लक्ष वेधण्यासारखें इकडे जें कांहीं आढळेल त्याविषयीं मी तुम्हाला कळवीत जाईन.

१६९

**२१ सप्टेंबर १९१०—गोविंद सखाराम सरदेसाई, बडोदें**

तुमचें आयर्लंडचें पुस्तक वाचून पाहिलें. प्रस्तुत स्थितींत फारच उपयोगाचें झालें आहे. त्याविषयावरील आपलें विस्तृत वाचन व जबरदस्त मेह-नत पाहून मन थक्क होतें. पाटणा कॉलेजचे प्रो. यदुनाथ सरकार व प्रो. आशुतोष मुकर्जी यांना गुदस्ता येथें आपण पाहिले असेलच. ते ऑक्टोबर ९ ते १३ पर्यंत

पुण्यास मुक्काम करणार आहेत. तरी त्यांचा सत्कार करून जे कांहीं पहाण्याजोगें असेल तें त्यांना दाखवावें अशी विनंती आहे. महाराष्ट्राची ऐतिहासिक राजधानी पहाण्याची त्यांची फार दिवसांची इच्छा सफल होणार आहे.

१७०

**२१ सप्टेंबर १९१०—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव**

माझ्या 'प्रेमशोधन' नाटकाचें पुण्यास वारंवार प्रयोग होत असून नाटक-मंडळीच्या उत्पन्नावरून त्यांना तें पसंत पडलें आहे असें दिसतें. तथापि तुमचा स्वतःचा अभिप्राय कळवावा. १८५८ व १८५९ या सालीं कै. महादेव गोविंद रानडे यांनीं लिहिलेल्या निबंधांच्या दोन वह्या मला रा. सहस्रबुद्धे यांजकडून मिळाल्या आहेत. त्यावरून रानड्यांची बुद्धिमत्ता, देशभक्ति, इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व इत्यादि गुण ठळकपणें दिसून येतात. ते तपासल्याविषयीं या निबंधांवर रानड्यांच्या तत्कालीन शिक्षकांचीं आद्याक्षरें आहेत. पण ते कोण हें कळत नाहीं. तरी डॉ. भांडारकर, प्रो. गोखले, शिवरामपंत साठे, रमाबाई रानडे यांच्यापैकीं कोणी भेटल्यास त्यांना त्या शिक्षकाचें नांव माहीत असल्यास कळवावें. या निबंधांना मी एकाद्या कृपणाप्रमाणें जपत असल्यामुळें ते मला तुमच्याकडे पाठवितां येत नाहींत. पण तुम्ही इकडे याल तेव्हां मी ते तुम्हाला दाखवीनच.

१७१

**२७ सप्टेंबर १९१०—सी. ए. किंकेड, सिमला**

मराठ्याच्या प्रती पोंचल्या. त्यांतील अभिप्रायाची मला विशेष किंमत वाटते. कारण आधुनिक राजकीय विषयांवरील तुमचीं माझीं मतें उत्तर-दक्षिण ध्रुवांइतकीं दूर आहेत. तुमच्या अभिप्रायाबद्दल आभारी आहे.

१७२

**१ फेब्रुवारी १९११—ना. गंगाधरराव माधवराव चिटणवीस, कलकत्ता**

लँड रेव्हिन्यु सेटलमेंटच्या ठरावावरील वरिष्ठ कौंसिलांतील माझें भाषण या सोबत पाठवीत आहे तें छापा. सरकार सागर व नर्मदा जिल्ह्यांत पन्नास टक्के सारा प्रथम उतरविण्यास तयार होईल. मग इतर जिल्ह्यांत. मध्यप्रांतांतील माल-गुजारांना यु. पी. व पंजाब यांतील जमिनदाराप्रमाणेंच वागविण्याचें वचन सर-

कार देत आहे. माझ्या मतें यांत मालगुजारांचा फायदा आहे. मी ठरावांत मागितलें तें सर्व मिळालें नाहीं. पण मागितलेलें सर्व कोणाला मिळत असतें ! तुमच्या वर्तमानपत्रांचा प्रसार मध्यप्रांतांत पुष्कळ आहे म्हणून तुम्ही या ठरावावरील माझीं भाषणें छापल्यास उपयोग होईल.

१७३

## ४ मार्च १९११—धर्मानंद कोसंबी, केंब्रिज, मॅसेच्युसेटस्, अमेरिका

येथें अमेरिकेंत मजुरांना दहा व पोस्टमन वगैरे सरकारी नोकरांना आठ तास काम देतात. अधिक देत नाहींत. आतां मजुरांनाहि दिवसातून आठच तास काम पडावें अशी येथें त्यांची मागणी सुरू आहे. रूझवेल्टसारखे पुढारीहि ह्या मागणीला पाठिंबा देत आहेत. आमचा धनिकवर्ग म्हटला म्हणजे उमींचंदाच्या वर्गांतील असावयाचा. तुमच्या पत्रांत असा युक्तिवाद वाचला कीं, हिंदुस्थानांत मजुरांचे तास कमी होण्याची मागणी स्वतः मजूर करीत नसून मँचेस्टरचे गिरणीवाले त्यांची उठावणी करीत असतात. पण हे म्हणणें बरोबर नाही. असो. माझें येथील काम जरा मंदाईनें चाललें आहे. सहा ताडपत्रीं पुस्तकें, तीन मुद्रित पुस्तकें, व दोन टीका एवढ्या ग्रंथाचें पर्यालोचन करून त्यांतून शुद्धाशुद्धाची निवड करावयाची, पाठांतरें द्यावयाचीं, व भाषांतरासाठीं योग्य शब्दांची निवड करावयाची हीं कामें त्वरेनें होणें शक्य नाहीं. तथापि रविवारी देखील सुट्टी न घेतां मी व प्रोफेसर लॅनमन काम करीत असतों. १९१२ च्या जून महिन्यापूर्वी हिंदुस्थानास परत जावें असा विचार आहे.

१७४

## १० मार्च १९११—एच्. सी. स्विफ्ट, कलेक्टर, पुणें

डॉ. बुडिंग नावांचे एक प्रशिअन स्टेट कौंसिलर पुण्यास आले आहेत. त्यांचा मुक्काम थोडा आहे. तुमच्या पक्षांतील एकदोन प्रमुख लोकांशीं त्यांनीं बोलावयाचें आहे. तरी शनिवार तारीख ४ रोजीं तीन वाजतां मजकडे याल काय ? डॉ. बुडिंग हे तिकडील फार मोठ्या दर्जाचे गृहस्थ आहेत आणि त्यांनी स्टेट सेक्रेटरी आणि व्हाईसरॉय यांचीं पत्रें आणिलीं आहेत.

१७५

## १३ एप्रिल १९११—सिटी मॅजिस्ट्रेट, पुणें

को-ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायट्यांचें बिल तुम्हांकडे हरि नारायण आपटे व विष्णु अनंत पटवर्धन यांनीं पाठविलेंच असेल. सिटी मॅजिस्ट्रेट या नात्यानें मला कलेक्टरकडे पंधरा तारखेपर्यंत अभिप्राय पाठवावयाचे आहेत. तरी कृपा करून तुमचा अभिप्राय लवकर पाठवा.

१७६

## २१ एप्रिल १९११—गंगाधरराव माधवराव चिटणवीस, नागपूर

आपल्या मतांविरुद्ध असणाऱ्या लोकांशींहि तुम्ही सहिष्णुतेनें वागू शकता ही मोठी गोष्ट असून तिनें त्यांच्या मनावर फार चांगला ग्रह होतो. राजद्रोही कायद्याला मी अनुकूल मत दिलें; परंतु तसें करण्यास मला कांहीं कारणें होतीं. मुंबईच्या बाजूला गेलों तर तुम्हाला भेटेन. तुम्ही समजुतदार व मनानें उदार आहा, म्हणूनच माझ्या सारख्याला तुम्हांला मोकळ्या मनानें लिहितां येतें.

१७७

## २८ मे १९११—दाजी आबाजी खरे, सिंहगड, पुणें

हरिभाऊ आपटे यांच्याजागीं हरी सीताराम दीक्षित हे निवडणुकीला उभे रहाणार असें कळतें. त्यांना गोखले यांचा पाठिंबा आहे. तेव्हां आतां करंदीकर हे उभे राहून काय करणार? मी व दीक्षित यांना मिळून खानदेश, नाशिक, नगर, सोलापूर यांतील मतें वांटून जातील. तेंच उलट त्यांनीं साताऱ्यांतील मतें मला दिलीं तर माझें काम होईल. त्यांना मात्र निवडून येण्याची आशा नाहीं. मी उभा राहिलों नाहीं तरी तेंच होणार. तरी ही गोष्ट करंदीकरांना समजावून सांगाल काय?

१७८

## ११ जून १९११—गोविंद सखाराम सरदेसाई, लंडन

बुद्धजयंतीवर तुम्ही केसरींत लेख लिहिला तो सयाजीराव महाराज गायकवाड यांना फार आवडला. महाराजांच्या मनांत फार दिवस आहे कीं, सर्व हिंदु-

स्थानांत एकच धर्म प्रवर्तित करण्याची सुधारणा घडवून आणावी. अशा प्रयत्नाला तुम्ही पुष्कळ मदत कराल व लोकमत बनवाल असें महाराजांना वाटतें. मग राजकारणांत त्यांचीं तुमचीं मतें कितीहि न जुळोत. हें मी महाराजांच्या सांगण्यावरून लिहितों असें मात्र समजावयाचे नाहीं. पण तुम्ही नेहमी कोणत्याहि प्रश्नावर लिहितांना निस्पृह व नेमस्तपणें लिहितां; म्हणून तुम्ही या प्रश्नाची ऐतिहासिक बाजू व आजची गरज यांची चर्चा मनमिळाऊपणानें कराल असें मला वाटतें. म्हणून मीच होऊन हें लिहीत आहे.

१७९

## २१ जून १९११—गोपाळ कृष्ण गोखले, पुणें

कै. गणेश व्यंकटेश जोशी यांच्या कुटुंबास कोणत्याना कोणत्या तरी मार्गें मदत करावी अशी एक्झिक्युटिव्ह कौंसिलर मिस्टर मॉरिसन यांना इच्छा होऊन त्यांनी मला तसें लिहिलें. त्या त्यांच्या पत्राचें उत्तर लिहिण्यास मी बसलों तेव्हां मला असें वाटलें कीं, मॉरिसनसाहेबांचे आभार मानण्यापूर्वी जोशी यांचें कुटुंब व मुलगे यांची परवानगी आधीं घेऊन मगच लिहावें. तरी मॉरिसनसाहेबांचें पत्र यांसोबत तुमच्याकडे पाठवीत आहे. तें घेऊन तुम्ही जोशी यांच्या कुटुंबाला भेटून, मॉरिसनसाहेबांना मी लिहिणार त्याला त्यांची परवानगी आहे कीं नाहीं हे विचारून मला कळवा.

१८०

## ८ जुलै १९११—श्रीधर व्यंकटेश केतकर, लंडन

नागपूरचे चीफ कमिशनर यांना पत्र लिहून मी असें सुचविलें आहे कीं, नागपूरप्रांताकरितां एक स्वतंत्र युनिव्हर्सिटी स्थापण्यांत यावी. तिचें धोरण जर्मन अमेरिकन विद्यापीठांच्या धर्तीवर प्रगतीपर असावें. आणि हिंदी व मराठी भाषा या शिक्षणाच्या माध्यम कराव्या. इंडिया कौन्सिलमधील सर थिओडर मॉरिसन यांची मी गांठ घेतली. तो मनुष्य उदारमतवादी दिसला. त्याला मी आपलें म्हणणें सांगितलें. तेव्हां तो म्हणाला कीं, "हिंदुस्थानांत देशी भाषांविषयीं चळवळ करणें अवश्य आहे." तरी या कामीं तुम्ही माझ्याशीं सहकारिता कराल काय? देशी भाषांविषयीं आमची भावना किती तीव्र आहे हें इंग्रजांना कळत नाहीं. तरी

तें कळविलें पाहिजे. तुमच्या हातीं दोन वजनदार वर्तमानपत्रें आहेत त्यांचा ह्या कामीं फार उपयोग होईल. रा. ब. मुधोळकर व माधवराव पाध्ये यांनाहि मी हें लिहीत आहे.

१८१

### ३१ फेब्रुवारी १९१२—व्ही. व्ही. टिळक, सोलापूर

कै. रा. ब. ग. व्यं. जोशी यांच्या ग्रंथसंग्रहांत सुमारें किती किंमतीचे ग्रंथ असतील हें कळवाल काय? आमच्याजवळ तितके पैसे नसले तर वर्गणीहि करूं. परंतु तो ग्रंथसंग्रह विकत घेऊन देवास दरबारच्या लायब्ररींत ठेवावा अशी इच्छा आहे.

१८२

### ३ एप्रिल १९१२—गंगाधरराव माधवराव चिटणवीस, नागपूर

वरिष्ठ कौन्सिलांत गोखले यांच्या शिक्षणविषयक बिलाला मी विरोध केला, याबद्दल तुम्ही मजवर रागावला असाल हें केसरीतील मजवरच्या टीकेनें उघडच होत आहे. तथापि या विषयींची माझीं कारणें तुम्हांला सांगावींशीं वाटतात. मी बिलाला प्रतिकूल मत दिलें हें खरें. परंतु तें सरकारच्या भिडेमुळें किंवा भीतिमुळें नाहीं. तर सक्तीच्या शिक्षणाच्या तत्त्वाविरूद्ध मी मनांतून आहे म्हणूनच! हें माझें मत पुष्कळ दिवसांपासूनचें आहे. गोखले यांचें बिल पास होतें तर हल्लीचा 'सेस' वाढवावा लागणार. आणि त्याला मी संमति द्यावी तर, गतवर्षींच मी सरकार धाऱ्याबद्दल ठराव पास करून घेतला त्याच्या नक्की विरुद्ध वर्तन मला करावें लागलें असतें! मी मालगुजारांचा प्रतिनिधि म्हणून वरिष्ठ कौन्सिलांत आहे. आणि शिक्षणाकरितां शेतकऱ्यावरील 'सेस' वाढविल्यानें मालगुजारांचें नुकसान झालें असतें असें मला वाटतें. अशा परिस्थितींत मी गोखले यांच्या बिलाला विरोध केला. मध्यप्रांतांतील शेतकरी वर्गाचेंहि असेंच मत आहे. तात्पर्य, माझा विरोध ही चूक असली तरी सरकारी मोहाला बळी पडून मी ती केलेली नाहीं. म्हणून तुम्ही मला या चुकीबद्दल अवश्य क्षमा करावी व पूर्वीप्रमाणेंच स्नेहभाव ठेवावा. बडोद्यांत सक्तीच्या शिक्षणाचा झालेला प्रयोग यशस्वी ठरला नाहीं असेंहि कांहीं गुजराथी मित्रांनीं मला कलकत्त्यांत सांगितलें हेंहि एक कारण होतेंच.

गोखल्यांनाहि मी माझें मत आधींच सांगितलें होतें. त्यांना आयत्या वेळीं दगा दिला असें झालेलें नाही.

१८३

**५ एप्रिल १९१२—विनायक विष्णु साठे, पेन्शनर सातारा**

आपलें तारीख ४ चें पत्र पोंचलें. आपल्या प्रसादवाणीमध्यें काय जादु भरली आहे कळत नाहीं. पत्र पहातांच माझी अशी स्थिति झालीः—

सौदामिनी प्रकटतां घन ओतितात।
पाणी, सवेग बहु पूरहि वाहतात॥
वाणी तुझी परिसतांच कवे नृसिंहा।
काव्यामृता प्रसवली सहजींच जिव्हा॥ १॥

हरिमुखिं कवलांना घालिती गोपपोरें।
मलिन शबरी चारी रामरायास बोरें।
मम कवन तसें तूं प्रेमळा आदरीसी।
हृदय मजसिं वाटे उत्सवानें भरीसी॥ २॥

रसिकचि कवितेचा होय बा माय बाप।
स्त्रवति कविमुखानें थोर काव्यें अपाप॥
वदुनि सहज वाणी काढिती शास्त्रसार।
सकल जग कवींना वाटतें हें असार॥ ३॥

सहृदयजन मुक्ता रत्न चिंतामणी वा।
मृगमद तरुराजा आगरू कृष्ण किंवा॥
वनिं वनिं नच राहे औषधी प्राणदात्री।
क्वचितचि रसिकाला जन्म देते धरित्री॥ ४॥

येती चंद्रोदयानें जलधिवरी जशा थोर कल्लोलमाला।
काव्याचे पूर येती कविहृदयिं तसे पाहुनि पंडिताला॥
फेनाच्या श्वेतराजी हिमकर किरणीं शोभती सागरांत।
शब्दांचे अर्थ तैसे विलसति कविंच्या मंगला गायनांत॥ ५॥

१८४

### ३० एप्रिल १९१२—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव

अनंत वामन बर्वे हे मला म्हणाले कीं तुम्ही उमरावतीला नाट्यसंमेलना-करितां येत आहा. गोळे यांचेंहि पत्र तसेंच आलें. परंतु तुम्ही खामगांवला आला नाहीं व मी उमरावतीला गेलों नाहीं. गेल्या तीन महिन्यांत माझी प्रकृति बिघडली होती व चुलत भाऊ निळू याचा हात मोडला होता. तुमच्याकडून बरेंच दिवसांत पत्र नाहीं यामुळें तुमचा स्नेह मी गमाविला की काय अशी भीति वाटते. आणि तो स्नेह तर मी माझी अत्यंत मौल्यवान मिळकत अशी समजतों! तुम्ही पत्रें न पाठविल्याचा वरील अर्थ तोच खरा ठरता तर मी कित्येक वर्षें दुःखी झालों असतों. 'सुधारणा व काव्य' या विषयांवरील तुमचा निबंध वाचला. त्यांतील युक्तिवाद बिनतोड वाटतो. पण त्यांत स्वतंत्र आणि नवे असेंहि कांहीं विचार आहेत. तुमच्या बुद्धीचा अनेकांगीपणा पाहून मला कौतुक वाटते. मी तुमच्या-सारखाच अनेकांगी बुद्धीचा आहे असें तुम्हाला वाटत असेल तर ती चूक आहे. आणि खरोखर तसा असतों तर मला तो बहुमान वाटला असता. तुमची भेट उन्हाळ्यांत होईलच.

१८५

### ४ मे १९१२—शामसुंदर चक्रवर्ति, कलकत्ता

आज या पत्रानें एक परप्रांतीय मित्र तुम्हाला भेट देत आहे. पत्र लिहि-ण्याचें कारण असें कीं तुमच्या केसरीच्या जामिनकीची रकम पांचहजार इकडे, पन्नास रुपयेप्रमाणें शंभर लोकांकडून, जमा करावी असें वाटतें. तरी हें करावें कीं काय तें कळवावें. तसें केल्यानें टिळकांविषयीं इकडे जी भावना आहे ती प्रगट केल्यासारखेंहि होईल. पण एकजण म्हणाला, " बाहेरून अशी मदत येत आहे असे पाहून सरकार केसरीवरील संकटांत आणखी कांहीं भर घालणार नाहीं कशावरून !" तरी कृपा करून खुलासेवार उत्तर पाठवा.

१८६

### १९ मे १९१२—माधव श्रीहरि अणे, यवतमाळ

शिवाजीच्या चरित्रावर एक निबंध मी लिहिला आहे. तो येत्या सुटींत तिकडे आल्यावर तुम्हास दाखवावा असा विचार आहे. दुसरी एक गोष्ट. हल्लीं

वऱ्हाडला महाराष्ट्राच्या मदतीची फार जरूर आहे. कांहीं प्रश्न तुमच्याशीं मला बोलावयाचे आहेत. वऱ्हाडांतील पुढाऱ्यांना इंपीरिअल प्रश्नांच्या चर्चेइतकी खुद्द वऱ्हाडच्या प्रश्नांची मातबरी वाटत नाही. "तो काय प्रांतिक प्रश्न आहे" असें ते म्हणतात ! मला असें वाटतें कीं अखिल महाराष्ट्राची मिळून एक परिषद भरवावी, व तेथें महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न विचारांत घ्यावा. भाषावार प्रांतरचनेवरील तुमचे लेख वाचले. ते मला आवडले. आणि सर्व विचारी लोकांना ते आवडतील यांत शंका नाहीं. पार्लमेंटपुढील नव्या बिलांत व्हाईसरॉयला कमिशनरी प्रांतांत कायदेकौंसिलें बनविण्याचा अधिकार देण्यांत येत आहे. पण वऱ्हाडप्रांत ब्रिटिश अंमलाखालीं नाही या सबबीवर वरील योजनेंतून तो वगळला जाणार आहे. तरी या प्रश्नाविषयी तुम्ही केसरींत लिहाल तर वऱ्हाडचें एक दुःख तुम्ही जनतेपुढें व सरकारापुढें मांडलें असें होईल. लागेल ती माहिती पुरविण्याला मी तयार आहे.

१८७

### ७ जून १९१२—सदाशिव खंडो अळतेकर, कऱ्हाड

केसरीच्या जामिनकीचे पांच हजार रुपये तुम्ही भरले ते लोकांत हिंडून गोळा करून द्यावे अशी कल्पना प्रथम मनांत आली. पण परवां साताऱ्यास कांही फौजदारी कामाकरितां गेलों होतों तेथील मित्रमंडळींनीं सांगितलें कीं, तुम्हाला अशीच अनेकांकडून पत्रें गेलीं असतां "लोकांकडून वर्गणी गोळा करून ही जामिनकीची रक्कम घेणें आपणांस बरें वाटत नाहीं" असें तुम्ही त्यांना व इतरांना कळविलें. म्हणून माझा बेत रहित केला. केसरीच्या वर्गणीदारांनीं या वर्षी वर्गणीचा म्हणून एकेक रुपया अधिक द्यावा असें विनंतिपत्रक केसरीत प्रसिद्ध करावें असा विचार नंतर आला. परंतु त्याविषयीं मतभेद झाला म्हणून मग तेंहि लिहिलें नाहीं. तथापि कोणी मित्रांनीं केसरीचे नवे वर्गणीदार मिळवून दिले तर ते मात्र तुम्हाला नाहीं म्हणतां यावयाचें नाहीं, किंबहुना इष्टच वाटेल. परंतु ही विनंति देखील केसरींतूनच करावी लागणार ! परप्रांतांतून कांहीं खटपट झाली तर व्हावी असें वाटतें. कोणी म्हणतात जामिनकी घेतल्यामुळें यापुढें केसरींत राजकीय विषय वगळून इतरच लिहावें. कारण टिळक परत येईपर्यंत केसरी जगविला पाहिजे. तरी याविषयीं आपणास काय वाटतें ?

१८८

**९ जून १९१२—म. ल. खांबेटे, वकील, जळगांव, खानदेश**

केसरीच्या जामिनकीमुळें फारच मोठा प्रश्न उद्भवला आहे. केसरी बंद झाल्यास तुम्हाला एखादा नवा धंदा हुडकून काढावा लागणार हें मनांत येऊन वाईट वाटतें.

१८९

**११ जून १९१२—बा. शि. मुंजे, नागपूर**

संकटे येतात तेव्हां ती मिळूनच येतात असें म्हणतात तें खोटें नाही. टिळकांचें कुटुंब निवर्तल्याची बातमी ऐकली आणि लगेच त्याच्या पाठोपाठ केसरी-कडून जामिनकी घेतल्याचे ऐकिलें. सर्वच बाजूंनीं तुमच्या जबाबदाऱ्या व संकटें वाढत आहेत. सरकारच्या दडपशाहीमुळें केसरी जर बंद झाला तर महाराष्ट्रांतील लोकांना त्यासारखी दुःखाची गोष्ट दुसरी कोणती ?

१९०

**१४ जून १९१२—गणेश श्रीकृष्ण खापर्डे, उमरावती**

मराठ्यांतील तुमच्या ज्या लेखाकरितां जामिनकी घेतली तो खरोखरीच फार चांगला होता. पण सरकार तें सरकार ! विलायतेंत हल्लीं टॉम मॅन याच्या खटल्यावरून भाषण स्वातंत्र्याची चळवळ सुरू झाली आहे. तुम्ही तयार करीत आहा तें पॅम्फ्लेट याच वेळीं तिकडे गेल्यास मजूर पक्षाला त्याचा उपयोग करतां येईल. गोपाळराव गोखले यांनीं प्रेस ॲक्टला संमति देऊन घाण केली ! ह्यूम व वेडरबर्न हे आमच्या कामी येणार नाहीत. कीर हार्डी, रॅम्से मॅक्डोनाल्ड अशासारखे येतील. आयरिश मेंबर एरवी मदत देते. पण यावेळीं काय करतात पहावें. टिळक सुटण्याविषयीं दाजीसाहेब खरे अर्ज तयार करणार होते त्याचें काम कोठवर आलें ?

१९१

**१६ जुलै १९१२—आर. ई. ह्यूम, भायखळा, मुंबई**

माझा एक स्नेही अमेरिकेंतील एका वजनदार युनिव्हर्सिटींत प्रोफेसर आहे. त्याला हिंदुस्थानांतील विद्यमान आर्थिक स्थितीविषयीं माहिती जमवावयाची आहे.

दोनशें पानांपर्यंत मजकूर झाला तरी चालेल. त्याकरितां तीनचार पगारी मदत-नीस तो ठेवूं शकेल. तरी अशीं माणसें मला पाहून द्याल काय ? चार वर्षांपूर्वी मी केसरी-मराठा कचेरींत आलों त्यावेळीं टिळकांशीं माझें संभाषण झाल्याची गोष्ट तुम्हाला स्मरत असेलच.

## १९२

### ४ नोव्हेंबर १९१२—पुरुषोत्तम नारायण सुभेदार, ब्रम्हावर्त, कानपूर

आपलें तारीख २३ ऑक्टोबरचें पत्र पोंचलें. इतिहास-संशोधनासंबंधी आपण समक्ष बोलला व पत्रांतहि सुचविलें आहे. त्यासंबंधी प्रथम कै. धोंडोपंत नानासाहेब पेशवे यांच्यासंबंधी मला माहिती आहे ती देतो. बंडवाले नानासाहेब हे कोणत्याहि विद्येंत निष्णात असे मुळींच नव्हते. त्यांना मराठी मोडी लिहिता वाचता येत होतें. या पलीकडे कांहीच नाही. लिहिणें वाचणेचा व्यवसायहि त्यांनीं कांही संपादन केला नाही. फक्त पेशव्यांचे दत्तक चिरंजीव इतकेंच. शारीरिक व्यवसाय, घोड्यावर बसणें, वगैरे करून काळ कमीत होतें. १८५७ च्या बंडाईनें त्यांचें प्रालब्ध किंवा जन्मग्रहगुण, कांहीं तरी म्हणा, असा नांवलौकिक जो हिंदुस्थान व इंग्रजाची विलायत वगैरेपर्यंत प्रसिद्ध झाला एवढेंच काय तें.

## १९३

### २ डिसेंबर १९१२—त्र्यंबक सीताराम कारखानीस, धारवाड

आपलें नाटक यशस्वी झाल्याचें वाचून समाधान झालें. आमच्याकरितां आपण नाटक लिहिणार तें लांबणीवर टाकल्यासारखें दिसतें. तरी त्याकडे लवकर लक्ष द्यावें. महाराष्ट्र नाटक मंडळीचें ठीक चाललें आहे.

## १९४

### १६ डिसेंबर १९१२—लाला लजपतराय, लंडन

आज दोन प्रहरीं लॉर्डांच्या सभेंत लॉर्ड मोर्ले हे सुधारणावर भाषण करणार आहेत. मी तें ऐकण्यास जात नाहीं. कारण नुकत्याच ज्या अनेक हद्दपारी झाल्या त्यांची बातमी ऐकून मनाला उदास वाटतें. शिवाय मोर्लेसाहेब सुधारणा काय देणार हें दिसतच आहे. आतां ईश्वरावरच भर टाकावा, त्यानेंच काय मिळावयाचें तें मिळेल, असें वाटू लागलें आहे. खापर्डे यांची गांठ पडली नाहीं. पण बॅ. परिख

हे परवां भेटले. ते सांगत होते की रुफस ऐझॅक यांच्या टेबलावर आमचा अर्ज चार आठवडे पडून आहे परंतु तो त्यांनी वाचलेला नाही. कदाचित् ती चूकच झाली म्हणावी कीं इतकीं फार कामें असणाऱ्या बॅरिस्टराकडे हें काम दिलें. 'डेली एक्प्रेस' पत्रावर लावलेल्या फिर्यादीच्या कामामुळें मी येथें अगदीं जखडून गेल्यासारखा झालों आहे. माझ्या स्नेह्यांनीं ती फिर्याद लावण्याचा सल्ला दिला तो मी ऐकला ही चूक झाली असें वाटतें. मित्रांनीं सल्ला दिला पण मदतीची वेळ येतांच हात आंखडले. तथापि आतां माघार घेतां येत नाहीं. नागपूरची राष्ट्रीय सभा तर बंदच झाली. असो तुम्ही मला वरचेवर पत्र लिहीत जा. आणि इकडची तिकडची कांहीं कात्रणेहि पाठवीत जा. म्हणजे हिंदुस्थानाकडील कांहीं खबर तरी कळेल. गोपाळराव गोखले आतां तिकडे परत गेले आहेत ते तुम्हाला इकडची सर्व हकीगत सांगतीलच.

१९५

१७ डिसेंबर १९१२—केशव विठ्ठल भोसले, मुंबई

सदाशिवराव भावे यांच्याबरोबर भेटीस आलों होतों. तेव्हां आपण मज-करितां नाटक लिहून देतों असें सांगितलें होतें. आपणास स्मरणार्थ पत्र पाठवीत आहे. तरी नाटक लिहिण्यास सुरुवात केली की नाही हें कळवावें.

१९६

१७ डिसेंबर १९१२—डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर

सर चार्लस क्लीव्हलंड यांची गांठ पडली होती. ते म्हणाले 'सरकारनें टिळकांविषयीं काय करावें ?' मी म्हणालों 'ते सरकारासच माहीत. तरी पण टिळकांना सरकारनें सोडावें असें मी सांगतों. टिळकांना स्वतः त्याचें कांहीं वाटत नसेल पण त्यांची बुद्धिमत्ता फुकट जात आहे असें लोकांना वाटतें. राज-कारणांत पडूं नये पण त्यांनी आपलीं इतर कामें करावीं अशी कांहीं व्यवस्था सरकारास करतां आली असती.' सर चार्लस म्हणाले कीं, 'टिळकांना शिक्षा झाली तेव्हां कित्येक लोकांना आनंद झाला. त्याच लोकांच्या चिथावणीवरून टिळकांवर मूळ खटला करण्यांत आला व हल्लीं त्यांच्या सुटकेच्या आड तेच लोक येत आहेत.'

१९७

२० डिसेंबर १९१२—श्रीधर बाळकृष्ण उपासनी, धुळें

मध्यभागांतील म्युनिसिपालिट्यांतर्फे मुंबई कायदे कौन्सिलांत निवडणुकी-करितां मी उभा होतों. काल रोजीं तिचा निकाल लागला व मला सर्वांत अधिक मते पडून माझी निवडणूक झाली. या निवडणुकीच्या कामीं आपण जी मनोभाव व निस्सीमप्रेमानें मदत केली तीबद्दल मी आपला फार फार आभारी आहे. या जबाबदारीच्या कामीं तें तडीस नेण्यालाहि आपण अशीच मदत कराल अशी आशा आहे.

१९८

४ जानेवारी १९१३—श्रीनिवास त्र्यंबक द्रवीड, इंदूर

मी काल इंदुरला परत आलों. नाताळांत तात्या कोल्हटकर मुंबईस भेटले तेव्हां आम्ही कितीतरी गतगोष्टींची चर्चा केली. "आपण वाङ्मयक्षेत्रांत आतां चांगलेच उदयास येत आहों. मासिक मनोरंजनांतील माझे लेख लोकप्रिय होत आहेत. ज्योतिर्गणितावरील निबंध बहुतेक तयार झाला. आणि नुकतेंच एक नाटक पुरें करून किर्लोस्कर मंडळीच्या हातीं दिलें" असें स्वतःविषयीं कोल्हटकरांनी सांगितलें. आणखी असेंहि सांगितलें कीं, "आपण कांहीं विनोदी लेखांमुळें लोकांच्या अप्रीतिच्या खड्ड्यांत पडून नामशेष होतों कीं काय अशी भीति वाटत होती; परंतु केळकरांनी मला आधार देऊन ती बाजू परतविली." असो, माझ्या बंधूच्या मृत्युपत्राचें प्रोबेट लवकरच तुम्हाला मिळेल. तरी त्याप्रमाणें अच्युतराव भट यांजकडून येईल ती रक्कम घेऊन बँकेंत टाकीत जावी.

१९९

२२ जानेवारी १९१३—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव

मुंबईहून गद्य नाटक पुरें करून परत आलों. तें व्हावें त्यापेक्षां कमी दर्जाचें झालें आहे. पण मी वचनांतून मोकळा झालों एवढाच फायदा. मुंबईस गेलों त्याच दिवशी तुमचें नाटक पहावयास सांपडलें. तें मला तर आवडलेंच; पण पिंपळीकर, शेंबेकर, देवधर, बापट इत्यादि स्नेही नाटकावर फार खूष झालेले दिसले. शोक व हास्य हे दोन्ही रस चांगले साधले आहेत. "कोणताहि उत्कट मनोविकार रंग-

वेण्यास आपणास साधणार नाहीं" असें तुम्ही स्वतःविषयीं एकदां विधान केलें तें तुम्हाला आठवत असेल. पण स्वतः तुम्हीच या नाटकानें त्या विधानाचें खंडन केलेलें आहे. टिपणिसांचें मत्स्यगंधा नाटकहि पाहिलें. चांगलें झालें आहे.

२००

**२७ जानेवारी १९१३—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव**

तुमच्या पत्राकरितां मी कांहीं लेख पाठवावे असें तुम्ही वारंवार लिहिलें. पण त्याविषयीं मजकडून कांहींच घडलें नाही हें कबूल करण्याला मला लाज वाटतें. कारण तुम्ही मजकरितां इतकें पुष्कळ लिहिलें व केलें आहे. माझे टीका-पर लेख 'विविधज्ञानविस्तारा'कडे जातात. आणि विनोदी लेख 'मासिक मनोरंजना'-कडे जातात. शिवाय दिवसेंदिवस मी जडबुद्धीचा होत चाललों आहे. म्हणून केसरीला कांहीं लिहून पाठवूं शकत नाहीं. तथापि तुमचीं नाटकें वाचून त्यावर टीका व सूचना करणें हें मात्र मी करूं शकेन. तुमचें यापुढील नाटक येत्या मे महिन्याच्या सुटीत तुमच्याबरोबर वाचीन व मग तें तुम्ही छापण्यास द्या. तुम्ही येथें ईस्टरच्या सुटींत येऊं शकाल तर मी जबलपुरास जाण्याचा बेत रहित करीन. येथें माझे एक मित्र शेंबेकर मोठे चिकित्सक बुद्धीचे आहेत. त्यांना तुमचें नाटक फार आवडलें. आणि दुसरे मित्र देवधर यांनाहि. पण त्यांतल्या त्यांत देवधर यांचें नांव मी सांगतों याचें कारण ते कोणत्याहि गोष्टीची निंदा करण्यांत मोठे पटाईत आहेत!

२०१

**९ फेब्रुवारी १९१३—सेक्रेटरी, पब्लिक सर्व्हिस कमिशन, रंगून**

पब्लिक सर्व्हिस कमिशनला तुम्ही लेखी साक्ष पाठविली ती पोंचली. त्यावर तुमची तोंडी साक्ष घेण्याचा कमिशनचा विचार आहे. १ मार्च व १२ मार्च यांच्या दरम्यान कोणचा तो दिवस ठरवून तुम्हाला कळवूं. तुम्ही साक्षीला यावें अशी अध्यक्ष लॉर्ड इस्लींगटन यांची इच्छा आहे. १९ फेब्रुवारीपर्यंत कलकत्त्याचें पत्त्यावर उत्तर पाठवावें.

२०२

**११ फेब्रुवारी १९१३—मनमोहनदास रामजी, मलबार हिल, मुंबई**

सरदार बाळासाहेब नातु यांच्या सांगण्यावरून पब्लिक सार्व्हिस कमिशनकडे

तुम्ही दाखल केलेल्या स्टेटमेन्टची प्रत तुम्ही मजकडे पाठविली त्याबद्दल आभारी आहे. त्यानें मला फारच उपयोग झाला.

२०३

### १९ फेब्रुवारी १९१३—टी. सांबमूर्ति राव, तंजावर

माझीं दोन मराठीं पुस्तकें पाठवितों त्यांचा स्वीकार व्हावा. तंजावर येथील राजवाड्यांतील ग्रंथसंग्रहाचें संरक्षण कसें करावें याचा विचार चालू आहे. दाव्याचा निकाल लागेपर्यंत तो रिसीव्हरच्या ताब्यांत राहील. नामदार शिवस्वामी अय्यर मला सांगत होते कीं "मद्रास सरकारची नजर त्या ग्रंथसंग्रहावर गेली आहे म्हणून त्याची काळजी करणें नको." मात्र सरकारानें काय तजवीज केली आहे ही सरकारी गोष्ट म्हणून ते उघड सांगू शकले नाहींत. पण असल्या मोघम आश्वासनावर विसंबून राहावें असें मला वाटत नाहीं. तरी या कामीं तुम्ही मला काय सल्ला देता ?

२०४

### २ मार्च १९१३—ग. कृ. साठे, कायदे कौंसिल-सभासद, सोलापूर

पब्लिक सर्व्हिस कमिशनकडून मलाहि साक्षीचें निमंत्रण आलें आहे. तुम्हाला तें आल्याचें टाईम्स पत्रांत वाचलें. अर्थात् तुम्ही कमिशनपुढें मांडण्या-करितां साक्षीचें टिपण केलें असेल तरी तें मला पहाण्यास पाठवावें. त्याचा मला फार उपयोग होईल. याच विषयावर तुम्ही केसरींत तीन लेख लिहिलेत ते वाचले, त्यांतील माहिती फारच महत्त्वाची आहे.

२०५

### ७ मार्च १९१३—हरिश्चंद्र आनंदराव तालचेरकर, लंडन

मिस् बारकर यांचें पत्र आलें तें तुमच्याकडे पाठवीत आहे. या बाई विलायतचें बातमीपत्र पाठविण्याला लायक आहेत असें तुम्हालाहि वाटेल. तरी तुम्ही त्यांना पत्र लिहून कायमचें काम द्या. येथें एक नवीन राजपुत्र, रजपुतान्यां-तले ठाकूर, उदयास येऊं पहात आहेत. त्यांनीं 'रजपूत हेरल्ड' नांवाचें एक पत्रहि काढलें आहे. कांहीं दिवसांपूर्वीं लिम्टनच्या एका चहापानगृहांत हे कपबशा

धुण्याचें काम करीत होते ! तेच एकदम महाराज हें नांव धारण करून जगाच्या पुढें आले आहेत. त्यांचा एक हस्तक सुंदर राजु नांवाचा असून, त्यानें परवां कॅक्स्टन हॉलच्या सभेंत बंगाली व मराठे लोक यांजवर बरेंच तोंडसुख घेतलें. हिंदुस्थानांतले राजेरजवाडे इंग्लडच्या आरमाराला सहाय्य देणार आहेत अशीहि कंडी यांनीं पिकविली आहे. सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, अशा कोणाकडून विलायतची बातमी म्हणून कांहीं मजकूर तुमच्याकडे आला तर त्याविषयीं सावधगिरी ठेवावी.

२०६

### ९ मार्च १९१३—चंद्रशेखर शिवराम गोऱ्हे, बडोदें

रे. मिस्टर टिळक यांजकडून 'अभिनव काव्यमाले'चा दुसरा भाग प्रसिद्ध होणार होता त्याविषयी त्यांना पत्रें लिहिलीं पण उत्तर नाहीं. तिसरा भाग प्रसिद्ध झाला पण दुसरा अजून कोठेंच नाही हें पाहून लोक हंसतील. तरी तुम्हीच दुसऱ्या भागाचा मजकूर आपणाकडे मागवून घेऊन दोन्हीं एकदमच कां प्रसिद्ध करांना ? तुम्ही लोकनियंते व सर्व गोष्टी जाणतच आहा. मी अधिक काय लिहावें ?

२०७

### १४ मार्च १९१३—काशिनाथ रघुनाथ मित्र, संपादक, मनोरंजन, मुंबई

तुमचे जामात सरदारगृहांत मृत्यु पावले ही बातमी वाचून फारच दुःख झालें. तुमचें सांत्वन कोणत्या शब्दांनीं करावें ? तुमचा जांवई मोठा होतकरू तरुण व सामाजिक सुधारणेचा भोक्ता होता. यामुळेंहि विशेष वाईट वाटतें.

२०८

### १८ मार्च १९१३—वासुदेव वामनशास्त्री खरे, मिरज

मुंबईस तुमचे जामात शिकत होते त्यांचें अकस्मात विपरीत वर्तमान ऐकण्यांत आल्यामुळें मनास मोठा धक्का बसला व खेद झाला तो किती लिहावा ? आज चार दिवस आमच्या घरांत ही गोष्ट किती मागें टाकण्याचा यत्न केला तरी कोणत्याना कोणत्या प्रकारें तिचें स्मरण वारंवार होतच आहे. काय करावें ? आम्हां तिऱ्हाइतांची जर ही दशा तर तुमची तेथें स्थिति काय असेल ? तुमच्या कन्येवर

तर बाल्यदशेंतच हा वज्रपात झाला. मला तर कांहीं लिहावयास सुचत नाही. नातवाच्या रूपानें आशेचा अंकुर डोळ्यापुढे आहे त्या बाळावर काय विवेक कराल तो कराल. संसार विषमय म्हणतात तेंच खरें. माझ्याहि डोळ्यापुढें रात्रंदिवस स्वतःचें एक उदाहरण आहेच !

२०९

**२३ मार्च १९१३—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव**

माझ्या वडील बंधूच्या मृत्यूचे वर्तमान तुम्हांला कळलें असेलच. माझें मन फार उद्विग्न झालें आहे. तीन भाऊ होतो ते आतां दोनच उरलों, असे म्हणण्याचा प्रसंग माझ्याप्रमाणें तुमच्यावरहि पूर्वी आलेलाच आहे. अशा दुःखानें मन कोमल झालें असतां, दुर्दैवानें त्यावरच फिरून आणखी प्रहार करावा तसें झालें. कारण तुमच्या जामाताच्या मृत्यूचें दुःखकारक वर्तमान नुकतेंच ऐकलें. तुमच्या कन्येनें मासिक मनोरंजनांत लिहिलेला सुरस व गंभीर लेख अवलोकनांत येऊन आम्ही सर्वजण त्याचें कौतुक करीत होतो, तों इतक्यांत या दुर्धर प्रसंगाची वार्ता आली. तुम्ही इकडे येणार ही आशा बाळगून होतों. पण दुर्दैवाला विपरीत करणें आवडतें हेंच खरें.

२१०

**१४ एप्रिल १९१३—डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर**

मी अलीकडे सिमल्यास गेलो होतो. सर चार्लस क्लीव्हलंड यांची गांठ पडली. दिल्ली दरबाराच्या प्रसंगीं टिळकांना सोडावें अशी क्लीव्हलंड यांनी पुष्कळ खटपट केली. पण लॉर्ड सिडेनहॅम व इतर कांहीं लोक यांनी विरुद्ध अभिप्राय दिल्यामुळें त्याला यश आलें नाही.

२११

**२८ मे १९१३—गोपाळ कृष्ण गोखले, सिंहगड**

काल दाजीसाहेब खरे यांनीं रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी वारल्याचें दुःखद वर्तमान सांगितलें. दुखवट्याच्या सभेला तुम्ही लिहिलें त्याप्रमाणें अवश्य येईन. मला सोईची तारीख ठरविणार तर पुढील रविवारची ठेवावी. म्हणजे पुण्यास येईन

तो परत सिंहगडला येणार नाहीं. सभेला मी येतों पण नगराध्यक्ष सरदार नव-रोजी पदमजी यांनाच या सभेचे अध्यक्ष म्हणून नियोजित केलेले बरे.

२१२

**२८ जुलै १९१३—रामचंद्र गणेश प्रधान, वकील, नाशिक**

'तोतयाचें बंड' हें कथानक स्वभावलेखन या सर्व दृष्टींनी अगदी पहिल्या प्रतीचें नाटक झालें असून, त्यामुळ मराठी नाट्यसाहित्यांत फार चांगली भर पडली आहे. मी त्याचें परीक्षण लिहिणार आहे. नाटकांतील अमला हें पात्र काल्प-निक पण फारच महत्त्वाचे आहे. नाना फडणवीसांनी मुखनिधान हा तोतयाच आहे, खरा सदाशिवराभाऊ नव्हे, अशी पार्वतीबाईची खातरी खऱ्या इतिहासांत कधीं केली की नाहीं ? व कशी केली ?

२१३

**३० जुलै १९१३—चिंतामण विनायक वैद्य, कल्याण**

तुर्क व बल्गेरियन यांचें युद्ध पुनः सुरू झालें. आणि बाल्कन राष्ट्रें आप-आपसांत लढू लागली आहेत. १९ जुलै रोजी मंगळ वृश्चिक राशीला आला आणि तेथें त्याची शनीशीं युति होत आहे. ते आतां दोन्ही एकाच घरांत आहेत. आणि त्याच वेळेस हीं युद्धें मोठ्या जोरानें होऊ लागली आहेत हा मोठा योगायोग नव्हे काय ? मंगळ वृश्चिक राशींतून बाहेर जाईल तेव्हां हीं युद्धें थांबतील असें ज्योतिषशास्त्राच्या आधारें म्हणतां येईल. मी गेल्या ऑक्टोबरपासून युद्धांच्या बातम्यावर नजर ठेवून आहे. आणि मला असें दिसून आलें कीं मंगळ व शनि यांच्या संबंधावरच या युद्धाची प्रगति अवलंबून आहे. कारण मंगळ हा युद्ध-कर्माचा अधिपति मानतात. मी ज्योतिषी किंवा भविष्यवादी म्हणून लिहीत नाहीं. पण योगायोगाची चिकित्सा करीत आहे. माझे सर्व लेख एकत्र छापून निघावे अशी सूचना तुम्ही केली, त्याप्रमाणें मी मोरमकर यांना लिहिलें व त्याबरोबर तुम्हीच त्या ग्रंथाला प्रस्तावना लिहावी असे सुचविले आहे.

२१४

**११ ऑगस्ट १९१३—विष्णु मोरेश्वर महाजनी, अकोला**

'तोतयाचें बंड' नाटक मला फारच आवडलें. तोतया व त्याची बायको यांज-मधील शेवटचा प्रवेश परिणामकारक व मनाची खात्री पटवून देणारा आहे.

त्यामुळें पार्वतीबाईचा भोळेपणा आणि नानाचा शहाणपणा ही दोन्ही व्यक्त होतात. पार्वतीबाईचें पतिप्रेम पाहून अंतःकरण द्रवतें पण तिची कींव येते. नाना व पार्वतीबाई यांजमधील प्रवेश फारच उत्कृष्ट आहे. तत्कालीन भटांच्या तोंडीं घातलेली भाषा मात्र बरी वाटत नाहीं. तोतयाच्या बायकोचा मृत्यु तुम्हाला टाळतां आला नसता काय? आपल्या नाट्यशास्त्रांत रंगभूमीवर प्रत्यक्ष मृत्यू दाखवूं नये असे आहे. येथील वकील लोकांच्या कारकुनांनीं यंदा कोणतें नाटक करावें असें विचारलें तेव्हां त्यांना तुमचें हें नाटक करा असें मी सांगितलें आहे, तरी त्यांना त्याची परवानगी लिहून पाठवा.

## २१५

### १९ सप्टेंबर १९१३—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, खामगांव

तुमचें दुसरें नाटक चंद्रगुप्त हेंहि अत्यंत यशस्वी झालें हें अनेक लोकांकडून ऐकून मला आनंद झाला. मी सध्या तोतयाच्या बंडावर टीका लिहिण्याचें काम हातीं घेतलें आहे. त्यांत नाटकाच्या परीक्षणाबरोबर एकंदर नाट्यशास्त्राचीहि छाननी करणार आहे. हें परीक्षण विस्तृत होईल. पहिल्या भागांत नाट्यशास्त्राची तत्त्वें विशद करून नाट्यकलेचाहि विचार करीन. आणि दुसऱ्या भागांत तीं तत्त्वें तुमच्या नाटकाला किती लागूं पडतात, पडत नाहींत, हेंहि दाखवीन. परीक्षणांत नाटकांतील गुणांप्रमाणें दोषांचीहि चिकित्सा करणार आहे. गुण पुष्कळ व दोष थोडे. परंतु दोष वगळणार नाही.

## २१६

### २३ ऑक्टोबर १९१३–रामभाऊ गोखले, चित्ताकर्षक नाटक मंडळी, कोल्हापूर

आपलें पत्र पावलें. तोतयाच्या बंडाच्या लोकमताबद्दल तर आतां प्रश्नच नाही. पण काल रोजीं चंद्रगुप्त नाटकाचा येथें पहिला प्रयोग झाला. हा प्रयोग बंडापेक्षांहि सरस आहे असें येथील लोकमत आहे. श्रीमंत जमखिंडीकर, भास्करराव जाधव, वगैरे मंडळी नाटकाला आली होती. इकडे प्लेग असल्यामुळें एकदम मुंबईस जावें म्हणतो. पण हें धाडस यशस्वी होणें सर्वस्वी आपल्या कृपेवर अवलंबून आहे. तरी चंद्रगुप्ताच्या जोडीला आणखी नवा खेळ पाहिजे. आपलें पत्र येईल त्याप्रमाणें मुंबईचा मुक्काम ठरवितों. येथील कांहीं भागांतील वातावरण

'कुलकर्णी लीलामृतां 'वरील लेखांमुळें विरोधीं असलें तरी उलट त्या लीलामृताच्या माधुर्यानें लुब्ध झालेला वाचकवर्ग जास्त उत्सुकतेनें थिएटरकडे येत आहे.

२१७

**२५ नोव्हेंबर १९१३—बळवंत बाबाजी देशपांडे, हायकोर्ट वकील, नगर**

मजवरील आपत्ती खरीच; पण मी तिजमुळें जमीनदोस्त झालो नाहीं. ती कशी तरी सहन करीन. केसरींतील तुमच्या विनंतीप्रमाणें दक्षिण आफ्रिकेंतील गांधींच्या चळवळीकरितां फंड गोळा करीत आहों. या निमित्तानें तरी मवाळ जहाल पक्षाचे पुढारी एकदिल झाले तर बरेंच. गोखले यांची मागणी कांही फार मोठ्या रकमेची नाहीं. तुम्ही केसरी चालविण्यांत जी विद्वत्ता व जें कौशल्य आणि जी स्वतंत्र-बुद्धि प्रकट करीत आहा, आणि हल्लींचें वर्तमानपत्रांवरील संकट निभावून नेत आंहा, याबद्दल तुमची करावी तितकी स्तुति थोडीच होणार आहे.

२१८

**२६ डिसेंबर १९१३—गणेश गोविंद नवरे, मुंबई**

कानपूरच्या साखरेसंबंधानें आपलें सार्टीफिकेट पाहिलें. तें फार उत्तम आहे. त्याबद्दल शेटजी आपले फार आभारी आहेत. आपणास सवड असेल अशा वेळीं एकदां येऊन भेटेन. कलकत्त्याच्या 'कॉमर्स' पत्रांत स्वदेशी साखरेविषयीं फारच आशाजनक माहिती दिली आहे. इकडे एक साखर कारखान्याची नवीन कंपनी निघाली आहे. तिला सहाय्य करण्याविषयीं आम्हाला विनंति करण्यांत आली आहे. परंतु एका वेळीं एकच गोष्ट केलेली बरी. म्हणून राम शुगर मिलच्या संबंधानें प्रथम काय अनुभव येतो तो पाहून मग पुढें पाहू. देशी साखर परदेशी साखरेहून अधिक स्वस्त मिळाली पाहिजे तरच ती टिकेल. तसें होईल तो सुदिन. कानपूरकडील खुद्द उंसाची साखर अद्याप इकडे फारशी आलेली नाहीं. परंतु या वेळीं बरीच मोठी खरेदी करून मी आलों आहे.

२१९

**१५ फेब्रुवारी १९१४—अश्विनीकुमार दत्त, शेवणी ( सी. पी.)**

तुमच्या पत्रावरून टिळक लवकरच सुटणार असे दिसते. त्यांना कैद झाल्याला किती वर्षें झालीं ! म्हणून ते सुखरूप परत यावेत अशी प्रार्थना आहे.

याहि खेपेस तुरुंगांतून सुटून आल्यावर एखादा ग्रंथ जो जगांत अमर राहील असा ते निर्माण करतील अशी मला फार आशा आहे. ना. गोखले यांची तब्येत कशी आहे तेंहि कळवावें.

## २२०

### ? फेब्रुवारी १९१४—दत्तो वामन पोतदार, पुणें

'कृष्णार्जुन युद्ध' हे नवीन नाटक पाहण्यास गेल्या रविवारीं गेलों होतो. केवळ नाटक या दृष्टीनें आपल्या कृतीकडे पाहिल्यास ती विशेष उच्च दर्जाची वाटत नाहीं. कारण त्यांत पात्रांचा स्वभावपरिपोष उठावदार दिसावा तसा दिसत नाहीं. परंतु एक लहानशी पौराणिक गोष्ट घेऊन तिला नाटकाचें रम्य रूप देण्याचा आपला उपक्रम स्तुत्य असून तो चांगलाच सिद्धीस गेला आहे असें वाटतें. औप-निषदीय सूत्राच्या दिग्दर्शनांत आपण हा जो खेळ केला आहे तो सरस आहे. भाषापद्धति चांगली व पात्रानुसार केली आहे हे सांगण्याची आवश्यकता नाहीं. आपली 'चंद्रगुप्त' ही कृती उदात्त व शुद्ध आहे. त्याप्रमाणें हीहि आहे. विद्या-र्थ्यांनीं सररहा हा खेळ बघावा इतका तो सोवळा आहे ही फारच समाधानाची गोष्ट आहे. याबद्दल तुमचे आभार मानावे तितके थोडेच आहेत. आपण या बाबतींत महाराष्ट्रांतील नाटकास नवीन वळण देत आहा असें म्हणण्यास हरकत नाहीं व या कामीं आपणास यश येवो. नारद तुमच्या फारच उपयोगी पडला आहे. एकंदरीनें खेळ झोकदार असून चटकदार व सुपरिणामी झाला आहे असे वाटते. चित्ररथाच्या धुंदीच्या भाषणांत एक कोटी आली आहे ती मात्र मला आवडली नाहीं. रसभंग न होता ती टाळतां आली असती.

## २२१

### ४ मार्च १९१४—हरि गणेश फाटक, फोंडा गोवा

आमच्या कॉलेजचे डायरेक्टर व प्रोफेसर यांचे फोटो तुम्हाला नजर म्हणून पाठवीत आहे. तुमच्याविषयीं असणाऱ्या अत्यंत खोल आदरबुद्धीची ती खूण म्हणून पाठवीत आहे. महाराष्ट्र वाचकवर्गाला जिव्हाळ्याच्या राजकीय विषयावर शिक्षण देण्याची जी सेवा तुम्ही केली त्याबद्दल तुमचे गुण घ्यावे तितके थोडे आहेत. हल्ली दडपशाही व शिक्षासत्र यांचा धूमधडाका सुरू आहे. अशा वेळीं तुम्ही नसता तर केसरीपुढें मोठा बिकट प्रश्न येऊन पडला असता. तुमच्या-

मुळेंच केसरी प्रेस—ॲक्टाच्या जाळ्यांतून बचावला. महाराष्ट्राला ही गोष्ट कबूल केली पाहिजे. तुमच्यावर कामकाजाचा ताण फार पडला यांत शंका नाहीं व आमच्या राष्ट्रीय पक्षाच्या मंडळींपैकीं तुम्ही म्हणूनच तो सोसली व त्यांतून यश मिळवून बाहेर पडला. आतां टिळक लवकरच सुटतील आणि तसे झाले म्हणजे हा ताण तुमचा थोडासा तरी कमी होईल व तुम्हाला थोडी विश्रांति मिळेल. तुमच्या स्वार्थत्यागपूर्वक परिश्रमानें अशी विश्रांति घेण्याचा हक्कच तुम्हीं मिळविला आहे.

२२२

**२१ जून १९१४—डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर**

टिळक सुटून आल्याची तार येथें पोहोचताच शहरांत एकच खळबळ उडाली. लोकांनीं पेढे वाटले. आपलीं घरें शृंगारली. सर्व शहरभर उत्साह दिसून येत होता. सायंकाळीं व्यंकटेश नाटकगृहाच्या पाठीमागील मैदानांत सुमारें पांच हजार लोकांची सभा भरली. त्यांत सर्व पक्षाचे जातीचे व धंद्याचे लहानथोर लोक हजर होते. सन्मान्य वकील नीळकंठराव उधोजी हे अध्यक्ष असून अभिनंदनाचा ठराव पुढें मांडतांना त्यांना गहिंवरून आले. स्वतः मी ( डॉ. मुंजे ) अळेकर भवानी शंकर वकील यांनीं ठरावावर भाषणें केलीं. वृद्धावस्थेमध्यें मधुमेहासारख्या रोगानें शरीर जर्जर झालें असतां तुरुंगाच्या हालअपेष्टा सोसण्याचें सामर्थ्य परमेश्वरानें त्यास दिलें व म्हणून तसेंच या पुढेंहि त्यास आयुरारोग्य द्यावें अशी परमेश्वराची प्रार्थना करण्यांत आली. पटांगणाच्या मध्यभागीं देवळाच्या शिखरावर सर्वांना दिसेल अशा ठिकाणीं टिळकांची मोठी तसबीर लावली होती. त्यावर सर्वांनीं मंत्रपुष्प अक्षता व फुलें यांची वृष्टी केली. सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे द्रवीड यांनीं अध्यक्षांचे आभार मानल्यानंतर सर्वांना साखर वाटण्यांत आली व "टिळक महाराज की जय" अशा जयजयकारांत सभा बरखास्त झाली.

२२३

**७ ऑक्टोबर १९१४—कॅ. बसू, अलाहाबाद**

टिळकांची प्रकृति बरी आहे असे वाचून आनंद झाला. पुढील पत्रांत त्यांना माझे नमस्कार लिहा. त्यांचें 'ओरायन' व 'वेदकालीन आर्यवस्ती'

[ या पत्राचा यापुढचा मजकूर गहाळ झाला आहे. ]

२२४

**२८ ऑक्टोबर १९१४—चिंतामणराव वैद्य, कल्याण**

दुर्दैवी रंगू ही कादंबरी तुम्ही वाचली काय ? भाऊसाहेब जिवंत असावेत असा ग्रह पार्वतीबाईने इतके दिवस कसा काय उराशीं बाळगला याबद्दल मी एक उपपत्ति सदर कादंबरींत सुचविली आहे. तुम्हाला ती कशी काय वाटते ?

२२५

**२० नोव्हेंबर १९१४—गोविंदराव टेंबे, नागपूर**

संत भानुदास रंगभूमीवर आलें. तरी आता गंधर्व नाटक मंडळीकरिता जें नाटक आपण योजलें आहे तें हातीं घ्यावे अशी विनंतिपूर्वक सूचना करतों. सध्या कंपनीला नव्या नाटकाची फार जरुरी आहे.

२२६

**?—आर्थर क्रॉफर्ड, लंडन**

नव्या पत्रासंबंधाने तुम्ही व चित्रशाळेचे मालक यांनी मिळून अंदाजपत्रक तयार करावे. तें कळलें म्हणजे टाईप-खरेदीची व्यवस्था होईल. वेळेचें फार महत्त्व आहे. म्हणून लवकरच उत्तर धाडा. मी तुम्हाला पाठवलेलें आर्टिकल तुम्ही नाकारलें याबद्दल मला कांही वाटत नाही. तुमची त्यावरील टीका प्रामाणिक व वजनदार होती, म्हणून मी तें आर्टिकल फाडून टाकलें. माझ्या पुस्तकावरील तुमचा अभिप्राय यथान्यायच लिहिलेला होता. पण तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे तें पुस्तक लिहितांनां मी गैरशुद्धींत नव्हतों ! इकडे त्या पुस्तकाची फार चाहा झाली. पण तें असो.

२२७

**२० नोव्हेंबर १९१४—बाबू मोतीलाल घोस, देवघर ( बंगाल )**

मी हल्ली देवघर येथे आलों आहे हें तुम्हाला टिळकांनी सांगितलेंच असेल. आळतेकर यांनी सर सुब्रह्मण्य अय्यर यांना पत्र पाठविलें तें पाठवावयास नको होतें! सर सुब्रम्हण्य यांचे आक्षेप काय आहेत हें माझ्या लक्षांत नाही, पण

हल्लीच्या कॉंग्रेसकमिट्यांचा अधिकार जाईल अशी भीति त्यांना कदाचित् वाटत असावी. पण त्याला उपाय आहे तो असा की, जाहीर सभा बोलवावयाच्या त्या हल्लीच्या कॉंग्रेसकमिट्यांनीं बोलवाव्या, किंवा नव्या क्रीडवर सह्या केलेल्या लोकांनी बोलवाव्या. असें केलें म्हणजे झालें. तरी यासंबंधाने तुमचें मत कळवा. भूपेंद्रनाथ मला लिहितात की, 'मोहरमच्या आठवड्यांत कलकत्ता किंवा अलाहाबाद येथे बेझंटबाईंना बोलावून लहानशी खासगी सभा भरवूं.'

२२८

२२ नोव्हेंबर १९१४—एन्. सुबराव, मद्रास

जाहीर सभांनी प्रतिनिधि निवडण्याच्या बाबतींत एक टिपण करून मी यासोबत तुमच्याकडे पाठवीत आहे. तुमच्या इतर मुद्द्यांसंबंधाने अद्यापि पूर्ण विचार केला नाही. पण समक्ष गाठ पडली असतां त्याचा निकाल अधिक चांगला लावतां येईल या हेतूने बेझंटबाई तिकडे जात आहेत. त्यांच्याबरोबर मीहि जावें म्हणतों. पाहावें काय घडेल तें. कॉंग्रेसच्या घटनेवरील टिपण मात्र न विसरता प्रसिद्ध करावें.

२२९

२६ नोव्हेंबर १९१४—बाबू मोतीलाल घास, कलकत्ता

या चंडाळांनी मला देवघराहून ओढून आणलेंच ! काल सभा झाली, व त्यांत काय झाले हें आजच्या 'पत्रिके'च्या अग्रलेखांत दिलेंच आहे. या अग्रलेखावरून असें दिसेल की, कलकत्त्यांतील उभय पक्षांच्या पुढाऱ्यांनी सहविचार करून खालील ठराव केला—कॉंग्रेसबाहेर असलेल्या लोकांनी प्रतिज्ञालेखावर तात्पुरती सही करावी, व इतर सर्व घटनाहि तात्पुरती मान्य करावी. आणि मग सर्वांनीं मिळून एक कमिटी नेमून जी काय घटना ठरेल ती सभेपुढे मांडून मंजूर करून घ्यावी. प्रतिज्ञालेखावर तात्पुरत्या सह्या देण्यास तयार झाल्यावर यंदादेखील जाहीर सभेने निवडलेल्या प्रतिनिधींना सभेंत घ्यावे.

२३०

६ डिसेंबर १९१४—बळवंतराव अनगळ, उमरावती

मी मानभाव मंडळींना तुमच्याकडे पाठविलें. त्यांचें काम तुम्ही घेतलें हें पाहून बरें वाटलें. आम्ही येथून कमिशनपुढे विचारण्याकरिता कांहीं प्रश्न तयार

करून पाठविलेच आहेत. तथापि सुचतील ते आणखी तुम्हीहि विचारावे. गोस्वामी लोकांनी वर्गण्या जमवून दाव्याला जोर आणला आहे. मॅजिस्ट्रेट ख्रिस्ती आहे. निकाल त्यांच्याविरुद्ध झाला तरी इकडे मानभाव लोकांचें प्रस्थहि बरेंच आहे. एकंदरीने मला वाटतें की, टिळक, डॉ. भांडारकर यांच्या मध्यस्थींने हा तंटा तोडण्याचा कांही प्रयत्न तुम्ही कराल तर फार चांगलें होईल.

२३१

१० फेब्रुवारी १९१५—नामदार गोपाळ कृष्ण गोखले, पुणें

काँग्रेस—समेटासंबंधाने मला एखादें जाहीर पत्रक काढून आपलें म्हणणें लोकांना कळविणें अपरिहार्य झालें आहे. म्हणून असें जाहीर पत्रक काढलें आहे. त्याच्या दोन प्रति तुमच्याकडे पाठवीत आहे. एक मराठ्यासाठी व एक केसरीकरिता. तरी हें पत्रक मराठ्यांत सर्वच्या सर्व छापल्यास मी आभारी होईन. तसेंच केसरीने मजवर गेल्या अंकांत भयंकर आरोप केले आहेत, म्हणून त्या पत्रकाचें समग्र भाषांतर केसरींतहि छापाल अशी मला आशा आहे.

२३२

२६ एप्रिल १९१५—कारभारी, देवास स्टेट

कै. गणेश व्यंकटेश जोशी यांचा ग्रंथसंग्रह विकत घेण्याच्या कामीं लक्ष घालून, आमच्यातर्फे आलेले दत्तोपंत टिळक यांना आपण मदत केली याबद्दल दिवाणसाहेब आभारी आहेत.

२३३

१७ जून १९१५—दत्तात्रय व्यंकटेश बेळवी, बेळगांव

टिळक सिंहगडाहून परत आले काय ? माझ्या मनांत असें आलें आहे की सर फेरोजशहा मेथा यांना एकवार लिहावे. आणि टिळक मी व बॅप्टिस्टा यांची गाठ ते घेतात का विचारावें. त्यांना भेटल्यावर मग जिल्हासभेची घटना निश्चयात्मक करूं. मद्रास येथे समेटकमिटी नेमली त्यावर इतर प्रांतांतील लोकांच्या, नेमणुकी अद्यापि झाल्या की नाही ? असल्यास कोण कोण निवडले ? आमच्या ठरावाची एकेक प्रत त्या सर्वांना पाठवावी असें वाटतें. इकडे पहावें तो लोकांना आम्ही आणि कन्व्हेन्शनवाले यांच्यांत काय फरक आहे, हें अजून नीटसें

उमगत नाही. आणि अशा गैरसमजुतीने ते जिल्हा काँ. कमिट्या बनवीत असतात. तरी भेदांतील मर्म खरें काय आहे हें लोकांच्या लक्षांत येण्यासाठी तुम्ही केसरींत एक लेख लिहावा असें वाटतें. कारण कित्येक लोकांना या कमिट्या आपले सभासद करून घेण्याचें नाकारतात.

**२३४**

**२३ जुलै १९१५—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव**

तुमचीं पुस्तकें आजच सकाळीं मिळालीं. पुस्तकाचें बाह्यांगदेखील अंतरंगाइतकेंच सुबक आहे. तुम्ही गेल्या महिन्यांत आजारी पडलां. तुम्ही विश्रांतीकरिता खामगांवाला कां येत नाही ? तुमचें काम आणि श्रम दोन्ही अचाटच आहेत.

केतकरांच्या :ज्योतिर्गणितावर मी परीक्षणलेख लिहिला आहे. माझ्या संकीर्ण लेखांचें पुस्तक निघालें तर बरें होईल असें वाटतें. पण तुमच्या अगर चिंतामणराव वैद्य यांच्या लेखसंग्रहाकडे मी पाहतों त्या वेळीं निरुत्साहाने वाटतें कीं माझे लेख एकत्र प्रसिद्ध न झालेलेच बरें !

**२३५**

**१३ सप्टबर १९१५—नारायण रंगनाथ आळेकर, नागपूर**

आम्ही इकडे संयुक्त परिषदेची खटपट चालविल्याचें तुम्ही ऐकलेंच असेल. रा. ब. मुधोळकरांनी येथील प्रमुख पुढाऱ्यांना पत्रें लिहून परिषद काँग्रेसच्या घटनेप्रमाणे भरावी असें सुचविलें. हें समजताच आम्हीहि खटपट केली. यामुळे एकपक्षीय सभा करणें बरें नव्हे असें त्यांनी उलट लिहिलें. आता मुधोळकर पुनः असें सुचविणार आहेत की, परिषद दोनाहि पक्षांची मिळून भरवावी, पण प्रतिनिधींनी काँग्रेसच्या प्रतिज्ञालेखाला मान्यता द्यावी. तरी याबद्दल टिळकांचा व तुमचा अभिप्राय काय तो कळवावा. मुधोळकरांनी: टाईम्स ऑफ इंडियांत पत्रें लिहिलीं त्याकडे तुम्ही लक्ष न देऊन आपल्या पत्रांतून कांही लिहिलें नाही हें चांगलें झालें.

**२३६**

**२६ डिसेंबर १९१५—मिसेस ॲनी बेझंट, मुंबई**

माझी उपसूचना मंजूर झाली. काँग्रेस कमिटीने ती मान्य केली. आता सर्वांना मार्ग खुला झाला !

२३७

## ३ जानेवारी १९१६—डॉ. बाळकृष्ण शिवराम मुंजे, नागपूर

काँग्रेसचा समेट मान्य नाही. तथापि आपण ठरवाल त्याबाहेर आम्ही नाही.

२३८

## २२ एप्रिल १९१६—दत्तात्रय व्यंकटेश बेळवी, बेळगांव

आमची परिषदेची तयारी जोरांत चालू आहे. परंतु अधिकारी वर्गाची प्रतिकूलता आहे असें पाहून प्रतिपक्षांनीहि थोडी उचल केलेली दिसते. जैन लोकांनी या सभेवर बहिष्कार घालावा असें ठरविण्याकरिता एका बंगल्यांत सभा झाली. पण दुसरे सुज्ञ जैन सभेला गेले व त्यांचा हेतु अशा सूचनेला विरोध करण्याचा होता. आणि हे लोक जाऊन पाहतात तो तेथे निमंत्रण करणारांपैकी दोघे व स्वतः लठ्ठे इतकीच मंडळी होती ! अशा रीतीने या विरोधकांची फजीति झाली. कांही लिंगायत लोकांकडूनहि असाच विरोध होणार आहे. दोन पक्षांचा समेट होणार हें तिसऱ्या पक्षाला मानवत नाही इतकेंच. अधिकाऱ्यांनी गुप्त सर्क्युलर काढल्यामुळे सरकारी नोकर भाडें घेऊनहि आपल्या जागा—घरें देत नाहीत. बेळगांवास होमरूल लीगची स्थापना होण्याचा विचार आहे. पण ती आता इतक्यांतच झाली पाहिजे काय ? तथापि रेव्हेन्यू कमिशनर यांना मी आश्वासनपूर्वक कळविलें आहे कीं, सर्व रीतसर राजनिष्ठपणें व कायदेशीरपणें होईल. कदाचित् प्रेक्षक लोक विशेष गडबड करावयाचे म्हणून त्यांचीं तिकिटें अगदी आयत्या वेळीं काढण्याचें ठरविलें आहे.

२३९

## ३ मे १९१६—नटेशराव द्रविड, सर्व्हंट ऑ. इं. सोसायटी, नागपूर

सुरत येथील तंटा व फाटाफूट यानंतर आज मी हें पहिलेंच पत्र तुम्हाला लिहीत आहे. या आपसांतलि कलहाविषयी तुम्हा आम्हाला किती वाईट वाटतें हें ईश्वरालाच माहीत. बेळगांवास तुम्ही मंडळींनी जो एकीचा ठराव केला त्याबद्दल तुमचें व त्याहूनहि आमचें अभिनंदन करावेसें वाटतें. हा सलोखा ठेवण्याचें काम करण्याला तुम्हाला आहे याहून अधिक बळ मिळावे अशी माझी प्रार्थना आहे. गोखले मरण पावण्यापूर्वीच हें घडून येतें तर अधिक चांगलें झाले

असतें. पण उशिरा झालें तरी ते हवेंच होतें. आता पूर्वीप्रमाणे दोनहि पक्षांनी मिळून काम करावे अशी मला फार उमेद आहे. ती व्यर्थ ठरेल काय ? कोणी-कडून तरी सर्व प्रामाणिक मतांचीं माणसें एकत्र जमावीत व त्यांनी होईल ते कार्य करावे. आग लागो या पक्षभेदाला ! मी पुण्यास लवकरच येईन व तुमची गांठ घेईन.

२४०

६ मे १९१६--ग. कृ. चितळे वकील, अहमदनगर

महाराष्ट्रांतील उभय पक्षांत सलोखा व्हावयास पाहिजे होता तो घडवून आणण्यांत तुम्ही मदत केली याबद्दल तुमचे आभार मानले पाहिजेत. हें घडून येण्याला तुम्हाला किती प्रयास पडले असतील याची मला कल्पना आहे. या-पुढील खटपट आपण लवकरच केली पाहिजे, म्हणजे जिल्हासभा व प्रांतिक परि-षदा भरतील त्या राष्ट्रीय सभेच्या नियमान्वयें भरविल्या जाव्यात. कारण तुम्ही-आम्ही सर्वांनीच हे नियम आता मान्य केले आहेत. तरी आपला विचार कळ-वावा. जमत असेल तर येथे उभय पक्षांच्या पुढाऱ्यांना बोलावण्याचा विचार आहे.

२४१

२० मे १९१६--ग. कृ. चितळे वकील, अहमदनगर

काल स्वागतमंडळाची सभा झाली व तिने सर्वानुमतें अध्यक्षाच्या जागी तुमची निवडणूक केली हें कळविण्यास मला आनंद वाटतो. हें जोखमीचें काम तुम्ही नाही म्हणणार नाही अशी मला आशा आहे. तुम्हाला अलीकडे पुष्कळ श्रम झाले आहेत. तरी पण तुमची विश्रांति घेण्याची वेळ अजून पुढेच आहे. चौकर वकील यांनी आमच्या बळवंतराव टिळकांना नगरास येण्याचें आमंत्रण दिलें आहे; व ते स्वीकारून तुम्ही दोघे मिळून येणार असें घडवून आणाल तर मी तुमचे फार आभार मानीन. जिल्हा परिषदेंत विषय मोजके असावेत, प्रमाणाबाहेर असू नयेत, ही तुमची सूचना मला मान्य आहे.

२४२

२३ मे १९१६--रा. चौकर वकील, अहमदनगर

परवा जिल्हा परिषदेच्या स्वागतमंडळाची सभा भरली त्यांत आप-

झाला सर्वानुमतें अध्यक्ष निवडलें हें कळविण्यास आनंद वाटतो. त्याबरोबरच लोकसमाजाच्या विनंतीवरून टिळक यांना सन्मान्य पाहुणे म्हणून निमंत्रण करण्याचाहि सर्वानुमतें ठराव झाला. तें आमंत्रण रीतीप्रमाणे जाईलच. पण आपणास अगत्याची विनंति की, टिळकांना नगरास आपणाबरोबर आपण आणलेंच पाहिजे व आणतों असें ताबडतोब उत्तरी लिहिलें पाहिजे. ते आल्यानें मोठेंच कार्य होणार आहे. बाळासाहेब देशपांडे यांच्या मृत्यूने येथील सार्वजनिक चळवळीचें काम अगदीं बंद पडलें आहे. त्याला पुनः जीवन मिळून ते फोफावणार आहे. नाहीं तर अजीबात नष्ट होण्याचा प्रसंग गुदरणार आहे. तरी टिळकांना वरील गोष्ट ताबडतोब कळवून, ते सिंहगडास असले तर तेथून त्यांचें अनुमोदन आणवून, मला कळवावे. जास्त काय लिहूं ? मी सर्वांना कबूल केलें आहे की टिळकांना मी येथे घेऊन येईन. तेव्हां ती मंडळी माझ्या भरवशावर बसली आहेत.

२४३

१८ जून १९१६—मिसेस ॲनी बेझंट, मद्रास

वि. वि. आपल्या दोनाहि संघांचे उद्देश एकच आहेत, आणि आपण उभयताहि सहकारितेने काम करणार आहों. तेव्हा ज्याची जशी आवड असेल, तसे त्याने ह्या अगर त्या संघाचें काम करावे. एकाच गृहस्थाने जर दोनहि संघांचें काम केलें, तर त्यावरून तर त्यांचा अभिन्न भाव अधिकच स्पष्ट होईल.

२४४

१ फेब्रुवारी १९१७—व्ही. एस्. श्रीनिवासशास्त्री, मद्रास

माझी प्रकृति अशक्त झाली आहे. त्यामुळे प्रवासाला आरंभ करण्याला कांहीः दिवस लागतील. समर्थ यांच्याकडून अपेक्षेप्रमाणे पत्र आलें आहे. आणि तुम्ही व मुंबईचे स्नेही यांनी प्रेमाने जें जबाबदारीचें स्थान मला देऊं केलें आहे तें मी स्वीकारण्याचें ठरविलें आहे असें कळविलें आहे. फेब्रुवारी व मार्च या दोन महिन्यांत मी दिल्लीस असेन. तथापि पत्रव्यवहाराने बरेंच काम होण्यासारखे आहे. मुस्लिम लीगची सहकारिता कितपत लाभणार आहे ! पुणें व लखनौ येथे याच विषयावर तुमचें आमचें भाषण झालें हें तुम्हांस स्मरत असेल. टिळकांनी जो टाइपरिटन मसुदा तयार केला, व ज्याला वाच्छा व मुंबईची प्रांतिक

कॉंग्रेस कमिटी यांनी संमति दिली, त्यांनीहि या गोष्टीला महत्त्व दिलें आहे. मुस्लीम लीग व कॉंग्रेस यांचें मिळून कार्यकारी मंडळ झाल्यास त्याचा स्नेह्यांप्रमाणे टीकाकारांवरहि चांगला परिणाम होईल. कदाचित् तुम्ही या बाबतींत प्रयत्न केला असेल, पण त्याला अद्याप यश आलें नसेल असें वाटतें.

## २४५

### ११ फेब्रुवारी १९१७—नटेशराव द्रवीड, स. ऑ. इं. सो., दिल्ली

शास्त्री यांनी तुमचें पत्र दाखविलें. मला किती आनंद झाला म्हणून सांगूं! यापुढेहि आपणात असाच सलोखा राहील तर किती चांगलें होईल! त्यांचें माझें बोलणें झालें. त्यांत असें ठरलें होतें की राष्ट्रीय पक्ष एकमताने त्यांस बोलावील तरच त्यांनी जावें. इतर कित्येक गोष्टींवर तुमचा सल्ला व मदत पाहिजे. मी माझ्या बाजूने मदत करण्यास तयार आहे व तुम्हीहि आहांच. १९०५।०६ सालीं तुम्ही-आम्ही मिळून खटपट केली ती फुकट गेली. सर्वांनी मिळूनच हें काम केल्याशिवाय होणें नाही. कोणत्याहि एकाच पक्षाचें हित साधावें अशी माझी इच्छा नाही. उभय पक्षांना मिळूनः करतां येण्यासारखें काम उभयतांनी मिळून करावें.

## २४६

### १५ फेब्रुवारी १९१७—वासुदेव गोविंद आपटे, इंदूर

मला खात्रीलायक कळलें आहे कीं येथून एक डेप्युटेशन रा. टिळक यांस आग्रह करून बोलावण्यासाठी तिकडे येणार आहे. तें संमेलन-कमिटीकडून नव्हे, तर गांवांतल्या चार तरुण मंडळीकडून! तें डेप्युटेशन आलें, तर त्यांना योग्य तो सल्ला देऊन माघारें पाठवाल अशी मी आशा करतों. आपण स्वतः, खाडिलकर, दामले वगैरे मंडळीस येण्यास मुळींच हरकत नाही. आपला निबंध नुसता पाठवून आमचा संतोष होणार नाही. आपण स्वतः आलेंच पाहिजे.

## २४७

### २२ फेब्रुवारी १९१७—माधवराव सप्रे, रायपूर

महात्मा टिळक यांचें एक चरित्र हिंदींत लिहावें असा विचार आहे. तरी स्वतःची किंवा दुकानदाराकडून त्यांच्या चरित्रासंबंधाने मिळतील तितकीं छापील

पुस्तकें वगैरे पाठवावीं. तुमच्या कांहीं पुस्तकांचीं भाषांतरेंहि मला करावयाचीं आहेत. तरी तींहि सर्व पाठवावींत.

२४८

**२६ फेब्रुवारी १९१७—रामचंद्र वर्मा, संपादक पत्रिका, बनारस**

तुमचे सुभाषित-विनोद हें सुंदर पुस्तक वाचून मी इतका मोहून गेलों की, हिंदींत त्याचें भाषांतर करावे असा मनाला मोह झाला. तें पुस्तक इतक्या सुगम व शास्त्रशुद्ध रीतीने लिहिलें आहे की, अशा विषयावर लिहिणारांनी त्याचा कित्ता घ्यावा. भाषांतराला तुम्ही परवानगी द्याल अशी आशा आहे.

२४९

**२७ एप्रिल १९१७—नाम. श्रीनिवास शास्त्री, मद्रास**

मी जोखमीचें काम पत्करलें आहे. अजून काय विषय घ्यावेत याचा विचार केलेला नाही. पुण्यास येताच लष्करभरतीसंबंधाने मी एक व्याख्यान देणार आहे. अद्याप आपली तरुण पिढी या कामीं मागे घेत आहे. तरी तुमचा मनमोकळा सल्ला आणि भरपूर मदत यांची अपेक्षा आहे. कॉंग्रेस व होमरूल लीग यांचें मिळून मंडळ नेमावे ही तुमची कल्पना अमलांत येईल तर बरें होईल.

२५०

**२७ एप्रिल १९१७—वि. गं. केतकर, वकील, नाशिक**

शास्त्री यांचें अध्यक्षस्थान स्वीकारल्याचें पत्र आलें आहे. परिषदेला क्रमांक कितवा द्यावा हा वाद डोकावत आहे. पण अजून जोर करीत नाही. शास्त्री लिहितात की मला मराठी भाषा समजत नाही; तर मी वक्त्यांना बोलावणें किंवा भाषणावर नजर ठेवणें वगैरे गोष्टी कशा करूं? याकरिता अध्यक्षांना मदत करण्याकरिता तुम्हाला उपाध्यक्ष म्हणून निवडावे अशी सूचना मंडळींत निघाली आहे. अशा गोष्टीला जुना दाखला नाही. पण आयत्या वेळीं बनेल तें करूं.

२५१

**२ मे १९१७—बॅ. जोसेफ बॅप्टिस्टा, मुंबई**

मी नाशिकच्या प्रां. परिषदेला हजर राहणार आहे. यापुढे माझी सूचना

अशी आहे की होमरूल लीगचे अध्यक्ष टिळकांनी व्हावे; नाही तर तुम्ही व्हावे. कामाचा सर्व भर तुम्हा दोघांवरच पडतो. मग हा मानदेखील तुम्हालाच कां असू नये ? मधुमेहाचें औषध टिळकांनी पाठवितों असें लिहिलें. पण तें अजून मिळालें नाही.

२५२

**७ जून १९१७—मिसेस ॲनी बेझंट, मद्रास**

दडपशाहीचा पाय पुढे आहे. येथील गव्हर्नरांचें भाषण सिमला येथून हुकूम आल्याप्रमाणे झालें. त्याप्रमाणे इतर ठिकाणींहि भाषणें होतील. प्रथम मला अटक होईल, मग इतरांना. पुढील आठवड्यांतच ही गोष्ट घडून येईल. कदाचित् त्याच्या आधीहि. या गोष्टींची उघड चर्चाहि करू नये व सभा भरवू नयेत असाहि हुकूम निघण्याचा संभव आहे. हेतु हा कीं इकडील चळवळ विलायतेस कळू नये. अशा रीतीची मुस्कटदाबी झाली तर सर्व संपलेंच म्हणावयाचें.

२५३

**१६ जून १९१७—जिनराजदास, अड्यार ( मद्रास )**

श्री. अय्यर यांना उटीला रवाना केल्याचें मी तुम्हाला मागील पत्रांत लिहिलें. अय्यर यांना काल पासपोर्ट मिळाला. त्याचप्रमाणे त्यांना एकंदर जलमार्गानेच जातां येईल, फ्रान्समध्ये उतरतां येणार नाही. उटी येथे ही अट दुरुस्त करून घेण्याची खटपट अय्यर हे करणार आहेत. काय होतें पाहावे. तसे झालें तर ते फ्रान्समधून जातील.

२५४

**६ जुलै १९१७—सुरेंद्रनाथ बानर्जी, कलकत्ता**

हिंदी लोक व युरोपियन यांच्यामधील खटल्यांत अन्याय होतो व भेद-भाव केला जातो, यासंबंधाने अनेक उदाहरणें गोळा करून त्यावर एक पुस्तक लिहिण्याला मीच रामगोपाळ यांना सुचविलें होतें. त्याप्रमाणे त्यांनी तें लिहिलें व मी त्याला प्रस्तावना लिहिली. तें पुस्तक प्रसिद्ध होऊ नये अशाविषयी सरकाराने जंग-जंग पछाडले. तें पुस्तक तुम्हाला हवें असेल तर इंपीरियल लायब्ररींत

मिळेल. याच विषयावर नौरोजी फरदुनजी यांनी पूर्वी पुस्तक लिहिलें होतें. त्याचा उल्लेख किंवा सारांश ईस्ट इंडिया असोसिएशनच्या अहवालांत कोठे तरी मिळेल.

### २५५

### १७ ऑक्टोबर १९१७—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

बेअब्रूच्या खटल्याचा निकाल तुमच्यासारखा झाल्याचें कळलें. मराठी नाटकांवर विस्तारांत लेख आला आहे. त्यांत तोतयाच्या बंडाबद्दल फार चांगला उल्लेख केला आहे. तो तुम्ही पाहिलाच असेल. तुमचें कृष्णार्जुन-युद्ध नाटक वाचून बंडापेक्षाहि माझा ग्रह अधिक अनुकूल झाला. माझ्या मतें मराठी कॉमेडीमध्ये कृष्णार्जुन हें सर्वोत्तम ठरेल. शोकपर्यवसायी नाटकांत तोतयाचें बंड अगदी पहिलें नसलें, तरी पहिल्या दर्जांत येण्यासारखें आहे. माझा संकीर्ण लेखसंग्रह प्रसिद्ध करण्याबद्दल मोरमकर यांना तुम्ही शिफारस केली याबद्दल आभारी आहे. त्याला तुम्ही प्रस्तावना लिहून द्यालच.

### २५६

### १७ ऑगस्ट १९१७—विठ्ठलभाई पटेल, वांद्रें

रिसेप्शन कमिटीचा अध्यक्ष झाल्यामुळे भाषण लिहून काढण्याला फुरसतच होत नाही. तुम्ही सोमवार-मंगळवारापर्यंत आलां तर त्याचें टांचण करूं. जुन्या सहकाऱ्यांचें मन विनाकारण दुखवूं नये असें वाटतें. कॉंग्रेस स्कीमबद्दल मी तपशिलांत न जाता सर्वसाधारणपणें बोलणार आहे.

### २५७

### २८ एप्रिल १९१८—श्री. कृ. कोल्हटकर, खामगांव

तुमचें 'मराठे व इंग्रज' पुस्तक काल मिळालें. योग्य वेळीं योग्य काम पार पाडण्यांत जें औचित्य तुम्ही दर्शवितां, त्यांत कोणीच तुमची बरोबरी करूं शकणार नाही. येथील वकिलांनी सात प्रति मागविल्या आहेत. दरवर्षी तुम्ही नवें पुस्तक लिहिलां हें मोठें अपूर्व आहे! कारण तुमचें 'केस फॉर होमरूल' हें पुस्तक माझ्याकडे आल्याला अवघे दोनच महिने झाले!

२५८

### २७ मे १९१८—मि. एस्. आर. बोमनजी, मुंबई

ता. १० जून रोजीं गव्हर्नर यांनी टाऊन हॉलमध्ये बोलाविलेल्या सभेचें निमंत्रण रॉबर्टसन यांनी मला नुकतेंच दिलें. टिळकांना बोलाविलें आहे किंवा नाही तें कळवा. प्रथम या सभेवर बहिष्कारच घालावा असे माझ्या मनांत आलें. पण नंतर वाटलें कीं, टिळकांना व तुम्हाला जर :रीतसर निमंत्रण केलें नसेल, तर सभेंत हा मुद्दा उपस्थित करून निषेध तरी करतां येईल. लखनौपेक्षा या वेळीं मुंबईसच स्पेशल कॉंग्रेस भरविणें बरें नाही काय ?

२५९

### ३० मे १९१८— मि. एस्. आर. बोमनजी, मुंबई

तुम्ही कॉन्फरन्सला याल तेव्हा टिळकांविषयी हकीकत कळेलच. सर रवींद्र-नाथ टागोर यांच्याकडून, टिळकांनी पाठविलेले, पन्नास हजार रुपये परत आले. पण त्यांनी माझे दहा हजार रुपये परत पाठविले नाहीत. कारण अमेरिकेला अजून जाण्याचा त्यांचा विचार असावा. त्यांची मुलगी वारली तेव्हा आता त्यांना कदाचित् जातां येईल. टिळकांना विचारा की, त्यांची रक्कम कोणाकडे द्यावयाची ? यापुढे नोटांच्या रूपाने रकमा ठेवूं नका. खणखणीत रुपया पाहिजे. राजपुतान्यांत शंभराची नोट ९८ ला विकूं लागले आहेत !

२६०

### ४ जून १९१८—मि. एस्. आर. बोमनजी, मुंबई

टिळकांना मसुदा पसंत पडला हें ऐकून बरें वाटलें. पटेल, मी, जमनादास, सरोजिनी नायडू व हॉर्निमन यांची त्यावर चर्चा झाली. जिनाहि होते. पैसे सेंट्रल बँकेंत ५ टक्क्यांनी ठेवले असून त्याची पावती सोबत पाठविली आहे.

२६१

### १२ जून १९१८—श्री. एम्. के. आचार्य, दिल्ली

दिल्लीचे लोक टिळकांनीच अध्यक्ष झालें पाहिजे असें म्हणतात. कारण एक तर त्यांची योग्यता. शिवाय त्यांचे पासपोर्ट रद्द केले, दिल्लीला येण्याची मनाई

ठेली, वगैरे कारणें विशेष आहेत. टिळकांचें नांव पुढे आल्यावर इतर कोणाचेंहि यशस्वी होणार नाही. टिळकांवरील मनाईचा हुकूम कायम राहिला तर आम्ही त्यांच्या जागीं खापर्डे यांना डेप्यूटी नेमूं. बेझन्टबाईच्याऐवजी सर सुब्रह्मण्यम् यांना डे० प्रेसिडेन्ट नेमण्याच्या कल्पनेचा दाखला आहेच. यंदाची काँग्रेस विशेष महत्त्वाची आहे. तरी अध्यक्षहि विशेष महत्त्वाचाच हवा.

२६२

१८ जून १९१८–पं. जवाहरलाल नहरु, अलाहाबाद

परवा आमच्या प्रांतिक कॉंग्रेस कमेटीची सभा आहे. बहुधा दिल्ली कॉंग्रेस-करिता लो. टिळकांचेंच नांव सुचविले जाईल अशी आशा आहे. आम्हाला टिळकच अध्यक्ष हवेत. त्यांच्याखेरीज दुसरा कोणीहि नको. संयुक्त प्रांत तरी त्यांच्याच बाजूचा आहे यांत शंका नाही.

२६३

२६ जून १९१८—श्री. जिनराजदास, थिऑसॉफिस्ट, मद्रास

तुमची तार पोचली. अय्यर भेटल्यानंतर तिचें उत्तर पाठवितो. त्यांना काल रोजी त्यांचा पासपोर्ट मिळाला तो, मार्सेलीसवरून न जाता बे ऑफ बिस्केवरून जाण्याचा आहे. कदाचित जमल्यास तो बदलून मार्सेलीसकडन जाण्याचा पासपोर्ट ते मिळवितील.

२६४

३० जून १९१८—म. गांधी, नाडियाद

तुमचें पत्र पावलें. त्याबद्दल आभारी आहे. तुम्ही स्वीकारलेले धोरण इतकें चांगलें आहे की, तें याहून अधिक चांगलें व स्पष्ट करतां येणार नाही. मी खेडा जिल्ह्यातील लोकांना जे 'अपील' काढलें आहे, त्याबद्दल टिळकांना काय वाटतें ! हें मला समजण्याची इच्छा आहे. हल्लीं सरकारने ज्या अटीवर टिळकांना पासपोर्ट देण्याचें ठरविलें आहे त्या अटी ते मान्य करणार नाहीत असे मला वाटते. तथापि त्यांना योग्य वाटेल तें तें करतीलच.

( हिंदी पत्र, केसरी )

२६५

१७ जुलै १९१८—श्री. बापूजी अणे, यवतमाळ

यवतमाळ जिल्हा परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारल्याबद्दल स्वागत मंडळातर्फे तुमचे आभार मानतों. सुधारणासंबंधाने कांहीं लोक एकीकडे हव्याहि म्हणतात व त्यावर सडकून टीकाहि करितात. तुमच्या अध्यक्षीय भाषणांत, १९१७ सालच्या कॉंग्रेस लीग स्कीमच्या अनुरोधाने, विलायतेंत जाऊन चळवळ केली पाहिजे हा मुद्दा मांडावा. वऱ्हाडाला स्वतंत्र कायदे मंडळ देऊन त्याचा निराळा सब् प्रॉव्हिन्स करावा याकडेहि लक्ष वेधावें.

२६६

२० ऑगस्ट १९१८—सर सुब्रम्हण्यम् अय्यर, मयलापूर (मद्रास)

मॉंटेग्यू यांना उत्तरादाखल लिहिलेलें तुमचें पुस्तक मी हातीं येतांच तत्क्षणीं वाचलें. तुम्ही हें छोटें पुस्तक किती सुंदर व समर्पक लिहिलें आहे म्हणून सांगूं ! प्रे. विल्सन यांना मी तक्रारी पत्र पाठविलें. पण माझ्या पाठपुराव्याकरिता मॉंटेग्यू यांच्यविरुद्ध तुम्ही हत्यार घेऊन उठला या गोष्टीबद्दल विशेषच कौतुक वाटतें. तुमचा कोटिक्रम बिनतोड व अगदी प्रतिपक्षास निरुत्तर करणारा आहे. हें पत्र पाठविलें त्याचा इतका गवगवा होईल असें त्या वेळी वाटलें नाही. व्ही. पी. माधवराव यांनी प्रे. विल्सनला पत्र लिहिल्याबद्दल मला दोष दिला ! अशीं उदाहरणें पाहिली म्हणजे तुमच्या या कामगिरीबद्दल जास्तच कृतज्ञता वाटते.

२६७

१५ सप्टेंबर १९१८—श्री. गुडाप्पा, संपादक, 'कर्नाटक' बंगलोर

सर्व वर्तमानपत्रांत मराठा पत्रानेच, मी हातीं घेतलेल्या संस्थानी कार्याला, सहानुभूति दाखविली. यामुळे संस्थानाच्या अधिकाऱ्यांचा 'कर्नाटका'वर डोळा आहे. माझें धोरण सामान्यतः बरोबर असल्याबद्दल जर तुमचा एखादा लेख मराठ्यांत येईल, तर मला फार मदत होईल व सरकारलाहि माझ्या पत्राबर हात टाकण्यापूर्वी दहा वेळ विचार करावा लागेल.

२६८

१५ ऑक्टोबर १९१८—मि. एस्. आर. बोमनजी, मुंबई

अखेर टिळक पोर्ट–सय्यदला पोंचले. तह होण्याच्या आधीं जर आपण परतलों तर पुष्कळ फायदा होईल. बेसिल स्कॉटच्या मतें मुंबईचा हा नवा गव्हर्नर मोठा हुशार मनुष्य आहे.

२६९

२२ ऑक्टोबर १९१८—कॅ. बेनन, कुलू-पंजाब

टिळक विलायतेस निघण्यापूर्वी त्यांचें मला पत्र आलें होतें. ते तिकडे गेल्यामुळे त्यांच्या सांगण्यावरून तुम्हाला लिहीत आहे. गेल्या जूनमध्ये जेलम येथे गरवाली ब्राह्मण शिपायांची कत्तल झाली. ती मोठी संशयास्पद असून कौन्सिलांत ना. शर्मा यांनी सेनापतींना त्यासंबंधी प्रश्न विचारले आहेत. तरी या संबंधाची माहिती टिळकांना लिहून ती तिकडे सांगण्याविषयी सुचवा. मेसापोटेमियामधील गोंधळ हें जसें मॉंटेग्यू-चेम्सफोर्ड सुधारणांना एक निमित्त झालें, तसेंच वरील कत्तलहि जबाबदारीचे अधिकार मागण्याचें निमित्त करतां येईल.

२७०

२६ ऑक्टोबर १९१८—श्री. गोविंदराव सरदेसाई, माउंट अबू

पुण्याच्या म्युनिसिपालिटीचे तुम्ही अध्यक्ष निवडला गेला याबद्दल आभिनंदन करितों. तुमचें 'मराठे व इंग्रज' पुस्तक मोठें उत्कृष्ट व स्वतंत्र विचाराचें आहे. मराठींत असें हें पहिलेंच पुस्तक: म्हणावयाचें. माझ्याः मराठी रियासतीचा ( ती पुरी झाल्यास ) तुम्ही उपसंहारच लिहून ठेवला आहे व माझे श्रम एका अर्थी वाचविले असें म्हणावयाचें.

२७१

२६ ऑक्टोबर १९१८—ग. श्री. खापर्डे, उमरावती

टिळकांच्या जागीं कोणाला निवडता असें मला विचारण्यांत आलें आहे. अईनी पंडितजींचें नांव सुचविलें आहे. पण मी रवींद्र टागोर, मोतिलाल नेहरू,

आणि मोतीलाल घोस या क्रमाने नांवें सुचविलीं आहेत. विजयराघवाचारियर हेहि चांगले गृहस्थ आहेत. त्यांचं व बाईचें बरें नाही असें दिसतें. कसेंहि असो. पंडितजी एकदा अध्यक्ष झाले आहेत. फिरून त्यांनाच का नेमा ?

## २७२

### ४ नोव्हेंबर १९१८—डॉ. ॲनी बेझंट, मद्रास

सर रवींद्रनाथ टागोर अध्यक्ष होण्याला मिळते तर ती गोष्ट सर्वोत्कृष्ट झाली असती. मी खूप खटपट केली, पण ती फुकट गेली. ते म्हणतात, नुसती गर्दी पाहिली की मला कसेसेंच होऊं लागतें! मला तें नको. मदन मोहन निवडले गेले किंवा न गेले तरी ते आपल्या बाजूला राहतील. इतरांचीच भीति वाटते. तेव्हा आपल्या मताची छाप पडत चालली आहे हें उघड आहे. आम्ही आपलीं मतें भीति व भीडमुरवत न धरता बोलून दाखवितों. नेमस्त आडपडद्याने बोलतात. बिल मंजूर होईपर्यंत एकविचाराने वागलें पाहिजे. मतवैचित्र्याला त्यानंतर जागा आहेच.

## २७३

### २४ नोव्हेंबर १९१८—बापुजी अणे, यवतमाळ

होम मेंबर यांनी कौन्सिलांत सांगितलें की, टिळक विलायतेस गेल्यावर त्यांची भाषणबंदी उठेल. तें वाचून आनंद झाला. तुम्हाला पासपोर्ट मिळण्याचीहि आशा यावरून दिसते. नारायणराव वैद्य दोषमुक्त होऊन सुटले. त्यांचें अभिनंदन करण्याकरिता त्यांना यवतमाळास बोलावलें आहे. त्यांचा खटला आपला असें समजून होमरूल लीगने त्यांची कांही तजवीज केली पाहिजे. शांतता परिषदेकडे आपले प्रतिनिधि म्हणून टिळकांना पाठविण्याची खटपट आपण केली पाहिजे. सरकार त्यांना नेमणार नाही. पण त्यांच्यामागे लोकमत किती आहे हें तरी दिसून येईल. सरकाराने मतदारसंघ ठरवावा, मग लोक टिळकांनाच निवडून देतात हें दिसून येईल. अशा प्रकारचे ठराव जाहीर सभांतून करण्याला मी प्रारंभ केला आहे.

## २७४

### २७ नोव्हेंबर १९१८—बाळ गंगाधर टिळक, लंडन

होमरूललीगच्या कामास सुरुवात केली. कामाला बऱ्याच अडचणी आहेत.

लेबर पक्षास सुमारे २००० पौंड दिले. त्यामुळे आणखी जास्त रकमेची जरुरी लागेल. सध्या येथे 'इलेक्शन'ची गडबड चालू आहे. तथापि आम्ही आमचें काम पुढे रेटीत आहों. माझ्या सॉलिसिटराकडून बादशहांना मी अर्ज केला. त्यामुळे सरकाराने घातलेलीं माझ्या हालचालींवरील बंधनें त्यांनी दूर केलीं आहेत. कॉंग्रेसचा रिपोर्ट व वर्तमानपत्रांचे उतारे रजिस्टर्ड पत्राने पाठवा.

## २७५

### २८ नोव्हेंबर १९१८—बाळ गंगाधर टिळक, लंडन

ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीसंबंधाचा रिपोर्ट यासोबत पाठविला आहे. स्वागतमंडळाच्या द्वारें तो राष्ट्रीय सभेपुढे ठेवण्यांत येईल. त्याचा नीट विचार विषयनियामक मंडळांत करावा. ही कमिटी व 'इंडिया' हें पत्र राष्ट्रीय सभेला सोडून देऊन जवळजवळ सरकारी मताचा अनुवाद करूं लागलीं आहेत. नेमस्तांना राग येईल म्हणून आम्ही रिपोर्टांत सौम्य भाषा मुद्दाम वापरली आहे. पण खरें बोलावयाचें तर स्थिति लिहिली याहून फार वाईट आहे. रिपोर्टावर कस्तुरी रंग अयंगार आणि 'वसुमति' पत्राचे संपादक घोषबाबू यांच्याहि सह्या आहेत ही गोष्ट ध्यानांत ठेवा. या दोघांना हिंदुस्थानांतील वर्तमानपत्रांचे प्रतिनिधि म्हणून सरकाराने इकडे पाठविलें होतें. त्यांचेहि विचार आमच्यासारखेच आहेत. अर्थात् ब्रिटिश कमिटीला तूर्त पैसे पाठविणें श्रेयस्कर नाही. लॉईड जॉर्ज मुख्य प्रधान यांच्याशीं माझा पत्रव्यवहार झाला त्याची प्रत पाठविली आहे. तिकडून पैसे येण्याची फार जरुरी आहे. कारण जवळच्या शिलकेपैकी २००० पौंड लेबर पक्षाच्या निवडणुकीच्या कामाकरिता मी दिले. दिल्लीच्या सभेंत काय होतें तें खुलासेवार कळवा.

## २७६

### ३० नोव्हेम्बर १९१८—सरलादेवी चौधराणी, लाहोर

टिळकांची मुंबईस गाठ पडली तेव्हा त्यांनी मला विचारलें की, तुम्ही विलायतेस राजकीय विषयावर व्याख्यानें द्यावयास जाल का? पूर्वी स्त्रियांना पासपोर्ट देत नव्हते. आता देऊं लागले आहेत असें समजतें. हें ऐकून पूर्वी टिळकांनी विचारल्याची आठवण झाली. असें वाटतें की जमलें तर जावेंहि. येथे निष्क्रिय बसून राहण्यापेक्षा तो उद्योग बरा.

२७७

६ डिसेंबर १९१८—बॅ. सत्यमूर्ति, मद्रास

एम्. के. आचार्य हे कलकत्त्यांस गेले आहेत. तेथून ते बंकिपूरला जातील. आपण पुष्कळ लोक मिळून दिल्लीला गेलें पाहिजे. मुंबई स्पेशल कॉंग्रेसच्या ठरावाच्या मागे जाण्याचा कांहीं लोकांचा विचार दिसतो. कॉंग्रेसचें प्रतिज्ञापत्रक बदलून घेतलें पाहिजे. सरकारी जाहिरनाम्यांत जरं 'जबाबदारीचें स्वराज्य' असे शब्द आहेत, तर कॉंग्रेसच्या उद्देशांत 'हळुहळू सुधारणा' असे शब्द कां असावेत?

२७८

?— डॉ. श्री. व्यं. केतकर, (अमेरिका)

माझें नाव तुम्ही यापूर्वी कदाचित् ऐकलें असेल. तुम्ही 'मराठा' पत्राचें संपादकत्व सोडून तें खाडिलकरांकडे दिलें हें पाहून मला फार वाईट वाटलें. त्याहिपेक्षा मला याचें वाईट वाटलें कीं, टिळकांनी खाडिलकरांना केसरीचे संपादक केलें. कारण शिक्षण व पात्रता या दोनहि दृष्टींनी ते या जागेला माझ्या मतें नालायक आहेत. ते मराठी चांगलें लिहितात हें खरें. पण महाराष्ट्रांतील या सर्वोत्तम पत्राच्या संपादकाला नुसता तेवढा गुण पुरा होत नाही. हल्लीची ही व्यवस्था चालेल तर केसरी बुडेल, आणि वाचकवर्गाचीहि न भरून येण्यासारखी हानि होईल. पुण्यांत वासुदेवराव जोशी यांना व टिळकांनाहि मी या बाबतींत लिहीत आहे. तुम्हीहि टिळकांकडे ही गोष्ट कळवा.

२७९

?— हेनरी पोलॉक, लंडन

मुंबईस स्पेशल कॉंग्रेसमध्ये सुधारणांवर बहिष्कार घालण्यांत येणार म्हणतात हें खरें का? तसें न होईल तर बरें. या योजनेंत पुष्कळ दोष आहेत. परंतु त्यांचें तत्त्व बरोबर आहे असे येथील लोक म्हणतात. शिवाय इकडील स्थिति काय आहे हेंहि लक्षांत आणा. असें एकहि घर नाही की, ज्यांतील मनुष्य युद्धांत पडला नाही. अशा वेळीं तुमच्या कामांत लक्ष घालतो कोण? तरी पण मॉंटेग्यूंना प्रधानमंडळाने हिंदुस्थानांत धाडलें आणि ते व चेम्सफर्ड यांनी रिपोर्ट केला. अशा रीतीने लिबरल व कॉन्झर्व्हेटिव्ह यांचें एकमत तिकडे व इकडे झाल्या-

मुळे, आहे हें ठीक आहे। अशा समजुतीने इकडील लोक योजनेला पाठिंबा देतील. तरीहि लॉर्ड कर्झन व सिडनहॅम यांचे विरुद्ध दिशेचे प्रयत्न होणार. म्हणून तिकडील शिष्टमंडळें येऊन तिकडची खरी हकीकत इकडे सांगितली पाहिजे. बेझंटबाईची निवडणूक व टिळकांच्या भाषणाचे इकडे येणारे रिपोर्ट यांनी आमच्या स्नेही मंडळींना थोडी भीतिच वाटूं लागली आहे. येथील कॉंग्रेस कमिटीने कांही करावें तर तिची येथील स्थिति फार वाईट आहे. तुमचे कोणी लोक इकडे पूर्वी आले नाहीत, आणि जे आले ते म्हणजे सर सत्येंद्र सिंह, बसू, प्रभाशंकर पट्टणी, अफताब अहमदखान! यांच्याविषयी हिंदुस्थानांत लोक प्रतिकूल आहेत असें दर्शविलें जातें. यांत लाभ कोणता? आयर्लंडांतील घोटाळ्याने लॉईड जॉर्ज हे गांगरून गेले आहेत. म्हणून हिंदुस्थानांतलाहि घोटाळा पाहिला म्हणजे ते म्हणतील की, हा आणखी त्रास नको. तात्पर्य, मुंबईच्या सभेंत जर कांही भलता प्रकार झाला, तर इंग्लंडांत जे तुमचे आज स्नेही आहेत त्यांनाहि तुम्ही गमावून बसाल.

### २८०

### १७ डिसेंबर १९१८—हेनरी पोलॉक, लंडन

मजूर पक्षाशीं सहकार्य करण्यांत टिळकांची राजकीय चूक होत आहे असें वाटतें. बॅप्टिस्टाहि त्यांना गैरसल्ला देत आहेत. तहपरिषदेबद्दल बॅप्टिस्टा यांना आलेली तुमची तार मी पाहिली. अशा चळवळीचा कांही उपयोग होणार नाही. पार्लमेंटाकडे हक्क मागत असता इतर देशांच्या सहानुभूतीने इंग्लंडावर दाब आणण्यांत येईल, तर ब्रिटिश लोक त्याचा निषेधच करतील.

### २८१

### ९ जानेवारी १९१९—लो. टिळक, लंडन

कांही पत्रें व वर्तमानपत्रें मिळालीं. अजून आमचें टपाल केव्हा केव्हा फोडूनच येतें. एकदा चार हजार पौंड व एकदा पांच हजार पौंड पाठविलेत ते पोचले. होमरूल लीगच्या कामाचा अहवाल पाठविला आहे. कोर्टें ११ जान्युआरीला उघडतील. मग चिरोल केसची तारीख कोणती नेमतात तें कळेल. सर जॉन सायमनसाहेबांनी आमचें वकीलपत्र स्वीकारलें आहे. पण समक्ष भेटून बोलणें चालणें अद्यापि व्हावयाचें आहे. मार्सेलवरून आता टपाल जाऊं-येऊं लागलें.

तेव्हा यापुढे पत्रें लवकर मिळतील. येथे आम्ही जीं हस्तपत्रकें व लहान पुस्तकें काढलीं त्यांच्या प्रती पाठविल्या आहेत. आम्ही मजकूर ठरविल्याप्रमाणे बॅप्टिस्टा यांनी लिहिला आहे. त्यांत लंडन टाइम्सचें नांव नाही पण त्याच्या टीकेला उत्तर आहे. मनरो-डॉक्ट्रिनचा उल्लेख कां केला याचीं कारणें तुम्हाला कळून येतीलच. दिल्ली येथील राष्ट्रीय सभेने शांतता परिषदेला पाठविण्याच्या शिष्टमंडळांत माझी निवड केली हें एका अर्थी बरें झालें. त्यामुळे मि. पोलॉक यांचा मला जो विरोध होत आहे त्याला परस्पर उत्तर मिळेल. हिंवाळा आहे पण फारसा बाधत नाही.

२८२

११ जानेवारी १९१९—बॅ. सत्यमूर्ति, मद्रास

बेझन्टबाईंनी काय चालविलें आहे हें तुम्ही पाहातातच. पण राष्ट्रीय सभेचें मत काय आहे हें इंग्लंडला नीट कळावें अशी खबरदारी आपण घेतली पाहिजे. बेझन्टबाई व रामस्वामी आय्यर यांचे आपसांत ठरल्यावरून रामस्वामी मला म्हणाले की, काँग्रेसतर्फे शांतता परिषदेकडे जें शिष्टमंडळ पाठवावयाचें त्यांत टिळकांची नेमणूक करणें हिताचें नाही. यावरून काय तें समजा. वर्तमानपत्रांत याविषयी गवगवा केला पाहिजे. पार्लमेंटकडील टिळकांचा अर्ज तयार झाला असल्यास त्याची रूपरेखा कळवा. काँग्रेसचें शिष्टमंडळ बेझंटबाईंच्या होमरूलच्या शिष्टमंडळाच्या आधी गेलें पाहिजे.

२८३

११ जानेवारी १९१९—हरि नारायण आपटे, पुणें

सरकारने कौन्सिलच्या उमेदवारीविषयीं तुम्हांवर घातलेला निर्बंध काढून घेतला याबद्दल मी तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करतो. सरकारने आजवर हा तुमच्या बाबतीत मोठा अन्याय चालू ठेवला होता. १९०९ सालीं ज्या वेळीं तुम्हांवर हा निर्बंध घातला, त्या वेळीं मीच सरकारची साथीदारी केली असा माझेवर निष्कारण आळ होता ! डेक्कन सभेंत या निर्बंधाचा निषेध करण्याची सभा झाली त्या वेळीं अध्यक्ष गोपाळराव गोखले यांच्या संमतीने मीच मुद्दाम हा ठराव मांडला होता. त्यानेहि गैरसमज थांबले नाहीत. कसेंहि असो. आज मी फिरून एकवार तुमचें अभिनंदन करतो.

२८४

### १७ जानेवारी १९१९—ॲडव्होकेट मुनशी, मुंबई

आपण जो अर्ज तयार करणार आहां त्याकरिता मी पूर्वीचे दाखले कांहीं मिळाले तर पाहात आहें. अर्जाचीं टिपणें प्रथम करून मी तीं सोबत तुमच्याकडे पाठवीत आहें. तरी तीं पाहून परत करावीं. अर्ज मोघम कॉंग्रेसच्या नांवाने लिहावा किंवा जे कोणी त्यावर प्रत्यक्ष सह्या करतील त्यांच्या नांवाचा लिहावा याचा दाखला मी पाहात आहें.

२८५

### २० जानेवारी १९१९—विजयराघवाचारियर, सेलम

कस्तुरीरंग अय्यंगार व मद्रासचे इतर कांहीं स्नेही यांचें मत असें आहे कीं, राजकीय सुधारणांचें बिल लोकांपुढे आलें म्हणजे त्याचा विचार करण्याकरिता राष्ट्रीय सभेची जादा बैठक भरवावी. त्याना असेंहि वाटतें कीं, या गोष्टीला पुणें हें चांगलें ठिकाण आहे. आपणाला आता गप्प बसून उपयोगी नाही. पुढील खटपट केलीच पाहिजे.

२८६

### २४ जानेवारी १९१९—डॉ. ॲनी बेझंट, मद्रास

राष्ट्रीय सभेच्या शिष्टमंडळांत जाऊन मग तिची आज्ञा मोडून सुधारणांचें बिल कोणी सुधारावें हें मला योग्य वाटत नाही. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांत जाणे मला फार बरें वाटलें असतें. पण असे हात बांधून घेऊन जाणें मला योग्य वाटत नाही. महत्त्वाच्या मुद्द्यावर राष्ट्रीय सभेची आज्ञा मानावी हें ठीक. पण किरकोळ गोष्टींत देखील कोणी स्वतंत्र मत सांगूं नये हें काय ? आज एकदम प्रांतिक स्वातंत्र्य मागावें असें राष्ट्रीय सभेत बहुमताने ठरलें आहे, व ती मागणी 'मुद्द्याची महत्त्वाची व न सोडण्याची ' या सदरांत घातली आहे. शिवाय माझ्याविषयी अनेक लोकांचा विद्वेष कसा आहे हें पहा. म्हणून मी कॉंग्रेसच्या शिष्टमंडळांत राहणें योग्य नाही. एकंदर थाट असा की, जे कोणी मोठमोठ्याने शिरा ताणून बोलतील त्यांचेंच म्हणणें ग्राह्य ! आणि कोणी परिस्थितीचा विचार केला, खऱ्या

अडचणी काय आहेत त्या लक्षांत घेतल्या, आणि त्याप्रमाणे मागणीला मुरड घालण्याचा प्रयत्न केला, म्हणजे त्याच्यावर लोक रागावून तुटून पडतात. समेट करण्याला मी तयार आहें. पण अविचाराने सगळें हातचें गमावणाऱ्या जहालां-बरोबर काम करण्यापेक्षा, ज्याचा उद्या अधिक कांही मिळविण्याकडे उपयोग करतां येईल असें थोडें तरी मिळवूं पाहणाऱ्या नेमस्तांशींच सहकारिता करावी हें मला अधिक पसंत आहे. दिलेलें टाकूं नये अशा मताची मी प्रथमपासून आहे. मी कांहीहि टाकणार नाही. घेईन तें स्वीकारलें असेंहि म्हणणार नाही. मिळेल त्याची जबाबदारी पत्करणार नाही. पण लोकांचा हा अविचारी विरोध पाहून थोडेंहि स्वीकारावें असा माझा कल होऊं लागला आहे. जें थोडेंहि देऊं नका असें आमचे शत्रु म्हणतात त्यांत स्वीकारण्यासारखें कांही तरी असलेंच पाहिजे असें मन सांगतें !

२८७

२५ जानेवारी १९१९--ग. श्री. खापर्डे, दिल्ली

बेझंटबाईंचें शिष्टमंडळ कॉंग्रेसवर आघाडी मारण्याच्या तयारींत दिसतें, पण एप्रिलच्या पूर्वी फ्रॅन्चाईज कमिटीचा रिपोर्ट तयार होणार नाही. तो झाल्या-वर एप्रिलच्यापुढे शिष्टमंडळाना पासपोर्ट देतील असें वाटतें.

२८८

२५ जानेवारी १९१९--विजयराघवाचारियर, सेलम

तुम्हाकडून आलें ठरल्याप्रमाणे पत्रें आलीं म्हणजे मी या इलाख्यांतील लोकांना तीं पाठवितों. आणि ते विलायतेस जातात कीं नाही, व गेले तर त्यांचा खर्च ते करणार कीं नाही, याची माहिती मिळवितों. शिष्टमंडळाच्या सभेला दिल्लीस मी जाण्याचें कांही कारण आहे असें वाटत नाही. कारण पुष्कळशा लोकांची मला माहिती नाही. या प्रांताकरिता किती संख्या निश्चित झाली हें कळवा असें लोक विचारतात. रौलट कमिटीच्या रिपोर्टाविरुद्ध रोज कांही तरी चळवळ केल्याशिवाय माझा हल्ली एकहि दिवस जात नाही. या वेळीं सर्व राष्ट्रीय-पक्ष एकविचाराचा होईल तर किती बरें होईल !

२८९

८ फेब्रुवारी १९१९—ॲड. मुनशी, मुंबई

बेझन्टबाई व जिना यांच्याशीं आमचा फार वाद झाला व कडाक्याचाहि झाला. पण तीं दोघें आपला हट्ट सोडीत नाहींत. यामुळे राष्ट्रीय सभेच्या शिष्टमंडळावर त्यांची नेमणूक करून फुकट. मालवीयजी आपल्याकडून खटपट करीत आहेत. पण तें जुळणें कठीण दिसतें. ' राष्ट्रीय सभेचा ठराव ऑ. इं. कॉं. कमिटी दुरुस्त करील तर मी राष्ट्रीय सभेच्या शिष्टमंडळांत जाण्यास तयार आहे असें मी केळकरांना पूर्वी सांगितलें आहे व तें माझें मत तसेंच कायम आहे असें केळकरांना लिहा ' असें जिना यांनी मला सांगितलें. पार्लमेंटकडे अर्ज करण्याविषयी टिपण मी तुमच्याकडे पाठविलें आहे. तें वाचून तपासून व दुरुस्त करून माझ्याकडे परत पाठवा.

२९०

१९ फेब्रुवारी १९१९—ॲड. मुनशी, मुंबई

येथील होमरूल लीगचें शिष्टमंडळ विलायतेस जाणार की नाही, म्हणून तुम्ही विचारतां तर माझी माहिती अशी की, ' शहाण्या लोकांनी ' सल्ला दिल्यामुळे राष्ट्रीय सभेच्या शिष्टमंडळाशिवाय दुसरें कोणीहि जात नाही ! पटेल मला लिहितात की, 'पार्लमेंटाकडे अर्ज म्हणून जो करावयाचा ठरला आहे, त्याची व्यवस्था केळकर व तुम्ही मिळून करावी. '

२९१

१ मार्च १९१९—श्री. विजयराघवाचारियर, सेलम

चिरोल खटल्याचा निकाल विरुद्ध झाला ही एक राष्ट्रीय आपत्ति आहे. हाऊस ऑफ लॉर्डस्‌कडे अपील करावें. हा दुर्दैवाचा प्रहार टिळक धैर्यानें सोसतील. पण त्यांच्या प्रकृतीवर याचा परिणाम होईल अशी भीति वाटते.

२९२

२२ मार्च १९१९—इंदुभूषण सेन, कलकत्ता

व्योमकेश चक्रवर्ती यांना तुम्ही मुंबईस बोलाविलें, पण ते आताच येऊ

शकत नाहीत. टिळक अपील करणार असें कांही वर्तमानपत्रांत वाचलें. पण त्याचा कांही उपयोग होईल असें तुम्हांस वाटतें काय ?

२९३

**२४ जुलै १९१९—फिलिप स्नोडन, लंडन**

कमिटीपुढे रॅम्से मॅक्डोनाल्ड यांनी साक्ष द्यावी म्हणून तुम्ही लिहिलें या सूचनेबद्दल आभारी आहों. पण मॅक्डोनाल्ड यांचें म्हणणें असें कीं, मि. स्पूर यांनी कमिटीच्या अध्यक्षाशीं प्रथम बोलून नंतर त्यांना विनंति करावी. स्पूर व अध्यक्ष यांचें बोलणें झाल्यावर आमच्या कौन्सिलाकडून मॅक्डोनाल्ड यांना विनंति करूं. या आठवड्यांत मॅक्डोनाल्ड हे बाहेरगांवीं जाणार आहेत हीहि एक अडचण आहेच.

२९४

**?—लो. टिळक, लंडन**

येथील ब्रिटिश काँग्रेस कमिटीसंबंधाने आमचे विचार दिल्ली येथील स्वागत-मंडळाकडे व इतरांकडे पाठविले आहेत. या कमिटीची उपयुक्तता कांही राहिलेली नाही. उलट तिच्यापासून अपाय होऊं लागला आहे. ती सुधारेपर्यंत तिला पैसे पाठविण्यांत अर्थ नाही. राष्ट्रीय सभेला अध्यक्ष कोण निवडावा याविषयी मी कांहीच मत ठरविलें नाही. सर रवींद्रनाथ टागोर तें स्थान सहसा स्वीकारणार नाहीत. विजयराघव किंवा नेहरू यांपैकी कोणीहि आपल्या कार्याला उपयोगी पडतील. मुंबईस झालेल्या ठरावाच्या मागे पाऊल जातां कामा नये. त्यामागे तुम्ही जाल तर सुधारणांची योजना आहे त्याहून चांगली करण्याचे आमचे येथील प्रयत्न फुकट जातील. मजूरपक्ष पूर्णपणें आमच्या बाजूला आहे. जमल्यास राष्ट्रीय सभेने एक ठराव करून शांतता परिषदेपुढे राष्ट्रीय सभेचे विचार मांडावे.

२९५

**?—लो. टिळक, लंडन**

......खटल्याचें लिहिलें. आता राजकीय बाबीविषयी थोडें लिहितों. येथे काय चाललें आहे याची कल्पना तुम्हाला सहसा येणार नाही. पार्लमेंट लॉईड जॉर्ज यांच्या मुठींत आहे. मजूरपक्ष भिंतीवर धडक्या मारीत आहे. पण

त्याचा फारसा उपयोग होत नाही. मॉंटेग्यू-चेम्सफर्ड रिपोर्टाइतक्याहि सुधारणा पदरांत पडण्याचा रंग नाही. सिलेक्ट कमिटीचें काम संपताच एकदम बिल प्रविष्ट होईल व झटपट पास होऊन जाईल. यावरून शिष्टमंडळ कसें असावें याची कल्पना येईल. पुष्कळ लोक येण्याने विशेष साधणार नाही. फुकट खर्च होईल. अगदी थोडे शेलके लोक आले तर बरें. इकडे व्याख्यानें हवीं, पण तीं हळुहळू सारखी पेरीत राहिलें पाहिजे. थोड्या वेळांत पुष्कळ देऊन फारसा उपयोग नाही. मला शांतता परिषदेकडे प्रतिनिधि म्हणून पाठविण्याचा ठराव पोचला. हा प्रश्न लीग ऑफ नेशन्सपुढे आणण्याचा प्रयत्न आहे. काय होईल पाहावें. बेझंटबाई व कॉंग्रेस यांचा सलोखा होत नाही असें दिसतें. त्यांचें शिष्टमंडळ स्वतंत्र येणार तर येवो. पण त्यांचा व आपला येथे विरोध दिसू नये. मी त्यांना एक सामोपचाराची तार पाठवीत आहे. शांतता परिषद वगैरेसंबंधाने आम्ही तुम्हांला कळवूं तें कोणत्याहि रीतीने प्रसिद्ध करण्याचें नाही. ११ तारखेला पार्लमेंट उघडेल तेव्हा कोणाकडून तरी प्रथमच हिंदुस्थानाच्या स्वयंनिर्णायक हक्काचा प्रश्न काढतां आला तर पाहतों. पण शांतता परिषद संपण्यापूर्वीच पार्लमेंटाला न डिवचलेलें बरें. बमनजी हे लवकरच इकडे येतील. त्यांचा आम्हाला बराच उपयोग होईल असें वाटतें. गेले तीन दिवस बर्फ एकसारखें पडत आहे, तथापि प्रकृति ठीक आहे.

## २९६

### १२ जानेवारी १९२०--हॉल्फर्ड नाइट, कॅलिडोनिया आगबोट

तुम्ही पाठविलेलें पार्सल मला आताच आगबोटीवर मिळालें. तुम्ही पाठविलेल्या वस्तु पुण्याचें स्मरण म्हणून आम्ही घरीं अंगावर घालीत जाऊं. विलायतेमध्ये हिंदुस्थानासंबंधी किती तरी काम होण्यासारखें आहे. मी आपल्याकडून होईल ती मदत करीन. मी परत जाताच लॉइड जॉर्ज व मॉंटेग्यू यांना भेटतों. हिंदुस्थानांतील हकीकत मधून मधून कळवीत जा. तुमच्याकडून येणाऱ्या पत्रांना मी फार चाहतो.

## २९७

### १७ जानेवारी १९२०--जी. पी. ब्लिझर्ड, लंडन

टिळकांचा व तुमचा तिकडे हिंदुस्थानांत गेल्यावर जो सत्कार झाला

त्याचीं वर्णनें वाचून फार बरें वाटलें. अमृतसरच्या अत्याचारांनी खरोखर आमच्या देशांला मोठा काळिमा आणला ! येथे त्याचा सडकून निषेध होत आहे; मग तिकडे हिंदुस्थानांत लोकांना काय वाटत असेल ? अमेरिकेंतल्या ट्रेड यूनियन्सना अद्याप पत्रकांच्या प्रति पाठविल्या नाहीत. 'इंडिया' पत्राची कामगार मंडळी थोडी आणि काम फार. मिस नार्मटन यांवरच कामाचा बोजा पडतो. मजूर पक्षातर्फे येत्या पार्लमेंटाच्या निवडणुकीला मी उभा राहिलों आहे. कॉंग्रेसच्या वतीने तुम्ही इकडे येऊन पार्लमेंटाच्या निवडणुकीला कां उभे राहत नाही ? मजूर पक्ष तुम्हाला भरपूर पाठिंबा देईल.

२९८

### १९ जानेवारी १९२०—केळकर यांचें पं. नेहरू यांस पत्र

गेल्या राष्ट्रीय सभेने लंडन येथील 'इंडिया' पत्रासंबंधाने ठराव केला त्याची अंमलबजावणी कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून आपण त्वरित कराल तर बरें होईल. कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाने या पत्राची सुधारणा कशी करावी या संबंधाने पूर्वीच ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीकडे रिपोर्ट केला आहे. ता. १२ जानेवारी रोजीं भरलेल्या सभेंत त्याचा विचार करण्याला सवड झाली नाही व फिरून सभा लवकर बोलावली जाईल असें दिसत नाही. म्हणून लेखी अभिप्राय मागवून या गोष्टीचा विचार करावा असें मला वाटतें. ही सुधारणा घडून येण्याला प्रथम सुमारें ७५० पौंड पाठविले पाहिजेत. तसेंच त्या रिपोर्टांत सुचविल्याप्रमाणे 'इंडिया' पत्राचा संपादक होऊन जाण्यास तयार असलेल्या लोकांचीं नांवें व शिफारसी प्रत्येक प्रांताकडून आपण मागवाव्या व त्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या सभासदांकडे लवकर पाठवाव्या असें मला वाटतें.

२९९

### १६ फेब्रुवारी १९२०—जी. पी. ब्लिझर्ड, लंडन

पटेल यांच्याबरोबर मेमोरँडम पाठवीत आहे. बरींच पार्सलें सेन्सॉरकडून मध्येच गहाळ होतात असें दिसतें. निदान आमचें नवें पुस्तक Agony of Amritsar हें तरी तुम्हाला मिळेल अशी आशा आहे. डॉ. क्लार्क व रुदरफोर्ड हे फ्रान्समध्ये गेले आहेत. तथापि सभा वगैरे करण्याचा उपक्रम आम्ही चालू ठेवला आहे.

३००

### २२ फेब्रुआरी १९२०—रे. डॉ. मॅकनिकोल, पुणें

ता. २८ रोजीं जॉन स्मॉलमध्ये 'राष्ट्रीय कर्तबगारी' या विषयावर व्याख्यान देणार आहे. तरी या प्रसंगीं तुम्ही अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी आमची विनंति आहे. यापूर्वीहि अनेक वेळां अध्यक्षस्थान स्वीकारलें होतें तसेच आजहि. शिवाय तुमची गांठभेट पुष्कळ दिवसांत झाली नाही म्हणूनहि. सोबत येथील सर्व व्याख्यानांचा कार्यक्रम जोडला आहे.

३०१

### २२ मार्च १९२०—डॉ. अन्सारी, लखनौ

राजकीय सुधारणांच्या कायद्याबाबत नियमांविषयी कॉंग्रेसचें मत पार्लमेंटरी कमिटीपुढे मांडण्याकरिता विठ्ठलभाई पटेल यांना विलायतेस पाठविण्याचें कॉंग्रेस-च्या प्रचार कमिटीने ठरविलें आहे, त्याबद्दल तुमचें मत कळवा. गांधी आजारी आहेत असें नुकतेंच दिल्लीस कळलें. अर्थात् आमचा रिपोर्टहि या महिना-अखेर प्रसिद्ध होत नाही.

३०२

### ८ एप्रिल १९२०—वाग्भट देशपांडे, सातारा

सोलापूर परिषदेंत तुम्ही अध्यक्ष या नात्याने जे निःपक्षपातीपणाचें धोरण ठेवलें त्याची सर्वत्रांकडून वाहवा होत आहे. दादासाहेब करंदीकर तर मजजवळ असें अभिमानाने बोललें की, अध्यक्ष कसा असावा याचें अगदी नमुनेदार उदाहरण तुम्ही घालून दिलें. नेमस्तांनी सत्यशोधक तमासगिरांची मदत घेऊन जें वर्तन केलें तें मात्र शरमेने खाली मान घालावयास लावणारें आहे. रँग्लर परांजप्यासारख्यांनी केवळ निवडणुकीच्या निमित्ताने अशा पागल लोकांच्या गळ्यांत गळा घालावा याचें नवलच वाटलें! ना. गोखल्यांच्या हातून असला भिकारपणा कधीहि झाला नसता !

३०३

### २० मे १९२०—मोहनदास गांधी (आगगाडींत)

व्हाइसरॉय साहेबाशीं माझ्या सहा मुलाखती झाल्या. नवीन असें कांहीच

बोललों नाहीं. जुने तेंच बोललों. पण तीन मुख्य प्रश्नांवर तीन विचारमंडळें नेमावी म्हणजे त्यांचीं उत्तरें ठरतील असें मी सुचविलें. ही गोष्ट व्हॉइसरॉयांनी अजून मान्य केली नाही. तरी पण आमचें म्हणणें त्यांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न आपणच करावयाला हवा. मी त्यांना सुचविलें कीं 'माझ्याप्रमाणे इतर चार पुढाऱ्यांच्याशींहि तुम्ही बोलावें हें बरें' ती गोष्ट मात्र त्यांनी मान्य केली व म्हणाले कीं ज्या पुढाऱ्यांना माझी मुलाखत हवी असेल त्यांनी मला लिहावें म्हणजे मी भेटीला त्यांना बोलावीन. लाला लजपतराय हे त्यांना आधींच भेटले आहेत. तुम्हीहि व्हॉइसरॉयांना पत्र लिहून मुलाखत मागा. वाटल्यास, तुम्ही माझ्या सांगण्यावरूनच मुलाखत मागत आहां असेंहि लिहा.

### ३०४

### २५ जून १९२०—दुर्गादास आडवानी

गतवर्षी पंजाब व सिंध या प्रांतांत ज्या: कित्येक गृहस्थांना तुरुंगाच्या शिक्षा झाल्या त्या लोकांना येत्या कौन्सिल निवडणुकींना नवीन कायद्याप्रमाणे उभे राहता येत नाही ही गोष्ट यापूर्वीच तुमच्या लक्षांत आली असेल. अर्थात् त्यांनी निवडणुकीला उभें रहावयाचें तर त्यांच्यावरील नालायकीचा शेरा सरकारी हुकमाने निघाला पाहिजे व तो निघण्याला त्यांना माफी देण्यांत आली पाहिजे. तरी या बाबतींत, टिळकांचा सल्ला घेऊन, तुम्ही ताबडतोब विलायतेंत पटेल यांना तार कराल काय ? नियमांची इतर दुरुस्ती करतांना अशीहि एक दुरुस्ती झाली पाहिजे कीं ,राजद्रोहाच्या गुन्ह्याकरिता शिक्षा झालेल्या लोकांना निवडणुकीला उमेदवार म्हणून उभे राहण्याला हरकत होऊं नये. तरी पटेल यांना ताबडतोब तार करावी.

### ३०५

### २६ जून १९२०—मो. गांधी, मुंबई

काँग्रेसच्या घटनेचा मी केलेला मसुदा पाठवीत आहें. त्यांत सुगमता व सर्व पक्षांच्या लोकांना प्रतिनिधित्व मिळून काँग्रेसचें आजचें वैशिष्ट्य राखलें जाईल, इकडे मी लक्ष पुरविले आहें. सदर मसुदा नीट लक्षपूर्वक वाचा व तुमचे मतभेद असले तरी तेंहि खुशाल कळवा. त्यांत फारच वादग्रस्त बाबी असल्या तर आपणांस भेटून चर्चा केली पाहिजे. माझा मुक्काम हल्ली मुंबईसच आहे.

३०६

## ? १९२०—श्रीधर व्यंकटेश केतकर, पुणें

नेमस्तपक्ष व गांधींचा पक्ष यांहून वेगळें अस्तित्व दर्शविणारा पक्ष स्थापन करण्याची आता वेळ आली आहे. या दोन पक्षांपेक्षा वरील पक्षाने आपला कार्यक्रम विस्तृत आंखल्यास जनतेवर त्याचा ताबा सहज चालूं शकेल. म्हणून राष्ट्रीय पक्षातर्फें तुम्ही कीडचें जाहीरपत्रक काढून नवा पक्ष स्थापन करण्यांत पुढाकार घ्यावा अशी माझी सूचना आहे. तुमची इच्छा असल्यास या बाबतींत तुम्हांस हवी ती मदत देण्यास माझी तयारी आहे.

३०७

## १२ जुल १९१२०—डॉ. हर्डीकर, न्यूयॉर्क

यासोबत येथील स्वराज्य संघाच्या कामाचा अहवाल पाठविला आहे. येथे पैशाची फार टंचाई आहे. पण कॉंग्रेसकडून :कांही रक्कम आल्यास आम्ही अधिकं काम करूं शकूं. प्रथम आम्ही ‘ यंग इंडिया ’ पत्र काढलें. हस्तपत्रकें वगैरे सुमारे दहा लक्ष काढून वाटलीं. लहान, पण हस्तपत्रकाहून मोठीं, अशींहि तीन पुस्तकें काढून त्यांच्या पुष्कळ प्रती वांटल्या. व्याख्यानें देतच आहों. हिंदुस्थानविषयक पुस्तकांचें एक लहानसें दुकानच मांडलें आहे म्हणाना. त्यांचा उपयोग व्याख्यानें वगैरे देण्याकरिता येथील हिंदी विद्यार्थ्यांना होतो, व कांही अमेरिकन लोकहि पुस्तकें घेतात. कांही मोठ्या शहरीं संघाच्या शाखा उघडण्याचा विचार आहे. महिन्यांतून दोन बातमीपत्रें हिंदुस्थानास इकडून पाठवावयाचीं आणि विद्यार्थी व इतर कोणी यांना लागेल ती माहिती पुरवावयाची असा विचार केला आहे. गेल्या तीन महिन्यांत निरनिराळ्या प्रकारांनी आम्हाला अठरा हजार डॉलर उत्पन्न झालें. त्यांतच टिळकांनी पाठविलेले सहा हजार डॉलर आहेत. पण निरनिराळे खर्च होऊन आता फक्त रोख हातांत साडेतीनशें डॉलर व अठराशें पंचाहत्तर डॉलरचे शेअर्स असे आहेत. इकडील मतप्रसारावर कॉंग्रेसने खर्च केल्यास त्याचा चांगला उपयोग होईल. न्यूयॉर्कहून इतर सर्व देशांत आम्हांला पत्रव्यवहाराला व इतर सर्व बाबतींत खुला दरवाजा मिळतो. त्याचा कॉंग्रेसने कां उपयोग करून घेऊं नये ?

३०८

१४ जुलै १९२०—विठ्ठलभाई पटेल, लंडन

मिसेस नायडू व मॉंटेग्यू यांचा पत्रव्यवहार पाठवीत आहें. हिंदुस्थानांत घडणाऱ्या गोष्टींसंबंधाने मॉंटेग्यूहि कसें अज्ञानांत आहेत हें दिसेल. येथील 'इंडिया' पत्राचें व ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीचें काम अतिशय असमाधानकारक चाललें आहे. डॉ. क्लार्क यांच्याऐवजी आता बेनस्पूर यांची अध्यक्ष म्हणून निवड झाली आहे. पार्लमेंटचे पुष्कळ सभासद कमिटीचे नामधारी सभासद आहेत. पण कोणी त्यांत लक्ष घालीत नाहींत. एक दोन हिंदी गृहस्थ येथे कायमचे राहिले तर इंडिया पत्र व राजकीय प्रचार आपणास हवा तसा करणें कठीण नाहीं. पंजाब प्रकरणावर पार्लमेंटमध्ये सहा तास वाद झाला. फक्त मजूरपक्षाने कॉंग्रेस-प्रमाणे मत दिलें.

३०९

२४ जुलै १९२०—धोंडोपंत विद्वांस, मुंबई

आज सकाळीं येथे आलों. आज ( टिळकांना ) ताप मुळीच नाहीं. साफ निघाला आहे.

( १ ) कालच्या टिळक जयंतीची हकीकत उद्याच्या केसरींत चार ओळीं-पेक्षा जास्त देऊं नये असें दादांचें सांगणें आहे.

( २ ) जगन्नाथमहाराजांच्या केसच्या निकालावर ती. दादांस ( टिळकांना ) बरें वाटल्यावर ते स्वतः लिहिणार आहेत. म्हणून आपण लिहूं नये असें सांगणें आहे. फक्त बातमी द्यावी. जजमेंटची कॉपी मिळाल्यावर, प्रकृ-तीचें मान असेंच राहिल्यास, चार दिवसांनी पुण्यास येतील. मलेरियाचा ताप आहे. भिण्याचें कारण नाहीं.

३१०

२६ जुलै १९२०—दा. वि. गोखले, मुंबई

दोन वाजता सरदार गृहांत आलों. लो. टिळक यांचा ताप परवापासून १०४ डिग्री एकसारखा आहे. उजवी लंग ॲफेक्ट झाली असून एकंदर केस सीरियस होत चालली आहे असें भडकमकर यांचें म्हणणें आहे. डॉ. नाना-साहेब सीरियस आहेत असें म्हणत नाहीत. पण केव्हा तसें होईल तें सांगतां

येत नाहीं असें ते म्हणतात. डॉ. गोपाळराव देशमूख म्हणतात दोनः दिवसांत ताप खास उतरेल. लंग ॲफेक्ट झाली तरी हरकत नाही. इतर लक्षणें चांगलीं आहेत. काळजी करण्याचें कारण नाहीं. आज सायंकाळीं सर्वजण पुनः बसून ठरविणार आहेत. कांहीहि असो, मला तरी लक्षण साधें दिसत नाहीं. आज केसरीचें काम आटोपलें असेल. आपण हें पत्र पावतांच चार दिवस राहण्याची तयारी करून जरूर यावें. माझ्या पत्रावरून फार काळजी वाटेल पण वस्तुस्थिति आहे अशी स्पष्ट लिहावी असें वाटल्यावरून लिहिलें आहे.

### ३११

### ४ ऑगस्ट १९२०—वाग्भट देशपांडे, सातारा

कालचा केसरींतील अग्रलेख अतिशय करुण व मनाला पीळ पडणारा होता. माझ्या नम्रमताप्रमाणे टिळकांचें व त्यांच्या महत्तम कार्याचें गुणवर्णन य पेक्षा अधिक योग्य शब्दांत करतांच येणार नाहीं. लेखकाच्या मनांत वावरणाऱ्या तीव्रतम दुःखाची छाया सर्व अग्रलेखांतून पसरली होती. यामुळे वाचकाचेंहि मन दुःखमूढ झाल्याशिवाय रहात नाहीं.

### ३१२

### ५ ऑगस्ट १९२०—वि. गो. विजापूरकर, तळेगांव

बळवंतरावांच्या निधनाने आलेल्या घोर प्रसंगाने तुमच्यावर जेवढी जबाबदारी पडली आहे तितकी दुसऱ्या कोणावरहि नाहीं. आपण सर्वांनी प्रार्थना केल्या पण परमेश्वराने यश दिलें नाहीं. श्रांतास विश्रांति पाहिजे होती व खुशीने न घेणारास देव ती बळजबरीने देतो की काय न कळे ! !

### ३१३

### ५ ऑगस्ट १९२०—गोविंदराव टिळक, बार्शी

ता. ६ च्या केसरींत टिळकांच्या गुणसमुच्चयाचें आपण जें वर्णन केलें आहे तें अत्यंत मार्मिक व मुद्देसूद असून त्यांत त्यांच्या मोठेपणाचें व कामगिरीचें रहस्य उत्तम प्रकारें आपण स्पष्ट करून दाखविलें आहे. थोडक्यांत बोलावयाचें म्हटलें म्हणजे एकंदर लेख जसा असावयास पाहिजे तसाच वठला आहे, व त्यांत आपली अवलोकन-शक्ति व बुद्धिकौशल्य हीं प्रकट झालीं आहेत.

### ३१४

#### १० ऑगस्ट १९२०—श्रीपाद कृष्ण कोल्हटकर, जळगांव

आपण लिहिलेला लोकमान्य टिळकांचा मृत्युलेख येथील लोकांस फारच पसंत पडला. त्याची गणना निःसंशय आपल्या चांगल्या लेखांतच होईल. टिळकांच्या स्मशानयात्रेचें वर्णन जरी अनपेक्षित नव्हतें तरी अत्यंत आश्चर्यजनक वाटलें. असा लोकप्रिय पुरुष गेल्या शतकांत दुसरा झाला नाही व पुढील शतकांत होईल असें वाटत नाही.

'संदेश'ने पूर्वी जसा निंदेचा सपाटा चालविला होता तसा हल्ली स्तुतीचा सपाटा चालविला आहे! अच्युतरावास गत गोष्टीबद्दल खेद वाटत असला पाहिजे!!

कै. टिळकांस लोकमान्य या नांवाने न म्हणतां विद्वन्मान्य या नांवानेच संबोधणें कित्येकांस पसंत पडतें असें जें आपण मृत्युलेखांत लिहिलें आहे तें कोणास उद्देशून लिहिलें आहे हें मी वाचल्याबरोबर ओळखलें! ज्याप्रमाणे रानड्यांचें चरित्र लिहिण्यास गोखलेच योग्य होते त्याप्रमाणे टिळकांचें चरित्र लिहिण्यास आपणच योग्य आहां. टिळकांच्या सर्व कार्याचा वारसा आता आपणाकडे आला आहे. आपणास प्राप्त झालेल्या स्थानीं आपण योग्यच ठराल अशी माझी खात्री आहे. ईश्वर आपणास तें स्थान दीर्घ कालपर्यंत सुशोभित करण्यास दीर्घायुष्य व विपुल उत्साह देवो.

### ३१५

#### १४ ऑगस्ट १९२०—नारायण कृष्ण वैद्य, इंदूर

लोकमान्यांचें सांगोपांग चरित्र चांगल्या लेखकाकडून लिहविण्याचें येथील महाराष्ट्र साहित्य सभेने ठरविलें आहे व या कामाकरिता सभा एक हजार रुपये पारितोषिक देण्यास तयार आहे. या अग्रेसरत्वाचा मान आपला आहे. पण तदभावी कृष्णाजीपंत खाडिलकर किंवा रा. व. वैद्य यांच्यासारख्यांनी हें काम अंगावर घेतल्यास त्याची पूर्तता होणारी आहे. या कामांत आपल्या पोक्त सल्ल्याची अवश्यकता असल्याने आपण याविषयी सवडींत सवड काढून लिहिल्यास फार उपकार होतील.

### ३१६

### १४ ऑगस्ट १९२०—पांडूअण्णा शिराळकर, कऱ्हाड

येथे टिळकांचे नांवें हायस्कूल करावें असें ठरविलें आहे. सुमारे दहा हजारांचे आंकडे पडले आहेत. अशीच ठिकठिकाणीं निरनिराळ्या स्वरूपाचीं स्थानिक स्मारकें होतीलच. लोकमान्यांचे पिंडास १० व्या दिवशीं कावळा शिवला नाही. तेव्हा आपण व खाडिलकर त्या स्थानीं जाऊन "कार्य पुढे चालवूं" अशा आशयाचें बोलल्यावर मग पिंडास कावळा शिवला असें येथे पुण्याहून एका गृहस्थाचें पत्र आलें आहे त्यांत सत्यता आहे काय ?

### ३१७

### २ सप्टेंबर १९२०—बॅ. मेहेंदळे, लंडन

तुमचें पत्र लहानसेंच पण त्यांत कितीतरी खोल अर्थ भरलेला होता. मोठ्या विभूतींच्याचमुळे राष्ट्राला आपलें ध्येय गाठता येतें असें तुम्ही लिहिलें तें अगदीं सार्थ आहे. तुम्ही लिहिलेला मृत्युलेख म्हणजे लेखनाचा एक उत्कृष्ट नमुना होता. त्यांत उत्कट पण आवरून धरलेलें दुःख, तुमची टिळकांच्याविषयीं भक्ति, विवेचक बुद्धीने मांडलेलें गुणवर्णन, व आगामी संकटाविषयीची रूपरेषा ही फार चांगल्या रीतीनें दिग्दर्शित केलेली आहे. दुःखांत सुख एवढेंच की, टिळकांच्या मृत्यूमुळे आपसांतील यादवी मिटवून आपल्या सर्व पुढाऱ्यांनीं एक झालें पाहिजे या बाबतींत इतिहासाची पुनरावृत्ति झाल्यास सर्वांसच फार आनंद होईल.

हेलेना नॉरमन्टन यांना 'इंडिया' पत्राचा अखेर राजीनामा द्यावा लागला. ती बहुधा सर्व पटेल यांचीच कारवाई असावी. हेलेना बाई या सध्या वेल्समध्ये गेल्या आहेत. त्या येथे आल्यावर मी त्यांना भेटणार आहे. त्यांनी आम्हांला प्रेमाने वागविलें.

### ३१८

### २३ सप्टेंबर १९२०—दीपचंद जव्हेरे, लंडन

तुम्ही लंडनला पुनः केव्हा येणार ? तुम्ही गेल्यापासून आम्ही तुमच्या खोलीला 'केळकर-रूम' असें नांव दिलेलें आहे. लोकमान्य गेले तरी आता तुम्हीच त्यांच्या विश्वासाचे उजवे हात आहांत. तुम्ही 'मराठा' पाठवितां त्याबद्दल फार आभारी आहे.

३१९

### ८ ऑक्टोबर १९२०—केळकर यांचें हेलेना नॉरमन्टन यांना पत्र

तुमच्याकडून पत्राचीं मेल इतके वेळा चुकली आहे कीं मला नवल वाटते. मलाहि तुम्हांस लिहिण्यास वेळ झाला नाही. पण बाहेर गांवीं व्याख्यानांच्या दौऱ्यामुळे मला तितकी स्वस्थता मिळतच नाहीं त्याला मी तरी काय करूं ? टिळकांच्या मृत्यूमुळे जी एकदा घडी विसकटली आहे ती अद्याप नीट बसली नाही, व दर दिवशीं असें कांही तरी कारण उपस्थित होतें की, त्यावर चिंता व काळजी करण्यांत माझे कित्येक तासच काय पण प्रहरान् प्रहर जातात. असहका-रितेच्या लाटेमुळे राष्ट्रीय पक्षाच्या पायाखाली लोकमताची वाळू भराभर निसटून चालली आहे. आणि या संकट समयीं आम्ही काळाबरोबर धावण्याची शर्यत न जिंकूं तर आम्हाला कायमचेच पाठीमागे पडलें पाहिजे. राजकारणांतून राष्ट्रीय पक्ष उठून जाण्याची त्यावर वेळ आलेली आहे, पण तें कालत्रयी न घडूं देण्याचा त्याचा निश्चय आहे. तुम्ही गांधींना पाहिलें नसेल पण त्यांच्याबद्दल खात्रीने ऐकलें असेल. नुकतेच कांही वर्षांपूर्वी ते मोठे सदाशावादी, सरकारावर विश्वास ठेवणारे, सहकारितावादी होते पण त्यांच्या साध्या भोळ्या मनाला राजकारणांत धक्का बसल्याबरोबर उलट दिशेने त्यांची प्रगति बेसुमार झाली. आणि आता ते सरकारवर अशा कांही कठोर शिव्याशापांचा भडिमार करीत आहेत कीं, आजपर्यंत आमच्या सगळ्या राजकीय इतिहासांत सरकारला अशी भाषा माहीत नसेल ! त्यांचा कार्यक्रम अर्थातच तितकासा व्यवहाराला धरून नाही. तथापि त्यांच्या चळवळीच्या बुडाशीं असें कांही एक तत्त्व आहे की, लोकांना त्याचा अर्थ सम-जला तर खात्रीने हिंदी राजकारणांत थोडी उदात्त भावना आल्याशिवाय राहणार नाही. या दृष्टीने पाहतां हिंदुस्थानांत एका नव्या मनूची सुरुवात झाली आहे. ही चळवळ बहुधा इतक्या जोराने चालेल की, उत्क्रांतीचें रूपांतर क्रांतींत होऊं द्यावयाचें कीं नाही याचा सरकारला विचारच करावा लागेल. ही गोष्ट अर्थात् सर्वस्वी सरकारच्या शहाणपणावर अवलंबून राहील.

'इंडिया' पत्रामध्ये तुमचा राजीनामा येण्याची मी वाटच पहात आहे. तो हातीं येतांच मराठ्यामध्ये लिहीन. सय्यद हुसेन व ब्रॉकवे हे सध्या तेथे वर्तमानपत्राच्या कामावर आहेत. पण यांच्यासंबंधी तुम्हाला नीट कल्पना आहेच. ब्रिटिश कॉंग्रेस

कमिटीला या दोघांना सध्या एक हजार पौंड देणें परवडतें, पण पूर्वी ७०० पौंड खर्चण्यालाहि त्यांची तक्रार असे. तुमच्या वेळीं तर 'इंडिया' पत्राचा खर्च चारशें पौंडहि लागत नसे. ब्रिटिश कॉंग्रेस कमिटी हा गोंधळ वाटेल तसा मिटवो, पण निदान आता तुम्ही तरी त्यांतून मोकळ्या झाला हें पाहून फार बरें वाटतें. आता तुम्हाला कायद्याचा अभ्यास व एखादे वर्तमानपत्र अगदी निर्वेधपणानें चालवितां येईल.

स्पूर व वेजवूड हे येत्या कॉंग्रेसला हजर राहण्यासाठीं हिंदुस्थानास येत आहेत. येथे आम्ही मोठ्याच वादळांत सांपडलों असल्याकारणानें येथले कसें काय मत ते तिकडे घेऊन जातात ते पहावयाचें आहे. टिळकांच्या स्मारकासाठीं एक मोठा फंड येथे उभारण्याची मोठी तजवीज चालविली आहे, व त्यांतून इंग्लंड व परराष्ट्रीय देश यामध्यें लायक हिंदी गृहस्थ प्रचाराकरिता पाठविण्याची कायम व्यवस्था होईल असा अजमास आहे.

## ३२०

## ता. ९ ऑक्टोबर—केळकर यांचें सर अली इमाम (निजाम सरकारचे दिवाण) यांना पत्र

सध्या केसरी व मराठा हीं पत्रें मी स्वतः चालवीत असून त्याबद्दल मी जबाबदार आहे.

केसरीच्या राजकीय मतांबद्दल आपणाला काय वाटतें तें मला माहीत नाहीं. पण खुद्द ब्रिटिश हद्दींत हीं पत्रें बंद न पडतां आजपर्यंत निर्वेध चालत आलीं आहेत. रजिस्टर्ड सरकारी वाचनालयांतूनहि केसरीला मज्जाव नाहीं. सर्व हिंदुस्थानांत व परदेशांत हीं पत्रें बिनधोक जातात. सुमारें आठ वर्षांपूर्वी केसरीने जामिनकी भरली होती पण ती अद्याप जप्त करण्यांत आलेली नाहीं. पोस्टखात्याच्या सवलती सरकारी रिपोर्ट वगैरे सर्व सरकारकडून केसरीला पुरविण्यांत येतें. अशा स्थितींत आपली सर्व प्रजा मराठी व आमच्याच संस्कृतीची असतांना, केसरी घेण्याची तेथे बंदी असावी हा केसरीला आपणाकडून मोठाच अन्याय होत आहे. इंदूर संस्थानांत पूर्वी केसरीला अशीच बंदी होती पण सध्या ती उठली आहे, व सरकारनेंहि या बाबतींत हरकत घेतली नाहीं. मग आपणहि तसेंच कां करूं नये? हें पत्र हाच हुजूर सरकारला अर्ज समजावा. वेगळ्या अर्जाची गरज असल्यास तोहि पाठवीन.

### ३२१

### १४ आक्टोबर १९२०—एस्. व्ही. केळकर वकील, अकोला

ता. १९ सप्टेंबर रोजीं मुंबईस बावीस पुढाऱ्यांनीं मिळून जो निर्णय प्रसिद्ध केला आहे, तो पाहून कलकत्त्याचा ठराव तुम्ही बदलून घेणार ही आशा आता कायमचीच नष्ट झाली असें वाटूं लागतें. बहुमताच्या म्हणण्याप्रमाणें वागून आता राष्ट्रीय पक्ष म्हणून कसें जगूं हेंच मला कळत नाही. लोकमान्यांचा लोकशाही पक्षाचा जाहीरनामा अशा तुच्छतेने बाजूस सारण्यांत आला त्याचेंच वाईट वाटतें. टिळकांच्या लोकशाही पक्षाचा कॉंग्रेसमध्ये पराभव झाला, व पूर्वीच्या राष्ट्रीय पक्षाचे लोक गांधी पक्षांत विलीन होऊन गेले असें दिसूं लागलें. गांधींशी आमचा नुसत्या तपशिलापुरताच मतभेद नाही. आम्हाला जितके मवाळ दूर तितकेच गांधी दूर. सरकारने दडपशाही चालविली आहे म्हणून लोक गांधीकडे ओढले जातात. पण म्हणूनच तर स्थानभ्रष्ट समाजाला मार्गावर आणण्याकरितां आपण याचवेळी प्रयत्न केला पाहिजे.

### ३२२

### १९ आक्टोबर १९२०—केळकर यांचें लाला लजपतराय यांना पत्र

तुमच्या पत्राप्रमाणे ताबडतोब एक हजार डॉलर हर्डीकर यांना पाठवीत आहें. आपल्या दोघांच्या किंवा तुमच्या एकट्याच्या सहीने त्यांना पत्र पाठवून यासंबंधीच्या अटी निश्चित केल्या जाव्या. म्हणजे हर्डीकर यांना स्थिति कळून आपण कोठे आहों तें त्यांच्या लक्षांत येईल. मुंबईस तुमची ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या वेळीं गांठ पडेलच.

### ३२३

### २१ आक्टोबर १९२०—केळकर यांचे कर्नल वेजवुड याना पत्र

तुम्ही या देशांत प्रथमच येणार म्हणून तुमचें स्वागत करण्याच्या संधीची मी मार्गप्रतीक्षा करीत होतों. पण देशांत असहकारितेची मोहीम सध्या भरधांव मार्ग आक्रमण करीत असून आम्हीहि दौरे व व्याख्यानें यांत गुंतलों आहोंत. नुकतें आताच माझे हातांत मुंबईपासून सुमारें तीनशें मैल दूर अशा ठिकाणीं एका कॉन्फरन्सला अध्यक्ष होण्याचें निमंत्रण आलें असून त्याकरिता मी ताबड-

नोंब निघत आहे. तथापि तुमची माझी भेट ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या वेळीं होई-लच. पुणें व दक्षिण महाराष्ट्रांत फेरी करण्याकरिता तुम्हाला एक सबंध आठवडा राखून ठेवावा लागेल. आणि थोडीशी गैरसोय पत्करूनहि या अवधीत तुम्हाला माझ्या ताब्यांत रहावयाचें आहे असें समजा! हिंदुस्थानची खरी कल्पना तुम्हाला शहराबाहेर खेडोपाडीं जाऊनच होईल.

### ३२४

### २६ ऑक्टोबर १९२०—शौकत अली, मुंबई

मी व महात्मा गांधी महाराष्ट्रांत फिरण्याकरिता तेथे ३ नोव्हेंबरच्या सुमारास येत आहोंत. पुण्यास सभा होण्याची व्यवस्था करा. खिलाफतीच्या कामाकरिता फिरण्यासारखी दुसरींहि ठिकाणें सुचवा. बेळगांव, हुबळी, सातारा, धारवाड येथे आमचा जाण्याचा कार्यक्रम ठरला आहे. तेथील तुमच्या मुसलमान स्नेह्यांना फंड जमविण्याविषयी कसून प्रयत्न करण्यास सांगा. खूप पैसे जमविल्याशिवाय असहकारितेची चळवळ यशस्वी होणार नाही. खिलाफतीकरिता भरपूर पैसे हातीं आले म्हणजे यश व जय आपल्या हातांत आहे!

### ३२५

### २६ ऑक्टोबर १९२०—कर्नल वेजवुड, मुंबई

माझ्या स्वागताबद्दल तुम्ही केलेली तार पोहोचली. माझा कार्यक्रम मी याप्रमाणें ठरविला आहे. (१) गांधी कसेहि असोत पण त्यांच्याबरोबर मी कोठेहि जाऊं इच्छित नाही. त्यांची जळजळीत भाषा मनाला विनाकारण लागते. (२) दुसरें असें कीं बहुमताने अल्पसंख्यांक असलेल्या पक्षावर जुलमाची अरेरावी चालवावी ही गोष्ट मला मान्य नाही. तरी पण (३) तिसरी गोष्ट म्हणजे त्यांनी मुसलमानांच्या गळ्यांत आपला गळा घातला आहे व त्यांच्याबद्दल मला पूर्ण अविश्वास वाटतो. ना. ३ ला मी लजपतराय यांचेबरोबर पंजाबमध्ये सफर करण्यास जाणार आहें. तुमच्या हिंदुस्थानांत कांही लोक असे आहेत कीं, त्यांच्याशीं राजकीय मतभेदामुळे असलेली मैत्री बिघडण्याचा संभव नसतो. त्यांच्याशीं माझा राजकीय बाबतींत फारसा मतभेदच नाही म्हणाना.

३२६

### ३ नोव्हेंबर १९२०—केळकर यांचें बेनस्पूर यांना पत्र

एका गोष्टीकडे मला तुमचें लक्ष वेधलें पाहिजे. पुण्याला तुम्ही आपली भेट देणार हें वर्तमानपत्रांत जाहीर झाल्याबरोबर तुमच्या महाराष्ट्र व कर्नाटक यामधील दौऱ्यांत आपलें नांव असावें म्हणून अनेक ठिकाणचीं पत्रें मला येत आहेत. तुम्हास ठिकठिकाणीं घेऊन जाण्याकरिता अनेक ठिकाणांहून येथे माणसें आलीं आहेत. या सर्व स्नेह्यांची तुम्ही निराशा करणार नसाल व या सर्व ठिकाणीं जाणार असाल तर निदान आणखी वीस दिवस तरी तुम्हाला तुमचा दौरा लांबवावा लागेल. कारण आतांच माझे हातांत वाई, सातारा, सांगली, मिरज, चिकोडी, निपाणी, बेळगांव, धारवाड, हुबळी, विजापूर, सोलापूर, अहमदनगर, संगमनेर, नाशिक इत्यादि अनेक ठिकाणची निकडीचीं निमंत्रणे आली आहेत. अर्थात् किती दिवस खर्च करावयाचे हें तुमच्यावर अवलंबून आहे. पण एकदा तुम्ही दौऱ्याला बाहेर पाय काढला कीं, मग मला व तुम्हाला दोघानाहि लोकांचीं मनें मोडतां येणें कठिण जाईल. म्हणून या अडचणीची तुम्हाला आगाऊ सूचना दिली आहे.

३२७

### ४ नोव्हेंबर १९२०—केळकर यांचें रंगस्वामी यांना पत्र

रिपोर्टाबद्दल मी गांधींशीं बोललों. रिपोर्टाचा शेवटचा मसुदा मी व पटेल यांनी तयार केला असून कमिटीच्या सर्व सभासदांनी त्यावर मान्यता दिली आहे.

गेले दोन आठवडे मी पुण्याबाहेर व्याख्यानें देत असल्याने तुम्हाला उत्तर घालतां आलें नाही. कॉंग्रेसच्या घटनेचा यथास्थित विचार अखेर ऑ. इं. कॉं. कमिटींत होईलच त्याबद्दल कोणीहि घाई किंवा चिंता करण्याचें कारण नाही.

विजयराघवाचारियर कॉंग्रेसचे अध्यक्ष निवडले गेले आहेत. मी व आमच्या मंडळींनी त्यांच्याकरिताच मतें दिलीं. राष्ट्रीय पक्षाची एक बैठक पुण्याला भरविण्याचें ठरत आहे. सत्यमूर्ति व विजयराघव यांच्याशीं बोलून तुम्हीहि या सभेला या. लजपतराय व बॅप्टिस्टा यांच्याशीं ट्रेड यूनियन कॉंग्रेसच्या वेळीं मी याबद्दल बोललों आहे.

३२८

## ९ नोव्हेंबर १९२०—केळकर यांचें बॅप्टिस्टा यांना पत्र

कर्नल वेजवुड यांना विचारून नक्की कळवा म्हणजे त्याप्रमाणे पुण्यास त्यांच्या कार्यक्रमाची तारीख निश्चित ठरवूं. लजपतराय यांच्या भेटींत आपलें ठरल्याप्रमाणे तुम्ही आपल्या सूचना लिहून काढल्या असालच. सबकमिटीने सुच-विलेल्या कॉंग्रेसच्या घटनेंत तुम्हाला कांही दुरुस्त्या हव्या असल्यास, तुम्ही त्या एकदम जाहिर रीतीनेच मांडा, म्हणजे वादाला तोंड लागेल. वाटल्यास जिना यांना भेटून त्यांचें मत अजमावून पाहा.

३२९

## १२ नोव्हेंबर १९२०—केळकर यांचें बॅप्टिस्टा यांना पत्र

मुंबईतील संपाच्या भानगडीमुळे तुम्ही उतावीळ व थोडे चिडखोर झालां आहां. अगदी क्षुल्लक कारणाने रागावतां. वेजवुड यांचा कार्यक्रम सर्व तुम्ही ठर-वाल तो मला मान्य आहे. मी स्वतंत्रपणें अद्याप त्यांना केव्हांहि लिहिलें नाही. मात्र एवढें करा कीं, वेजवुड यांच्या दौऱ्यांत सातारा व बेळगांव हीं नांवें घाला. नाहीतर ते लोक निष्कारण नाराज होतील.

कॉंग्रेसच्या घटनेचा तुमचा मसुदा वाचला; त्यासंबंधाने माझें मत मी मागाहून देईन. गांधींच्या कार्यक्रमांतील तपशिलाला आज संमति देऊन आम्ही आपल्याला कायमचें बांधून घेतलें आहे हें तुमचें मत बरोबर नाही. आपल्या पक्षाची व गांधींची माझ्या घरीं मी बैठक घडवून आणली, त्याला तुम्ही हजर असतां तर तुमचा हा गैरसमज दूर झाला असता. शिक्षणसंस्था स्थापन केल्याशिवाय मुलांना शाळा सोडावयास सांगणें हें मला पसंत नाही व केसरी-मराठ्यांनी तसें केव्हांहि लिहिलें नाही. तीच गोष्ट वकिलांच्या बाबतींत. तुम्हाला कांही विधायक सुचवायचें असल्यास, नागपुरास आपल्या पक्षाच्या मंडळींची बैठक होईलच; तेथे आपण हा विषय काढूं व निश्चित धोरण ठरवूं.

संपवाल्यांच्याकरिता मराठी जाणणारे व्याख्याते पाठवून देण्याबद्दल तुम्ही लिहतां. पण साधु व स्वामी या वस्तु माझ्या परिवारांत नाहींत! स्वतः मीहि आजारीच असल्याकारणाने नवीन एंगेजमेंट्स घेऊं शकत नाही. खाडिलकर मुंबईस येतील तेव्हा त्यांना तुम्ही बोलवा. मलाहि जी मदत करतां येईल ती करीन.

३३०

१७ नोव्हेंबर १९२०—रँग्लर परांजपे, पुणें

आपले चि. काशिनाथ नरसिंह केळकर यांच्याकडून कॉंग्रेसच्या ठरावानुसार फर्ग्युसन कॉलेजांतून आपलें नांव कमी करण्याबद्दल आम्हास लिहून आलें आहे. आपल्या संमतीने व परवानगीने त्याने ही गोष्ट केली आहे किंवा काय तें कळवावें. असें करण्यांत व्यक्तिशः त्याचें नुकसान आहे असें मला वाटतें. कारण सध्या तो इंटर क्लासमध्ये असून मार्चमध्ये त्याची परीक्षा आहे.

३३१

२५ नोव्हेंबर १९२०—बी. जी. परांजपे, लंडन

कांही उद्धट व आचरट लोकांनी 'तुम्ही आता केसरीचा राजिनामा द्या' अशी तुम्हास सूचना केली असें वाचून फार फार वाईट वाटलें.

शिवाजीमहाराजांच्यानंतर जशी संभाजीने राज्याची धूळधाण केली, त्याप्रमाणे टिळकांच्या मृत्यूनंतर अशा लोकांचें पेंढार मोकाट सुटलें आहे. येथे दर मेलला त्यांची अलौकिक कृत्यें आम्हाला वाचावयाला मिळतात. स्वतः तुम्हाला या गोष्टीमुळे केवढी पीडा व मनाची काळजी उत्पन्न होत असेल तें कल्पनेनेच जाणलें पाहिजे.

३३२

२७ नोव्हेंबर १९२०—श्रीशंकराचार्य-मठ करवीर, धुळें

श्रींनी नागपूर येथे जाण्याच्या उद्देशाने नाशिक सोडून आजला धुळें येथे मुक्काम केला आहे. श्रींचा विचार नाशिक येथे विद्यालयाची स्थापना करण्याचा आहे. तो आपणास सविस्तर कळविण्याकरिता मुद्दाम मराठे यांना पाठविलें आहे. समक्ष भेट नागपूर येथे होणारी आहे; परंतु तत्पूर्वी वरील बाबतींत लोकमत काय आहे तें अजमावणेचा श्रींचा विचार आहे. तरी या बाबतींत शक्य ती तजवीज आपणाकडून होईल असा अदमास आहे.

३३३

२९ नोव्हेंबर १९२०—बापूजी अणे, यवतमाळ

गांधींच्या कार्यक्रमाने चळवळीचें राजकीय स्वरूप जाऊन त्याला सामा-

जिक स्वरूप येणार व वर्गविद्वेष वाढणार. मला हें पसंत नाही. आपल्या पक्षां-तील प्रमुख व्यक्तींची एक खासगी सभा बोलवावी ही तुमची कल्पना मला फारच पसंत आहे. पक्षाची सभा बोलावण्यापूर्वीहि आपण चौघापांचजणांनी एकत्र बसून धोरण ठरवावें. गंगाधरराव, बॅप्टिस्टा, वैद्य, वामनराव जोशी, शिवरामपंत परांजपे, तुम्ही, गोखले, भोपटकर यांनी प्रथम डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यांत कोठे तरी जमावें व चर्चा करून पक्षाची सभा दुसऱ्या आठवड्यांत बोलवावी.

## ३३४

### ७ डिसेंबर १९२०—ना. बेळवी, बेळगांव

कोर्टांतील कामामुळे मला टिळक महाविद्यालयाच्या समारंभास येतां आलें नाही. मी वकिली तहकूब केली असून, आता नवीं कामें घेत नाही. तथापि पूर्वीचीं जुनीं कामें हातावेगळी करण्यालाच सहा महिने लागतील. तुमची भेट घेऊन मला फार बोलावयाचें आहे. वकिली न सोडलेल्या लोकांना जाहिर सभेंत बोलणें हें मुंबई-कर्नाटकांत दुरापास्त झालें आहे. बहुतेक वकिलांच्या बाबतींत त्यांनी वकिली सोडणें अशक्य आहे. वेळोवेळीं सार्वजनिक फंडाला त्यांनी मदत केली असून, हींच प्रमुख कार्यकर्ती माणसें आहेत. कॉंग्रेसच्या कार्यक्रमांत बदल न झाला तर वकील लोकांना तोंड उघडतां यावयाचें नाही, व जनतेवरील त्यांचें वजन उडून जाईल. ज्यांना प्रॅक्टिसची आवश्यकता नसेल त्यांनी वकिली सोडावी. डॉक्टर लोक, बँकर, व्यापारी लोक, सराफ व इतर धंद्यांचीं सर्व माणसें आपला उद्योग करून पोट भरीत असतात, मग वकिलांनीच आपली वृत्ति काय म्हणून टाकावी ? दासबाबू किंवा जिना यांच्यासारख्यांनाहि, त्यांनी जर प्रॅक्टिस बंद न केली, तर जाहिर सभेंत भाग घेणें अशक्य झालें आहे.

## ३३५

### १७ डिसेंबर १९२०—जनार्दन विष्णु लेले वकील, अलीबाग, यांचें केळकर यांना पत्र

महाराष्ट्रानें लोकमान्यांच्यामागे आपणास पुढारी मानलें आहे. परमपूज्य शिवाजीमहाराज हे मृत्यु पावल्यावर महाराष्ट्राची जी स्थिति झाली तशीच

हल्लींची वेळ आहे. परंतु त्या वेळीं शिवाजीइतका मोठा मनुष्य नसला तरी सर्व मराठे सरदारांनी मिळून ज्याप्रमाणे स्वातंत्र्ययुद्ध फार जोराने चालविलें, व शिवाजी-महाराजांच्या उच्च भावना जागृत ठेवल्या, त्याप्रमाणेच आताही ठिकठिकाणच्या पुढारी मंडळींची बारभाई तयार करून राजकारणाची गाडी सर्वानुमतें हाकिली पाहिजे, असें आमच्या अल्पबुद्धीस वाटतें. महाराष्ट्रांतील लोक स्वाभिमानी आहेत व आपल्या प्रांताचें पुढारीपण परप्रांतीय पुढाऱ्याकडे न देतां तें अशा बारभाईकडे राहील तर फार चांगलें, म्हणून महाराष्ट्राने पुढे वेळोवेळीं करावयाच्या कामाचा निर्देश अशा सर्व पुढाऱ्यांच्या संकलित सह्यांनी जर प्रसिद्ध होईल, तर सर्व लोक तो आनंदाने ग्राह्य मानतील.

### ३३६

### २३ डिसेंबर १९२०—बी. जी. परांजपे, लंडन

तुमचे पत्रांतील शेवटचें वाक्य पाहून फार समाधान वाटलें. " Always remember that I remember you, and look to you for doing anything that you can do, so as to be useful for the Kesari, which I know, is as much dear to you as to myself."या तुमच्या वाक्याला होय, सर्वस्वी होय, सदैव होय, असेंच आम्ही उत्तर देतों.

### ३३७

### २८ मे १९२१—केळकर यांचें डॉ. मुंजे यांस पत्र

तुमच्याप्रमाणे मलाहि गांधींचें पत्र आलें आहे. मलाहि तुमच्यासारखीच :थोडीशी अनिश्चितता वाटत असल्यामुळे, काय करावयाचें तें मी अद्याप ठरविलें नाही. कदाचित् सिमल्यास जावें लागेल, म्हणून प्रेस ॲक्ट कमिटीपुढे साक्ष देण्याकरिता आलेलें निमंत्रण मी बाजूला टाकलें आहे. अद्याप व्हाइसरॉय यांना मी मुलाखतीसंबंधी पत्र लिहिलें नाही; व आपल्या सर्व मित्रमंडळींना भेटून आपलें धोरण निश्चित ठरल्याशिवाय व्हाइसरॉय यांना मी कांही लिहिणारहि नाही. खरें म्हटलें तर या मुलाखतीकरिता आपण कोणतीहि घाई करण्याचें कारण नाही. आणखी कांही आठवडे तरी सरकार नवीन धोरण पत्करणार नाही, व दडपशाहीचा हात कांही काळ थोडा थांबेल यापेक्षा जास्त कांही होणार नाही. म्हणून आपण आपल्या पार्टीच्या लोकांची सभा ताबडतोब बोलावली पाहिजे. तिकडे वऱ्हाडांतच

ही सभा भरवावी कारण सर्व लोक बाबासाहेबांच्या खटल्यांत गुंतले आहेत. दादासाहेब खापर्डे व अणे यांना विचारून मला ताबडतोब कळवा. म्हणजे होमरूल लीगच्या वतीने किंवा राष्ट्रीय पक्षामार्फत पार्टी सर्क्यूलर काढतों. तुम्ही काय ठरवाल तें मला पूर्ण मान्य आहे म्हणून उत्तर मात्र ताबडतोब पाठवा.

### ३३८

### ८ जुलै १९२१—केळकर यांचें गांधीजींना पत्र

धारवाडचा गोळीबार व खटला यासंबंधाने तुम्ही वाचलेंच असेल. गोखले यांना मी येथून तिकडे मुद्दाम पाठविलें. ते लिहितात कीं, दडपशाहीने लोकांना वठणीवर आणण्याचा सरकारचा बेत आहे. लोकांना धीर देण्याकरिता ऑ. इं. कॉं. क.ची बैठक धारवाडला करावी असें गंगाधरराव देशपांडे यांचें म्हणणें आहे तें बरोबर आहे. पंजाब–प्रकरणानंतर अमृतसरला भरविलेल्या कॉंग्रेसप्रमाणेच त्याचा उपयोग होईल. कर्नाटकांत ऑ. इं. कॉं. क. ची बैठक अद्याप झालेली नाही. आणि केवळ मोठमोठ्या शहरांपेक्षा अशा दुय्यम प्रतीच्या ठिकाणीं ऑ. इं. कॉं. क. ची बैठक भरविणें हें न्याय्य इतकेंच नव्हे तर धोरणीपणाचेंहि होईल.

### ३३९

### २१ डिसेंबर १९२१—के. के. गोखले, जत

बडोद्याच्या साहित्यसंमेलनाचें काम तुम्ही फारच चांगल्या तऱ्हेने पार पाडलें याबद्दल तुमचें अभिनंदन करतों. मराठी टाइपांची माझी योजना इंग्रजी मोनो–टाईपवर कशी काय बसते, याबद्दल मी लंडन मोनोटाईप कंपनी यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू केला आहे, व त्याबद्दल लवकरच काय तें कळेल. सध्याच्या देवनागरी लिपीमध्ये अक्षरसंख्येच्या बाबतींत निश्चित सुधारणा व्हावी. मुळाक्षरांमध्ये उच्चाराच्या बाबतींत अक्षराचा पृथक्पणा व वळण कायम राहून देवनागरींत तिसांपेक्षा अधिक वर्ण असूं नयेत अशी माझी योजना आहे. देवनागरी ही अखिल भारतीय लिपि म्हणून इंग्रजी लिपीपेक्षा प्रत्येक बाबतींत श्रेष्ठ होईल याबद्दल मला शंका नाही.

### ३४०

### ८ जानेवारी १९२१—लक्ष्मणशास्त्री लेले, सोलापूर

'तिलकाञ्जलि' काव्यांतील एक पद्य आपण केसरीच्या शिरोभागीं योजिलेलें

पाहून मला आनंद वाटला. आपण माझा बहुमान केला असें मी समजतों. आणि त्याबद्दल आपले कृतज्ञतापूर्वक आभार मानतों. लोकमान्यांस प्रेमपूर्वक अर्पिलेली अञ्जलि त्यांच्या आत्म्यास आवडली व मानवली असें वाटतें. आपली अष्टपैलू विद्वत्ता, रसिकता, लेखन-चातुर्य, विदग्धपणा, सहृदयता, बहुश्रुतता इत्यादि गुणांविषयीं मला परम आदर आहे. माझी प्रकृति फार क्षीण झाली आहे. केव्हा केव्हा तर मला जीविताचाहि भरंवसा वाटत नाहीं. आपली भेट देखील पुनरपि होईलच असें नाहीं, या हेतूने आपल्याविषयींचा माझा अभिप्राय मोकळ्या मनाने मी येथे कळवून टाकीत आहें. आपली अभिनव कृति (वीरविडंबन) वाचली. मला ती फार आवडली. खाडिलकरांच्या द्रौपदीने व्यासांच्या द्रौपदीचें केलेलें विडंबन पाहून खेद वाटतो.

## ३४१

### १२ जानेवारी १९२१—डॉ. मॅन, ऑक्स्टन ( इंग्लड )

तिकडचीं वर्तमानपत्रें इकडे दुर्मिळ झाल्याकारणाने बातमी मिळत नाहीं. हिंदुस्थानांत खरें काय चाललें आहे कोणास ठाऊक! पण मी लवकरच तिकडे येणार आहें. हिंदुस्थानच्या परिस्थितीबद्दल व विशेषतः दारूबंदीबद्दल मी येथे बरींच व्याख्यानें दिलीं. 'अबकारीच्या' या महिन्याच्या एका अंकावरून माझ्या प्रयत्नांची हकीकत तुम्हास कळून येईल. पुण्यास आल्यावर मी तुम्हास भेटेन. कसेंहि असो. तुमच्या हिंदुस्थानविषयक सर्व प्रयत्नांमध्ये माझें अन्तःकरण तुमच्या-कडेच आहे असें समजा.

## ३४२

### १४ जानेवारी १९२१—ग. अ. लेले, बडोदें

तुम्हाला पुस्तक पाठविण्यास उशीर झाला, पण बळवंतराव पटवर्धन हे त्या-बरोबर कांहीं टिपणेंहि करून पाठविणार आहेत म्हणून विलंब झाला. पटवर्धन यांना बापट–प्रकरणाची प्रत्यक्ष माहिती आहे; व बापटांचे दुय्यम अधिकारी म्हणून वॉरंटाने ते त्या वेळींच पकडले जावयाचे. पण ते राहून गेले. सोबत दोन पुस्तकें पाठवीत आहें—(१) एक, टिळकांनी बहुधा स्वतः लिहिलेला बापटांचा डिफेन्स व (२) दुसरें म्हणजे बारखलीचा रिपोर्ट. हा रिपोर्ट इलिएटसाहेबांनी १८९३-९४

सालीं लिहिला. रेसिडेन्सीने केलेल्या हल्ल्यांना हें एक उत्तरच होतें. इलिएटसाहेब रजेवर गेल्यानंतर त्यांचे जागेवर मेकॉनकी आले, व त्यांनीच कमिशन नेमून घेऊन बापट–प्रकरण रंगरूपास आणिलें.

### ३४३

### २८ जानेवारी १९२१—केळकर यांचें महात्मा गांधींना पत्र

कलकत्त्याच्या सभेस मला हजर राहतां येत नाही. तथापि तेथे तुमचें काय ठरतें तें मला ताबडतोब कळवावें. पुणें, मुंबई, धारवाड येथे शिक्षणविषयक बहिष्काराची चळवळ जोरांत चालली आहे हें तुम्हास वर्तमानपत्रावरून दिसून आलेंच असेल. जे विद्यार्थी शाळेंत शिक्षण न घेतां खेडेगांवांत प्रचारक म्हणून जाणार, त्यांची व्यवस्था करणें हें पहिलें काम आहे. कॉंग्रेसच्या वतीने तुमच्या नांवें कांही अधिकृत सूचना करून छापून काढाव्या असें वाटतें. असलें हस्तपत्रक व्यक्तिशः प्रत्येकास गेल्याने त्याचा जास्त परिणाम होईल.

### ३४४

### ३१ जानेवारी १९२१—डी. नियोगी, जलालपूर

मला असें फार वाटतें कीं, आपण गुजराथी केसरी काढला तर तो यशस्वी होईल. कारण केसरीतील अग्रलेख हे नेहमी स्वतंत्र बुद्धीचे, सार्वजनिक महत्त्वाचे, सुंदर, व बोधप्रद असल्याने केसरीचें गुजराथी भाषेंत रूपांतर होऊं लागेल, तर ते गुजराथी समाजाला फार आवडेल असें वाटते.

### ३४५

### २४ फेब्रुवारी १९२१—बी. जी. परांजपे, लंडन

आयर्लंडची चळवळ आता अगदी हातघाईवर आली असल्याकारणाने १९०८ ते १९२० या भागावर तुम्ही एखादें लहानसें पुस्तक प्रसिद्ध करावें असें मला वाटतें. हा विषय तुम्हाला चांगला अवगत आहे, व पूर्वीच्या तुमच्या आयर्लंडच्या इतिहासाला ही एक पुरवणी पाहिजेच आहे. मी हें तुम्हाला सुचविणें म्हणजे एक प्रकारें लहान तोंडीं मोठा घास घेणेंच होय. पण कामाचा केवढाहि ढीग तुमच्यापुढे असला तरी अखेर तुम्हीच त्याला पुरून उरतां हें मला माहीत आहे, म्हणून सुचविण्याचें धाडस केलें आहे.

३४६

**२६ फेब्रुवारी १९२१—रंगस्वामी अय्यंगार, दिल्ली ( कौन्सिल ऑफ स्टेट )**

तुमच्या सांगण्याप्रमाणें सावरकर बंधूंच्या सुटकेबद्दल ठराव आणण्याची मी नोटीस दिली आहे. तरी त्यासंबंधी वर्तमानपत्रांतील लेख, सावरकरांचा खटला व हद्दपारी यासंबंधाने सर्व हकीकत कळवा. तसेंच खापर्डे यांनी असाच ठराव पूर्वी केव्हा आणला होता त्याची तारीख कळवा.

३४७

**९ एप्रिल १९२१—डॉ. मुंजे, तळेगांव (?) ( वऱ्हाड )**

नागपूर येथे पोलिसांनी गोळीबार करून दंग्यांत सुमारें दहा माणसें मारलीं व अनेक जखमी झालीं. सरकारी चौकशी कशी काय होईल तें आम्हाला दिसतेंच आहे. पण आपण खाजगी कमिशन नेमून तोडीस तोड देऊं. बॅप्टिस्टा, चिंतामण-राव वैद्य, बापूजी अणे, तुम्ही स्वतः व आणखी एक दोघे अशांनी कमिशनवर काम करावें असा हेतु आहे. तुम्ही याल काय ? इतरांनाहि विचारा व तारेने कळवा.

३४८

**१६ मे १९२१—केळकर यांचें जम्नादास मेहता यांना पत्र**

वेळांत वेळ काढून तुम्ही व पटेल मालेगांवाला येत आहां याबद्दल फार आभारी आहें. तुम्ही काशीकर यांच्याकडे उतरलांत ही गोष्ट चांगली केलीत. पण इतर प्रमुख हिंदु असहकारितावाद्यांची तुमची गांठ पडली कीं नाही ? मला वाटतें बाळूभाई यांना सरकारने पकडलें असेल. ही कमिटी नेमण्याचा वसई परि-षदेचा हेतुच असा कीं, मालेगांवास असलेल्या असहकारितावादी लोकांच्या मनास धीर यावा. तासगांवला तारीख १८ ते २० या तारखांस कुलकर्णी परिषद अस-ल्याने मी पुण्यांतून बाहेर जात आहें. तसेंच ता. २३ ते २६ रोजीं पुण्यास संस्थान परिषद मीच बोलाविली असल्याने येथे हजर राहाणें मला भाग आहे. तरी मध्यंतरीं माझे गैरहजेरींत तुम्हास वाटल्यास मदतीदाखल गोखले यांना पाठवून देतों.

३४९

**१७ मे १९२१—जम्नादास मेहेता, मुंबई**

काशीकर वकील व इतर असहकारितावाले यांना भेटलों. तुमच्या अटकळी-

प्रमाणें श्री. बाळूभाई पकडले गेले. लोकांवर त्यांचें बरेंच वजन असल्याकारणानें डिफेन्स देऊन त्यांच्या बचावाची खटपट केली पाहिजे, अशाहि विनंत्या मला करण्यांत आल्या. मालेगांवामध्ये पोलीसची दंडुकेशाही अद्याप सुरू झाली नाही. तथापि असहकारितावादी लोक पकडले जाण्याची भीति वाटत आहे. आपण तेथून इकडे आल्यानंतर कांही लोकांना पकडलेंहि असेल. अशा वेळीं आपली चौकशी कमिटीच तेथे जाऊन ठाण मांडून बसली म्हणजे पोलीसच्या करामतीला आळा पडेल.

### ३५०

### १७ मे १९२१—विठ्ठलराव शिंदे, पुणें

अस्पृश्यांच्या बक्षीससमारंभानिमित्त तुम्ही जें काल अत्युत्कृष्ट भाषण केलें तें मला फार आवडलें. माझ्या अल्पमतीने तुम्ही दाखविला इतका उदारपणा लोकमान्य टिळकांनी देखील आपल्या भाषणांत कधी दाखविला नसेल. केसरी-प्रेसला आग लागून जें भयंकर नुकसान झालें त्याबद्दल मला आपणाशीं सहानुभूति वाटते. वर्तमानपत्रांतील हकीकतीवरून तुम्ही या प्रसंगीं मनाचें मोठें धैर्य दाखविलें असें दिसतें. आपल्या महाराष्ट्राच्या पुढारीपणास ही गोष्ट खरोखरच शोभण्यासारखी आहे. तुमच्या निःस्वार्थी देशसेवेचें फळ तुम्हास मिळो अशी आशा करतों.

### ३५१

### १९ मे १९२१—दत्तोपंत तुळजापूरकर, मळवली

कोल्हापूरच्या महाराजांचीं गुप्त पत्रें उघडकीला आणून तुम्ही अत्यंत अमूल्य अशी कामगिरी केली त्याबद्दल तुमचें अभिनंदन करतों. खरोखर हें श्रेय एकट्या तुम्हालाच आहे. हीं पत्रें वाचून कोल्हापूरचे महाराज म्हणजे मनुष्यस्वभावाचा किती अजब नमुना आहे हें लोकांस कळल्यावांचून राहणार नाही.

### ३५२

### २० मे १९२१—म. गांधी, भुसावळ

व्हाइसरॉयांशीं माझ्या सहा मुलाखती झाल्या. लालाजीनींहि त्यांची मुलाखत घेऊन पंजाब–प्रकरणाची चर्चा केली. माझ्याप्रमाणेंच इतर असहयोगी पुढाऱ्यांनीं त्यांनी मुलाखत घ्यावी असें मी व्हाइसरॉय यांना सुचविलें. तुम्ही त्यांची भेट

घ्याल काय ? मीच तुम्हांस मुलाखत घेण्यास सुचविलें असेंहि तुम्ही त्यांना म्हटलें तरी हरकत नाही.

३५३

२ जून १९२१—मेहेंदळे, लंडन

कांही दुष्ट लोकांच्या हातून केसरी छापखान्यास आंग लागली हें वाचून फार फार वाईट वाटलें. छापखान्याच्या कागदाचा विमा उतरला असेलच. ब्राह्मणेतर चळवळीची पीडा महाराष्ट्रांत सध्या फार होऊं लागली आहे. पुढील राष्ट्रीय सभेंत कौन्सिलें काबीज करण्याचा ठराव तुम्ही पास करून घ्याल अशी आशा आहे. इकडे डी व्हॅलेरा यांनी कांही कौन्सिलवर बहिष्कार घातलेला नाही!

३५४

१८ जून १९२१—सौ. इंदुमतीबाई नाईक, पुणें

आपण माझ्याविषयी पूर्ण सहानुभूति बाळगून मला सल्ला दिल्याप्रमाणे मी गेल्या एल. सी. पी. एस.च्या परिक्षेस बसलें, आणि ईश्वरकृपेने व आपणां सर्वांच्या आशीर्वादाने मी त्या परीक्षेंत पास झालें. शिवाय सर्व मुलांमध्येहि आज माझा नंबर पहिला आला. याशिवाय मेडिसिन व सर्जरी या दोन प्रमुख विषयांमध्येहि माझा नंबर पहिला आला आहे.

३५५

३० जून १९२१—हेलेना नारमन्टन, लंडन

तुम्ही मोठें देशकार्य अंगावर घेतलें आहे त्यांत तुम्हाला यश येवो. कोल्हापूरच्या महाराजांचा गुप्त पत्रव्यवहार तुम्ही उघडकीस आणून प्रसिद्ध केला तो सर्व मी नीट काळजीपूर्वक वाचला. हिन्दुस्थानांत तुम्हाला किती अगणित संकटांशीं झगडावें लागत आहे!!

३५६

२ जुलै १९२१—केळकर यांचें विजयराघवाचारियर यांना पत्र

ऑल इं. कॉं. क. बोलावण्याचा हक्क वर्किंग कमिटीला नसून तुम्हालाच आहे हें तुमचें म्हणणें बरोबर आहे. गांधींना तुम्ही याबद्दल जरूर लिहा. गेल्या सभे-

च्या वेळीं पुढे आलेल्या ठरावांत डॉ. मुंजे व मी दोघांनीहि हरकत घेतली. वर्किंग कमिटीचा सभासद व वर्तमानपत्राचा संपादक हीं दोनाहि नातीं माझ्यांत एकत्रित झाल्यामुळे थोडी अडचण उपस्थित झाली आहे. आम्हीहि अल्पसंख्याक पडलों. वर्किंग कमिटी म्हणजे एक प्रकारें कॅबिनेट आहे असें गांधींना वाटतें; व म्हणूनच राष्ट्रीय सभेच्या ठरावावर मी टीका करतों त्यालां ते हरकत घेतात. अशा स्थितींत वर्तमानपत्रकाराचें खरें कर्तव्य व वर्किंग कमिटीशीं निष्ठा या दोनाहि गोष्टी माझ्या हातून होणें शक्य नाही. या विरोधाचा परिहार म्हणजे वर्किंग कमिटीचा रीतसर राजीनामा द्याना हाच होय. पण याचा विशेष गाजावाजा न करता मी असें करणार आहे कीं, आता नवीन ऑ. इं. कॉं. कमिटी मधून जेव्हा वर्किंग कमिटी निवडली जाईल त्यांत मी असणार नाही. म्हणजे झालें. पण पुढल्या ऑ. इं. कॉं. कमिटीच्या बैठकींत राष्ट्रीय सभेच्या ठरावाचा खरा अर्थ काय होतो हा प्रश्न मी चर्चेला काढल्याशिवाय मात्र राहणार नाही!

३५७

### ७ जुलै १९२१—केळकर यांचें मुंबईचे गव्हर्नर यांच्या सेक्रेटरींना पत्र

दोन वर्तमानपत्रांतील लेख सोबत पाठविले आहेत ते गव्हर्नरसाहेबांस दाखविण्याची कृपा करावी. शनिवारवाड्याच्या जीर्णोद्धाराबद्दल 'राजकारण' या पत्रांत आलेल्या लेखावरून, राष्ट्रीय पक्षाचीं वर्तमानपत्रेंहि एखाद्या वेळीं सरकाराचा खरा गुण घेतात हें सरकाराला दिसेल. दुसरें कटिंग नटराजन् यांच्या ' सोशल रिफॉर्मर ' या पत्राचें आहे. साताऱ्यास सत्यशोधकांच्या अत्याचाराच्या बाबतींत सरकार आपलें कर्तव्य कसे करीत नाही याबद्दल माझ्याप्रमाणेच त्यांनीहि आपलें मत व्यक्त केलें आहे. असहकारितावाल्यांचे मार्ग साफ चूक आहेत असें तुम्ही बेलाशक म्हणा. पण प्रश्न इतकाच आहे कीं त्याकरिता म्हणून अधिकारी वर्गानें प्रजेचें संरक्षण करण्याचें आपलें कर्तव्य टाकलें तर तें कितपत बरोबर होईल? प्रजेकडून कर घेणाऱ्या सरकारानें जोपर्यंत आपल्या अधिकाराच्या जागा टाकून दिल्या नाहीत, तोपर्यंत प्रजेचें संरक्षण करण्याचें कोणत्याहि सबबीवर नाकारतां येत नाही. नटराजन् हे असहकारितावादी नसून स्वतंत्र बाण्याचे वर्तमानपत्रकार आहेत हें गव्हर्नरसाहेबांस विदित असेलच.

३५८

## २७ जुलै १९२१—केळकर यांचें महात्मा गांधींना पत्र

तुमच्या पत्रामुळे मनाला थोडें वाईट वाटलें. एखाद्या विशिष्ट गोष्टींत वर्किंग कमिटीशीं माझा कितीहि मतभेद असला तरी तिच्या प्रत्यक्ष कामांत माझ्याकडून कोणताच अडथळा उत्पन्न होणार नाही याची मी तुम्हाला हमी देतों. वर्किंग कमिटीशीं ज्यांचा बऱ्याच प्रमाणांत विरोध असेल त्यांनीं राजीनामा द्यावा हें रास्त आहे, व नव्या ऑ. इं. कॉं. कमिटींतून वर्किंग कमिटीची पुनः नवी रचना होण्याचा संभव नसता तर मीहि राजिनामाच दिला असता. कारण मी तुम्हाला स्वच्छ सांगतों कीं, कोर्टाच्या बहिष्काराबद्दल तुमच्याशीं माझा पूर्ण मतभेद आहे. तुमच्याशीं मला याकरिता समक्ष भेटून सविस्तर चर्चा केली पाहिजे, व तुम्ही लवकरच मुंबईस येणार असल्यास मी मुद्दाम तेथे येऊन तुमच्याशीं बोलेन.

पुणें शहर व जिल्हा यांतून ४५००० वर टिळक स्वराज्य फंड जमला आहे. खुद्द एकट्या पुणें शहराचेच यांत ३८००० रु. आहेत. इतर जिल्ह्यांची रक्कम मिळून सुमारें पाऊण लाख रुपये होतील असें मी तुम्हाला वर्किंग कमिटीच्या बैठकीच्या वेळीं बोललोंच आहे. एकंदर महाराष्ट्र प्रांतिक कमिटीजवळ सुमारें ३ लक्ष रुपये आहेत. पण याचें मुख्य श्रेय मुंबईच्या उपनगरांतील धनिक लोकांनी दिलेल्या देणग्यांसच दिलें पाहिजे!

३५९

## २२ जुलै १९२१—सी. विजयराघवाचारियर, सालेम

लो. टिळकांच्या पहिल्या पुण्यतिथीनिमित्त तुम्ही जें भाषण केलें तें मी मोठ्या लक्षपूर्वक वाचलें. खुद्द महात्माजींना तें कसे काय आवडलें असेल कोणास ठाऊक!

३६०

## १२ ऑगस्ट १९२१—केळकर यांचें कस्तुरीरंग आयंगार यांस पत्र

वर्किंग कमिटीच्या सभेच्या वेळीं काय झालें तें तुम्ही जाणतांच. झालेल्या नव्या निवडणुकीबद्दल स्वतः गांधीच नाखूष आहेत. परंतु स्वदेशी–बहिष्काराची

चळवळ पुढे रेटण्याकरिता पुढील निवडणुकीपर्यंत आहे अशीच स्थिति कायम राखावी, व तुम्ही ही चळवळ नेटाने पुढे ढकलावी, अशी त्यांची तुम्हाला विनंति आहे.

३६१

**१४ ऑगस्ट १९२१—केळकर यांचें जम्नादास मेहता यांस पत्र**

तुमचें कालचें पत्र मिळालें. कलेक्टराच्या हुकुमाविरुद्ध ठाणें जिल्ह्यांत कायदेभंग करण्याकरिता तुम्ही मला वाटेल त्या दिवशीं बोलवा मी येईन. पुण्याचे इतरहि कांही लोक माझ्याबरोबर येऊं शकतील. पण त्यांची निश्चित नांवें सर्क्युलर काढून मग तुम्हास कळवितों. वर्किंग कमिटीला या बाबतींत परवानगी विचारण्याची जरुरी नाही.

३६२

**२९ ऑगस्ट १९२१—विठ्ठलभाई पटेल, मुंबई**

तुमचें कार्ड मिळालें. माझ्या पत्रांतील शेवटचें वाक्य तुम्हाला थोडें लागलें, याबद्दल वाईट वाटतें. तुम्हास पत्रांतून कांहीहि लिहिलें तरी चालतें अशी माझी समजूत होती. पण तुम्हास त्याचा राग आला असल्यास मी तुमची क्षमा मागतों!

३६३

**२२ सप्टेंबर १९२१—केळकर यांचें कौजलगी यांना पत्र**

तुम्ही व रा. कड्डाप्पा यांनी बल्लारी–प्रकरणासंबंधाने जी मतभेदपत्रिका पाठविली ती मी वर्किंग कमिटीकडे पाठविली आहे. ब्राह्मणेतर परिषदेसंबंधाने कालच 'जागरूक' पत्राचे संपादक कोठारी यांच्याशीं बोलणें झालें. कॉन्फरन्सला इतर ब्राह्मणेतर मंडळी हितचिंतक या नात्याने हजर राहिल्यास ती चांगली गोष्ट होईल असें ते म्हणाले. यासंबंधाने गदगला गंगाधररावांशीं आपलें बोलणें झालेंच आहे.

३६४

**२२ सप्टेंबर १९२१—केळकर यांचें मुंबईचे गव्हर्नर यांस पत्र**

राजपुत्राच्या स्वागतप्रसंगीं स्वागतकमिटीवर सभासद या नात्याने काम

करण्यासंबंधी आपलें निमंत्रणः पोहोचलें. मला सदर कमेटीवर काम करता येणार नाही हें कळविण्यास दिलगिरी वाटते.

३६५

**२९ सप्टेंबर १९३१—केळकर यांचें जम्नादास मेहता यांना पत्र**

कर्नाटकांतून मी नुकताच परत आलों. पिकेटिंगच्या हुकुमाविरुद्ध तुम्हीं यशस्वी रीतीने सत्याग्रह केला याबद्दल तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. पटेल यांनी मला लिहिलेलें पत्र तुम्ही पाहिलें काय ? तें अगदी त्यांच्या जन्म-स्वभावा-प्रमाणेच त्यांनी लिहिलें ! मी त्यांना अगदी थोडक्यांत पण झणझणींत अशा चार ओळी एका पोस्ट कार्डावरच लिहून उत्तर दिलें आहे ! पटेल यांचा हा स्वभाव कधी जाईल असें मला वाटत नाही. खुद्द त्यांचे बंधू वल्लभभाई, आम्ही दोघे वांद्र्यांहून परत येतांना, याच खोडीबद्दल तक्रार करीत होते. गोखले तुमच्याबरोबर अकोल्यास येतील. बल्लारी प्रांत हा कर्नाटकांत घ्यावा कीं आंध्र प्रांतांत सामील करावा, या दाव्याचा निकाल करण्याकरिता मी ४ तारखेस बल्लारीस जात आहे. गणपति उत्सवाच्या अखेरीच्या सुमारास मी मुंबईंत येईन त्या वेळी कांही व्याख्यानें जरूर देईन.

३६६

**७ ऑक्टोबर १९२१—संपतराव गायकवाड, बडोदें**

२७ नोव्हेंबर रोजीं येथील दहावें मराठी साहित्य संमेलन भरविण्याचें ठरलें आहे. हें आपणास विदित आहेच. सदर प्रसंगीं अध्यक्षस्थान स्वीकारण्यास आपणच योग्य आहां असें आमचें मत असल्या कारणाने, आपणास या पत्रद्वारें अध्यक्षपदाकरिता निमंत्रण करण्यांत येत आहे. करिता आपण तें स्वीकारल्याचें उत्तर लवकर धाडण्याची कृपा करावी.

३६७

**१० ऑक्टोबर १९२१—विश्वनाथपंत केतकर, नाशिक**

त्रिंबक क्षेत्राचे श्री. बाळासाहेब जोगळेकर आज भेटले. लिंगायत लोकांना त्र्यंबकेश्वराच्या देवळांत जाण्यास हक्क आहे कीं नाही, याबद्दल तुम्ही चौकशी कर-

ण्यास त्यांची व्यक्तिशः हरकत नाही. पण त्या चौकशीचा उपयोग होईलसें वाटत नाही. म्हणून आपणच काय तें ठरवावें.

३६८

**२८ ऑक्टोबर १९२१—सदाशिव महादेव सोनार यांची तार, भोर**

शेजारच्या बऱ्याच खेडेगांवांतून येथे हजारो लोक जमले आहेत व तुम्ही येण्याची मार्गप्रतीक्षा करीत आहेत. कृपा करून निराशा करूं नका.

३६९

**३० ऑक्टोबर १९२१—डॉ. वि. दा. फाटक, पुणें**

मुळशींतील मावळ्यांच्या जमिनीविषयी तडजोडीचा कांहीं मार्ग निघणें शक्य आहे किंवा कसें हें ठरविण्यासाठी शेट लल्लूभाई सामळदास यांचेबरोबर प्रास्ताविक भाषण करण्यास मला दिलेलें आमंत्रण पोंहोचलें. परंतु प्रो. शिवरामपंत परांजपे व इतर स्नेही मंडळी यांचे विचारें, मी आजच्या सभेस हजर राहूं नये हें अनेक दृष्टींनी योग्य होईल असें वाटतें. यामुळे आज येता येत नाही. आपल्या तडजोडीच्या मसलतीस यश येण्याची कांहीं चिन्हें दिसत असल्यास पुढील बैठकीस मावळ्यांची मागणी स्पष्ट स्पष्ट काय आहे व कोणत्या अटी मान्य झाल्यास मावळ्यांचें समाधान होण्याचा संभव आहे, हें सांगण्यास सत्याग्रहाच्या कामांत आरंभापासून ज्या ज्या मंडळींनी भाग घेतला त्यांसहवर्तमान हजर राहण्याचे करतों.

३७०

**९ ऑक्टोबर १९२१—गोविंदराव सरदेसाई, बडोदें**

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे चालक मोरमकर, पाध्ये, प्रभृतींनी येथील संमेलन भरविण्याच्या आमच्या प्रयत्नास विरोध चालविला आहे, हें आपणास कळलेंच असेल. सर्व बाब खोडसाळपणाची असून त्याचें मूळ कारणहि आपण ताडलेंच असेल. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे हल्लींचे सभासद कोण आहेत त्यांची यादी आपल्या माहितीसाठी सोबत पाठविली आहे, त्यांतील जितकी मंडळी येतील तितकी हवीच आहेत.

३७१

## ११ नोव्हेंबर १९२१—मिस हेलेना नॉर्मटन, लंडन

माझा विवाह नुकताच झाल्याचें मी तुम्हास पत्र लिहिलें होतें. पण तें मिळण्यापूर्वीच रूटरने आपल्या तारायंत्रांतून तेथे ही बातमी जाहीर केली असेल !

हिंदुस्थानाचें राजकीय वातावरण इतकें दूषित व अंधकारमय झालें आहे याबद्दल फार वाईट वाटतें.

ते दोघे अली बंधु मला चांगले माहीत आहेत, व पुढारी होण्यास ते योग्य आहेत असें त्यांच्याबद्दल मला कधींच वाटलें नाही.

इकडे या देशांत हिंदुस्थानाबद्दल चांगलें मत ठेवून चळवळ करावयाची तर, जरा जास्त धोरणीपणा ठेवून तोंडाची बडबड कमी करणारीं माणसें इकडे आलीं पाहिजेत. तुर्कस्थानाबद्दल इंग्लिश लोकांना सहानुभूति काय म्हणून वाटावी ? पूर्वीच्या मुसलमानी राजकर्त्यांपासून तुर्कांनी तरी मनगटाच्या अरेरावीवरच खिलाफत बळकावली की नाही ? जॉर्ज बादशाहाप्रमाणे मी इंग्लंडचा राजा असतें तर हातांत तरवार घेऊन मींहि मला मुख्य खलीफ म्हणून जाहीर केलें असतें; व धर्म व राजकारण यांचा संबंध कसा काय असतो तें पाहिलें असतें !

येथे 'मराठ्या'चे अंक मला न मिळाल्याकारणाने तुमचे अग्रलेख वाचावयास मिळत नाहीत. सेन्सॉरचा हात त्यावर पडतो कीं काय ? कोणास ठाऊक ?

३७२

## १२ नोव्हेंबर १९२१—लक्ष्मण जनार्दन आपटे, पुणें

टाटा कंपनींतर्फे वकिली काम मी पत्करलें, तसेंच युवराजांच्या पुण्यास होणाऱ्या भेटीबद्दल मी जें धोरण पत्करलें, त्याबद्दल माझ्या जिवाला कांही घातपात करण्याचा कांही लोकांचा प्रयत्न आहे असें मला निश्चित कळतें ! तरी तुम्ही चौकशी करून मला कळवा. असे अत्याचार घडणें हें तुमच्या चळवळीलाहि एक प्रकारें विघातक होय. तुमचेकडून कळतांच मला माझ्या सुरक्षितपणाकरिता उपाययोजना केली पाहिजे.

## ३७३

### १६ ऑक्टोबर १९२१—गोविंदराव सरदेसाई, बडोदें

आपली तार कालें पोचली. त्या पूर्वीच समेटाची तडजोड मान्य होऊन तशी जाहीर खबर वर्तमानपत्रांतून देण्याची तजवीज झालेली आहे. वास्तविक या तडजोडींत आम्हास दोन मोठे लाभ झाले. एक आपला व दुसरा साहित्यविषयक चर्चेच्या मंडळींत बडोद्याची सर्व स्वागतमंडळी व सहाविचारिणी सभा यांचा समावेश झाला. मला तर वाटतें की, गैरसमजापलीकडे या वादांत कांही तथ्य नव्हतें.

## ३७४

### १९ नोव्हेंबर १९२१—शिंदे सरकाराचें स्वदस्तुरचें पत्र, कँप-पुणें

माझ्या विनंतीचा जो तुम्ही आस्थापूर्वक विचार केला त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

## ३७५

### ७ डिसेंबर १९२१—हेलेना नॉर्मिंटन, लंडन

माझ्या विवाहाच्या अभिनंदनार्थ तुम्ही जें पत्र पाठविलें तें मिळालें. मला त्याची किंमत विशेष वाटते. काय वाटेल तें करून विलायतेला डेप्युटेशन आणण्याची जुनी कल्पना तुम्ही पुनः लोकांपुढे आणा. सिनफेनचे प्रतिनिधि इकडे येऊन त्यांनी लंडन प्रेसच्याभोवती आपला केवढा जमाव उत्पन्न करून तो काबीज केला आहे हें लक्षांत आणा. हिंदुस्थानने तसें कां करू नये ? आकाशांतील ढग पिंजून त्यांतून राजकारणाचें सूत काढण्याच्या गांधीच्या कार्यक्रमापेक्षा हा उपाय किती तरी चांगला ! तो खात्रीने करून पाहण्यासारखा आहे.

## ३७६

### १३ डिसेंबर १९२१—चिदंबरम् पिल्ले, कोइमतूर

माझ्या कल्पनेप्रमाणेच सर्व देशभक्तांना तुरुंगांत घालून म. गांधींनी नोकरशाहीचा मार्ग सुलभ केला आहे. सरकारची शक्ति अजमावण्यांत मी हिमालया-एवढी चूक केली असें आता ते म्हणतील. पण व्हायचें तें होऊन गेल्यावर ती

चूक कबूल करण्यांत, :अगर माझा हेतु शुद्ध सात्त्विक होता हें म्हणण्यांत, अर्थ काय ! येती कॉंग्रेस आपण जिंकली व आपले ठराव मान्य करावयाला लावले, तर इतर पुढारी तुरुंगांत असतांना फेरवाल्यांनी आपलें घोडें पुढे दामटलें अशी हाकाटी गांधीचे अनुयायी करतील. म्हणून गांधींच्या कार्यक्रमाच्या अपयशाची कबुली, गांधी तुरुंगाबाहेर आहेत तोपर्यंतच, घेऊन कॉंग्रेस नीट मार्गावर आणावी. तुम्हाला काय वाटतें ?

३७७

## १४ डिसेंबर १९२१—श्री. म. माटे, पुणें

आपणावर गदा आल्याचें वर्तमान आज संध्याकाळीं समजलें. तुरुंगांत जातांना केसरीची काळजी तुम्हाला असेल. मला इतकेंच लिहावयाचें आहे कीं, आपण ज्या वेळीं मी इकडील नोकरी सोडून यावें असें सांगाल, त्या वेळीं सोडून यावयास कबूल आहे. अर्थात् माझा उपयोग आपणास होण्यासारखा आहे हें मी गृहीत धरून चालतों आहे याबद्दल माफी असावी.

३७८

## १५ डिसेंबर १९२१—अशुतोष चौधरी, कलकत्ता

गांधीचा कार्यक्रम संपूर्णतः मला पसंत नाही. तथापि प्रामाणिक मतभेदाला कॉंग्रेस वाव देईल असें मला वाटतें. कारण राजकारण हें थांबवितां येत नाही. तें चाललेंच पाहिजे. याकरिता कलकत्ता अगर मुंबई येथे ताबडतोब एक परिषद विचारविनिमयाकरिता भरवावी अशाबद्दल तुम्हाला तार केली. शक्य तर मुंबईस परिषद भरविण्याची खटपट करण्याबद्दल मी जयकर यांना लिहिलें आहे.

३७९

## २७ मे १९२२—केळकर यांचें सत्यमूर्तींना पत्र

स्थानिक कामें व तुरुंगांतून नुकत्याच सुटलेल्या कांही मित्र-मंडळींचा स्वागत-समारंभ, यामुळे गेला आठवडा गडबडीचा असल्याने तुम्हास पत्र पाठवितां आलें नाही. श्रीनिवास अय्यंगार हे नुकतेच येथे व्याख्यान देऊन गेले. महाराष्ट्राचें मत कसें काय आहे तें तुम्हास सटीक सांगतीलच.

तुमचा अजमास बरोबर आहे. महाराष्ट्रांत तूर्त तरी दोन पक्ष झाले असून, एका पक्षाला कार्यक्रमांत फेरफार पाहिजे आहे. या मुद्द्यावर भांडणें इतकीं निकरावर आलीं आहेत कीं, तत्त्वाकरिता कार्यकर्ती माणसें फुटतील इतकेंच नव्हे तर जुने मित्रदेखील आपली मैत्री मोडावयास तयार होतील. सर्व पक्षांना व मतांना दाबांत ठेवून त्यांच्याकडून काम करून घेणारी लोकमान्यासारखी प्रभावशाली व्यक्ति आज हयात नसल्याने, त्यांच्याविना अशा गोष्टी साहजिकच होणारच त्याला इलाज नाही. शक्य तितके व्यक्तिविषयक वाद थांबवून, प्रत्यक्ष तत्त्वाचाच भेद किती आहे या एकाच मुद्द्याकडे लक्ष वेधण्याचा मी प्रयत्न करीत आहे. हा मार्ग धिमा व कंटाळवाणा खरा, पण अखेर याच धोरणाने चालून मी यश मिळवीन असा मला भरवसा वाटतो. तुम्ही विसंगततेबद्दल म्हणतां, पण या महापुरामध्ये प्रत्येकाच्या पायाखालची वाळू निसरून जात असल्याकारणानें सध्या राजकारणांत स्थिर असा कोणीच नाही. महाराष्ट्रालाच नांवें ठेवण्यांत अर्थ नाही. तुमच्या मद्रासेंत तरी हेंच आहे कीं नाही ? स्वतः श्रीनिवास अय्यंगार यांनी आपण मत बदललें असें कबूल केलेंच कीं नाही ? 'हिंदु' कौन्सिलाबद्दल पक्षपात दाखवूं लागला. आणि तुम्ही श्रीनिवास अय्यंगार यांच्या दौऱ्यांत त्यांचीच री ओढूं लागलां असा आता तुमच्यावरहि आक्षेप आला तो टळत नाही. त्याचें काय तें उत्तर द्या.

### ३८०

### १९ फेब्रुवारी १९२२—केळकर यांचें बमनजीना पत्र

माझे मराठ्यांतील दोन अग्रलेख तुम्हाकडे पाठवीत आहे. त्याबद्दल तुम्हाला कसेंहि वाटो. पण मला खरेंच असें वाटतें की, कॉंग्रेस पार्टीने आपलें राउण्ड टेबल कॉन्फरन्स भरविण्याची आता वेळ आली आहे. महात्मा गांधी दिल्लीहून आल्यावर त्यांना लिहून विचारण्याचा माझा बेत आहे.

### ३८१

### ८ फेब्रुवारी १९२२—पटेल यांची तार, बार्डोली

शनिवारीं 11 तारखेस वर्किंग कमिटीची सभा बार्डोलीस आहे. तुम्ही जरूर या.

३८२

**३ जानेवारी १९२२—केळकर यांचें येरवडा जेल सुपरिंटेन्डेन्ट यांना पत्र**

मी व अन्तुकाका फडणीस हे येथील तुरुंगांतील कैदी गंगाधरराव देशपांडे यांना भेटूं इच्छितों. फडणीस हे गंगाधरराव देशपांडे यांचे खासगी कारकून असून, देशपांडे यांनी मला त्यांच्या मालमत्तेची व्यवस्था करण्याकरिता ट्रस्टी म्हणून नमलें आहे. त्यांच्या मालमत्तेच्या व्यवस्थेसंबंधी आम्हाला त्यांची भेट घ्यावयाची आहे. तरी स्पेशल केस म्हणून भेटण्याची परवानगी द्याल अशी आशा आहे.

३८३

**४ जानेवारी १९२२—श्री. कृ. कोल्हटकर, जळगांव**

आपलें बडोदा येथील भाषण आपल्या इतर लेखाप्रमाणेच सुंदर व मार्मिक उतरलें आहे हें कळविण्यास संतोष वाटतो. तें अत्यंत व्यापक दृष्टीने लिहिलेलें दिसतें. या कारणामुळेंच त्यांत क्वचित् विसंगतपणाचा भास होतो. उदाहरणार्थ, आपण हल्लीच्या काळास प्रथम गीतारहस्याचें युग म्हणून नंतर केशवसुतांचें युग म्हटलें आहे. आपली विधानें अनुक्रमें गद्य व पद्य वाङ्मयासंबंधाने आहेत ही गोष्ट स्पष्ट केली असती तर विरोधाचा परिहार झाला असता. गद्य वाङ्मयासंबंधाने हल्लीच्या काळास गीतारहस्य-काळ म्हणणें कितपत योग्य होईल याबद्दल दोन मतें होण्याचा संभव आहे. माझ्या मतें अजून विष्णुशास्त्री चिपळुणकरांचेंच युग चाललें आहे. दुसरा विरोध भाषांतरासंबंधाने केलेल्या विधानांत दिसून आला. एके ठिकाणीं आपण भाषांतराचा निर्देश आदरबुद्धीने केला असून, दुसऱ्या ठिकाणीं अनादर-बुद्धीने केला आहे.

नवे व जुने कवि यांची आपण घातलेली सांगड सकृद्दर्शनीं अत्युक्तिरूप वाटली तरी पूर्ण विचारान्तीं तशी वाटत नाही. जुन्या कवींत फारशी कल्पकता दिसून येत नाही. संख्येच्या दृष्टीने त्यांची कविता हल्लीच्या कवितेच्या किती तरी पट आहे. पण गुणांत हल्लींची कांही कविता तिची बरोबरी करू शकेल. आपल्या भाषणांत कवितेला अवास्तव महत्त्व दिलेलें दिसतें. तत्संबंधी भागाची भाषाहि आपल्या स्वतःच्या भाषेसारखी गोंडस व खुबीदार नाही. वाङ्मयाची व्याख्या आपणास अधिक बारकाईने देतां आली असती. तो भाग अत्यंत हृदयंगम झाला आहे

यांत शंका नाहीं. Expression and gold of literature यांमधील अंतर दाखविणाऱ्या वाक्याचें भाषांतर चुकलें असावे असें वाटतें. लो. टिळक यांस सिंहीच्या मुलाची उपमा देतांना इतर लेखकांबद्दल व विशेषतः मृत लेखकांबद्दल कांहींसा अनादर प्रकट झाल्यासारखा वाटतो.

हे सर्व दोष बारकाईने पाहणारासच दिसण्यासारखे आहेत व ते गुणसमुच्चयांत पूर्णपणें लोपून जाण्यासारखे आहेत. आजपर्यंतच्या अध्यक्षांच्या भाषणांत आपलें भाषण बरेंच वर येईल यांत शंका वाटत नाहीं. तें पहिल्या प्रतीचें तर आहेच. पक्षपात दिसण्याचा संभव नसता तर मी त्यास पहिलेंच म्हटलें असतें. आपल्यामागे इतकीं कामें असता आपण इतकें सुंदर व व्यापक भाषण तयार केलें ही गोष्ट आपणास निःसंशय अभिमानास्पद आहे. त्याच्यावर झालेल्या प्रतिकूल टीकेमुळे त्याची किंमत मुळीच कमी होत नाहीं. आपण ज्या कांहीं ग्रंथकारांची नांवें वगळलीं आहेत त्यांच्या पोटांत त्याने शूळ उठल्यास नवल नाहीं. माझ्या नांवाचा अनेकदा गौरवपूर्वक निर्देश केल्याबद्दल मी आपला अत्यंत ऋणी आहे.

### ३८४

### ४ जानेवारी १९२२—केळकर यांचें वर्किंग कमिटीचे अध्यक्ष यांना पत्र

ऑ. इं. कॉं. कमिटीवर महाराष्ट्र प्रांतिक कमिटींतून जे लोक निवडले गेले त्यासंबंधाने देवकीनंदन, दास्ताने वगैरे अनेक लोकांच्या तक्रारी आहेत. या बाबतींत वर्किंग कमिटीने त्यांचें म्हणणें ऐकून घ्यावे. पण याहिपेक्षा पुढल्या वर्किंग कमिटीच्या बैठकीच्या वेळीं त्यांनी हजर राहून आपली तक्रार सांगावी म्हणजे शक्य असल्यास मलाहि खुलासा करतां आल्यास करीन. पण सर्वांत चांगली गोष्ट म्हणजे मुंबई शहरांतील कोणा तरी कॉंग्रेसच्या सभासदाकडे ही गोष्ट निकालाकरिता सोपवून द्यावी. असे झाल्यास त्रयस्थ पंचापुढे हजर राहून प्रांतिक कमिटीच्या सेक्रेटरीला आपलें म्हणणें मांडण्यास मी सांगेन. वर्किंग कमिटीच्या वेळेचा निष्कारण अपव्यय होऊ नये म्हणून हा शेवटला मार्ग मला बरा वाटतो.

### ३८६

### ५ जानेवारी १९२२—केळकर यांचें पटेल यांना पत्र

येत्या २२ तारखेची महाराष्ट्र प्रांतिक कमिटीची बैठक बरीच महत्त्वाची

होईल व त्याला तुम्ही हजर राहालच. मला वाटतें, कार्यकारी मंडळाची सभा बोलावण्याचें कारण नाही. जिल्ह्याच्या सेक्रेटरींना त्यांनी खासगी अगर जिल्हावार सभा बोलावून कॉंग्रेसच्या पुढील कार्यक्रमासंबंधाने चर्चा करावी, व या सर्व सामुग्रीनिशीं २२ तारखेच्या सभेस हजर राहावे अशा अर्थाचें सर्क्युलर काढलें आहे. त्यांनी आपलें काम त्याप्रमाणे सुरू केलेंच असेल, म्हणून त्यांस पुनः पुण्याला हेलपाटा देण्याचें कारण नाही. वर्किंग कमिटीने तुमच्याकडे दिलेल्या कॉंग्रेस गॅझेटाचें काम तुमचें जोरांत सुरू असेलच.

३८७

## ६ जानेवारी १९२२—केळकर यांचें जयकर यांना पत्र

ता. १४ रोजीं भरणाऱ्या परिषदेस येण्याबद्दल तुमचें निमंत्रण पोहोचलें. या परिषदेस कोण कोण कसे लोक येणार आहेत याची मला कल्पना नाही. तथापि तुमच्या निमंत्रणामध्ये खाडिलकर, शिवरामपंत परांजपे, भोपटकर वगैरेंचीं नांवें घालण्यांत यावींत असें मी सुचवितो. माझा उद्देश इतकाच कीं, शक्य तितकी ही परिषद सर्व मतांची दर्शक व्हावी.

३८८

## ६ जानेवारी १९२२—केळकर यांचें सप्रे यांना पत्र

गेले दोन महिने बहुधा मी पुण्याबाहेरच सारखा हिंडत असल्याने तुम्हास उत्तर घालण्यास वेळ लागला. तुमचीं सर्व पत्रें मला मिळालीं. तुमच्या परदेशांतील पत्रांचा केसरीला थोडाबहुत उपयोग होतो. पण पत्रें यापेक्षा थोडीं लहान असावींत. केसरीजवळ इतकी जागा नसते. होमरूल लीगने तुम्हाला यापूर्वी ५०० रु. पाठविलेच आहेत, व आणखी ५०० रु. पाठविण्याची व्यवस्था करतों. यापेक्षा जास्त पैसे पाठवितां येतील असें वाटत नाही; व चांगल्या शिंप्याप्रमाणे तुम्ही कापड किती आहे तें पाहून आपला अंगरखा बेतावा. केसरीवरून व इतर रीतीने तुम्हाला इकडील हकीकती कळत असतीलच.

३८९

## ६ जानेवारी १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

जिना, जयकर, मालवीय यांनी मुंबईस ता. १४ रोजीं बोलावलेल्या सभेस

तुम्ही यालच. गांधी हजर राहणार आहेत असें ऐकिलें आहे. अभ्यंकर यांना घेऊन येतो असें डॉ. मुंजे यांनी कळविलें आहे. भोपटकरांना घेऊन तुम्ही सरदार-गृहांत या, म्हणजे या परिषदेंत आपण सर्व एकमताने महाराष्ट्र पक्षाचें मत मांडूं.

३९०

८ जानेवारी १९२२—बॅ. जयकर, मुंबई

तुम्ही सांगितलेल्या सर्व गृहस्थांना यापूर्वीच निमंत्रणें पाठविलीं आहेत. हे गृहस्थ म्हणजे आपल्या पार्टीची प्रमुख माणसें होत व त्यांना वगळता येणें शक्यच नव्हतें. सर्व मंडळी जमली म्हणजे बरें होईल. तुम्हीहि या. विशेष समक्ष भेटींत बोलूं.

३९१

१८ जानेवारी १९२२—आर. एस. निमकर, मुंबई

अच्युतराव कोल्हटकरांच्या चुकीमुळे फसवणुकीच्या आरोपाबद्दल शिक्षा होऊन मला तुरुंगांत जावें लागलें. तुरुंगांत गतआयुष्याचा मी नीट विचार केला. असहकारितेच्या चळवळींत पुढारीपण पत्करलें. तारुण्याच्या अविचाराने कोल्हटकरांच्या बाजूस गेलों, व त्यांच्यामुळे तुमच्यावर हवी तशी टीका केली. मला त्या वेळीं स्वर्ग मिळाला असें वाटलें. पण असल्या सहकाऱ्यांच्या संगतीने मी नरकांत पिचत पडलों आहे असें आढळून आलें. तुरुंगांतून आल्यावर पश्चाताप झाल्या कारणाने मी तुमची माफी मागतों. यापुढे तरी कांही राष्ट्रकार्य माझे हातून होवो. कोल्हटकरांच्या बाजूला जाण्यांत मी फार मूर्खपणा व चूक केली म्हणून ती माफी केसरींत जाहीर रीतीने प्रसिद्ध करावी. कारण यापुढील राष्ट्रकार्यांत लोकांची सहानुभूति तरी मला मिळेल.

३९२

२५ जानेवारी १९२२—वा. वि. दास्ताने, भुसावळ

आपला प्रांत असावा तितका जागृत नाही हें, मला वाटते, कबूल करणें भाग आहे. जागृति करणें आपल्याच प्रांताच्या पुढाऱ्यांच्या व इतरांच्या शिरावर आहे. जोरदार व हिंदुस्थानास चकित करून सोडील असा संघटित प्रयत्न सर्व तऱ्हेने

करणें एवढें तरी आपलें कर्तव्य आहे. त्यासाठी सर्व शैथिल्य झाडून प्रयत्न होण्याचें उत्साहवर्धक वातावरण व ठराव कोणते आहेत असें पाहूं गेलें असता दिसत नाही. निदान प्रचाराच्या बाबतींत तरी आपण सर्वांनी अंगावर घेण्याचें धोरण-देखील जमलें नाही.

३९३

२७ जानेवारी १९२२—माधवराव खांबेटे, जळगांव

'लोकमान्यां'त आलेला भोर संस्थानांतील आपल्यावरील खटल्याचा निकाल वाचून फार समाधान व आनंद झाला. चीफसाहेब यांनी या कामीं मनाची उदारता चांगली दाखविली. कारणें कांहीही असोत, परंतु वारा कसा वाहतो आहे हें स्वतःस आलेल्या लोकमताच्या अनुभवावरून त्यांना बरेंच जाणवूं लागलें आहे असें दिसतें. बाकी पुण्यांतील सर्व हकीकती वर्तमानपत्रांतून वाचावयास मिळ-तातच व कालानुरूप सर्व माणसें कशीं तयार होतात, हेंहि प्रत्ययास येतें.

३९४

३१ जानेवारी १९२२—गोविंदराव बिनीवाले, सांगली

येथील प्रजापरिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयी श्री. कृ. प्र. खाडिल-कर यांना विनंति केली आहे. त्यांनी अध्यक्षस्थान जरूर स्वीकारावें याबद्दल आपण त्यांना आग्रहपूर्वक एक पत्र लिहावें. भोरची परिषद फार यशस्वी झाली असें दिसतें. भोरच्या खटल्यांतून आपण निर्दोषी सुटलां याबद्दल आपलें जरूर अभिनंदन केलें पाहिजे.

३९५

१ फेब्रुवारी १९२२—सी. व्ही. मेहता दिवाण यांना केळकर यांचें पत्र

तुमच्या मनांतून खरी इच्छा असल्यास दारू बंद कशी करावी याबद्दल येथल्या स्थानिक कमिटीने आपल्या ठरावांत मार्ग सुचविला आहे. कमिटींतील बिनसरकारी लोकांनी पूर्ण एकमताने या योजना सुचविलेल्या आहेत. आणि तुम्ही अधिकाराच्या जागेवर असल्या कारणाने या प्रश्नाला हातभार लावणें हें तुमच्यावर अवलंबून आहे. सरकारने बिनतक्रार या सूचना मान्य केल्या तर,

दारूच्या मुळावरच कुऱ्हाड न बसली तरी, लोकमत यामुळे बरेंचसें शांत होईल हें तुमच्या कसें लक्षांत येत नाही याचें नवल वाटतें.

३९६

### १ फेब्रुवारी १९२२—केळकर यांचें एस. आर. बमनजी यांना पत्र

तुमचें भाषण 'क्रॉनिकल' मध्ये आलें तें वाचलें. तुम्ही मोठ्या धैर्यानें आपले विचार बोलून दाखविले. तुमच्या दानशूरत्वाबरोबर तुम्हाला परमेश्वराने चांगल्या वक्तृत्वाचीहि देणगी दिलेली आहे. पुण्यामध्ये लोकमान्य टिळकांचा पुतळा उभा राहावा म्हणून म्हात्रे यांना तुम्ही ऑर्डर दिली आहे याबद्दल मला किती कृतज्ञता वाटते म्हणून सांगूं. तुम्ही व म्हात्रे येथे येऊन पुतळ्याकरिता जागा पाहून पुतळ्याचें प्रत्यक्ष मोजमाप ठरवीपर्यंत मी तुम्हा दोघास स्वस्थ बसू देणार नाही. तुम्हाकडून पुढल्याच आठवड्यांत हें काम हातावेगळें करावयाचें असें मी ठरविलें आहे. सरकार बहुधा तुम्हाला पकडणार असें तुम्ही लिहितां. पण तुमच्याबरोबरच आणखी कोणा कोणावर ही पाळी आहे ? सरकार आता बहुधा गांधींना पकडणार असा माझ्या मनाला नक्की संशय येऊं लागला आहे. तुम्हाला काय वाटतें ?

३९७

### १ फेब्रुवारी १९२२—केळकर यांचें कॅप्टन यांना पत्र

दारुबंदीला तुम्ही लोकल एक्साईज कमिटीच्या सभेमध्ये जो पाठिंबा दिला त्याबद्दल शहरांतील लोकांना तुमच्याविषयी फार कृतज्ञता वाटते. सर्वच बिन-सरकारी सभासदांनी याप्रमाणे एकमेकांना पाठिंबा दिला तर दारुबंदीचा प्रश्न खात्रीने सुटेल. अधिकारी मंडळांतील मुख्य दर्जाची जागा जरी आज आमच्या हातांत आलेली नसली तरी दारुबंदीची गोष्ट शक्य कोटीतील वाटते.

३९८

### २ फेब्रुवारी १९२२—एम. एस. गोडबोले, अलाहाबाद

महात्माजींना तुमची तार सुरतेस सभेच्या आधी वेळेवर पोचली. वर्किंग कमिटीची ही बहुधा शेवटचीच सभा होणार असें सर्वांस वाटलें. कारण गांधींनी

व्हाइसरॉय यांना निर्वाणीचा खलिता पाठविला असून, त्याची मुदत ता. ११ रोजीं संपते. बहुधा त्याच दिवशीं ते पकडलेहि जातील. तें तुरुंगांत गेल्यास सर्वांचीच मोठी हानी होईल व बार्डोलीस सत्याग्रह होण्याची वेळ कायमची लांबेल. पण या बाबतींत तुम्हीच अधिक चांगलें जाणतां.

३९९

२ फेब्रुवारी १९२२—बमनजी, मुंबई

तुम्ही ह्मात्रे यांच्याबरोबर मला पुण्यास कां बोलावतां ? माझें काम फक्त ह्मात्रे यांना देण्याच्या पैशाची व्यवस्था करावयाची. जागा वगैरे सर्व तुमची तुम्ही ठरवा. सरकार महात्माजींना पकडील असें वाटत नाही. गळ टाकून तुमच्या-माझ्यासारखे लहान मासेच सरकार पकडणार.

४००

२ फेब्रुवारी १९२२—पुरुषोत्तम केशव फडके, जमखिंडी

सांगली येथे भरणाऱ्या संस्थान परिषदेस आपण हजर राहणार असल्याचें समजतें. तसें असल्यास आपण जमखिंडीस आलें पाहिजे. आपणास येथे आलेंच पाहिजे हें समजूनच आपण सांगलीस येण्याचें करावें. येथे सभेस आगाऊ परवानगी घेणें जरूर आहे. आपणाकडून पत्र आल्याबरोबर त्या तजविजीस लागत आहों.

४०१

१५ फेब्रुवारी १९२२—केळकर यांचें बमनजी यांना पत्र

ह्मात्रे हे पुण्यास येऊन पुतळ्याकरिता जागा पाहून गेले. तुम्ही पुण्यास निदान एक दिवस तरी यावे म्हणून प्रयत्न तरी कसा करून पाहूं तें सांगा. म्हणजे तोहि करीन. तुम्ही पुण्यांत होणाऱ्या टिळकांच्या पुतळ्याकरिता देणगी द्या अगर न द्या, पण स्मारकाची नवीन मिळालेली जागा पहाण्यास तरी एक दिवस याल कीं नाही ? ताईमहाराज केसमध्ये टिळक सतत वीस वर्षें भांडले, म्हणून श्री. जगन्नाथ महाराजांनी स्मारकाकरिता केवढी मोठी जागा दिली आहे ती पाहून तुम्हास खचित आनंद होईल. खरोखरच तुम्ही एक दिवसहि येऊं शकणार नाही

काय ! मी पाहिलेल्या जागा तुम्हास पसंत नसल्यास तुम्हास पसंत होतील अशा दुसऱ्या जागा मी तुम्हाला सुचवीन.

४०२

१७ फेब्रुवारी १९२२—झात्रे, मुंबई

लोकमान्यांचा पुतळा पुणें शहरास देण्याची कल्पना शेठ बमनजी यांनी सोडून दिली हें ऐकून अत्यंत आश्चर्य वाटतें; व कारण काय तर एकाच माणसाचे पुण्यांत दोन पुतळे नकोत म्हणून ! युरोपमध्ये मोठ्या माणसांचे असे पुतळे एकेका शहरांत शेंकडो असतात. माझी निराशा झाली एवढें मात्र खरें.

४०३

२२ फेब्रुवारी १९२२—केळकर यांचें जमनालाल बजाज यांना पत्र

ज्यांना वकिली सोडल्यामुळे मदत काँग्रेसकडून होत होती अशांची यादी गांधी यांनी मागविली आहे. परंतु कांही वकिलांनी पुनः प्रॅक्टिस सुरू केल्या-कारणानें त्यांनी काय काम करावें व त्यांना किती मदत मिळवी हें तुम्ही त्यांनाच व्यक्तिशः जाऊन विचारावें. स्वतः मी या बाबतींत कोणाचीच शिफारस करण्याची जबाबदारी घेऊं इच्छित नाही. तुम्ही द्याल ती रक्कम मी त्यांना पोंचती करीन; पण कोणाला किती रक्कम द्यावयाची हें निवडून ठरविण्याचें काम तुमचें तुम्हीच करावें. मी तें केल्यास त्याबद्दल गैरसमज होईल.

४०४

२८ फेब्रुवारी १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

तुमची तार दिल्लीस मिळाली, पण तुम्ही दिल्लीस येऊं शकलां नाही याबद्दल हळहळ वाटली. तुमचा आधार व मार्गदर्शिकत्व यांची उणीव आम्हा सर्वांनाच फार भासली. आम्ही कशी तरी वेळ निभावून नेली. मी मांडलेला ठराव तुम्हाला पसंत असल्यास तुम्ही 'केसरी' व 'मराठ्यां'त त्यासंबंधाने लिहा.

४०५

२ मार्च १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

'क्रॉनिकल'ने अलीकडे महाराष्ट्र पक्षाचा विपर्यास करून त्याची हिंदुस्थानभर

बदनामी करण्याचा खोडसाळपणा चालविला आहे. त्याचा प्रतिकार आपणास केला पाहिजे व त्याकरिता असें दिसलें पाहिजे कीं, पुण्यापासून नागपुरापर्यंत आपणामध्ये यत्किंचितहि मतभेद नाही. तुम्ही याकरिता इकडे यावे अशी येथील मित्रमंडळींची इच्छा आहे.

४०६

३ मार्च १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

महाराष्ट्र पक्षाने दिल्लीस राष्ट्रीय सभेची घसरलेली बाजू सावरून धरण्याचा जो प्रयत्न केला त्याचें फळ तर राहोच; पण गांधी पक्षाचीं वर्तमानपत्रें व विशेषतः 'क्रॉनिकल' व 'लोकमान्य' यांनी महाराष्ट्र पक्षाची बदनामी चालविली आहे. खुद्द लोकमान्यांजवळ राहिलेल्या खाडिलकरांसारख्या बुद्धिमान माणसाने ह्या खोडसाळपणांत भाग घ्यावा व इतर लोकांचे दुष्ट हेतु त्यांना कळू नयेत हें मात्र सर्वांत आश्चर्य होय ! महाराष्ट्रांत स्वार्थत्याग व एकजूट कधी होऊच नये असा या भूमीला शापच आहे की काय न कळे.

४०७

८ मार्च १९२२—केळकर यांचें महात्मा गांधींना पत्र

शंकरलाल बँकर व जयकर हे तुम्हाला सद्यःस्थितीसंबंधाने मला काय वाटतें ते सांगतीलच. पण मीहि मुंबई अगर अहमदाबाद येथे तुमची मुद्दाम भेट घेऊन तुमच्याशीं बोलणार आहे. तुमच्याशीं स्वस्थ निवांतपणें बोलण्यास पूर्णपणें एक किंवा दोन दिवस मिळावेत अशी फार इच्छा आहे. पण म्युनिसिपालिटीची निवडणूक, महाराष्ट्र प्रांतिक कमिटीचें काम, व टिळक विद्यापीठ सिंडिकेटची सभा यांमुळे ही गोष्ट दोन आठवडे तरी नाइलाजाने पुढे ढकलली पाहिजे. स्थानिक गोष्टीहि बऱ्याच आहेत. तुमच्याप्रमाणे मला संपादकाला मनांत आल्याबरोबर वाटेल तिकडे परिभ्रमण करता येत नाही ही अडचण आहे. पण इंग्रजी म्हणीप्रमाणे महंमदानेच अखेर पर्वताकडे गेलें पाहिजे !

४०८

८ मार्च १९२२—केळकर यांचें दुबे यांना पत्र

येत्या सप्टेंबरांत अखिल भारतीय संस्थान परिषद भरविण्याचें ठरविलें

आहे. तुम्ही हजर राहून आपला अनुभव व बुद्धिमत्ता यांचा फायदा परिषदेस जरूर करून द्या. तुमच्या सूचना फार बहुमोल असून, स्वागतमंडळाकडून त्या खात्रीने विचारांत घेतल्या जातील.

४०९

## ८ मार्च १९२२—केळकर यांचें डॉ. मुंजे यांना पत्र

गेला सर्व आठवडा मी बाहेर गावीं असल्याकारणाने तुमचीं पत्रें माझे गैरहजेरींत आलीं. तुम्हास एकवार भेटण्याचें माझे फार मनांत आहे. पण अद्याप तसें घडून येत नाही. कारण माझेपुढे पुढील महत्त्वाचीं कामें आहेत— ( १ ) म्युनिसिपालिटीच्या नव्या निवडणुकी हस्तगत करण्याकरिता व बहुमत प्रस्थापित करण्याकरता राष्ट्रीय पक्ष येथे कसून झगडत आहे. ( २ ) महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरविण्याकरिता म. प्रां. कमिटीचे नवीन नियम तयार करावयाचे आहेत. ( ३ ) येत्या ता. २० ला दारूच्या दुकानांचे लिलाव व्हावयाचे असल्याने त्यासंबंधी प्राथमिक कामकाज आहे. ( ४ ) चौथें काम म्हणजे टिळक युनिव्हर्सिटी सिंडिकेटची सभा. या सर्व कामांतून मोकळा होतो न होतो तोच म्युनिसिपालिटी-च्या अध्यक्षाच्या निवडणुकीची वेळ येईल. यावरून मला तूर्त तरी पुण्याबाहेर हलतां येत नाही हें तुम्हास दिसून येईल. परंतु आपल्या कामासंबंधाने काय करा-वयाचें हें मी तुम्हाला सांगतों. महात्मा गांधींशीं मुंबईस एकवार शेवटचें बोलून आपण एक नवा जाहीर मॅनिफेस्टो काढावा याबद्दल मी जयकर, बॅप्टिस्टा, पटेल व जमनादास मेहता यांची मतें अजमावलीं आहेत. महात्माजींनाहि याबद्दल मी लिहिलें आहे. आपलें निश्चित म्हणणें काय तें गांधींच्यापुढे मांडण्यांसाठी मीं तें प्रत्यक्ष लिहूनच काढतों. त्याचा कदाचित् नव्या मॅनिफेस्टोकरिताहि उपयोग होईल.

४१०

## ११ मार्च १९२२—व्ही. टी. जोशा व राजे, पुणें

टाटा कंपनीतर्फे मि. भाभा यांचेकडून मुखत्यार म्हणून आम्हां तुम्हास कळवितों कीं, सत्याग्रह-मंडळाने योग्य सूचना केल्यास कंपनी मावळ्यांशीं तड-जोड करावयास तयार आहे. हें पत्र सत्याग्रह-मंडळापुढे ठेवावें.

४११

## १२ मार्च १९२२—सदर पत्रास केळकर यांचें उत्तर

सत्याग्रह-मंडळाचे अध्यक्ष ज. स. करंदीकर यांच्याशीं यापूर्वी तुमचें बोलणें झालेलेंच आहे. तरी तडजोड होण्यास मावळ्यांच्या सूचना तशाच आहेत असें समजावें.

४१२

## २१ मार्च १९२२—हेलेना नॉरमन्टन, लंडन

तुमचीं बरींचशीं पत्रें (सेन्सारकडून) गहाळ होतात असें दिसतें. मला मिळत नाहीत. माझा कायद्याचा अभ्यास बरा चालला आहे. 'इंडिया' पत्राशीं असलेल्या माझ्या संबंधामुळे निष्कारण त्रास उत्पन्न झाला आहे. पण प्राचीन क्रुसेडर्सच्या वीरकुळांत माझा जन्म झाला असल्याकारणाने या भांडणांत मी शेवटपर्यंत झगडण्याचें ठरविलें आहे. त्याने तापच होईल पण त्याला इलाज नाही. लग्न होऊन सध्या अतिशय सुखांत व आनंदांत आहे. माझ्या श्वशुरांना तर माझें केवढें अवर्णनीय कौतुक वाटतें. मी अद्याप 'हेलेना नॉरमन्टन' असें माहेरचेंच नांव लावतें, पण माझा हा अभिमान मला माझी पदवी मिळतांना आड येणार असें दिसतें. काय नसती भानगड पहा!

मॉंटेग्युसाहेबांच्या राजीनाम्याबद्दल तुम्हांला काय वाटतें! त्यांनी प्रत्यक्ष कर्झनसाहेबांचीं पत्रेंच उघडकीला आणलीं त्यामुळे त्यांचेवर लोकांचा फारच रोष झाला. लॉइड जॉर्ज हे तरी पदच्युत होण्याला हींच पत्रें कारणीभूत झालीं. आता कांही दिवस कॉन्झरव्हेटिव पक्ष उदयाला येणार: पण आयर्लंड व इजिप्त यांचे प्रश्न निकालांत निघाल्याकारणाने, कोणताहि पक्ष सत्ताधीश असला तरी तें सारखेंच आहे. हिंदुस्थानने मनांत आणलें तर पुढील निवडणुकीच्या निमित्ताने हिंदुस्थानच्या प्रश्नावर येथे धामधूम उठवितां येईल. पण ते भ्रमिष्ट व धर्माच्या नांवाने जपमाळ ओढणारे गांधीपक्षीय लोक या मार्गांत आडवे पडणार. मग ही रीत अगदीच जगावेगळी व आत्मघातकीपणाची नव्हे कां? रशियाबद्दल आज जसा तिरस्कारपूर्वक उल्लेख होतो तसाच हिंदी लोकांच्या बद्दलहि जगाला तिटकारा येऊन हिंदी लोक मूर्ख व स्वराज्याला नालायक आहेत अशी बदनामी

होईल. गांधींच्या ' साधुत्वा 'बद्दल तरी बोलणा-लिहिणारांचा कोण आग्रह व केवढा गाजावाजा ! तें ऐकून लोक इकडे सहजच विचारतात की, हिंदुस्थानचे इतर राजकारणी लोक हे सर्वच अट्टल बदमाष आहेत की काय !

आणि लबाड माणसांच्याचबद्दल बोलावयाचें तर ते V. G. P. (विठ्ठलभाई पटेल ) ला कां पकडीत नाहीत ? पकडण्याला तो मनुष्य अगदी योग्य आहे ! ! पण कदाचित् या माणसाला पकडून लोकांत त्याचें महात्म्य वाढावयाचें म्हणून सरकार तसें करीत नसेल ! तुमचा मराठ्यांतील अग्रलेख मी मोठ्या उत्सुकतेने व कौतुकाने वाचला. तुम्ही अलीकडे मराठा पाठविण्याचें बंद कां केलें ?

## ४१३

## २१ मार्च १९२२—एस. आर. बमनजी, मुंबई

माझें पाऊल जलद पडूं लागलें आहे. बार्डोली येथे मी भाषणें केलीं आणि पाटील-तलाठी लोकांना नोकऱ्या सोडा म्हणून उपदेश केला, अशा आरोपावरून मला अटक झाली अशा बातम्या उठलेल्या दिसतात. मला सल्ला मिळाला आहे की, तुम्ही तूर्त मुंबईतून बाहेर जाऊं नये. म्हणून तूर्त तुमचें आमचें ठरल्याप्रमाणे मला तिकडे येतां येत नाही. माझीं पत्रें पोस्टांत फोडलीं जातात. तरी यापुढे तुम्ही माझा ( भाचा ) के. व्ही. डॉक्टर यांच्या पत्त्यावर पाकीट बंद पाठवीत जा. समजा मला अटक झाली तर मी आपला डिफेन्स द्यावा की नाही ? तुम्हाला काय वाटतें ? तुमच्याशीं चर्चा बरीच करावयाची आहे. मला मुंबईतून बाहेर जातां येत नाही. तुम्हीहि वरचेवर मुंबईस खेपा घालाव्या असें म्हणतां येत नाही. तरी पण तुम्ही आलां तर पुष्कळ बोलूं.

## ४१४

## २२ मार्च १९२२—केळकर यांचें सरलादेवी चौधरी यांना पत्र

तुम्हीं मला दोन प्रश्नांचीं उत्तरें विचारतां. पण मी तुम्हांस खरेंच सांगतों कीं, राजकारणांत prophet होऊन एखादें भविष्य सांगणें ही फारशी धोक्याची नसली तरी थोडी कठीण गोष्ट आहे. आतां तुम्ही मला विचारतां म्हणूनच मी ग्रीक ओरॅकलप्रमाणे प्रयत्न करून पाहतों. अर्थात् अशा भविष्यांतून कोणाला वाटेल

तसा वाटेल तो अर्थ काढतां येईल. मला वाटतें, लालाजींपेक्षा दासबाबूव गांधीं-च्या गैरहजेरीत देशाचे पुढारी होतील; व दुसरी गोष्ट म्हणजे अत्याचाराच्या मुद्द्या-वर असहकारितावादी लोकांमध्यें मतभेद उत्पन्न होणार नाही.

४१५

**१३ एप्रिल १९२२—केळकर यांचें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट पुणें, यांना पत्र**

प्रेस ॲक्ट नुकताच रद्द झाला असल्याकारणाने केसरी-मराठ्याकडून जो ५००० व १००० असा जामीन घेण्यांत आला होता त्याबद्दल ठेवलेल्या प्रॉमिसरी नोटा आमच्या आम्हास परत देण्याविषयीं आपण सरकारला विनंति करावी.

४१६

**२९ एप्रिल १९२२—केळकर यांचें हकीम अजमलखान यांना पत्र**

तुमचें पत्र पोहोचलें. पेणच्या परिषदेचा ठराव जर आपण बारकाईने वाचाल तर आपणांस असें दिसेल कीं, चिंतामणराव वैद्य यांनी तूर्त दिल्ली-बार्डो-लीचे ठराव मान्य करून कार्यक्रम आंखावा असा मुख्य ठराव मांडला व तोच पास झाला. गोखले यांची उपसूचना म्हणजे एक प्रकारचा श्लेष ( rider ) होता आणि त्यांत फक्त सर्वसाधारण रीतीने काँग्रेसच्या कार्यक्रमाची फेरतपासणी करावी कीं काय, याचा विचार करण्याकरिता चौकशी कमिटी नेमण्यांत यावी असें मोघम रीतीने म्हटलें होतें. मुख्य ठराव व उपसूचना यांमध्ये कायदेकौन्सिलाचा निर्देशच नाही. भोपटकरांनी आपल्या उपसूचनेंत कौन्सिलें काबीज करावीत असें स्पष्ट म्हटलें होतें पण त्यांची उपसूचना नापास झाली. तसेंच गोखले व घारपुरे यांच्या ठरावांत स्थानिक स्वराज्यसंस्था व को-ऑपरेटिव्ह सोसायट्या काबीज कराव्या असें आहे. तथापि त्यांच्या ठरावांतून कायदेकौन्सिलाचा शब्द मुद्दाम वगळण्यांत आला. क्रॉनिकलने केलेलें विधान साफ चूक आहे हें यावरून आपलें लक्षांत येईल.

कौन्सिल-बहिष्कार मान्य नसलेला एक मोठा पक्ष महाराष्ट्रांत आहे. व अकोला व पेण अशा परिषदांतून हा प्रश्न उघड रीतीने चर्चेला काढल्याशिवाय महाराष्ट्र पक्ष कधीहि राहणार नाही. तथापि कौन्सिलांत जाण्यासंबंधाने अप्रत्यक्ष रीतीने तरी काँग्रेस आपली संमती देईपर्यंत कोणीहि लोक कौन्सिलांत जाणार

नाहीत हें निश्चित समजा. कौन्सिलच्या पुढल्या निवडणुकींना अद्याप अठरा महिने अवकाश आहे, मग त्याची काळजी आजच कां करता? अझाद सोभानी, देशबंधु दास, अगर त्यांच्या पत्नी हे कायदेकौन्सिलांचा उच्चार जितपत करतात अशाच रीतीने आम्हीहि करीत आहों. पण त्या योगाने कॉंग्रेसच्या बळकटीस विघ्न येणार नाही !

४१७

२० एप्रिल १९२२—केळकर यांचें लाहोरचे संतानम् यांना पत्र

पंजाब प्रांतिक परिषदेला हजर राहतां येत नाही याबद्दल वाईट वाटतें. गेल्या आठवड्यांत पेण कॉन्फरन्सकरिता मी आठवडाभर बाहेर होतों. नुकताच परत आलों. म्युनिसिपालिटीच्या फार महत्त्वाच्या सभा या आठवड्यांत आहेत. ड्रेनेजच्या प्रश्नासंबंधी सरकारला अखेरचें निश्चित उत्तर द्यावयाचें असून म्युनिसिपालिटीच्या बाबतींत यांत लाखो रुपयांचा प्रश्न आहे. या व इतर अनेक कारणांमुळे एप्रिलच्या शेवटच्या आठवड्यांत मला पुणें सोडून जाणें अशक्य आहे म्हणून तुम्ही या वेळीं माफ करा. पंजाबबद्दल मला इतकेंच वाटतें कीं, सर्वांत दंडपशाहीचा कहर तेथे जास्त झाला असून पंजाबने त्याला अद्याप मान वांकविली नाही. ही वेळ आणीबाणीची असून सर्व प्रांतांनी कार्यक्रमासंबंधी एकमेकांचा सल्ला घेऊन धोरण आंखलें पाहिजे. म्हणून लालाजींच्या पाठीमागे पंजाबचे पुढारी एकत्र होऊन परिषदेंत काय ठराव करतात, इकडे माझे डोळे लागून राहिले आहेत.

अलीकडे लालाजींची तुम्ही तुरुंगांत भेट घेतली होती काय? त्यांची हालहवाल कशी आहे? कार्यक्रमासंबंधी ते काय म्हणतात?

४१८

३० एप्रिल १९२२—के. अ. नायक, चिटणीस सारस्वत ब्राह्मण समाज, गोवा

आपण प्रेमपूर्वक पाठविलेले पंचवीस रुपये साभार स्वीकारण्यांत आले. संस्थेबद्दल असलेलें प्रेम व आपलेपणा दिवसेंदिवस वृद्धिंगत होईल अशी आशा करतों.

४१९

७ मे १९२२—देवधीकर वकील, उंबरगांव

तुमच्या राजिनाम्याची हकीकत वाचून फार वाईट वाटलें. याच आणीबाणी-

च्या प्रसंगीं आपल्यामध्ये फूट पडून उपयोगी नाही. पण कॉन्फरन्समध्ये आपण पुष्कळसे स्तब्ध होतां. तरी गोखले यांच्या उपसूचनेची वेळ येताच ती मुख्य ठरावाला जोडून त्या दोहोंवर मिळून एकत्र मतें घ्यावींत असें आपण किती उत्सुकतेने व ताबडतोब अध्यक्षास सांगून हा ठराव पास करून घेतला, हें मला माहीत आहे. चौकशी-कमिटी नेमली जाण्यास माझी हरकत नाही. पण तोपर्यंत दिल्लीचे ठरावच आपण पाळले पाहिजेत.

## ४२०

### ११ मे १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

हजरत मोहानी यांना झालेली दोन वर्षांची शिक्षा हायकोर्ट कदाचित् आणखी दोन वर्षांनी वाढवील असें दिसतें. हजरत मोहानी हे अत्यंत गरीब असून, पाठीमागे त्यांची बायकामुलें उघडीं पडलीं आहेत. अहमदाबादेस सेशन कोर्टांत "टिळकांना मी आपला गुरु मानतों" असें त्यांनी सांगितलें. मला वाटतें, त्यांना जरूर असल्यास आपण होमरूल लीगमधून त्यांच्या बायकामुलांना दरमहा रु. ७५ ची मदत करावी. तुमची संमति असल्यास अलाहाबादेस त्यांच्या मंडळीस कळवितों. हजरत मोहानी परधर्मी असला, तरी त्याच्या संकटाचे वेळीं त्याच्या कुटुंबाला आपण जरूर मदत केली पाहिजे. आणि लोकमान्यांच्या पक्षाच्या एका शूर, निधड्या छातीच्या व एकनिष्ठ भक्ताला जर या वेळीं आपण मदत केली, तर आपल्या गुरूचाहि स्वर्गांतून खातीने आशीर्वाद मिळेल.

## ४२१

### १२ मे १९२२—रावजी जनार्दन भिडे, ग्वाल्हेर

इ. सं. मं. चा वास्तुप्रवेशसमारंभ श्रीमंत महाराज शिंदे सरकार यांच्या हस्तें होण्यासंबंधाने आपलें पत्र आलें, त्याचें उत्तर त्याच वेळीं धाडलें. त्यास महाराजांचें उत्तर खालीलप्रमाणे—

'निमंत्रणाबद्दल केळकर यांचे फार कृतज्ञतापूर्वक आभारी आहों असें त्यांना सांगा. परंतु वेळेच्या अभावी तसें करतां येत नाही याबद्दल फार दिलगिरी वाटते.'

वरील उत्तराने आपली निराशा होईल याबद्दल वाईट वाटते. भालेराव यांचें

बोलण्यांत असें आलें कीं, आपण सातारचे महाराजाकडेहि बोलणें लावणार आहां. आता तोच एक मार्ग युक्त दिसतो.

४२२

१७ मे १९२२—जम्मनादास द्वारकादास

शिंदे सरकार, मी व कांही मंडळी यांना तुमच्याशीं कांही गोष्टी खासगी रीतीने बोलावयाच्या आहेत. तरी तुम्ही उद्या इकडे येऊ शकाल काय ? (तार)

४२३

२ जून १९२२—गंगाधरराव देशपांडे, मुंबई

प्रकृति साधारण आहे. मुंबईस 'कौन्सिला'संबंधाने बोलणें जरूर आहे असें वाटतें. म्हणून माझें मत मी दिलें आहे. याचा उपयोग समेटाच्या वेळीं होईल असें वाटतें. समक्ष भेटींत जास्ती खुलासा करीन. खाडिलकर, वैद्य, दास्ताने हेहि भेटले.

४२४

३ जून १९२२—गंगाधरराव देशपांडे, मुंबई

आपलें पत्र आताच सकाळीं पोचलें. येथे मी खाडिलकर, वैद्य, भडकमकर, दास्ताने यांना भेटलों व तेथे केलेल्या पत्राचा मसुदा दाखविला. तो सर्वांना पसंत असून, त्यांत केलेली सूचनाहि मान्य आहे. आज मी लखनौला जाण्याकरिता निघत आहे. पुनः या सर्व मंडळींना भेटून अगर पत्र लिहून उत्तरें मागवणें येत्या मंगळवारच्या आंत शक्य नाही. याकरिता पुण्यास आपल्या घरीं भेटलेल्या मंडळींना व मी वर नमूद केलेल्या मंडळींना माझ्या पत्रांतील सूचना मान्य आहे असें माझ्या सहीचें पत्र केसरींत छापावें. डॉ. नानासाहेब देशमुख, वासुकाका वगैरे मंडळींना मी पत्रें लिहिलीं आहेत.

४२५

१ जुलै १९२२—व्रजलाल केशवलाल ठक्कर, भावनगर

जानेवारी महिन्यांत मी आपणाला गुजराथी केसरी प्रकट करण्याविषयीं

एक पत्र लिहिलें होतें. पण केसरी डबल करण्याच्या हेतूमुळे त्या वेळीं तें तसेंच राहून गेलें. आपण ही गोष्ट विसरलां असाल, परंतु मला तसा करणें शक्य नाही. कारण गुजराथी केसरी प्रकट करणें माझा जीवनहेतु झाला आहे.

लोकमान्यांचीं राजकीय मतें मला दुसऱ्या कोणाच्याहि राजकयि मतापेक्षा अधिक पटतात. उदाहरणच द्यावयाचें तर लोकमान्यांची कार्यपद्धति एखाद्या खऱ्या :व्यापाऱ्यासारखी असे. महात्माजींची कार्यपद्धति सट्टा करणारासारखी आहे. सट्ट्यांनी पैसे जलदी मिळतात, पुष्कळ मिळतात हें जरी खरें असलें तरी त्यांत पुष्कळच जोखीम आहे. आणि पदरचें घालवून फकीर व्हावयाची पाळीसुद्धा येऊं शकते, हें कोणी नाकबूल करणार नाही.

माझी इच्छा आपल्या हाताखाली काम करण्याची आहे. माझें राजकीय मत पहिल्यापासून तुमच्या लेखांनी घटलें गेलेलें आहे. पैशांनी मी स्वतंत्र: आहे. गुजराथी केसरी काढून माझा सदुपयोग कां करून घेत नाही ?

४२६

### १२ जुलै १९२२—गंगाधरराव देशपांडे यांची तार, मुंबई

गुरुवार—शुक्रवारी कमिटी भरवून काम करावयाचें ठरविलें आहे. अणे, अभ्यंकर यांना कळविलें आहे. डॉ. मुंजे यांना तारीख पसंत आहे. अणे, अभ्यंकर यांना तार करून केसरींत प्रसिद्ध करावें.

४२७

### २६ जुलै १९२२—बॅ. जम्मनादास मेहता, मुंबई

येत्या पहिल्या ऑगस्टच्या तारखेस आह्मी 'राष्ट्रसेवक' साप्ताहिक काढीत आहों. महाराष्ट्र पक्षाचे मुख्य पुढारी म्हणून तुमचा संदेश छापण्याकरिता आह्माला पाठवून द्या.

४२८

### २८ जुलै १९२२—बापूजी अणे, यवतमाळ

नॅशनॅलिस्ट प्रेसचा डायरेक्टर होण्याबद्दल जम्मनादास मेहता यांनी मला लिहिलें आहे. तरी तुम्ही स्वतः डायरेक्टर होणार असाल तर मला कळवावें,

म्हणजे मीहि तितके शेअर्स घेण्यास तयार आहे. केसरीला पाठविण्याकरिता म्हणून एक लेख लिहून तयार केला होता. पण अकोल्याचे बापट येऊन त्यांनी तो 'प्रजापक्षा'च्या खास अंकाकरितां नेला. तथापि गेल्या पंधरवड्यांत माझी लोकमान्यांचें चरित्र व कामगिरी या विषयावर पांचसहा ठिकाणीं व्याख्यानें झाली. तसेंच वर्धा म्युनिसिपालिटीकडून होणाऱ्या स्मारकाच्या पायाचा दगड बसविण्याचें कामहि झालें.

४२९

३ ऑगस्ट १९२२—बॅ. जम्मनादास मेहता, मुंबई

केसरीची गुजराथी आवृत्ति काढण्याची कल्पना अत्युत्कृष्ट आहे व माझ्याकडून होणारी शक्य ती मदत मी आनंदाने करीन.

४३०

३ ऑगस्ट १९२२—डॉ. मुंजे, नागपूर

दासबाबू ता. १३ ला सुटणार म्हणून ऑ. इं. कॉं. कमिटीने आपली सभा १५ तारखेस बोलावली आहे. कलकत्त्यास त्यांचें जंगी स्वागत करण्याचें ठरलें असून, सर्व प्रांतांचे पुढारी तेथे जमणार आहेत. आपण जावें कीं न जावें? न गेलें तर कदाचित् वाईट दिसेल की काय? तरी तुम्हाला काय वाटतें तें तारेने कळवावें.

४३१

८ ऑगस्ट १९२२—दादासाहेब करंदीकर, सातारा

लोकमान्य टिळकांचे केसरींतील लेख खंड पहिला नजर म्हणून पाठविला त्याचा मी प्रसाद म्हणून शिरीं धरून स्वीकार करतों. शिरीं ऊर्फ डोक्यांत, त्यांतील कांही भाग राहिल्यास लोकमान्य टिळकांचें रेसपॉन्सिव्ह कोऑपरेशनचें किंचित् स्वरूप उमटलें तर उमटेल. नाहीतर आपली प्रस्तुतची छाप जास्त झडपेची ठरून रेसपॉन्सिव्ह नॉन-कोऑपरेशन घेऊन उठेल.

४३२

८ ऑगस्ट १९२२—हेलेना नॉर्मन्टन, लंडन

फार दिवसांत तुमच्याकडून पत्र नाही. पण नुकतीच वर्तमानपत्रांत

तुमच्या सहभोजनसमारंभाची हकीगत वाचली. श्री. विठ्ठलभाई पटेल हेहि खूप मिजाशींत आहेत असें दिसतें. जशी कांहीं जॉनी वॉकरची व्हिस्कीच! तुमच्या गांधींसारख्या आध्यात्मिक सत्यवादी लोकांच्या जठरांना विठ्ठलभाई पटेलासारखे खडे कसे पचवितां येतात देव जाणे. तें मला एक कोडें वाटतें. असो. ता. १७ नोव्हेंबर रोजीं माझी बॅरिस्टरची परीक्षा होईल. एक्विटी शाखेकडील एका प्रमुख बॅरिस्टरच्या हाताखाली मी काम करणार आहें. डायव्होर्स कोर्टांतील एक खटला मला प्रथमच मिळणार आहे. माझे सासरे डॉ. क्लार्क हे हल्ली बव्हेरियामध्ये आहेत. ते आल्यावर साम्राज्यान्तर्गत होमरूलकरिता खटपट करणार आहेत.

४३३

२५ ऑगस्ट १९२२—निनांवी पत्र, मुंबई

महात्मा गांधींना शिव्या देण्याबद्दल तुम्हांला ऑनरेबल ही पदवी मिळेल. चार महिन्यांनी दिवाण व्हाल. १९२५ त Knight आणि असहकारितेची मनसोक्त बदनामी केल्यास Sir, Narasingrao Kelkar. Glorious Mr. Kelkar ! Is it not ?

X. Y. Z.

४३४

११ सप्टेंबर १९२२—केळकर यांचें श्री. पवार यास पत्र

अस्पृश्यांच्या परिषदेकरिता मला अध्यक्ष होण्याची तुम्ही विनंति करतां, पण सदर सभेस मला येतां येणार नाहीं याबद्दल दिलगिरी वाटते. न्यायबुद्धि असून पूर्वग्रह दूषित नसलेला असा कोणताहि मनुष्य माझ्याबद्दल गैरसमज करून घेणार नाहीं व अस्पृश्यांच्या उन्नतीकरिता मी आतापर्यंत जाहीर रीतीने काय काय केलें आहे हें तुम्ही तुम्हाला विचारणारांना बेलाशक सांगावें. पण ज्यांचीं मनें माझ्याविषयीं विकृत झालीं असतील त्यांचा गैरसमज दूर न झाल्यांची मला मुळींच पर्वा नाहीं. कांहीतरी सबब सांगून अध्यक्ष होण्याच्या अडचणींतून मी निसटून जाईन असें ज्यांना वाटत असेल त्यांना साफ सांगा कीं, त्यांच्या विरुद्ध बोलण्याने किंवा अशा बळजबरीने मी मुळींच येऊं शकणार नाहीं. या सभेविषयीं तुम्ही मला पुनः लिहिण्याचें कारण नाहीं. अस्पृश्यांची उन्नति व्हावी अशीच

सदिच्छा मी नेहमी बाळगिली आहे व त्यांच्या हिताकरितां प्रयत्न करण्यास मला माझ्यां वर्तमानपत्रांतून भरपूर वाव आहे.

४३५

**२३ सप्टेंबर १९२२—स्वामी रामानंद संन्यासी, सिमला**

मुलतानच्या दंग्यामुळे पंजाबमध्ये इतकी विलक्षण खळबळ झाली आहे कीं, तितकी मी गेल्या पंचवीस वर्षांत पाहिली नव्हती. पंजाबमधील हिंदुमुसलमानांचें ऐक्य आता संपलें आहे. हिंदूंच्या मनाची जखम भरून येण्यास बराच अवधि पाहिजे. मुसलमान पुढाऱ्यांनी निषेधाचा जाहीर मॅनिफेस्टो काढून हिंदूंना द्रव्यसाहाय्य केलें पाहिजे. मलाच काय पण या अन्यायाबद्दल सर्वच हिंदूंना संताप आला आहे. काँग्रेसच्या राजकारणांत घोटाळा झालाच आहे व अशी स्थिति राहिल्यास काँग्रेसचें जनतेवरील वजन उडून गेल्याशिवाय राहणार नाही.

४३६

**१८ ऑक्टोबर १९२२—रामानंद संन्यासी, सिमला**

आम्हांला राजकारणांत धार्मिक भावनेची मदत व्हावी. पण धर्म व राजकारण यांची गुंतागुंत नको. मुलतानच्या दंग्यामुळे या गोष्टीचा मी फार जोराने विचार करूं लागलों आहें. काँग्रेसच्या राजकारणांत धर्म आणावयाचा किंवा नाही या गोष्टीचा काँग्रेसला एकदा शेवटचा निकाल लावलाच पाहिजे. सर्व आशिया खंडांत पॅनइस्लामिक चळवळ चालू असून हिंदी राजकारणाला तो एक मोठा धक्का होय. पण हिंदी मुसलमानांना त्यांचें राष्ट्रहित हिंदुस्थानांतच आहे हें पटविल्याशिवाय वरील गोष्टीचा प्रतिकार करतां येणार नाही. हिंदु लोक स्वतः बलिष्ठ झाले तरच त्यांच्या मुसलमानी बांधवांना ही गोष्ट पटवून देतां येईल. काँग्रेसच्या वेळीं आपली भेट होईलच. मला एकवार महाराष्ट्र येऊन पहाण्याची इच्छा आहे. कारण माझ्या मतें महाराष्ट्र व पंजाब हेच भावी स्वराज्याचे खांब होत.

४३७

**१९ ऑक्टोबर १९२२—ऑर्थर मॅडोक, सरकारी सॅनिटरी इंजिनियर, पुणें**

पुणें ड्रेनेजसंबंधी तुम्ही पुणें म्युनिसिपालिटीचे ठराव मजकडे पाठविले. त्यासह मी माझेंहि एक टिपण मुंबई सरकाराकडे पाठविलें आहे. तुमच्या व

माझ्या विचारांत फारसा फरक नाही. ड्रेनेजच्या मुख्य पंपिंग स्टेशनचा सर्व खर्च सरकाराने केलेला आहे. म्हणून ज्या गोष्टींचा उपयोग नव्या पंपिंग स्टेशनकडे करतां येणार नाही त्या विकून आपली कांही रक्कम वसूल करतां आली तर पहावी असें सरकारास सहजच वाटतें. बंड गार्डन जवळील नदीच्या पाण्याची लेव्हल कमी करण्यासंबंधाने तुम्ही सूचना केली तिचा विचार चालू आहे; पण ती गोष्ट हटकून होईल अशी कबुली मात्र दिली आहे असें समजूं नका. ज्यास सॅनेटरी बोर्ड स्थापण्याची गोष्ट आजची नाही फक्त संभवनीय म्हणून सांगितली होती. इतरहि गोष्टींबद्दल तुमच्याशीं बोलावयाचें आहे तरी सवड काढून अर्धा तास भेटाल काय ?

## ४३८

### ९ नोव्हेंबर १९२२—एस. आर. बमनजी, लंडन

येत्या कॉंग्रेसमध्ये दासबाबू काय धोरण पत्करणार याबद्दल नुकतीच वर्तमानपत्रांत तार वाचली. माझा त्यांना पूर्ण पाठिंबा आहे. या ' अहिंसा 'त्मक राजकारणाने आम्ही शत्रूचे हात मात्र बळकट केले. तुम्ही व तुमच्या मित्रांनी कॉंग्रेस कमिट्यांचे राजीनामे दिले हें वाचून बरें वाटलें. कौन्सिलें बळकावून सरकारला आंतून पायबंद लावला पाहिजे. मॉंटेग्यू गेल्यापासून येथील इंडिया ऑफिसचें धोरण अत्यंत प्रतिगामी झालें आहे. मी तिकडे आल्यावर एखाद्या मतदारसंघातर्फे कौन्सिलला उभें राहण्यास तयार आहे.

## ४३९

### २९ नोव्हेंबर १९२२—केसरीचा एक वर्गणीदार, पुणें

प्रतिपक्षाचे डोळे न दुखवितां, त्यांत अंजन घालीत असतांनाच, स्वपक्ष समर्थन आपणास करीत असतांना पाहून जो आनंद होतो तो लेखणींतून दाखवितां येत नाही याबद्दल दिलगिरी वाटते. या आपल्या गुणाबद्दल केसरीची कामगिरी आपणावर सोपविण्यांत लो. टिळकांची पुण्याई व चतुराई जास्त का सोपविलेली कामगिरी पार पाडण्यांत तुमची पुण्याई कां चतुराई जास्त याचा उलगडाच माझे मूढ मनास होत नाही. संपूर्ण स्वराज्य फेर अगर नाफेरवाले कोणासच आज मिळत नाही. पण तूर्त तरी जनतेस कांही दृश्य फल पाहिजे व तें कौन्सिला-

पासूनच कांही तरी मिळेल असें वाटतें. किंवा तसें न झाल्यास ती मोडली तरी काय हरकत आहे ! टिळक पर्स फंडाच्या दिवशीं सभेंत गंगाधरराव देशपांडे यांनी प्रथम गहिवर आणणारें भाषण करून वरिष्ठ कौन्सिलकरिता टिळकांनी उभें रहावें व त्या द्वारें देशसेवा करावी अशी विनंति केली होती. तेच गंगाधरराव आज काय करीत आहेत ! या संबंधीचा खुलासा केसरींत कराल अशी आशा आहे.

४४०

१ डिसेंबर १९२२—तांबोळकर, म्युनिसिपल इंजिनिअर, पुणें

काल टिळक रोडवरील प्लॉटसंबंधीं मे. चीफ ऑफिसरसाहेब यांस विचारलें. त्यांनींहि दर फुटास सहा आणे किंमत आल्यास देण्यास हरकत नाही असें सांगितलें. आजचे टिळक रोडचे लिलावास मंडळी जमल्यास आपणास कळविण्यास आपटे यांना सांगितलें आहे.

४४१

८ डिसेंबर १९२२—गोविंद विनायक धायगुडे (स्टेट कारभारी), भोर

श्रीमंत पंतसचीव साहेब यांची स्वारी जमाबंदीकरिता तालुक्यास एकदोन दिवसांत जात आहे. तरी २० जानेवारी १९२३ चे पुढे आपणास कोणता दिवस सोयीचा आहे तें आगाऊ कळवावें. म्हणजे आम्ही त्या दिवशीं पुण्यास येऊन श्रीमंताचें वाड्यांत डेप्युटेशनचें भेटीचें काम पुरें करून घेऊं. शिष्ट मंडळाचे भेटीचा सांप्रदाय आपणास माहित आहेच. मंडळाने आपलें म्हणणें आमचे पुढे मांडावें. त्यावर स्टेटतर्फे आमचें काय म्हणणें आहे तें आम्ही आपलेपुढे ठेवूं. परंतु तेथें प्रत्यक्ष वादविवाद करण्याचें नसावें व नसतोंहि.

४४२

१४ डिसेंबर १९२२—सेन गुप्त व गंगाधरराव देशपांडे यांची तार, मुंबई

मिळेल त्या पहिलें गाडीने येथे येण्याकरिता तावडतोब निघा. तुमच्या मदतीची आम्हांस अत्यंत जरूरी आहे.

४४३

?—गंगाधरराव देशपांडे, मुंबई

वि. वि. आज सहा महिनेपर्यंत मी सार्वजनिक आयुष्यक्रमांतून बाजूला

होतों. आता तुरुंगांतून बाहेर आल्यावर महाराष्ट्र, कर्नाटक, वऱ्हाड, नागपूर वगैरे प्रांतांतील निरनिराळ्या मित्र मंडळीशीं माझीं भाषणें झालीं. त्या सर्वांत एकच गोष्ट मला प्रमुखपणाने दिसून आली ती ही की, हल्ली राष्ट्रीय पक्षामध्ये बरेच मत-भेद झालेले असून त्यांचें पर्यवसान राष्ट्रकार्य साधण्याचे दृष्टीने इष्ट होणार नाही असें वाटतें. पण या गोष्टीबरोबर दुसरीहि एक कल्पना तितक्याच ठळकपणाने नजरेस आली ती ही कीं, राष्ट्रीय पक्षांतील निरनिराळ्या मताच्या प्रमुख गृहस्थांनी एकत्र जमून संयुक्त असें धोरण निश्चयात्मक ठरविण्याचें मनांत आणलें तर तें एकंदर राष्ट्रीय पक्षांनी मान्य करणें अशक्य नाही. स्वतः माझें मत तसेंच असून वरील कल्पना सिद्ध करण्याविषयी जितकी खटपट करतां येईल तितकी करावी अशी माझी इच्छा आहे. तथापि अशा कामास सर्वांची संमति असल्यास सर्वांतर्फे एक कमिटी नेमून तिचा निकाल सर्वमान्य होण्याचा पुष्कळ संभव आहे. माझ्या मतें खालील गृहस्थांची कमिटी नेमल्यास त्यांचा निकाल राष्ट्रीय पक्षास पूर्ण मान्य होईल. ते गृहस्थ म्हणजे. रा. रा. चिं. वि. वैद्य (अध्यक्ष); रा. अभ्यंकर; नागपूरचे डॉ. मुंजे; रा. अणे; रा. कौजलगी; रा. खाडीलकर; रा. केळकर व मी स्वतः. मी त्या कमिटीचें पडेल तें कार्य करण्यास तयार आहें. या कार्यास मदत करण्याकरिता भाषणांतून, लेखांतून हल्ली एकमेकांत चालविलेले वाद तूर्त तहकूब ठेवावेत अशी माझी सर्वास आग्रहाची विनंति आहे.

### ४४४

### १० जानेवारी १९२३—रामस्वामी शास्त्रलु, मद्रास

स्वराज्य पक्षाच्या स्थापनेनंतर मला तुमची तत्क्षणीच भेट घ्यावयाची होती, पण झालें नाही. इकडे मद्रासेमध्ये कौन्सिलवादी पक्षाला योग्य पुढारी नसल्यामुळे त्याचें वजन नाही. सत्यमूर्ति व रंगस्वामी अय्यंगार हे बरीच खटपट करतात, पण त्यांच्यावर लोकांचा विश्वास नाही. ते दोघेहि बुद्धिवान व चतुर आहेत. पण आजच्या स्थितींत तरी त्यांचें तेज पडत नाही. तरुण लोकांवर राज-गोपाळचारियर यांचें वजन अतोनात आहे. अशा स्थितींत दोनहि पक्षाला सम्भाळणारा पाहिजे असलेला मनुष्य म्हणजे श्रीनिवास अय्यंगार होत. दुसऱ्या माणसावर आपली छाप टाकण्यांत ते पक्के धूर्त आहेत, व त्यांचीं मतें नाफेरवाल्यांपेक्षा स्वराज्य पक्षा-कडेच अधिक झुकतीं आहेत. या माणसाला वळवून घेतां आलें तर दुसऱ्या

पक्षाची बाजू बरीच ढासळेल. म्हणून तुम्ही अथवा दासबाबू इकडे येऊन व्याख्या-नांचा दौरा काढतां आला तर पाहा. याशिवाय एखादें वर्तमानपत्रहि आपल्या ताब्यांत यावयास पाहिजे. 'हिंदु' हा नुसता संधिसाधक आहे. 'स्वराज्य' बेपर्वा आहे. 'आंध्र-पत्रिका' तेलगू असून, त्याचे सदैव महाराष्ट्र पुढारी व दासबाबू यांच्यावर प्रहार चाललेले असतात. माझें तेलगू साप्ताहिक फक्त तुमच्या पक्षाचें आहे. 'स्वदेशी-मित्रम्'ची लोकसेवाहि चांगली चालली आहे. पण त्याला लोकांची खात्री पटवतां येत नाही. एका इंग्रजी पत्राची तरी आपणास फार आवश्यकता आहे. अय्यंगार हे आप-ल्याला मिळतील तर हें साधण्यासारखें आहे. दास नेहरू यांना घेऊन तुम्ही येथे याच; म्हणजे मद्रासमध्ये आपल्या पक्षाचा पाया बळकट करतां येईल. श्रीनिवास अय्यंगार यांना नव्या पक्षाचीं मतें पटतात. पण कॉंग्रेसच्या लोकमताविरुद्ध जाण्याचें धैर्य त्यांना होत नाही; तथापि तुम्ही व दासबाबू येथे आल्यावर आपण त्यांना पाहून घेऊं.

४४५

## २७ जानेवारी १९२३—कर्तारसिंग, अमृतसर

तुमची तार पोहचली. येरवडा जेलमध्ये असलेल्या शीख कैद्यांबद्दल तुम्ही जी काळजीपूर्वक विचारपूस केली त्याबद्दल शिरोमणि-गुरुद्वारप्रबंधक कमिटीतर्फे तुमचे आभार मानतों. अशीच यापुढेहि या गरीब लोकांची तुम्ही काळजी घ्याल अशी आशा आहे.

४४६

## १ फेब्रुवारी १९२३—जहांगीर पेटिट, मुंबई

कांही प्रमुख गृहस्थांना खाजगी रीतीने चर्चा करण्यासाठी ४ फेब्रुवारी रोजीं मी आपल्या घरीं बोलाविलें आहे. विषय हल्लीची राजकीय परिस्थिति हा आहे. बाबू चित्तरंजनदास व पं. मोतीलाल नेहरू येणार आहेत. तुम्हीहि त्या वेळीं आल्यास बरें वाटेल. तरी या.

४४७

## १० फेब्रुवारी १९२३—केळकर यांचें पं. नेहरू यांना पत्र

जयकर यांच्याशीं माझें बरेंच बोलणें झालें, त्यावरून अलाहाबादेस सभेच्या वेळीं कांही गैरसोयीचे प्रश्न उपस्थित होतील असें दिसतें. नागपूरच्या कॉंग्रेसनंतर

कांहीं होमरूलर लोक उदासीन वृत्ति स्वीकारून स्वस्थ बसले. त्यांना आपल्या गटांत ओढण्याचा त्यांचा बेत आहे. नाफेरवाले व फेरवाले यांच्यांत समेट झाला तर पाहावा, म्हणून पटेल यांनी त्रयस्थाची भूमिका घेतली आहे. या दोनहि मित्रांच्या प्रयत्नांमुळे आपल्या पक्षाचा अखेरं फायदाच होणार. पण त्याच्या आधी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे तुम्ही व दासबाबू यांच्या मतांमध्ये या वेळीं पूर्ण ऐकमत्य राहिलें पाहिजे हें होय, यत्किंचितहि मतभेद होऊं नये. अलाहाबादेस जर तुम्हा दोघांमध्ये मतभेद झाला, तर नव्या पक्षावर त्यासारखें दुसरें मोठें संकट नाहीं. तुम्ही स्वतः हे जाणतच असल्याने या बाबतींत मी आपण होऊन सल्ला देण्याचे कारण नाहीं; तथापि परिस्थिति थोडीशी नाजूक असल्याने मुद्दाम सुचविलें आहे.

महाराष्ट्र पक्षातर्फे मी इतकेंच सांगतों कीं, या एकीला माझ्याकडून झाली तर मदतच होईल, अडथळा केव्हाहि उत्पन्न होणार नाहीं. स्वतः मला प्रतियोगी सहकारिता मान्य आहे व श्रीनिवास अय्यंगार यांच्या सिनफेनच्या ठरावावर मी गयेच्या काँग्रेसमध्ये अनुकूल मत दिलें हे तुम्हास माहीत आहेच. गेल्याच 'मराठ्यां'त मी माझें मत व्यक्त केलें आहे. त्यांत असें म्हटलें आहे कीं, सध्या स्वराज्य पक्षाचें कार्य म्हणजे असहकारितेपासून जनतेचें तोंड पुनः कौन्सिलाकडे वळविणें हें होय. सरकाराची आम्ही कौन्सिलांत अडवणूक करणार इतकें आमचें वर्णन प्रतिपक्षाला पुरें आहे. आम्हांहि जास्त भेदाभेद पाहाण्याची जरुरी नाहीं. आपल्या पक्षाचा कार्यक्रम जितक्या थोड्या शब्दांत व मोघम मांडूं तितकें सर्वांसच बरें. आम्ही कौन्सिलांत शिरणार, तेथे अडवणूक करणार, राज्ययंत्र बंद पाडणार, हा आमचा कार्यक्रम. प्रतिपक्षाला ते जोपर्यंत सभेटाला पुढे येत नाहींत तोपर्यंत ज्याप्रमाणे आम्ही यापेक्षा जास्त शब्दाने उत्तर देऊं इच्छित नाहीं, त्याचप्रमाणे आपल्या पक्षांतदेखील एकेक मतांत काय काय श्लेष आहेत यांत आता मन घालण्याचा मोहहि आपण टाळला पाहिजे. आपल्या पक्षाचें निश्चित धोरण काय, हें कालमानाने अधिकाधिक स्पष्ट होत जाईलच. तोपर्यंत आपल्या पक्षाला सर्व बाजूंनी बळकटी कशी येईल हेंच आपण पाहिलें पाहिजे. म्हणून महाराष्ट्रांतून तिकडे अलाहाबादेस कोणी प्रतिनिधि येवो अगर न येवो; स्वराज्य पक्षाच्या सभेंत आता कोणतेहि तार्किक वाद उत्पन्न होऊन शेवटीं सभेचा बोजवारा न होईल इतकी तुम्ही जरूर दक्षता घ्या.

४४८

**१२ फेब्रुवारी १९२३—श्रीमत् शंकराचार्य (करवीर) यांचे कारभारी, यवतमाळ**

धर्मपरिषदेसाठी श्रींची स्वारी येथे आली आहे. परिषदेला जरूर येण्याचें करावें. श्रींना आपली आवश्यकता फार आहे. यंदाच्या परिषदेंत राष्ट्रीय सभेसारखी या संस्थेची कायमची घटना नियम वगैरे करून अगोदर वऱ्हाड प्रांतांत प्रयोगा-दाखल प्रत्यक्ष कार्यास सुरुवात करण्याचें ठरलें आहे. घटना व नियम करण्याच्या बाबतींत आपली मदत श्रींना जरूर पाहिजे आहे.

४४९

**१८ फेब्रुवारी १९२३—पं. नेहरू, अलाहाबाद**

समेटाच्या अटी काँग्रेसला पाठविण्याकरिता त्यांची पार्टीच्या सभेपुढे चर्चा करावयाची आहे, ताबडतोब या. ( तार )

४५०

**२० फेब्रुवारी १९२३—देशबंधु दास**

काय वाटेल तें करून इकडे येण्याकरिता ताबडतोब निघा. अशा महत्त्वाच्या वेळीं गैरहजर राहण्याचा तुम्हास हक्क नाही. ( तार )

४५१

**२१ फेब्रुवारी १९२३—सत्यमूर्ती, अणे, राघवेंद्रराव**

समेटाच्या अटी तुम्हास दाखविल्याशिवाय पाठवितां येत नाहीत. सर्व तुमच्यावर अवलंबून ठेविलें आहे. भोपटकरांना बरोबर घेऊन ताबडतोब निघा. ( तार )

४५२

**१८ फेब्रुवारी १९२३—डॉ. बाबासाहेब परांजपे, यवतमाळ**

यवतमाळ जिल्ह्यांतून शास्त्रीबुवांच्या कार्याकरिता २००० रु. आम्ही दिले आहेत. गंगाधरराव देशपांडे यांनी अजूनपर्यंत आपल्याकडे आपल्या धार्मिक कृत्याची व्यवस्था निश्चित नाही असें सांगितलें आहे. ता. २४।२ च्या सभेंत हा विषय मांडतों असें म्हणाले. हें त्यांचें धर्मफंडाचें पहिलेंच वर्ष असल्यानें व त्यांच्या

वडिलांनी आजन्म यज्ञ व अग्निहोत्र यांत आयुष्य घालविल्यामुळे त्यांच्या स्मारका-निमित्त अग्निहोत्रशाळा होणें हें अगदी योग्य आहे, व आपण तें कार्य कराल अशा समजुतीने हें पत्र मुद्दाम आपणास लिहिलें आहे. ट्रस्टतर्फे अर्ज करण्याचा तो श्री. बापुजींनी लिहून दिला आहे. तो शास्त्रीबुवा आपणाकडे पाठवतीलच. रु. ५०००: म्हणजे त्यांची अग्निहोत्रशाळा. पैकीं रु. २००० आम्ही दिले आहेत व रु. ३००० म्हणजे चालू वर्षाचा श्री. गंगाधरराव यांचा सर्व धर्मादाय इकडे दिल्यास एक अपूर्व स्मारक होऊन राहील. मीमांसाशास्त्र युनिव्हर्सिटींत ठेवलें. डॉ. भांडारकर यांच्या मतें असें स्कूल सबंध हिंदुस्थानांत नाही. डॉ. गंगानाथ झा पुस्तकें लिहीत व संपादीत आहेत. शिक्षणप्रसारक मंडळीने कॉलेजाची । म्हणून मीमांसाविद्यालयशाखा काढली आहे. तरी आपण व श्री. गंगाधरराव यांनी मिळून हें कार्य करून घ्यावें, अशी विनंति आहे. आपण तिकडे प्रयत्न या दृष्टीनेच उद्योग करावा, म्हणजे सध्याच्या आपल्या मतांना यश येईल अशी खात्री आहे.

४५३

२४ फेब्रुवारी १९२३—वा. रा. कोठारी, बार्शी

रविवार ता. ४ मार्च रोजी येथील अस्पृश्य विद्यार्थिगृहाच्या प्रारंभ-समारंभाकरिता आपणास येथे यावयाचें आहे हें आपल्या स्मरणांत असेलच. आपण सदर प्रसंगीं हजर राहणार म्हणून या जिल्ह्यांतील कित्येक लोक समारंभास येणार आहेत.

४५४

३ मार्च १९२३—ग. त्र्यं. माडखोलकर, स. ऑ. इं. सोसायटी, पुणें

ज्ञानप्रकाशच्या साप्ताहिक पुरवणीला आपणाकडून केव्हा तरी लेखन-साहाय्य मागण्याचा माझा विचार आहे. आपण तूर्त फार कामांत आहां व नेहमीच आपल्यामागे अनेक उद्योग असतात, पण आपल्या सवडीप्रमाणें केव्हा तरी आपण या नवीन वाङ्मयउपक्रमाला लेखन-साहाय्य द्याल अशी मला आशा आहे.

४५५

१९ मार्च १९२३—महादेवभाई देसाई, अहमदाबाद

महात्मा गांधींच्याबद्दल तुम्ही जो लेख लिहून पाठविला त्याबद्दल मला

किती कृतज्ञता वाटते म्हणून सांगूं. तो आम्ही केवळ 'यंग इंडियांतच' नव्हे तर 'नवजीवना'च्या गुजराथी व हिंदी आवृत्तींमध्ये छापला. तुमची स्तुति करण्याचें मला कारण नाही पण खरेंच सांगतों कीं, गांधीजींच्या खटल्याचा इतका सुंदर वृत्तान्त दुसऱ्या कोणी दिला नाही व तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाला देतांहि आला नसता. तुमच्या लेखाबद्दल खरोखरच तुमचा आभारी आहें.

शुद्धिसंघटनाबद्दल केसरींत मजकूर वाचला. मला वाटतें या वेळीं श्रद्धानंदजींनी शुद्धिसंघटनेच्या नांवाने हिंदुधर्माचें निशाण उभारावें हें अनुचित होय. अशा चळवळीची आवश्यकता खरोखरच आज भासूं लागली आहे कीं, श्रद्धानंदजींनी ती आपल्या मनाच्या कल्पनेंतूनच काढली आहे ? गुजराथेंतील खोजा मुसलमान लोक हे पूर्वी हिंदूच होते पण आज ते मुसलमान होऊन गेलेल्याला तीन शतकें अधिक झालीं. त्यांना आपल्याला बदलून घेण्यासाठी मुसलमानी धर्मांत हात कसा घालतां येईल ? त्यांना धक्का तरी काय म्हणून यावयाचा ?

४५६

## २७ मार्च १९२३—गोविंदजी वसनजी, मुंबई

विसापूर जेलमधून कैद्यांची स्थिति दिवसेंदिवस अतिशय निकृष्ट होत चालली आहे व मी हा प्रश्न हातीं घेऊन त्याचा एकदा कायमचा सोक्षमोक्ष करून टाकण्याचा निश्चय केला आहे. तुरुंगांतील या दुर्दैवी कैद्यांच्या स्थितीबद्दल आपणहि मला आपल्या केसरी पत्रांतून पाठिंबा दिल्यास मी आपला फार आभारी होईन.

४५७

## २८ मार्च १९२३—डॉ. मुंजे, नागपूर

शिवाजी उत्सवाकरिता राजेसाहेब भोसले बहुधा येऊं शकणार नाहीत असें मला वाटतें. सरकारकडून त्यांना पेन्शन मिळत असल्याकारणाने या बाबतींत त्यांना परवानगी विचारावी लागेल; म्हणून त्या संकटांत आपण त्यांना घालूं नये असें वाटतें. सरकारकडून आक्षेप येण्याची भीति नसलेला एखादा मराठा सरदार पहा, व इकडे मीहि दासबाबू अगर एखादा शीख अगर रजपूत सरदार मिळाल्यास पाहतों. बंगालच्या फाळणीच्या वेळीं ज्याप्रमाणे असा सांधा जोडून महाराष्ट्र व बंगाल यांना आपण जवळ जवळ आणिलें असेंच आताहि होण्यासारखें आहे.

४५८

८ एप्रिल १९२३—नानल वकील, रत्नागिरी

आरंभापासून कमेट्यांच्या गैरकायदेशीरपणांत पडावयाचें नाही असें आम्ही ठरविलें आहे व तोच निश्चय आम्ही कायम ठेवणार. परांजपे कंपूच्या विघ्नसंतोषी-पणाबद्दल आपणांस लिहितां यावें याच हेतूनें चिंतामणराव वैद्य यांच्या स्वागतमंड-ळास आलेल्या पत्राची नक्कल धाडीत आहे. दोन्ही पक्ष परिषदेस यावे आणि उभय पक्षांच्या बलाबलाची कसोटी लागावी अशी आमची इच्छा होती. परंतु नाफेरपक्ष परिषदेस आला नाही तर त्या पक्षाच्या कमकवुतपणाची ती एक कबु-लीच होईल.

४५९

१३ एप्रिल १९२३—बेगम हजरत मोहानी, नागपूर

कांही गुप्त कागदपत्रांवर मौलाना साहेबांच्याकडून जुलूम जबरदस्तीने सह्या घेतल्या आहेत असे कळते. तरी चौकशी करून खरा प्रकार कळवावा. (तार)

४६०

५ मे १९२३—जमनालाल बजाज, नागपूर

नागपूर येथे ता. १ मेपासून राष्ट्रीय झेंड्याच्या सत्याग्रहाला सुरुवात झाली हें आपण जाणतांच. नागपूरच्या स्टेशनमध्ये मिरवणूक अगर सभा यांना बंदी झाली आहे, व गव्हर्मेंट कम्युनिकमध्ये राष्ट्रीय निशाणामुळे सिव्हिल स्टेशनच्या रहिवाशांना चीड येते असें म्हटले आहे. हें सगळें अत्यंत अपमानास्पद असून राष्ट्रीय स्वाभिमान दुखविणारें आहे. या मनाई हुकमामुळे राष्ट्रीय झेंड्याच्या मिर-वणुकीच्या बाबतीत सुरू असलेला कायदेभंग स्पष्ट आहे. केसरी वरचेवर हा प्रश्न लोकांसमोर आणून त्याला सार्वत्रिक स्वरूप देवो असा भरंवसा आहे.

४६१

१५ मे १९२३—बापूजी अणे, यवतमाळ

लग्नसमारंभास तुम्ही याल असे फार वाटलें होतें. पण तुम्हास कामामुळे येतां आलें नाही असें दिसतें. तुमच्या हजर राहण्याने वधूवरांना आशीर्वाद मिळावा अशी आमची इच्छा होती. कट्टर असहकारितावाद्यांच्या लोकांपासून

तिकडले वातावरण दूषित न होऊं देण्याचा तुम्ही आटोकाट प्रयत्न करीत असाल. हा एक प्लेगच म्हणावयाचा, तो केव्हा कोठे उमटेल याचा कांही नियम नाही. शिवाय तो संसर्गजन्यहि फार, म्हणून तुम्ही तो पसरूं न देण्याची योग्य ती काळजी घ्यालच. येथील कट्टर असहकारितावादी आता राष्ट्रीय निशाणाच्या बाबतींत सत्याग्रह करणार आहेत. या निशाणामुळे आपणाला चीड येते असा गोऱ्या सरकारी अधिकाऱ्याने आव आणला आहे. पण जमनालालजी लोकांच्यावर आपला कितपत परिणाम करतात याचीच सरकार स्वस्थ बसून थोडी गंमत पाहात आहे. असहकारितावाद्यांना कायदेभंग करावयास लावून लोकमत चाळवावें व स्वराज्य पक्षाच्या हालचालींना खो घालावा असा सरकारचा कावेबाज हेतु आहे. या दृष्टीने सरकारची नोकरशाही व नाफेरवाल्यांची लोकशाही यांच्या हालचाली येथे पाहण्यासारख्या सुरू आहेत. वऱ्हाडांत अद्यापि नाफेरवाल्या वृत्तीचा रोग आला नाही हें भाग्य म्हटलें पाहिजे, व समशेरी म्यानांत राहूनच काम बिनबोभाट भागेल असें दिसतें. बुलढाण्याच्या परिषदेंत येऊन प्रत्यक्ष विरोध व मस्ती करण्याची अवाई उठली होती. पण अखेर वर्तमानपत्रांत एक मामुली तार छापून कांही मूठभर नाफेरवाले व खिलाफतवाले यांनी परिषदेवर बहिष्कार घातला. त्यावरून वऱ्हाडमधील नाफेरवाल्यांच्या अंगीं जाहीर रीतीने भांडण्याला बुद्धिबळ नाही हें दिसतेंच आहे. पण स्वराज्य पक्षाच्या स्थापनेमुळे काम इतकें वाढलें आहे कीं, कांही हुषार व कार्यकर्त्या लोकांचा संघ निर्माण करून उमेदवारांच्याकरिता खेड्यापाड्यांत जाऊनहि खटपट केली पाहिजे.

## ४६२

### १८ मे १९२३—वल्लभभाई पटेल, अहमदाबाद

तुमच्या तारेबद्दल फार आभारी आहे. महात्माजींच्या प्रकृतीबद्दल मोठ्या भयप्रद बातम्या आम्ही ऐकल्या होत्या, पण त्यांना अतिसार झाला असून त्यांची तब्येत आता बरी आहे असें कळतें. कस्तूरबाई गांधी या पुण्यास गेल्या आहेत त्या महात्माजींची भेट घेतीलच.

## ४६३

### १७ जून १९२३—व्रजलाल ठक्कर, बोरीवली

गुजराथी केसरीची योजना मागे पडून मला काम करण्याची संधि मिळाली

नाही. तरी 'गुजराती' पत्रांत दर आठवड्यास तीनचार कॉलम आपला पक्ष विचार-समर्थक लेख लिहिण्यास मला संधि मिळतेच. त्यांनी माझा अनुभव आणि आत्म-विश्वास वाढतो. केसरीचे प्रासंगिक किंवा स्फुट सूचनांसारखे आठदहा विषयांवर मी लिहितों. मुंबईस गांठ पडेलच. आपणास पत्र लिहितां गय होण्याचें कारण आपल्या वेळेच्या किमतीचा विचार आहे. आपलें स्मरण केल्याशिवाय मात्र एकहि दिवस जात नाही.

४६४

२० जून १९२३—बा. गं. खेर, सेक्रेटरी स्वराज्य पक्ष, मुंबई

येथील स्वराज्य पक्षाच्या शाखेच्या कामाचें अद्याप मनासारखें बस्तान बसलें नाही. म्हणून तुमच्याशीं एकवार चर्चा करावी अशी सर्वांची इच्छा आहे. तसेच पुष्कळ सभासदांच्या मनांतून तुमचें एक जाहीर व्याख्यान व्हावेंसें आहे. तरी तुम्ही आल्यास पुष्कळ गोष्टी निकालांत निघतील.

४६५

२५ जून १९२३—केळकर यांचें ऑटो रॉथफील्ड यांना पत्र

मिसेस रॉथफील्ड वारल्या हें ऐकून वाईट वाटलें. त्या, तुम्ही व मी मिळून त्या दिवशीं जळगांवीं किती गप्पागोष्टी केल्या! पुणें डिस्ट्रिक्ट सेंट्रल बँकेच्या कामाबद्दल तुम्ही अनुकूल मत प्रगट केलें त्याबद्दल आभारी आहें. तुमचें पत्र सभेला वाचून दाखविलें. काल व आज मिळून बँकेच्या सभेचें काम ७ तास चाललें होतें. पण तींत शेवटी आमच्या प्रतिपक्षाला यश आलें नाही. रिपोर्ट व ताळेबंद बहुतेक जसेच्या तसे पास झाले. लक्ष्मी रोडवर २० हजार रु. खर्चून बँकेच्या इमारतीला जागा विकत घेतली. तिच्यावर इमारत बांधण्याला ३० हजार रुपये लागतील. ही गोष्ट प्रति-पक्षाला कबूल करावी लागली. ही डिस्ट्रिक्ट बँक बँकांचीं इतर कामें करण्यास अधिकृत राहावी याला फार विरोध झाला. पण मी सभेला म्हणालों कीं, बँकेंतील ज्या ठेवींच्या जीवावर तुम्ही उड्या मारता त्या कांही शेतकी सोसायट्यांकडून आलेल्या नाहीत. शेतकी सोसायट्यांशीं संबंध नसलेल्या तुमच्या आमच्या सारख्या नागरिकांकडूनच आलेल्या आहेत. तेव्हा या बँकेला इतर सामान्य बँकां-प्रमाणे काम करण्याचा अधिकार कां नसावा ?

तात्पर्य, सर्व गोष्टी माझ्या मनासारख्या झाल्या. आता इतर कामें राजकीय वगैरे वाढूं लागलीं. म्हणून एक वर्षभर बँकेच्या चेअरमनची जागा आपणाकडे न ठेवण्याचें मी ठरविलें आहे.

४६६

३ जुलै १९२३—बॅ. जयकर, मुंबई

पटेल हे आपल्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणे अनेक कारवाया व भानगडी उत्पन्न करीत आहेत, व त्यामुळे मला असेंब्लीकरिता उभें राहण्याचा विचार सोडून देऊन मुंबई कौन्सिलकरिताच उभें राहावें लागेल असें दिसतें. केवळ त्या गरीब बिचाऱ्या दासबाबूकडे पाहून एकी राखण्याकरिता मी शिकस्त करीत आहें.

४६७

४ जुलै १९२३—बॅ. बा. ग. परांजपे, मुंबई

टिळक—चरित्राबद्दल आपलें अभिनंदन करतों. आजवर कोणाहि राजकीय पुढाऱ्याचें अधिकारयुक्त चरित्र त्याच्या देहावसानानंतर इतक्या थोड्या अवधींत लिहिण्याचें धारिष्ट जवळच्या मित्रांनी अगर शिष्यांनी आजवर दाखविल्याचें माझ्या पाहण्यांत नाही. गोखले हे रानड्यांचें बौद्धिक ऋण न फेडतांच गेले. गोखल्यांचेंहि चरित्र आजवर झालें नाही. आपल्या उदाहरणाने त्यांना स्फूर्ति न झाली तर रानड्यांबरोबर गोखल्यांची गत झाली असें म्हणावें लागेल.

गेल्या शतकांतील आपल्या सर्वांच्या मताने अत्यंत मोठ्या माणसाचें चरित्र मोठ्या प्रमाणावर असून त्यांतील अवघड भाग आपण इतक्या त्वरित हातावेगळा करूं शकलां, या एका गोष्टीने आपल्या कर्तृत्वाबद्दल आम्हा तरुण पिढीच्या मनावर खरोखर खोल ठसा उमटावयास पाहिजे. कॉंग्रेस काम, स्वराज्य पार्टीचें काम, म्युनिसिपालिटीचें काम, व केसरी मराठ्याचें काम, ही सर्व संभाळून हा ग्रंथ हातीं पडेल अशी मला कांही कल्पना नव्हती.

४६८

५ जुलै १९२३—दा. वि. गोखले, मुंबई

श्रीयुत नेने भेटले होते. टिळक—बंधूंनी त्यांच्यावर केलेल्या फिर्यादींत एक मौज आहे कीं, त्यांना एक नवें वुईल सांपडलें आहे म्हणे! पटेल व जम्नादास दोघेहि

आताच भेटले. त्यांच्या व जयकरांच्या भांडणांत आपणास घालून आपला उपयोग करूं इच्छितात. त्यांचें म्हणणें की, आपण युनिव्हर्सिटीस उभें राहावें. जयकरांचा छळ करावयाची ही बुद्धि आहे. मी त्यांना स्पष्ट सांगितलें कीं, तात्यासाहेब उभे राहिले तर ते असेंब्लीकरिता उभे राहणार. आपण त्यांचें ऐकून योग्य तें करावें.

४६९

५ जुलै १९२३—देशबंधु दास, मद्रास

ऑ. इं. कॉं. कमेटीच्या सभेस शक्य तितके लोक हजर राहण्याकरिता बरोबर आणावे. मला अकोल्यास येतां येणार नाही. किती प्रतिनिधींना आणता तें तार करून कळवा.

४७०

५ जुलै १९२३—वासुदेवशास्त्री खरे, मिरज

टिळकचरित्राचा पहिला भाग पाठविलात तो पोंचला. फार आभारी आहें. सावकाशपणें वाचून पाहीन व कमजास्त आढळल्यास कळवीन. 'विलायतचीं बातमीपत्रें' हें बुक पूर्वी आलें तें वाचून झालें आहे. फार मनोरंजक वाटलें. माझी नात बनताई इची पत्रिका येथील पंचांगाप्रमाणें करविली आहे. परंतु टिळक पंचांगाप्रमाणें ती केलेली बरी. तरी तेथील कोणी त्या मताचे गणक ती पत्रिका करून देतील काय ? कळवावें.

४७१

६ जुलै १९२३—बॅ. जयकर, मुंबई

ऐसें ऐकतों कीं, युनिव्हर्सिटीतर्फे तुम्ही लोकल कौन्सिलला उभें राहावें अशी खटपट तुमच्याकडे येऊन माझे हित—शत्रु—मित्र (?) करणार आहेत. त्यांची इच्छा अशी कीं, कोणीकडून तरी माझी अडवणूक करावी व माझी फजिती करावी. तुमच्या गैरमाहितीचा फायदा त्यांनी घेऊं नये म्हणून मोकळेपणाने लिहिलें आहे.

४७२

६ जुलै १९२३—एस्. बी. परिषवाड, मल्लेश्वरम्

आपलें टिळकांचें—चरित्र पुस्तक तयार झाल्याचें वाचून कालचा दिवस

उत्सवाचा वाटला. चिपळूणकरांच्या चरित्रानंतर रानडे यांचें चरित्र गोखल्यांच्या-कडून झालें नाहीं ! त्यानंतर आपलेंच पुस्तक पाहतां या दृष्टीनें आपण भाग्यवंत आहां असें दिसतें.

४७३

### ९ जुलै १९२३—कृष्णाजी आबाजी गुरुजी, खरवली ( महाड )

टिळकांचें चरित्र स्मरणपूर्वक पाठविलें याबद्दल किती आभार मानावेत, हें लिहून दाखवितां येत नाहीं. प्रस्तावनेंत ग्रंथ—प्रकाशनाच्या ज्या मुदती दिल्या आहेत त्या पाहून हल्लीच्या फेरनाफेर भानगडींवरून दुसरा भाग माझी इहलो-कची यात्रा संपण्यापूर्वी दृष्टिस पडेल किंवा नाहीं याचा संशय वाटतो. माझे ह्या-तींत जर चरित्र पूर्ण झालें नाहीं तर माझी आशा त्यांत गुंतून पिंडास कावळा शिवणार नाहीं. असो. काय घडेल तें खरें.

४७४

### १३ जुलै १९२३—एन्. बी. देसाई, कोल्हापूर

सद्गुरूच्या सच्छिष्यानें चरित्र लिहिलें आहे तेव्हा पक्षपातित्वाचा दोष सहजच येण्याचा; परंतु या खंडांत तरी तो मला कोठेंहि दिसून आला नाहीं. जेवणाची वेळ खेरजि करून टिळक चरित्र अहोरात्र वाचून टाकिलें. तरी या उतारवयांतसुद्धा मला शीण तर वाटला नाहींच परंतु आनंदच झाला. तुमचे इतर उद्योग अहर्निश चालू असतां इतकें उत्कृष्ट चरित्र, इतक्या थोड्या कालांत, सुंदर भाषेनें व सुंदर मांडणीनें तयार करून छापून प्रसिद्धहि केलें. आणि कै. गोखले यांच्यामुळे ज्यांना प्रसिद्धी आली अशा त्यांच्या अनेक भक्तांपैकी एकालासुद्धा त्यांचें या तऱ्हेचें चरित्र लिहिण्याची बुद्धि व सामर्थ्य असूं नये ही गोष्ट त्यांच्या बोलघेवडेपणाची व कर्तृत्वशून्यतेची दर्शक असून, कै. गोखले यांच्याबद्दल अभिमान बाळगणाऱ्या मला अतिशय दुःखद झाली.

४७५

### १९ जुलै १९२३—वि. गो. विजापूरकर, तळेगांव

टिळक चरित्र हातीं येतांच प्रथम कोल्हापूर-प्रकरण वाचलें. त्याची हस्त-लिखित प्रत अगोदर पाहिली असती तर ज्या कोल्हापूर प्रजेसाठीं टिळक व

आगरकर इतके कष्ट पावले तिला त्या महात्म्याबद्दल काय वाटत होतें, आम्ही विद्यार्थिदशेंतील मंडळी या प्रकरणासाठी आपले उद्योग विसरून किती आतुरतेने झटत होतों, व लहानसहान संकटें सोसत होतों, तो कांही भाग आपणास कळविला असता. डिफेन्स फंडासाठी आम्ही 'भ्रांतीकृत चमत्कार' हा खेळ केला. पण उत्पन्न न झाल्यामुळे आपसांत वर्गणी करून रु. ३५ सच पाठविले. एक महिनाभर टाइम्सची वर्गणी भरून, जनरल पोस्ट ऑफिसांत तें पत्र घेण्यासाठी जाऊन, उघड्या मैदानांत खटल्याची हकीकत २५-३० विद्यार्थी ऐकत व वाचीत असूं. मग सायंकाळीं दिवस बुडतां गांवी येत असूं. ही गोष्ट बर्वे वगैरे अधिकाऱ्यांस खपली नाही, व बेचाळीस लोकांस हद्दपार करावें असा बेत चालला होता. त्यांत माझें स्वतः नांव ऐकूं येत होतें. पण श्री. मातोश्री बडोदेकर महाराणीसाहेब यांनी बरव्यांची कानउघाडणी केली म्हणून हें प्रकरण दबलें. पत्रे बनावट नव्हती असा माझा स्वतःचा अचल ग्रह आहे. म्हणून माफी मागावयास नको होती असें आमचें सर्वांचें म्हणणें होतें. परंतु आम्ही तरुण मंडळींचा तिळमात्र आदर कमी झाला नाही. आणि टिळक आगरकर ऑक्टोबर २५ ला सुटले त्याच रात्रीं आम्ही पी. इ. परीक्षेसाठी जेथे राहिलों होतों त्या ठिकाणीं थाटाची मेजवानी दिली.

भाग २१ मध्ये डेक्कन सभेवरच्या आर्टिकलांतील सभ्यतेच्या होमाबद्दल तुम्ही स्पष्ट लिहिलें याबद्दल मला बरें वाटलें. भाग ८ व ९ यांत स्वतःचें मत असें निक्षून दिले नाही, व एकंदरीने सर्व प्रतिपक्षाविषयी म्हणून लिहिलें आहे. चरित्रनायक व चरित्रकार या दृष्टीने असेंच असणें अपेक्षित होतें. तुमच्या एकंदर ग्रंथाची भाषा सुंदर व चटकदार वठली आहे. बुद्धिपुरःसर व्यक्तिद्वेषाने नांवें ठेवणारे लोक वाटेल तें बोलोत किंवा लिहोत; पण सर्व मजकूर सरळपणाचा व तुमच्या नेहमीच्या सौजन्यास साजेल असाच आहे.

### ४७६

### २० जुलै १९२३—मि. ग्विन, पुणें

दिवाणगिरीच्या काटे लगामांतून चिंतामणी एकदा मुक्त झाले. त्यांची माझी कांही दिवसांपूर्वी गांठ पडली होती व त्यांचा माझा जुना स्नेह असल्याने आम्ही बराच वेळ बोललों. नेमस्तांना धीर देऊन ते जास्त हुषार करण्याचा प्रयत्न करतील हें तुमचें म्हणणें मला पटतें. पण राष्ट्रीय व नेमस्त पक्षांतील फरक

मूलभूत तत्त्वाचा व खरा आहे. पण राजकारणांत जसजशी प्रगति होत जाईल त्याप्रमाणे ही सीमारेषाहि बदलत जाईल हें उघड आहे.

४७७

## २० जुलै १९२३—केळकर यांचें देशबंधु दास यांना पत्र

नागपुरास ठरल्याप्रमाणे तुम्हास रु. २५०० चेकने पाठवीत आहें. तुमच्या वर्तमानपत्राच्या लिमिटेड कंपनीमध्ये जमा करावे, व केसरी व मराठा ट्रस्टच्या नांवें शेअर लिहून द्यावेत.

४७८

## २५ जुलै १९२३—वामनराव मुकादम, गोध्रा.

गयेस तुम्हांस विचारल्याप्रमाणे तुमच्या 'मराठे व इंग्रज' पुस्तकाच्या पहिल्या भागाचें गुजराथींत भाषांतर केलें. इंदुलाल याज्ञिक तें प्रसिद्ध करणार आहेत. १० ऑगस्टनंतर भेटेन. टिळक-चरित्राची प्रत मला अद्याप मिळाली नाही.

४७९

## १५ ऑगस्ट १९२३—द. के. केळकर, पांचगणी

आपण पाठविलेला New Republic मधला A Basis for Criticism हा लेख वाचला. लेखकाचें असें म्हणणें दिसतें कीं, टीकाशास्त्राला आजपर्यंत शास्त्रशुद्ध पाया नव्हता तो यापुढे घातला पाहिजे. काव्य किंवा कला यांजवर सरस-नीरसतेचा शिक्का मारण्यापूर्वी त्यांचें ध्येय काय हें ठरविलें पाहिजे. हें ध्येय ठरलें म्हणजे तें ज्या मानाने साध्य झालें असेल त्या मानाने काव्याचा दर्जा ठरवितां येईल. सौंदर्यवादी (Aesthetical) हे अमूर्त सौंदर्याला मूर्त स्वरूप देणें हेंच काव्यकलांचें ध्येय मानतात. पण सौंदर्याचे घटक कोणते याच्याविषयी ऐकमत्य नाही. सौंदर्य म्हणजे काय हें निश्चित ठरवितां आलें, म्हणजे टीकाविषयीभूत काव्यांत तें किती प्रमाणांत हजर आहे हें ठरवितां येईल. लेखकाने याचें उत्तर असें दिलें आहे कीं, सौंदर्य हें बाह्य वस्तुनिष्ठ आहे म्हणण्यापेक्षा आत्मनिष्ठ आहे असें म्हणणें जास्त सयुक्तिक होय. काव्याकडे मानवी मनाचा ओढा कां असतो याचें परीक्षण केलें म्हणजे सौंदर्याचें हृद्गत आपणास सांपडेल. लेखक पुढे म्हणतो कीं लौकिक जगांत ज्या आकांक्षा तृप्त करून घेतां येत नाहींत, त्या

काव्याने प्रदीप्त केलेल्या कल्पनेच्या साहाय्याने तृप्त करून घ्याव्या, हें काव्याच्या आवडीचें बीज होय. अर्थात् ह्या आकांक्षा तृप्त करण्याचें साधन हेंच काव्यांतील सौंदर्य होय. ह्या सर्व विचारसरणीचा रोख Art for art's sake ह्या मताच्या विरुद्ध आहे. ह्या मताचे लोक म्हणतात कीं काव्यांत मुख्यतः सौंदर्य पहावयाचें असतें, व सौंदर्य हें विषयापेक्षा त्याच्या मांडणींतच अन्तर्भूत झालेलें असतें. त्यामुळे काव्याचा विषय काय आहे हें पाहण्याची जरुरी नाही. आकांक्षा-परिपूर्ति ही सौंदर्याची उपपत्ति ग्रहण केली म्हणजे प्रतिपादनशैलीबरोबर मुख्य विषय ही जमेस धरणें जरूर होतें. सौंदर्याची नीटशी उपपत्ति नसल्यामुळे त्यावर उभारलेली टीकापद्धति चुकीची ठरली असें लेखकाने दाखविलें आहे. टीकाशास्त्राचा पाया शुद्ध करण्याकरिता काव्यध्येय व सौंदर्य यांची मीमांसा करणें जरूर आहे, व ही मीमांसा मुख्यतः मानसशास्त्राच्या आधारें केली पाहिजे असें लेखकाचें म्हणणें आहे.

अमेरिकन लेखकांमध्ये विषय ठांसून व अभिनिवेशपूर्ण मांडण्याची जी एक सर्व-साधारण लकब दिसते ती या लेखांतहि दिसून येते. आजपर्यंत प्रचलित असलेली सर्व काव्यटीका हा स्वैरालाप होय असें दणकून विधान लेखकाने केलेलें आहे. काव्याचें ध्येय आनंद, व ज्या गुणामुळे आनंद होतो तें काव्यांतील सौंदर्य, ह्या गोष्टी सर्वांना माहीत आहेत. त्या सौंदर्याचें शास्त्रीय परीक्षण करतां आलें नाही म्हणून तन्निष्ठ सर्व टीका निष्फळ असें म्हणणें चुकीचें आहे. कारण आनंद आणि त्याचें कारण सौंदर्य हीं दोनहि स्वसंवेद्य आहेत. उद्या शास्त्राला सौंदर्याचें पृथक्करण करतां आलें तरी, अमुक वस्तु आवडली पाहिजे व अमुक न आवडली पाहिजे असा हुकूम थोडाच फर्मावतां येणार आहे! तेव्हा मानसशास्त्रदृष्ट्या काव्यानंदाचें किंवा काव्यसौंद-र्याचें परीक्षण झालें तरी टीकाशास्त्रांत त्यामुळे मोठें परिवर्तन होणार आहे असें नाही. टीकाशास्त्र हें आवडीनिवडीचें शास्त्र आहे. त्या आवडीनिवडीचें शास्त्रीय स्वरूप कळलें वा न कळलें तरी आवडनिवड पूर्वीप्रमाणेच राहणार, आणि त्यामुळे तन्निष्ठ टीकाशास्त्र हेंहि पूर्ववतच राहणार.

काव्याचें परीक्षण करून दर्जा ठरवितांना मूळ विषयापेक्षा त्याच्या प्रति-पादनाकडे जास्त लक्ष दिलें पाहिजे ह्या मताला लेखकाने दिलेलें उत्तर योग्य आहे. विषयापासून त्याची प्रतिपादनशैली बाजूस काढून प्रतिपादनशैलींतील कौशल्य हें

आनंदाचा स्वतंत्र विषय करणें हें तज्ज्ञास साधलें तरी, सर्वसाधारण माणसास शक्य नाही. आणि काव्य हें सर्वांकरिता आहे.

असो. माझा ' काव्यानंदाचा ' लेख विविधज्ञानविस्ताराच्या जूनच्या अंकांत आला आहे. त्यानंतर ' काव्यप्रेम ' नांवाचा दुसरा लेख पाठविला आहे, व तो सप्टेंबर व ऑक्टोबर या दोन अंकांत मिळून छापणार आहेत, असें पत्र आलें आहे. त्या लेखांत Art for art's sake या मताचा परामर्ष घेतला आहे. मी सप्टेंबरच्या पहिल्या तारखेस तिकडे येईन. रॉयल ए. सोसायटींतून मिळाल्यास (1) Sanity of Art by Bernard Shaw (2) What is art? by Tolstoy (3) Critical essays of Goetho हीं पुस्तकें पाहिजे आहेत. येथील एक मास्तर मुंबईस जाऊन येणार आहेत. तरी सोसायटीस चिठी दिल्यास तीं पुस्तकें मिळतील.

४८०

ता. ६ ऑक्टोबर १९२३—माधवराव लेले, इंजीनियर, लष्कर ग्वाल्हेर

लोकमान्यांच्या चरित्रासंबंधी स्वतःचें मत कळवून आपलें मनापासून अभिनंदन करावें, असें त्या चरित्राचा पूर्व भाग वाचल्यापासून प्रत्यहीं वाटत होतें. त्या ऋणांतून आज कसाबसा उतरायी होतां येत आहे याबद्दल मला मनापासून आनंद होत आहे. टिळकांचें यथावत् चरित्र लिहिण्याची पात्रता आपल्याइतपत दुसऱ्या कोणाच्याहि अंगी नव्हती व नाही. आपण तें काम अंदाजापेक्षाहि अप्रतीम चांगलें, मनोवेधक, बोधप्रद आणि महाराष्ट्र वाङ्मयाला भूषणभूत असेंच लिहिलें आहे. असें सर्वांगसुंदर चरित्र, सवडींत सवड निघून, आपल्या हातून निर्माण झालें, याबद्दल आपल्यापेक्षा सर्व महाराष्ट्रच जास्त अभिनन्दनीय व भाग्यवान असें मी समजतों. टिळकांचा व माझा सहवास १८७५ पासून त्यांच्या अखेर दिवसापर्यंत चांगलाच राहून कायम होता. त्या थोर पुरुषाची मजवर नेहमी कृपा कायम राहिली. ते डोंगरीच्या तुरुंगांत जाण्याकरिता हायकोर्टांतून रवाना झाले, त्याच दिवशीं मी व कै. डॉ. करंदीकर मेडिकल कॉलेज सोडून न्यू. इं. स्कूलमध्ये सामील होण्यासाठी त्यांना सांगून गेलों. पुढें फाटक, केळकर, धारप वगैरे आल्याने आमचें काम उरलें नाही.

टिळक चरित्रांत आपण असें लिहिलें आहे कीं, वासुदेव बळवंत फडके

फांशी गेले तें मात्र बरोबर नाही. तसेच ग्वाल्हेरचे कै. परचुरेसाहेब हे टिळकांचे साहाध्यायी होते तेंहि बरोबर नाही.

४८१

**६ ऑक्टोबर १९२३—महादेवभाई देसाई, साबरमती**

म. गांधींच्या आजाराविषयी तुम्ही ऐकलेंच असेल. त्यांच्या जन्मदिवसाच्या रात्रींच त्यांच्या आजाराने एकदम उलट खाल्ली. आणि आम्ही गेले चार दिवस मोठ्या काळजींत काढले. प्रत्येक तासाला त्यांची शक्ति अधिकाधिक क्षीणच होत चालली आहे. ती केवळ अन्नाने भरून येणार नाही. सर्वांत अनिष्ट गोष्ट ही कीं, गांधीजींच्या मनाने असें घेतलें आहे, व आंतून अशी जाणीव उत्पन्न झाली आहे असें त्यांना वाटतें कीं,—जगांतील आपलें कार्य आता संपलें व आपले प्राण कुडींतून कोणत्याहि क्षणीं निघून जातील अशी अपेक्षा करावी. दिवसांतून निदान ५।६ वेळ ते गीतेचा दुसरा अध्याय वाचवून घेतात, आणि "एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति। स्थित्वा अस्यां अन्तकालेऽपि ब्रह्म निर्वाणमृच्छति।" या श्लोकाचा उदात्त पण दुःखगंभीर अर्थ लक्षांत घेऊन तो ते घोळवितात. त्याना वाटतें कीं, ही दिव्य ब्राह्मी स्थिति आता आपणाला प्राप्त झाली आहे. मग याला तुम्ही मुमूर्षा म्हणा किंवा मोक्षेच्छा म्हणा. पण आम्हाला मात्र संकटाने ग्रासलें, राष्ट्राला ग्रासलें असें वाटतें. पण याला कांही इलाज करतां येईल काय ?

तुम्ही आपल्या स्नेह्यांस हें पत्र दाखविण्यास हरकत नाही. तुमची माझी प्रत्यक्ष ओळख झालेली नाही; परंतु ही हकीगत तुम्हाला लिहावी असें मला वाटलें म्हणून लिहिली आहे.

४८२

**२० ऑक्टोबर १९२३—पं. मोतीलाल नेहरू, प्रयाग**

कृपा करून नानावटी व जमनादास मेहता यांत मध्यस्थी करून गुजराथ मतदारसंघातर्फे कोणी उभें राहावें हें ठरवा. विठ्ठलभाई पटेल हे शक्य तर तुम्हाला मदत करतील. नाही तर आपल्या कार्यकारी कौन्सिलाची सभा बोलावण्यावांचून गत्यंतर नाही.

### ४८३

### २२ नोव्हेंबर १९२३—एम्. के. आचार्य, मद्रास

तुम्ही असेंब्लीकरिता निवडून आलां याबद्दल मनःपूर्वक अभिनंदन करतों. इतकीं वर्षें तुम्ही ठळक रीतीने देशसेवा केली त्याअर्थी तुमच्या निवडणुकीबद्दल शंकाच नव्हती. पण स्वराज्य पक्षाचे जवळजवळ सर्व उमेदवार यशस्वी झाले हें पाहून अंतःकरणाला आनंदाचें भरतें येतें. पटेल व मेहता ही जुनी मंडळीहि पुनः असेंब्लींत दिसतील. आपल्या पक्षावर तुमच्या म्हणण्याप्रमाणे जबाबदारी पडली आहे हें खरेंच. पण कोकोनाडा येथे जमून आपण कार्यक्रम आंखूं. त्यांत बंगालचाहि आपणाला पाठिंबा मिळेल. लॉर्ड रेडिंग यांचें आव्हान बेलाशक आता स्वीकारण्यास हरकत नाही. या आव्हानाला लोकपक्षाकडून जबाब किती ठणठणीत मिळणार आहे, त्याची लॉर्ड रेडिंग यांना कल्पनाहि नसेल.

### ४८४

### २३ नोव्हेंबर १९२३—सुरेंद्रनाथदास, हिंदुस्थान सेवासमिति, अमेरिका

अमेरिकन सरकाराने १९ फेब्रुवारी रोजीं हिंदी लोकांचा अमेरिकन नागरिकत्वाचा हक्क काढून घेतला. वरिष्ठ कोर्टाने भगतसिंग यांच्याविरुद्ध निकाल दिला. आम्ही या हक्काकरिता आज चार वर्षें झगडत आहों. हिंदुस्थानांतून मात्र आम्हांला मुळीच साहाय्य मिळत नाही. यामुळे परराष्ट्रांच्या दृष्टीने आम्ही अगदीं हलके ठरतों. मुंबई युनिव्हर्सिटीचे पदवीधर सखाराम गणेश पंडित यांचा दावा मात्र त्यांच्यासारखा झाला. कॅलिफोर्नियांतील कामकरी लोकांनी त्यांना पैशाची मदत केली. पण त्याच कोर्टाने अक्षयकुमार मुजुमदार यांचा दावा १९१४ सालीं रद्द केला होता. यावेळीं हिंदी राष्ट्राने आपल्या हक्काची घोषणा करून उठलें पाहिजे, आणि आपली राष्ट्रीय भावना अमेरिकेच्या कानांत गर्जून सांगितली पाहिजे. तरी या कामीं तुम्ही कांही खटपट करावी व हा प्रश्न राष्ट्रीय सभेपुढे ठेवावा.

### ४८५

### २७ डिसेंबर १९२३—हेनरी पोलक, लंडन

पक्षभेद मनांत न आणतां केवळ स्नेहबुद्धीने तुम्हांस असें कळवितों कीं, हिंदी राजकीय आकांक्षांच्या दृष्टीने सध्या विलायतेंतील परिस्थिति फार अनुकूल होत-

आहे. म्हणून तुमच्या पक्षाच्या तसेंच इतर पक्षांच्याहि पुढाऱ्यांनी सध्या विलायतेंत येऊन खटपट करण्यास फार नामी संधि आहे. मजूरपक्ष आणखी कांही दिवस अधिकारारूढ होईल पण तो लिबरल पक्षावर अवलंबून. म्हणून खरी सत्ता लिबरल पक्षाच्याच हातीं राहील. दोन्ही पक्षांना एकमेकांची गरज अशी अस्थिर परिस्थिति आहे. खासगी संभाषणें व भेटी घेण्याला हीच संधि योग्य आहे.

४८६

२७ डिसेंबर १९२३—सी. व्ही. मेहता, मुंबई

विजापूरकर भेटले; त्यांना सर्व गोष्टी समजून सांगितल्या. तुम्हीं भेटूं शकल्यास तुमच्याशींहि चर्चा करीन. लवाद पद्धतीनें काम व्हावें असें वाटत असल्यास तुम्हाला तशी खटपट करण्यास हरकत नाही. पण लवादाने प्रश्न न सुटला तर स्वतः निर्णय करण्याला सरकारलाहि मोकळीक पाहिजे. या बाबतींत आधीच पुष्कळ उशीर झाला आहे. तरी काय तें लवकर ठरवा.

४८७

१३ फेब्रुवारी १९२४—ना. भि. परुळेकर, कोलंबिया ( अमेरिका )

येथील इन्फरमेशन ब्यूरोला गेल्या वर्षीप्रमाणे याहि वर्षी बारा केसरी व बारा मराठ्याचे अंक चालूं ठेवावेत अशी विनंति आहे. ही एक आपली ब्यूरोला दरसालची मदत असावी. यांत आज मोजमाप न करतां येण्यासारखे पुष्कळ फायदे आहेत. राजकीय परंपरेप्रमाणेच इन्फरमेशन ब्यूरोच्या संघटनेसहि याचा उपयोग होतो.

४८८

१ एप्रिल १९२४ (?)—सुरेंद्रनाथ सेन, कलकत्ता

श्री. अशुतोष मुकर्जी वारल्यामुळे माझे अनेक बेत ढासळून गेले. सध्या मी युनिव्हर्सिटीच्या कामांत लक्ष घातलें आहे. तुमच्या पुस्तकांचें भाषांतर 'वंगवाणी' मासिकांत हप्त्याने द्यावें असें मी प्रथम योजिलें होतें. तथापि तुमच्या सूचनेप्रमाणे तें 'भारती'लाहि देण्याला हरकत नाही. मात्र वंगवाणी मासिकाच्या संपादकाशीं मी शब्दाने गुंतून बसलों यामुळे नाईलाज झाला आहे.

४८९

## १३ एप्रिल १९२४—मोहनदास गांधी, जुहू

तुमचें पत्र पोंचलें. त्याप्रमाणे मी शरीफ देवजी कानजी यांना लिहिलें आहे. पण लवादाने कोणत्या गोष्टींची चौकशी (Terms of Reference) करावी याविषयींच त्यांनी कांहीं बाबींना हरकत घेतली आहे. श्री. पोतदार यांचीहि तशीच हरकत आहे. तरी तुम्ही मजकडे टर्मस् ऑफ रेफरन्स पाठवाव्या म्हणजे मी त्या शेरीफ देवजी कानजी यांना पाठवीन. त्यांनी कांहीं नव्या सूचना केल्या तर त्याहि तुम्हाला कळवीन. देवजी कानजी यांना गुरुवारीं मला भेटण्यास सांगितलें आहे.

४९०

## ३१ एप्रिल १९२४—वल्लभभाई पटेल, अहमदाबाद

येथील म्युनिसिपालिटी सरकारने सस्पेंड केल्यामुळे लो. टिळकांच्या स्मारकाचें काम लांबणीवर पडलें हें तुम्हास माहीत असेलच. सध्याच्या बोर्डानें तें काम पुन्हा हातीं घेण्याचें ठरविलें आहे. तरी रे-मार्केटमध्ये टिळकांचा जो पुतळा आहे त्याला एकंदर खर्च काय आला याची तपशीलवार माहिती कळवावी.

४९१

## २ मे १९२४—म. गांधी, अंधेरी

देवजी कानजी भेटले. लो. टिळकांच्यासंबंधीं आठवणी लिहून झाल्यावर पाठवितो. पाठविलेली एक आठवण गहाळ झाली तरी चिंता नाही, असें हरिभाऊ यांस कळविलें आहे. त्या आठवणींत असहकारितेचा उल्लेख असल्याने ती छापूं नये असें मला वाटतें. कोणाचीं मनें दुखविलीं जावीं अशी माझी इच्छा नाही.

४९२

## १६ मे १९२४—सुरेंद्रनाथ सेन, कलकत्ता

तुमची व माझी प्रत्यक्ष ओळख नाही. तथापि पुण्याच्या भारत-विद्या मंडळांत आपण भेटलों होतों. महाराष्ट्रीय व मराठ्यांचा इतिहास याबद्दल मला आदर आहे. बंगाल व महाराष्ट्र यांत आताहून अधिक बौद्धिक विचारविनिमय झाला

पाहिजे. बंगाली वाङ्मयाचें भाषांतर पुष्कळांनी मराठींत केलें आहे. तशी गोष्ट मराठी वाङ्मयासंबंधाने आमच्या हातून मात्र झालेली नाही! तुमच्या 'लो. टिळकांचें चरित्र' या पुस्तकाचें भाषांतर करण्याची मला परवानगी द्याल तर मी ते मोठ्या आनंदाने 'वंगवाणी' मासिकांत प्रसिद्ध करीन. आमच्या इकडे चरित्र-ग्रंथांना अगदीच खप नाही, म्हणून तें चरित्र मासिकांतच क्रमशः प्रसिद्ध करावें असें वाटतें.

४९३

१७ मे १९२४—म. गांधी, साबरमती

तुम्ही आता येण्याचें कारण नाही. कारण मनुष्य चिंतितो एक व ईश्वर करतो दुसरेच!

४९४

१३ जून १९२४—तारकानाथ दास, न्यूयॉर्क

इकडील प्रोफेसर डॉ. रॉस व डॉ. कॅनिअर हे तिकडे हिंदी राष्ट्रीय चळवळीचें अवलोकन करण्याकरिता येत आहेत. त्यांना तुम्ही योग्य ती सर्व मदत कराल आणि स्वतःहि कांही माहिती द्याल अशी आशा आहे. तुमच्या महाराष्ट्र विद्यापीठांतील विद्यार्थी व शिक्षक यांना त्यांच्या व्याख्यानामुळे फार लाभ होईल.

४९५

१९ जून १९२४—लक्ष्मणराव किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी

आपण केसरींत आमच्या कारखान्याविषयी लिहिलेला मजकूर वाचून फार आनंद झाला. आपण महाराष्ट्रांतील उद्योगधंद्याबद्दल दाखविलेली कळकळ व त्यांना हरतेऱ्हेने पुढे आणण्याची आपली उत्कंठा ही पाहून आम्हाला आमचें काम दुप्पट जोराने करण्यास हुरूप येतो.

४९६

२३ जून १९२४—के. नटराजन, मुंबई

हॉर्निमन यांच्या बाबतींत गव्हर्नरकडे जाणाऱ्या शिष्टमंडळांत येण्याचें तुम्हाला होणार नाही असें ब्रेलवी यांनी मला सांगितलें. तत्त्वाची गोष्ट म्हणून

मी बोलत नाहीं. पण तुम्हीं या बाबतींत फेरविचार केल्यास तुमच्या येण्याने, शिष्ट-मंडळाच्या म्हणण्याला मोठें वजन येईल असें मला वाटतें.

४९७

**२४ जून १९२४—डॉ. र. पु. परांजपे, पुणें**

तुमचें पत्र पोहोंचले. मराठ्यांतील स्फुट सूचनाहि पाहिली. युनिव्हर्सिटी-मध्ये फक्त कॉलेजमधील विद्यार्थ्यांना शारीरिक शिक्षण सक्तीचें करण्याबद्दल ठराव आणता येईल. आणि एकदा I. T. F. चें शिक्षण कॉलेजमधील विद्यार्थी सक्तीने घेऊं लागले म्हणजे पुढे इतर वर्गांनाहि तो नियम लागू करतां येईल. युनिव्हर्सिटीने माझा ठराव पास केला तर 'ऑक्झिलिअरी' व 'टेरिटोरिअल' फोर्स कमिटीला मी ज्या इतर सूचना केल्या आहेत त्या पुढे मांडण्यालाहि माझी बाजू बळकट होईल. माझ्या सूचना हाणून पाडण्याकरिता कांहीं लोकांकडून त्यांवर टीका होण्याचा संभव आहे, पण मला विधायक टीका इष्ट आहे. सध्या तरी सुशिक्षित वर्गाला शारीरिक शिक्षण सक्तीचें व्हावें इतकाच माझा कटाक्ष आहे.

४९८

**९ जुलै १९२४—आर्कीऑलॉजिकल सुपरिंटेंडेंट, पुणें**

रायगड येथील शिवाजीमहाराजांच्या समाधीचें एक नवें स्केच ड्रॉइंग पाठवीत आहे. मुंबई सरकारचे आर्किटेक्ट व मी मिळून हें तयार केलें असून स्मारक बरें दिसेलसें वाटतें. तुमच्या इच्छेप्रमाणे अष्टकोनी समाधीच्या बाजूने कठड्याला जाळी ठेवली आहे. समाधीला जो जुना दगड आज आहे तसाच या सर्व कामाला वापरावा. आणि शनवारवाड्यापुढील वॉरमेमोरियलला जसा पिवळा दगड आहे तसा वेगळ्या रंगाचा दगड छत्रीच्या घुमटाला वापरावा. हें ड्रॉइंग तुम्हाला पसंत पडेलशी आशा आहे.

४९९

**११ जुलै १९२४—सच्चिदानंद सिंह, पाटणा**

नुकताच मी माझ्या प्रिय पत्नीच्या स्मरणार्थ माझ्या राहत्या घराचा सार्वजनिक ट्रस्ट केला. त्यांत ग्रंथालय, सार्वजनिक वाचनालय, वगैरे सर्व व्यवस्था आहे. ग्रंथायलयांत सुमारें १० हजार पुस्तकें असून वाचनालयांत निरनिराळीं वृत्तपत्रें

आहेत. संस्थेच्या चालू खर्चाकरिता ५० हजार रुपये वेगळे काढले आहेत. हिंदी वृत्तपत्रें या संस्थेला फुकट यावी अशी इच्छा आहे. त्याप्रमाणे 'मराठा' 'हिंदुस्थान रिव्ह्यू'चे भेटीस पाठवावा अशी विनंति आहे. लो. टिळकांच्या वेळे-पासून आज वीस वर्षें 'हिंदुस्थान रिव्ह्यू'चा व 'मराठ्या'चा ऋणानुबंध आहे त्यांत खंड पडूं नये.

५००

## १३ जुलै १९२४—मोतीलाल नेहरू, मुंबई

टेलिफोनवरून तुमचें बोलणें मला कांही नीटसें ऐकूं आलें नाही. तरी काय म्हणालात तें दोन ओळी पत्रानेच लिहून कळवा. माझ्या भाषणांत एखाद्या गोष्टीचा विशेष उल्लेख करावयाचा असल्यास तसें लिहा. ठरल्याप्रमाणे आज मी अलाहाबादला परत जात आहे.

५०१

## १४ जुलै १९२४—सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, मुंबई

तुम्ही मुंबईला आल्यावर मला भेटा. असेंब्लीमध्ये प्रत्यक्ष विधायक काम करण्याला तुम्ही जोराने सुरुवात केली आहे. त्याला माझ्याकडून केव्हाही लागेल ती मदत मी तुम्हास देईन. कांही महत्त्वाच्या बाबतींत पं. मोतीलाल नेहरू यांच्याशी माझी हल्ली वाटाघाट चालू आहे. असेंब्लीमध्ये आपणा सर्वांकडून कांही तरी महत्त्वाचें व विधायक कार्य व्हावे अशी अपेक्षा आहे. तरी तुम्ही मुंबईस केव्हा येणार तें कळविणें.

५०२

## १५ जुलै १९२४—सच्चिदानंद सिंह, पाटणा

माझ्या सरकारी नोकरीचीं आता सारीं १-२ च वर्षें राहिलीं आहेत. त्या-नंतर असेंब्लींत तुमच्याबरोबर सार्वजनिक काम करावे अशी इच्छा आहे. केवळ लॉर्ड सिंह यांच्या आग्रहाखातर मी ही नोकरी पत्करली. येत्या ऑक्टोबर अखेर मी रांचीहून परत येईन, तेव्हा नोव्हेंबर अगर डिसेंबरच्या सुमाराला पाटणाला तुम्ही माझ्याकडे आला, तर १९२१ सालीं सिकंदराबाद ट्रेनमध्ये आपण दोघे असतांना जशा मनमोकळेपणाने गप्पागोष्टी केल्या तशा पुष्कळ गोष्टी बोलूं. मी सरकारी अधि-

कारी, माझा पाहुणचार तुम्ही घेतलांत तर लोक काय म्हणतील, असें वाटूं देऊं नका. माझा धाकटा भाऊ राजेन्द्र प्रसाद हा अगदी अस्सल जहाल असहकारवादी असून, त्याला जर या गोष्टींचा विधि निषेध नाही, तर तुम्ही स्वराजिस्ट लोक म्हणजे कोणत्या झाडाचा पाला ! तरी कांही मनांत न आणता याच.

५०३

### ३ ऑगस्ट १९२४—के. एन्. पणीकर, दिल्ली

'हिंदुस्थान' या नांवाचें राष्ट्रीय पक्षाचें पत्र मी येथे सुरू करीत आहे. राजधानींसारख्या शहरीं आपल्या राष्ट्रीय पक्षाचें एकहि पत्र असू नये ही मोठी उणीव होती. तुमच्या 'पासपोर्ट बिला 'विषयी एखादी छोटी मुलाखत अगर लेख लिहून पाठवाल काय !

५०४

### ९ ऑगस्ट १९२४—सुभाष चंद्र बोस, कलकत्ता

देशबंधु दास सध्या आजारी आहेत. त्यांच्या सांगण्यावरून मुद्दाम हें पत्र लिहीत आहे. विठ्ठलभाई पटेल यांना पुण्यास मानपत्र मिळालें नाही, यावरून कलकत्ता कॉर्पोरेशनने त्यांना मानपत्र द्यावें हें तुम्हास मनांतून कितपत रुचेल याची शंका वाटते. पटेल यांच्या मुंबईतील कारवाया आणि जयकर वगैरे पुढाऱ्यांशी वागणूक यांमुळे पुष्कळ स्वराजिस्टांना विठ्ठलभाई पटेल यांच्याविषयी तुमच्याप्रमाणेच वाटूं लागलें आहे. पण या वेळीं कलकत्ता कॉर्पोरेशनच्या विशिष्ट दृष्टीनेहि तुम्ही या प्रश्नाकडे पाहावे अशी विनंति आहे. स्वराज्य पक्षांतल्या लोकांशीं पटेल कसे वागतात त्याचा त्रास—तोशीस—एक तुम्हा आम्हालाच माहीत ! बाहेरच्या जगाला त्याचें काय ? त्यांच्या दृष्टीने पटेल मोठेच आहेत. पटेल मुंबई कॉर्पोरेशनचे अध्यक्ष नसते, तर केवळ स्वराज्य पक्षीय म्हणून आम्हीहि पटेल यांना मानपत्र दिलें नसतें ! दुसरें असें की, कलकत्ता कॉर्पोरेशन ही संस्था सरकाराच्या हातून अटीतटीने आम्ही काबीज केली आहे. म्हणून सरकारी अधिकाऱ्यांना मानपत्रें देण्याची प्रथा मोडून आम्हाला लोकपक्षाच्या पुढाऱ्यांचा सत्कार करावयाचा आहे. अशा वेळीं तुम्ही व मोतीलाल नेहरू यांनी जर मानपत्र घेण्याचें नाकारलें तर येवढा खटाटोप कोणाकरिता

करावयाचा ? इतकी प्रसिद्धि व गाजावाजा होऊन हीं मानपत्रें देण्याची गोष्टच जर रहित करावी लागली तर, सरकार आणि जनता यांच्यापुढे आम्हाला शरमेने खाली मान घालावी लागेल ! आमची अशी फजिती झालेली पाहणें तुम्हाला बरें दिसेल काय ? तरी आमची सर्वांची आणि विशेषतः देशबंधु दास यांची विनंति मान्य करून, कृपा करून तुम्ही आपला नकार परत घ्या ! वाटल्यास पटेल यांना आम्ही वेगळ्या दिवशी मानपत्र देऊं. पण तुम्ही आणि पंडित नेहरू यांनी येऊन मानपत्र घेतलेंच पाहिजे. मग काय वाटेल तें होवो ! तुमची तार मी तशीच दाबून ठेवली आहे. ती मुकाट्याने मी फाडून टाकीन. पण कसेहि करून तुम्ही आलेंच पाहिजे ! पटेल यांच्या कुटिल कारवाया देशबंधु दास यांना माहीत नाहीत असें नाहीं ! पण त्यांनी आपलें धोरण नेहमीप्रमाणे उच्च ठेवलें आहे. आणि केळकर, असें पाहा कीं, शत्रूशीं देखील जर आपण उदार अंतःकरणाने वागावयाला पाहिजे तर, मुंबई कॉर्पोरेशनच्या अध्यक्षपदाला आम्ही मानपत्र दिलें तर त्यांत इतकेंसें काय बिघडलें ?

५०५

## १२ ऑगस्ट १९२४—विठ्ठलभाई पटेल, मुंबई

कलकत्त्यास येण्यासंबंधी तुमच्या तारेची जमनादास मेहता व मी यांनी कॉर्पोरेशनमध्ये वाट पाहिली, व मेहता यांच्या सांगण्यावरून दास यांना 'येतो' म्हणून तारहि केली. पण घरीं येऊन पाहतों तो 'तुम्ही येत नाही' अशी तार आलेली. कृपा करून आपला बेत बदला, म्हणजे आपण मिळून कलकत्त्यास जाऊं. त्यांच्या अतिशय आग्रहावरून मी त्यांना हो म्हटलें. तुम्ही मला निराश करणार नाही अशी आशा आहे.

५०६

## २४ ऑगस्ट १९२४—बापुजी अणे, यवतमाळ

सध्या माझ्या कुटुंबाची प्रकृति फार खालावली असल्यामुळे धड धंदा अगर सार्वजनिक काम कांहीच हातून होत नाही. तथापि असेंब्ली टाळणें हेंहि शक्य नाही. आपल्या पक्षाकरिता आपण सर्व प्रांतभर सारखे फिरत राहून पक्ष संघटित केला पाहिजे अशी तांतडीची वेळ आली आहे. रु. १००० पोचले असें अण्णा-साहेब नेने यांना कळवा.

५०७

२४ ऑगस्ट १९२४—विश्वनाथ गंगाधर केतकर, नाशिक

सावरकर यांस पर्स अर्पण करण्याचा समारंभ ता. २८ रोजीं करण्याचें ठरविलें आहे. तसेंच आपलें अभिनंदन करण्याची सभाहि शक्य असल्यास मोकळ्या जागेंत अगर थिएटरमध्येंच करूं.

५०८

२ सप्टेंबर १९२४—विनयकुमार सरकार, स्वित्झर्लंड

पुण्यास हरि नारायण आपटे यांच्याकडे १९१२ सालीं तुमची माझी ओळख झाली. त्यानंतर गेलीं १०–१२ वर्षें मी जगभर प्रवास करीत हिंडत आहे. इंग्लंड, अमेरिका, जपान, इजिप्त, चायना तसेंच युरोपांतील सर्व देश यांचें सूक्ष्म अवलोकन मी तेथे राहून केलें. त्याबद्दल ५००० पानें भरतील येवढें बंगाली वाङ्मय मी लिहिलें आहे. माझी कांहीं व्याख्यानें फ्रेंच, जर्मन व अमेरिकन युनिव्हर्सिट्यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. आता मुंबई इलाख्यांत कोठे तरी राहून एखादी लहानशी नोकरी करून मराठी व गुजराथी यांचा अभ्यास करावा असें वाटूं लागलें आहे. तरी मुंबई, अहमदाबाद व सुरत येथे एखादी नोकरीची जागा आढळण्यांत आल्यास मला कळवावें.

५०९

३ सप्टेंबर १९२४-- एस. चक्रवर्ती, लखनौ

लखनौ युनिव्हर्सिटी युनियनतर्फे येथे होणाऱ्या वादविवाद सभेस आपण एकवार यावें अशी विनंति आहे. महाराष्ट्रांतील आपण सर्वांत थोर पुढारी आहां, तरी आमची विनंति आपण अमान्य करूं नये. सर आशुतोष मुकर्जी यांच्यासारखीं बडी माणसें येऊन त्यांनी आमच्या वादविवाद सभाविषयी समाधान व्यक्त केलें आहे. तरी आपण कोणत्या विषयावर बोलणार तेंहि कळविण्याची मेहरबानी करावी.

५१०

५ ऑक्टोबर १९२४—मनू सुभेदार, सिमला

टॅक्सेशन कमिटीच्या ठरावाबद्दल तुम्ही जी मदत केली त्याबद्दल आभारी

आहे. ही कमिटी नेमण्याचा सरकाराचा विशेषच आग्रह आहे. पण कर देणारांची कांही बाबतींत तत्त्वतः हरकत असल्यास त्यांच्याकडून कर घ्यावा की काय हा एक कायद्याचाच प्रश्न आहे! याबाबत प्रसिद्धीसाठी मी एक लेख पाठवीत आहे.

५११

**२२ ऑक्टोबर १९२४—सत्येंद्र चंद्र मित्र, कलकत्ता**

तुमची तार पोहोचली. देशबंधु दास हें सध्या सिमल्याला आजारी असल्यामुळे तुमची तार तिकडे रवाना केली आहे. बेळगांव काँग्रेसच्या वेळीं बंगाल्यांतील सगळे स्वराज्य पक्षाचे लोक जाऊं शकणार नाहीत. कारण ती मोठी खर्चाची बाब आहे. तथापि पुष्कळ लोक हजर राहतील. आमच्याकडे अकराशें प्रतिनिधि आहेत. प्रांतिक काँग्रेस कमिटीला रिकाम्या जागांकरिता प्रतिनिधि निवडतां येतात. तुम्ही यादी पाठवून द्यावी, म्हणजे त्या लोकांना प्रथम बंगाल काँग्रेस कमिटीचे सभासद करूं, व नंतर प्रां. कॉ. कमिटी त्यांची डेलिगेट म्हणून नेमणूक करील.

५१२

**२५ ऑक्टोबर १९२४—शौकतअल्ली, मुंबई**

मुंबई व महाराष्ट्र यांतील मागसलेल्या मुसलमानांच्या शिक्षणाकरिता ताबडतोब कांही करावे असा कांही जणांनी आमच्या पाठीमागे तगादा लावला आहे. दाऊद फझली यांच्या ट्रस्टच्या देणगीमुळे आम्हाला फार मोठी मदत झाली. महाराष्ट्रांत प्रथम आम्हाला सहानुभूति मिळाली, पण कमिटीमध्ये इतर लोक आल्याने आमच्या अडचणी वाढल्या व काम कांहीच झालें नाही! कॉलेज काढण्याला सरकाराने ट्रस्टीना कां मदत केली नाही अशाबद्दल मुंबईत सभा भरवावी असें कांहींचें म्हणणें आहे. पण सभा भरवावी असें मला वाटत नाही सभेंत लोक पाहिजे तसे बेजबाबदारपणे बोलतात. त्यांचा आमच्या कार्याला अडचण मात्र व्हावयाची.

५१३

**२ जानेवारी १९२५—महात्मा गांधी, साबरमतीच्या वाटेवर**

कोणाच्या मनोभावना दुखावूं नयेत असें माझें नेहमी धोरण व इच्छा असते आणि यंदाच्या वर्षी महाराष्ट्राला पूर्णपणें आपलेसे करावे असा मी

निश्चय केला असल्याने लिहिण्याबोलण्याच्या बाबतींत मला फार दक्षता घेतली पाहिजे. अहेतुकपणें, न कळत, मी असें लिहून जाईन कीं कदाचित् तें तुम्हांला म्हणजे तुमच्या पक्षाला आवडणार नाही. तरी ‘नवजीवन’ व ‘यंग इंडिया’ यांमध्ये असा कांही मजकूर आल्यास तुम्ही तो माझ्या निदर्शनास आणाल काय ! शक्य असेल तेथे माझी चूक मी दुरुस्त करीन.

५१४

३ जानेवारी १९२५—बापुजी अणे, यवतमाळ

आम्ही आकोल्याला सभा भरवितों ही गोष्ट पंडित मोतीलाल यांना आवडली नाही असें त्यांच्या पत्रावरून दिसतें. तारीख पुढे ढकलून ही सभा नागपुरास करावयाचें ठरविलें आहे. तरी तुम्ही व जयकर यांनी न विसरता नागपुराला यावें. मध्यप्रांत व वऱ्हाड यांतील वस्तुस्थिति स्वराज्य पक्षांतील लोक लक्षांतच घेत नाहीत.

५१५

२१ जानेवारी १९२५—एस्. आर. बमनजी, मुंबई

टिळकांच्या आठवणींचें पुस्तक फारच मनोरंजक वाटलें. मला त्यांच्याबद्दल निरतिशय आदर आहे आणि लिहिण्यासारखे पुष्कळ प्रसंगहि मला आठवतात. प्रेसिडेंट विल्सन यांच्या मुलाखतींत झालेल्या संभाषणाविषयीं लिहितां, पण ती बाब थोडी नाज़ुक आहे. आणि आधी भेटून चर्चा केल्याशिवाय त्याबद्दल मी कांही लिहूं इच्छित नाही.

५१६

२३ जानेवारी १९२५—दामोदर लक्ष्मण लेले, वांई

आपल्याकडून प्रस्तावना आली ती पोंचली. आपल्या महत्त्वाच्या कामांतून आपल्याला सवड होऊन इतक्या लवकर प्रस्तावना येईल असें मला वाटलें नव्हतें. परंतु खासगी सामान्य कामांतसुद्धा आपण इतकी दक्षता ठेवलेली पाहून मला फार आनंद झाला व त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे.

५१७

२९ जानेवारी १९२५—एस. टी. द्रवीड, इंदूर

मलबार हिलवर घडलेल्या प्रकारासंबंधांत ज्या गोष्टी आतापर्यंत उघडकीस

आल्या त्यांवरून पाहतां केसरींतील अग्रलेख पुष्कळच सचेपणाचा व न्यायबुद्धीला धरून होता असें म्हटलें पाहिजे. वेळोवेळीं उठणाऱ्या बातम्यांवर विश्वास ठेवून पुष्कळ इंग्रजी व हिंदी वर्तमानपत्रकारांनी आपलें मत आधीच बनवलें आहे. मनाने त्यांनी दोषी कोण याचा आधीच निकाल दिला असून, गुन्हेगारांची चौकशी व्हावी अशी मागणी ते जाहीर रीतीने करीत आहेत. पण अशा रीतीने टीका करणें हें वर्तमानपत्राच्या शिरस्त्याला अगदीं गैर आहे. खरा न्याय मिळण्यासहि यामुळे अडचण पडेल. इंदूरमध्ये तुमचा विवेचक लेख फार आवडला. मराठी संस्थानांबद्दल आदर व आपलेपणाची बुद्धीहि तुम्ही त्यांत दाखविली आहे. संस्थानांच्या अधिपतींनी स्वतःबद्दल व संस्थानातर्फे तुमचे आभार मानण्यास मला सांगितलें आहे.

५१८

४ फेब्रुआरी १९२५—तारकनाथ दास, न्यूयॉर्क

हिंदी संस्थानिकांच्या हक्काबद्दल माझें पुस्तक तुमच्या पाहण्यांत आलेंच असेल, कोहट व गुलबर्गा यांसंबंधी ठराव करून संस्थानें ही कॉंग्रेसच्या कक्षे-बाहेर नाहीत असा दाखला कॉंग्रेसने निर्माण केला तें बरें झालें. परराष्ट्रीय चळ-वळीबद्दल सत्यमूर्ती यांनी पुनः उचल खाल्ली आहे. म. गांधींनी त्या गोष्टीला पुनः विरोध केला. पण नुकत्याच झालेल्या कराराला धरून स्वराज्य पक्षाने तो प्रचार परस्पर केला, तर त्याला त्यांची हरकत नसावी असें दिसतें. कसेंहि करून परराष्ट्रीय चळवळ ही अधिकृत माणसांच्या हातून पुनः सुरू होईल असें करा. त्याला खर्चहि फार येणार नाही. निरनिराळ्या देशांत आपली माणसें आहेत. त्यानाच स्वराज्य पक्षाने अधिकारपत्र द्यावे म्हणजे झाले. माझा कोणत्याहि क्रांतिकारक लोकांशीं संबंध नाही. स्वराज्य पक्षातर्फे मी येथे हें काम करूं शकेन. इंग्लंड, जपान, येथे तुम्ही आपलीं माणसें नेमावीं. जपानमध्ये राश बिहारी बोस हे माहितगार व अनुभवी गृहस्थ आहेत. ते तुमचें काम आनंदाने करतील.

५१९

२० फेब्रुवारी १९२५—पट्टाभिसितारामय्या, मच्छलिपट्टम

'जन्मभूमि' पत्र मी गेलीं पांच वर्षें मोठ्या निग्रहाने चालविलें. त्याचें आर्थिक बळ सरत आलें आणि लेखणीचें बळहि लोकांना कंटाळवाणें होऊं लागेल

अशी भीति वाटते ! तरी वर्षांतून तुमच्या आवडीच्या विषयावर दोन लेख तरी पाठवाल काय ? एक लेख आता :पाठवा व दुसरा सहा महिन्यांनी पाठविला तरी चालेल !

५२०

७ मार्च १९२५—जी. व्ही. मावळणकर, भद्र अहमदाबाद

अहमदाबादच्या महाराष्ट्र मंडळींनी महाराष्ट्रीयत्वाची भावना जागृत ठेवण्यासाठी स्थापन केलेल्या महाराष्ट्र समाजातर्फे मी आपणास तसदी देत आहे. आपण बडोद्यास ता. १०-११ एप्रिलच्या सुमारास पोस्टल कॉन्फरन्ससाठी येणार आहांत तरी त्या संधीस दोन दिवस येथे येण्याचा कार्यक्रम ठेवावा अशी आग्रहाची विनंति आहे.

५२१

१२ मार्च १९२५—डी. जे. सॅमसन, मुंबई

बॉम्बे लॉ जर्नलच्या संपादकाच्या सूचनेवरून त्या मासिकांत लँड ॲक्विझिशन ॲक्ट सुधारण्याबद्दल मी एक छोटा लेख लिहिला आहे तो आपण पाहावा. बॉम्बे इम्प्रूव्हमेंट ट्रस्टमध्ये मी सुमारें १४ वर्षे याच कामावर आहे, व कोट्यावधी रुपयांच्या मिळकती 'ॲक्वायर' करून त्यांच्या किमती ठरविल्या असतील. पूर्वी १८९० सालीं फर्ग्यूसन कॉलेजांत लो. टिळकांच्या हाताखालून गेलेला मी एक विद्यार्थी आहे. माझ्या कामानिमित्त या कायद्याचा मी मुद्दाम अभ्यास केला. त्यांत मला असें आढळून आलें आहे की, हा कायदा ठिकठिकाणी सदोष असून त्याची दुरुस्ती जेवढ्या लवकर होईल तेवढी बरी.

५२२

१७ मार्च १९२५—ल. ज. आपटे, पुणें

मी सदाशीव पेठेतर्फें निवडून आलों आहें. आता माझी इच्छा अध्यक्षाचे जागेकरिता उमेदवार म्हणून राहण्याची आहे. आपली मदत मला मिळाल्यास मी खास निवडून येतों. तरी आपली मदत मिळावी अशी विनंति आहे.

५२३

१९ मार्च १९२५—सच्चिदानंद सिंह, पाटणा

कौन्सिलची बैठक सुरू असल्यामुळे तुमच्या अत्यंत अगत्य व स्नेहभाव

दर्शवंर्णांच्या पत्राला मला उत्तर घालतां आलें नाही. तुम्ही माझ्याकडे फार थोडा वेळ राहिलांत-कांहीं मिनिटेंच म्हणाना. अनेक प्रचलित प्रश्नांबद्दल मला तुमच्याशीं पुष्कळ बोलावयाचें होतें. कै. ना. गोखले हे तुम्हाला फार चाहत. तुमच्याबद्दल त्यांनी मजजवळ अनेकदा उद्गार काढले होते. या कारणाने मला तुमच्याबद्दल विशेषच प्रेम व आपलेपणा वाटतो. सध्या मी सरकारी नोकरींत आहे, पण लोकांचें हित करण्याचें एक अधिकाराचें स्थान यापेक्षा त्या जागेबद्दल माझी निराळी भावना नाही, म्हणून त्याबद्दल मला लाज अगर संकोचहि वाटत नाही! माझे जुने स्नेही, मग ते जहाल असोत, स्वराजिस्ट असोत, किंवा दुसरे कोणी असोत, या सर्वांशीं माझा व्यवहार व दळणवळण पूर्वीसारखे चालू आहे. माझीं राजकीय मतें पूर्वी होती तींच आहेत. सुधारणांबद्दल माझा 'सर्च लाइट'मधील लेख तुमचेकडे पाठवीन. प्रांतिक स्वायत्तता कां मिळावी हें त्या लेखांत सांगितलें आहे. गतवर्षी दिल्ली सिमल्याला 'मायनॉरिटी रिपोर्ट' लिहिणाऱ्यापैकीं तिघांनी मला असें सांगितलें कीं, अधिकारी वर्गामध्ये सर्वांत माझाच लेख चांगला आहे. तुमचें मत काय पडतें तें मला कळवा.

## ५२४

### १० एप्रिल १९२५—मोतीलाल नेहरू, अलाहाबाद

कौन्सिल ऑफ स्टेटची निवडणूक येत्या नोव्हेंबरांत आहे. सध्यांच्या सभासदांनी असेंब्लींत पास झालेलें देशहिताचें प्रत्येक बिल त्यांनी फेटाळून लावलें. इतकेंच नव्हे, तर त्यांतच ते मोठी प्रौढी व भूषण मानतात! याकरिता स्वराजिस्ट पक्षाचे उमेदवार तेथे निवडून आणले पाहिजेत. काँग्रेसच्या कौन्सिल बहिष्कारानंतरची ही पहिलीच निवडणूक आहे. अर्थात् त्यांत स्वराज्य पक्षाच्या बळाची कसोटी आहे. मतदारसंघ विखुरलेला असला तरी आपण योग्य प्रतिनिधी निवडला म्हणजे झालें. त्याची लायकी मोठीच असणार. अर्थात् तोच स्वतःचा खर्च करूं शकेल. तरी तुमच्या प्रांतांत एखादा प्रतिनिधी उभा करून तुम्ही हें काम ताबडतोब सुरू करावे.

## ५२५

### २२ मे १९२५—विठलभाई पटेल, महाबळेश्वर

लोटवाला व मी उद्या तुमची पुण्यांत गांठ घेऊं. सभेंत बोलण्यालाहि माझी

हरकत नाही. स्वराज्य पक्षाच्या परिषदेंत जे ठराव पास झाले ते नाफेरवाल्यां-खेरीज सर्वांना पसंत पडले. अध्यक्षांचे भाषणांत म. गांधींनी काँग्रेसच्या राजकारणांतून यापुढे अंग काढून घ्यावें अशी जी सूचना होती, ती नसती तर बरें झालें असतें !'

### ५२६

### २ जून १९२५—डी. व्ही. गुंडाप्पा, बंगलोर

'कर्नाटक' हें वृत्तपत्र येत्या जुलैमध्ये आम्ही पुन्हा सुरू करीत आहोंत. तरी हिंदी संस्थानांच्या दृष्टीने पहिल्या अंकाकरिता एखादा लेख पाठवावा. पुण्यास तुमची गांठ न पडल्याकारणाने वामनराव पटवर्धन यांना भेटलों.

### ५२७

### १२ जून १९२५—डी. व्ही. कीर्तने, न्यायाधीश, इंदूर

तुमची माझी विशेष ओळख नाही. तथापि दूर राहून तुम्हाला मनांत चाहणाऱ्यांपैकीं मी एक आहे. एका मराठी संस्थानाकरिता केसरींतून तुमचें नैतिक पाठबळ मिळावें अशी मी तुम्हास कळकळीने विनंति करितों. या वेळी संस्थानाला तुम्ही सहानुभूति दाखविणें म्हणजे लोकांचा अपवाद व नुकसान ओढून घेण्यासारखेंच आहे. तथापि, या संकटाच्या वेळीं एका मोठ्या संस्थानाला ही मदत मिळाली तर अतिशय उपकार होतील. तुमचेकडून जी मदत मिळावयाची त्यांत अनैतिक असें कांही असणारच नाही.

### ५२८

### ५ जुलै १९२५—लाला लजपतराय, सोलन

१ ऑगस्ट तारखेस पुण्याला येण्याबद्दलचें तुमचें पत्र पोहोंचलें. पण ही तारीख एकदोन आठवडे पुढे ढकलणें असल्यास पाहा. कारण माझी प्रकृति हल्ली बरी नाही. आणि तशा स्थितींत हें ठिकाण सोडून मी इतक्या दूरच्या प्रवासाला गेलों तर ती पुन्हा ताळ्यावर येणें कठीण आहे. तुम्हास मी निराश करूं इच्छित नाही, पण माझ्या सोयीकडे तुम्ही थोडें लक्ष द्याल अशी आशा आहे.

५२९

### ९ जुलै १९२५—जी. बी. ब्रेन्डन, सिमला

गणपतराव मोरे या शिपायाबद्दल मेहेरबानांनी विचार करून सरकारने त्याला नोकरीवरून कमी केल्या तारखेपासून पेन्शन देण्याचें ठरविलें आहे.

५३०

### २ ऑगष्ट १९२५—व्ही. शास्त्रलु, मद्रास

'स्वराज्य' पत्र सध्या लिमिटेड कंपनीचे व्यवस्थेखाली आहे. तथापि एक तेलगू दैनिक येत्या निवडणुकीकरिता निघणें आवश्यक आहे. तरी आपण पं. मोतिलाल नेहेरू यांच्याशीं बोलून ते दहा हजारांचे शेअर्स घेतील असें करावें अशी विनंति आहे.

५३१

### २७ ऑगस्ट १९२५—रतनसी डी. मोरारजी

मी मुंबईस परत जात आहे. मी काल तुम्हास भेटण्याचें ठरविलें होतें. पण मध्यंतरीं जम्नादास मेहता अचानक भेटले. त्यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, तुमच्या पक्षाने आपला स्वतःचा उमेदवार उभा करावयाचा कीं नाही हें अद्याप ठरविलेलें नाही. मला वाटतें, आमच्या होम रूल लीग आणि स्वराज्य पक्ष यांच्यांत म्हणण्यासारखें अंतर नाही. म्हणून तुम्हास विनंति इतकीच कीं, तुम्ही स्वराज्य पक्षाचाच उमेदवार असला पाहिजे असा आग्रह धरून बसूं नका.

तुम्ही मला मदत कराल अशी मला आशा आहे.

५३२

### २९ ऑगष्ट १९२५—बाळ गंगाधर खेर, मुंबई

'लोकमान्य' पत्राच्या संपादकाचें काम गेले १-२ महिने मी केलें. तथापि माझा वकिलीचा धंदा आणि हें काम दोन्हीहि नीटपणें होणार नाहीत अशी मला भीति वाटते. माझ्या प्रकृतीवरहि त्याचा ताण बराच पडतो. म्हणून महिनाअखेर तें काम सोडून पत्राला बाहेरून मदत करावयाचें मी ठरविलें आहे. ओगले हे 'लोकमान्य' पत्र नीटपणें चालवूं शकतील.

५३३

६ सप्टेंबर १९२५—श्रीनिवासराव कौजलगी, विजापूर

निवडणुकांचे नियम मी नुकतेच पाहिले. त्यांत हायकोर्टाच्या बेअदबीकरितां वकिलींची सनद रद्द किंवा तहकूब झालेल्या इसमाला मुंबई कौन्सिलच्या निवडणुकीस उभे राहतां येत नाही असा एक नियम आहे. हा नियम असेंब्लीला लागू आहे की नाही हें मला माहीत नाही. तसा असेल तर तुम्ही तो तिकडे असेंब्लींत बदलून घेण्याची खटपट करावी, आणि इकडे मुंबई कौन्सिलांतील लेह्यांनाहि तसेंच करण्यास कळवावे.

५३४

११ ऑक्टोबर १९२५—तारकानाथ दास, बर्लिन

तुमचें ' पासिंग फेज ऑफ पॉलिटिक्स ' हें पुस्तक तुम्ही प्रसिद्ध केलें ही मोठी उत्कृष्ट गोष्ट केलीत. ' मॉडर्न रिव्ह्यू 'मध्ये मी त्यासंबंधी लेख लिहिणार आहे. सोबत ' मराठ्या 'करिता एक लेख पाठवीत आहे. त्याचा उद्देश हिंदी पुढाऱ्यांनी जगाच्या दृष्टीने थोडा हिंदी राजकारणाचा विचार करावा असा आहे. तसेंच, कलकत्ता रिव्ह्यूमध्ये दोन लेख लिहून त्यांत कॉंग्रेसने आपलें क्रीड बदलन प्रतिसहकाराचें तत्त्वज्ञान स्वीकारावे असें मी म्हटलें आहे.

५३५

११ ऑक्टोबर १९२५—बी. आर. नानल, रत्नागिरी

आपलें पत्र पावलें. म. गांधींच्या नांवाचा उपयोग करून टिळकांच्या जन्मभूमीच्या स्मारकाकरिता पैसा जमवावा असा माझा केव्हांहि इरादा नव्हता व नाही. देशबंधूदास यांच्या स्मारकाकरिता फंड गोळा करण्यास म. गांधी इकडे यावयाचें असले तरी माझ्याकडून मदत होणें शक्य नाही. कारण लोकमान्यांच्या जन्मभूमी स्मारकाचें काम मला प्रथम पुरें केलें पाहिजे. येथे फेर व नाफेर या दोन्ही पक्षांत असें ठरलें आहे कीं, जन्मभूमी स्मारकाचा फंड गोळा करावा व तें स्मारक फक्त म. गांधींच्या हस्ते उघडावे.

५३६

१३ ऑक्टोबर १९२९—मोतीलाल नेहरू, अलाहाबाद

दरबार गोपाळदास यांना दुसरे स्वराजिस्ट उमेदवार म्हणून उभे करण्याचें

ठरविलें आहे असें जयकर यांच्याकडून कळलें. पण एकाच पक्षाचे दोन उमेदवार उभे करणें बरें नाही. चितळे यांनी आपल्या पक्षाचा सर्व कार्यक्रम कायदेभंग व करबंदी यासुद्धां मान्य केला आहे. ते आपल्यांत आले हा पक्षाला एक प्रकारें लाभ आहे. पण चितळे व गोपाळदास हे दोघेहि उमेदवार निवडून येतील किंवा कसे हें जयकर पटेल व तुम्ही ठरवावें. तुमच्या पत्रांतील इतर गोष्टींसंबंधी इतकेंच सांगतो की मी जी जी गोष्ट करीन ती ती महाराष्ट्राविषयी पूर्णपणे आस्था सहानुभूती बाळगूनच करीन.

५३७

१७ ऑक्टोबर १९२५—हॅरोल्ड मॅन, पुणें

पुढील वर्षी एक मोठें टोलेजंग शेतकी प्रदर्शन आम्ही पुण्यांत भरवीत आहोत. तुम्ही असहकारितावादी लोक या बाबतींत तरी सरकारशीं सहकार कराल किंवा नाही हें सांगतां येत नाही. तथापि तुमची त्याला हरकत नसेल तर मी तें फार उपयुक्त व आकर्षक करून दाखवीन. जनतेला विश्वासाने या प्रदर्शनाच्या कार्यकारी मंडळांतहि घेतां येईल असें मी करूं शकेन. पुढील आठवड्यांत तुम्हाला येऊन मी भेटूं इच्छितो.

५३८

६ नोव्हेंबर १९२५—के.एस्.सुंदरम्, सर्व्हण्टस् ऑफ इंडिया, सोसायटी, मद्रास

केव्हाहि थट्टा विनोद तुम्हाला आवडतो, खरें ना ? कोणा तरी वर्तमानपत्रांतील लेखकाने होम मेंबर सर मॉरीस यांच्या जागीं तुमची नेमणूक व्हावयाची आहे अशी कंडी पिकवून मोठी मौजच उडवून दिली म्हणावयाची ! अशा बातम्या सध्याचे दिवसांत पुष्कळ उठतात ! त्यांत तुम्हाला नवल वाटणार नाही. ‘राजकीय पक्ष’ या गोष्टीला बाहेर लोक काय महत्व देत असतील ते असोत, पण मला त्याचें कांही वाटत नाही. राजकारणास वाहून घेतलेल्या लोकांना अंतरबाह्य काडीची तरी मनाची शांतता लाभते काय ? पं. मोतीलाल यांच्या भाषणांतील बड्या बड्या शब्दांचें मला मनांत हसूं येतें. त्यांनी कितीहि जरी धाक घातला तरी त्याबद्दल तुम्ही कधींहि कदर बाळगणार नाही.

५३९

९ डिसेंबर १९२५—रंगा अय्यर, कानपूर

काकोरीच्या कटाच्या खटल्यांत जी धरपकड झाली त्यावरून संयुक्त प्रांतांत दडपशाही किती जोराने चालली आहे याची कल्पना: येईल. कांही आरोपींना सोडून दिलें पण बहुधा ऑर्डिनन्सचा अंमल सुरू होईल. कितीतरी लोकांनी माझ्याकडे येऊन वर्तमानपत्र काढण्याची मला कळकळीने विनंति केली आहे. कॉंग्रेसमधील तरुणांना मदत करण्याला त्यांचें असें एकहि पत्र नाही. तरी तुम्ही आम्हांला चांगलीशी आर्थिक मदत करावी अशी विनंति आहे. आमचें पत्र निघालें नाही तर पैसे परत करूं.

५४०

७ जानेवारी १९२६—के. एम्. मुनशी, मुंबई

गेल्या निवडणुकीसंबंधाने आपण जी मदत मला केली त्याबद्दल फार आभारी आहे.

५४१

८ जानेवारी १९२६—बापूजी अणे, यवतमाळ

पोट निवडणुकीला उभे न राहतां पुढच्या सार्वत्रिक निवडणुकीकरिता पक्ष संघटित करावा असें मला वाटतें. मार्चमध्ये स्वराज्यपक्ष सरकाराला उत्तर म्हणून अडवणुकीचें धोरण स्वीकारील, तेव्हा आपणहि आपल्या पक्षाचा प्रॉपोगँडा बाहेर जोराने सुरू करावा.

५४२

१७ जानेवारी १९२६—बॅ. जयकर, मुंबई

निवडणुकीसंबंधी रँ. परांजपे अटी घालीत आहेत त्या मला पसंत नाहीत. तुमचें मत तारेने कळवा. पोट निवडणुकींना उभें राहावयाचें नाही असें आपण चौघांनीहि एकमताने ठरविलें पाहिजे.

५४३

१७ जानेवारी १९२६—म. गांधी, साबरमती

वीस तारखेपर्यंत मला साबरमतीहून बाहेर जातां येत नाही. तरी त्याप्रमाणे

नंजाप्पा वि. गोद्रेज या लवादाची वेळ तारीख विचारून ठरवावी. सोमवार-खेरीज १२ ते ४ पर्यंत मला वेळ आहे. लवादांच्या लेखी जबान्या पाहिल्या म्हणजे काम झालें. मला वाटतें तोंडी पुराव्याची गरज नाही.

५४४

**२३ जानेवारी १९२६—दादासाहेब करंदीकर, सातारा**

बॅप्टिस्टा यांना निवडणुकीला उभे राहण्याला तुम्हीः संमति दिली असें ते म्हणतात. तसें असेल तर माझी उमेदवारी मी मागे घेतो.

५४५

**२४ जानेवारी १९२६—विजयराघवाचारियर, सालेम**

या स्वराजिस्टांचे डावपेंच तुम्हाला कळत कसे नाहीत ? साबरमती आश्रमांत घडलेली सभेची हकीकत वाचून मी जवळजवळ रडण्याच्या बेतांत होतो. मग मी जयकरांच्याजवळ आपलें मनमोकळे केलें. कांही तरी दुसऱ्या उद्योगांत आता मन गुंतवावे असें वाटतें. माझे मनांत श्रीरामाची मूर्ती बसवून मंदिर स्थापावे असें आहे. तुम्ही मला मदत करणार नाही काय ?

५४६

**२५ जानेवारी १९२६—बापूजी अणे, यवतमाळ**

मुंबईचे डॉ. गोपाळराव देशमुख यांचें पत्र पोहोंचलें. निवडणुकीसंबंधी ते लिहितात की हा सामना स्वराजिस्ट व नेमस्त यांतला आहे. मी त्याहि पुढे जाऊन म्हणतो की, आपल्या जुन्या राष्ट्रीय पक्षांतील एक टिळकांचा अनुयायी आणि टिळकांचा एक कट्टा शत्रू यांतील हा सामना आहे. एक वेळ आपल्या मदतीने स्वराजिस्ट निवडून आला तरी चालेल, पण डॉ. परांजपे यांच्यासारखा कट्टा नेमस्त विजयी होऊन उपयोगी नाही !!

५४७

**२६ जानेवारी १९२६—श्री. कृ. कोल्हटकर**

यवतमाळ येथील विदर्भ साहित्य संघाचे अध्यक्ष या नात्याने आपण केलेलें भाषण कालच वाचलें. फारच सुंदर झालें आहे. आपणांस इतकीं कामें इतक्या

चांगल्या रीतीने कशी उरकतात हें एक गूढच आहे. 'विविधवृत्ताच्या' खास अंकाकरिता मतें मागविलेल्या पांच पुस्तकांत मी प्रथम तुमच्या कृष्णार्जुनयुद्धाचा समावेश केला होता. पण माझ्या कांही पद्यरचनेचा माझ्या निवडीशीं संबंध जोडला जाण्याचा संभव दिसल्यामुळे मी मागाहून, त्याबद्दल 'मराठे व इंग्रज' हें पुस्तक घातलें. 'कृष्णार्जुन युद्ध' नाटकाची योग्यता मराठी नाटकांत फारच मोठी आहे असें माझें मत असल्याचें आपणांस माहीत आहेच.

५४८

**२७ जानेवारी १९२६—एम. आर. जयकर, मुंबई**

अणे व तुम्ही एकदोन दिवस मुंबईस आलांत तर आपल्या पक्षाच्या मॅनिफेस्टोचा तात्पुरता मसुदा करूं. म्हणजे २।३ आठवड्यांनी वऱ्हाडांत परिषदेकरिता आल्यावर त्याचा पुनः विचार करतां येईल. वऱ्हाडांतील परिषदेनंतर आपण लगेच दिल्लीस जाऊं. तुम्ही व अणे यांसारखी मंडळी आपल्या पक्षांत असल्यामुळे असेंब्लीचे पुष्कळ सभासद आपल्या पक्षास भराभर येऊन मिळतील. व मग मोतीलाल नेहरूंच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडेल!! बेझंटबाई इकडे येऊन माझ्याशीं व तुमच्याशीं चर्चा करणार आहेत. आपल्या पक्षाचें जाळें आपण पुष्कळ विस्तृत पसरलें पाहिजे. ज्यांना आपल्या पक्षाच्या क्रीडवर प्रत्यक्ष सही करतां येणार नाही त्यांना ॲसोशिएट मेंबर्स करावें ही तुमची सूचना मला पसंत आहे.

५४९

**३० जानेवारी १९२६—डॉ. ॲनी बेझंट, मद्रास**

मी लवकरच पुण्यास येत आहे, तेव्हा तुमची भेट घेईन. पार्लमेन्टांत स्वराज्य घटनेचें बिल आणण्यासाठी खटपट करण्याकरिता मी कॉंग्रेसला येऊन मिळण्यास तयार आहें. १९२४ सालीं मी कॉंग्रेसची सभासद झालेंहि. पण त्यावेळीं असें दिसलें कीं कॉंग्रेस ही सर्वस्वीं स्वराज्य पक्षाच्या हातांत गेली आहे, म्हणून निरुपाय झाला.

५५०

**३ फेब्रुवारी १९२६—एम. आर. जयकर, मुंबई**

तुमचें व बापूजी अणे यांचें मत वेगळें पडलें. पण युनिव्हर्सिटीचे जागेकरिता

डॉ. देशमुख यांचेविरुद्ध डॉ. परांजपे यांना मदत करून मोतिलाल नेहरू यांचेवर मात करावयाला पाहिजे होती, असें मला वाटतें. देशमुखांचीं मतें स्वराजिस्ट आहेत. आज प्रतिसहकारी या नात्याने स्वराजिस्टांशीं आपलें भांडण आहे. आणि तुम्ही दोघे तर असें म्हणतां कीं, एकवेळ स्वराजिस्ट आला तरी चालेल पण मवाळ येऊं नये ! जुने पक्षभेद विसरून आपल्या पक्षाच्या आंत येतील त्या सर्वांना घ्यावें, व जे आज आपल्या विरुद्ध नाहीत त्यांना आपलेच समजावें असें तुम्हांला वाटत नाहीं काय ? आपल्या पक्षाचा सभासद हा कॉंग्रेसचा सभासद असलाच पाहिजे असें तुम्ही म्हणतां. पण इतर ठिकाणांपेक्षां मुंबईंत वेगळी परिस्थिति आहे. मुंबईंत कॉंग्रेसच्या नांवाला अगदी मान नाहीं !

५५१

### ६ फेब्रुवारी १९२६—वा. रा. पंत वैद्य, इंदूर

इंदूर प्रकरणासंबंधांत केसरीने जें औदासीन्य पतकरलें आहे तें सोडून देण्याविषयीं मी आपणास यापूर्वी एकवार पत्र पाठविलें होतें. त्याला समर्पक उत्तर आपण योग्यवेळीं दिलें तें पोहोचलें व मनालाहि पूर्णपणें पटलें. सदर गोष्टीला बरेच दिवस झाले. हल्लीं आमचे संस्थानाधिपतीवर कोणता प्रसंग गुदरला आहे याची कल्पना आपण पूर्णपणें करीत असाल; पण प्रत्यक्ष परिस्थिति भयप्रद आहे. तिचें वर्णन हें पत्र घेऊन येणारे माझे मित्र त्रिंबकराव गोगटे हे प्रत्यक्ष करतील. ते आपणाकडे खुद्दांच्या सांगण्यावरूनच येत आहेत. तेव्हा या प्रसंगीं त्यांना आपण जरूर ती मदत कराल अशी आशा आहे. मराठी संस्थानासंबंधांत आपणा महाराष्ट्रीयांचें जें कर्तव्य आहे तें आपण केलें पाहिजे.

५५२

### ७ फेब्रुवारी १९२६—केळकरांचें जयकर यांना पत्र

मिसेस बेझंट यांची मी व कांहीं स्नेह्यांनी "सर्व्हंट्स ऑफ इंडिया" सोसायटींत गांठ घेतली. आमची गांठ घेण्यासाठीं त्या मुद्दामच पुण्यास उतरल्या होत्या. मी त्यांना आपल्या मॅनिफेस्टोची प्रत, तसेंच १९२० सालच्या मॅनिफेस्टोची प्रत दिली. आणि इतर प्रांतांत विखुरलेली आपल्या मताची मंडळी कोणत्या तत्त्वावर एकत्र आणतां येतील याबद्दलहि कांहीं मुद्दयांचें टांचण करून दिलें. येथे नेमस्त मंडळींशीं चर्चा करून त्या मुंबईस तुम्हाला भेटून बोलणार आहेत.

अकोला परिषदेची पूर्व तयारी म्हणून, मित्रांच्या करवीं, आपल्या जुन्या व लोकशाही पक्षाच्या मॅनिफेस्टोच्या शेकडों प्रती मी महाराष्ट्रांत वांटल्या आहेत. त्यांवर पत्ररूपाने :अनेक उत्तरें, सूचना, टीका वगैरे हातीं येतील. त्या बरोबर घेऊनच मी अकोल्यास जाणार आहे. किती प्रतिनिधि अकोल्यास जमतील सांगतां येत नाही. पण कोणाला विचारलें अगर कळविलें नाही अशी कोणाचीहि तक्रार उरूं न देण्याची मी खबरदारी घेतली आहे. माझ्या पत्रावर तुमचें उत्तर मिळालें नाही. तथापि डॉ. देशमुख यांचे निवडणुकीचे बाबतींत आपल्या दोघांच्या धोरणांत तफावत असल्याची जी चूक सार्वजनिक रीत्या दिसून आली, ती गोष्ट आता तुम्ही विसरून गेलां असाल. माझ्याप्रमाणेच अणे यांचें खुलाशाचें तुम्हांला पत्र आलें असेल. त्याने तुमचें समाधान होईल अशी आशा आहे.

### ५५३

### ११ फेब्रुवारी १९२६—जम्नादास मेहता, दिल्ली

नुकत्याच कांही अप्रिय गोष्टी घडून आल्या असूनहि मी कॉर्पोरेशनमध्ये निवडून आल्याबद्दल तुम्ही मला पत्र पाठविलें याबद्दल मी आभारी आहें. स्वराज्य पक्षांत एकी होण्याबद्दल तुम्ही फिरून प्रयत्न करून पहा. दिवाणगिऱ्या घेतल्याने जें अहित होईल त्यापेक्षा न घेतल्याने अधिक अहित होईल असें तुम्हास खरोखरच वाटतें काय !

### ५५४

### १३ फेब्रुवारी १९२६—श्री. कृ. कोल्हटकर, जळगांव

उमरावती येथे कॉलेजांतील विद्यार्थ्यांपुढे आपलें व्याख्यान होणार असें कळलें. आपण येथे एक दिवसाकरिता आलांत तरी चालण्यासारखें आहे. आपण माझ्या स्फुट लेखांना प्रस्तावना लिहिण्यापूर्वी तेः एकदा आपल्या नजरेखालून जाणें जरूर आहे. आपण इतक्या जवळ आला असतां भेट झाली नाही, तर मनाचा हिरमोड होईल. येथून तीन मैलांवर असलेल्या ' खर्डे ' नांवाच्या खेड्या-च्या लोकांनी ' बेबंदशाही ' नाटक बसविलें आहे त्याचा प्रयोग आपण पहावा अशी त्यांची इच्छा आहे.

५५५

१९ फेब्रुवारी १९२६—श्री. कृ. कोल्हटकर, जळगांव

आपण मार्च महिन्यांत येथे आल्यास आपणांस माझे लेख दाखवून प्रकाशनाच्या तपशिलाची चर्चा करतां येईल. आपण खामगांवास घरीं गेल्याचें कळलें. आपण खामगांवास रात्रीं साडेनऊ वाजतां आलां त्यानंतर रात्रीं बारा वाजेपर्यंत व्याख्यानादि कार्यक्रमांत गुंतलां होतां असें समजलें. तेव्हा मी तेथे गेलों नाही हें एकंदरीत चांगलेंच झालें असें वाटलें! आपली बी. ए. च्या परीक्षेकरिता मराठीचे परीक्षक म्हणून नेमणूक झाल्याचें वाचून फार आनंद झाला.

५५६

२१ फेब्रुवारी १९२६—वा. ग. पंत वैद्य, इंदूर

काल महाराजांकडून व्हाईसरॉयसाहेबांना अखेरीचा जबाब पाठविण्याचा शेवटचा दिवस होता. महाराजांच्या मनःस्थितीचें निरीक्षण करतां महाराजांनी काल खालील अर्थाचा जबाब दिला असावा.

I am quite innocent of the charge that is alleged against me

Under the circumstances of the case, I think I should abdicate in favour of my son, rather than under-go the humiliation of being tried by a Commission, and thus create a precedent quite unworthy of my Status as a ruler of a native State and an ally of H. M.

वरील धोरणाचा जबाब गेला असावा असें अनुमान आहे. साधारण खात्री आहे म्हटलें तरी चालेल. आपल्या खाजगी माहितीकरिता लिहीत आहे. यावरून अनुमान करून जें आपणांस लिहितां येण्यासारखें असेल तें स्पष्ट लिहावें.

५५७

२३ फेब्रुवारी १९२६—महात्मा गांधी, साबरमती

सध्या कोणतेंहि जड काम हातीं घेण्याइतकी माझी प्रकृति नाही. कसलेंहि कां होईना पण कोणालाहि वचन दिलें कीं तें पाळलें पाहिजे. माझ्या हल्लीच्या स्थितींत त्याला उपाय काय ? लवाद प्रकरणांतील पक्षकार, त्यांचे वकील,

आणि त्यांतूनहि विशेषतः तुम्ही, या सर्वांना अहमदाबादला हेलपाटा देण्याची मला लाज वाटते. पण काय करूं हें आता तुम्हीच सांगा !

५५८

२४ फेब्रुवारी १९२६—केळकरांचें जयकर यांना पत्र

मला विशेष कारणामुळे दिल्लीस येतां येत नाही, म्हणून गोखले यांना पाठवीत आहे. बॅप्टिस्टा तेथे आहेत. अणे यांनाहि लिहीत आहे. निवडणुकीसंबंधी ऑ. इं. कॉं. कमिटीचें काम चालणार. आपणाला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाही. अर्थात् त्या सभेंत आपण लक्ष घालण्यासारखें काम म्हणजे कॉंग्रेसचे डेलिगेट होण्यासबंधींचे नवे नियम हें होय. तुम्ही तेथे आहांत, नवे नियम सुचविणारे काय हेतूने ते सुचवितात हें तुमचें लक्षांत येईलच. स्पेशल कमिटीचें उत्तर असमाधान-कारकः असल्याने त्याला आपलें उत्तरहि स्पष्ट व निःसंदिग्ध पाहिजे. तें दिल्लीस दप्तरीदाखल झालें पाहिजे. सरकारचें उत्तर असमाधानकारक आल्यास काय करूं याबद्दल प्रतिसहकारपक्षाच्या लोकांनी आता कांहींच म्हणूं नये. त्यावर उगाच टीका करण्यास इतरांना संधि मिळते. ती जबाबदारी त्यांच्यावर आहे. त्यांनी ती संभाळावी. आपणाला आपलें काम भरपूर आहे.

नवे सभासद करतांना आपल्या पक्षाचा मॅनिफेस्टो पुढे करतांच आपल्या अडचणींना सुरवात होणार असें मी अकोल्यास तुम्हाला सांगितलेंच होतें. तथापि पक्षाची सभा करून एकदाचः त्या सर्व अडचणींचा आपणांस निकाल करतां येईल. मध्यंतरी सर्वांकडून मॅनिफेस्टोसंबंधी लेखी सूचना मागवाव्या व तोपर्यंत सभासद करण्याचें काम चालूं ठेवावें. जे लोक आपले आहेत ते मॅनिफेस्टोला सामान्यपणें हरकत न घेतां सभासद होतील. आणि पुष्कळसे सभासद आपल्या आधींच झाले म्हणजे इतरांच्यावरहि त्याचा परिणाम होऊन ते येतील.

५५९

२५ फेब्रुवारी १९२६—जम्नादास मेहता, दिल्ली

माझ्या तत्त्वांची सुसंगति पाळून तुमच्या हाताखाली काम करावें असें मला किती वाटतें म्हणून सांगूं ! अकोल्यास १९२१ सालीं व १९२६ सालीं जमलेली मंडळी तीच होती. पण त्या दोन सभांत केवढें तरी महदंतर ! तुम्ही मांड-

लेल्या सर्व मुद्द्यांचा मी नीट विचार केला. तरी मला असें वाटतें की, आपणांत समेट व्हावयाचा तर दिवाणगिऱ्या नाकारल्याच पाहिजेत हें तुम्हास कबूल असेल तर इतर सर्व बाबतींत प्रांतिक स्वातंत्र्याची अट मान्य होईल. तुम्ही पटेल यांच्याबद्दल विचारलेत ना ? ते अगदी चैनींत आहेत. ते जरा लठ्ठ झाले असून थोडे तरुणहि दिसतात.

५६०

**१० मार्च १९२६—जम्नादास मेहता, मुंबई**

हल्ली माझी अशी खात्री पटली आहे कीं, काँग्रेसवाले आणि प्रतिसहकार पक्ष यांच्यामध्ये सध्या जी दुही माजली आहे ती राष्ट्रांला अतिशय विघातक असून त्याने भलत्या लोकांना मात्र राजकारणांत हात घालावयास फावेल. मी दिल्लीस डॉ. मुंजे यांच्याशीं बोललों. ते समेटाला अनुकूल दिसले. पण मला असें वाटतें कीं, समेटाच्या पारड्यांत तुम्ही आपलें वजन घातलें तरच खात्रीने उपयोग होईल.

५६१

**१५ मार्च १९२६—एम. आर. जयकर, मुंबई**

मिसेस बेझंट यांच्याकडून सहीकरिता माझ्याकडे मॅनिफेस्टो आला आहे. आपण दोघेहि कन्व्हेन्शन्वाले असून बेझंट यांच्या बिलाला आपला पाठिंबा आहे. मिसेस बेझंट या प्रतिसहकार पक्षाला येऊन मिळाल्या, तेव्हा प्रत्युपकार म्हणून आपणहि त्यांच्या मॅनिफेस्टोवर सही देण्यास हरकत नाही.

५६२

**२३ मार्च १९२६—एम. आर. जयकर, मुंबई**

पुणें शहरातर्फें रा. ब. एल. जे. आपटे यांना तुम्ही उमेदवार म्हणून निवडलें हें चांगलें झालें. आणि तुम्हीहि तुमच्या जुन्या मतदार संघातर्फें असेम्ब्लीच्या जागेकरितां उभे राहत आहां हें पाहून बरें वाटलें हें सांगावयास नकोच.

५६३

**२९ मार्च १९२६—रंगस्वामी अय्यंगार, मद्रास**

मुंबई व महाराष्ट्रांत हल्ली घडत असलेल्या गोष्टी पाहून दुःख होतें. तथापि

१९२३-२४-२५ या तीन सालीं तुम्ही आम्ही जसें एकोप्याने काम केलें तसें पुनः घडून येण्याची शक्यता आहे कांय याची मी उत्कंठेने वाट पाहत आहे ! मागे कांही झालें असलें तरी, तुम्ही मोतीलाल नेहरू यांना पुनः येऊन मदत करण्याची इच्छा कराल तर ते आनंदाने तुमचें स्वागत करितील. तत्त्वाचा त्याग न करता स्वराज्य पक्षाच्या धोरणांत जे फरक तुम्हास करावयास पाहिजेत ते तुमचें व माझें सहकार्य झालें तर कदाचित घडून येतील. कोणत्याहि नव्या पक्षाला मिळण्यापूर्वी तुमच्याशीं चर्चा करण्याची संधि मला मिळावी, कारण आपण सर्वांनी मोठ्या परिश्रमाने जें अपूर्व कार्य केलें तें नष्ट करावें इतकाच या नव्या पक्षाचा हेतु आहे !

५६४

७ एप्रिल १९२६—पं. मालवीय, अलाहाबाद

रंगस्वामी अय्यंगार भेटले व तुमच्याशीं काय बोलणें झालें तें त्यांनी मला सांगितलें. एकाच कॉंग्रेसमधले दोन पक्ष, त्यांत तत्त्वाचा फारच थोडा फरक असता कसे व कां जवळ येऊं शकत नाहीत, याबद्दल वाईट वाटते. समेटाची ही परिषद ता. २० रोजीं अहमदाबादला भरवावी. कारण गांधी २२ तारखेस मसूरीस जाणार आहेत. अनेक विरोधी पक्षांची मंडळी या परिषदेस न जमविता कांही थोडे निवडक लोकच बोलवावें. तुम्हांला हें पसंत पडलें तर लजपतराय यांना तार करा.

५६५

१६ एप्रिल १९२६—म. गांधी, साबरमती

येत्या मंगळवारीं अगर बुधवारीं तुम्ही येथे येऊं शकाल काय ? मोतीलाल नेहरू तुमच्याशीं अनौपचारिक चर्चा करूं इच्छित आहेत. (तार)

५६६

१६ एप्रिल १९२६—केळकर यांचें जयकरांना पत्र

तुमचा टेलिफोन हातीं येताच ता. २०–२१ रोजीं आपणा सर्वांबरोबर अहमदाबादला येण्याबद्दल मी मुंजे व अणे यांना निकडीच्या तारा केल्या आहेत. आणि ते जर न येऊं शकले तर आम्ही म. गांधींशीं योग्य दिसेल ती वाटाघाट

करूं व तो निर्णय तुम्हांला मान्य करावा लागेल असेंहि कळविलें आहे. तें न झालें अगर त्यांनी आम्हांला मुखत्यारपत्रहि न दिलें तर, कॉंग्रेसमधील समेटाची अशी सोन्यासारखी संधि गमावल्याची जबाबदारी सर्वस्वी त्यांच्या माथ्यावर पडेल असेंहि तारेंत म्हटलें आहे. उद्यापर्यंत आपल्या तारांचीं उत्तरें येतील. दहा वाजता तुम्ही व मी टेलिफोनवर बोलूं व नंतर नेहरू व म. गांधी यांना तुम्हाला तारेने जबाब पाठविता येईल.

५६७

१८ एप्रिल १९२६—सी. वाय. चिंतामणी, अलाहाबाद

तुमच्या पक्षाने नव्या राष्ट्रीय पक्षांत सामील होण्याचे ठरविलें काय? तसें असेल तर तुम्ही मागे राहूं नये. तुम्ही नव्या पक्षांत न येण्याने त्या पक्षाला मोठा धक्का बसणार आहे.

५६८

२७ एप्रिल १९२६—न. र. फाटक व तटणीस, मुंबई

यंदा येथे भरणाऱ्या साहित्य संमेलनाला आपण अवश्य हजर राहून प्रसंगाचें महत्त्व वाढविलें पाहिजे हें सुचविण्याकरिता हें पत्र मुद्दाम लिहीत आहों.

५६९

१७ मे १९२६—केळकरांचें ॲप्टिस्टा यांना पत्र

युनिव्हर्सिटीपेक्षा मुंबई उत्तर भागाच्या वतीने तुम्ही निवडणुकीला उभें राहावें असें आमचें ठरलें याबद्दल तुम्ही गैरसमज करून घेतलेला दिसतो. तुम्ही कोठून निवडून याल हें तुमचें तुम्हालाच अधिक कळणार म्हणून जयकर व मी ही गोष्ट सर्वस्वी तुम्हावरच सोंपवितों. इलेक्शन ही बाबच अशी आहे कीं, त्यांत कोणाचाहि मिळते घेण्याचा स्वभाव व सहिष्णुता यांची अगदी परीक्षा होते. म्हणून आमच्याबद्दल पूर्वग्रह न धरतां व न रागावतां कोठलीहि गोष्ट खुल्या दिलाने बोलून त्यांची चर्चा करावी अशी माझी तुम्हाला विनंति आहे.

५७०

२० मे १९२६—के. सी. नियोगी, कलकत्ता

येथे मुसलमान लोक हिंदु देवळांतील मूर्ति फोडणें वगैरे अत्याचार दररोज

करीत आहेत. लॉर्ड लिटन यांना भेटलों. त्यांच्यांत दम दिसत नाही. एकदोन प्रमुख मुसलमान पुढाऱ्यांचें कपट उघडकीला आल्यामुळे दासबाबू यांच्या बंगाल पॅक्टविरुद्ध ओरड होऊं लागली आहे. हिंदु संघटनाकरिता वेळ चांगली आहे. पण तसा पुढारी नाही. बंगाल पॅक्ट रद्द करावा असाहि ठराव कांही स्वराजिष्ट येथील प्रांतिक परिषदेंत आणणार आहेत. त्यांचा पराभव झाला म्हणजे प्रतिसहकारपक्षाचें म्हणणें लोकांना पटूं लागेल!

५७१

**२० मे १९२६—केळकर यांचें जयकरांना पत्र**

तुम्ही युनिव्हर्सिटीतर्फे उभे राहात नाही असें समजून मी बॅप्टिस्टा यांना परवाच पत्र लिहून टाकलें आहे. तुम्ही व बॅप्टिस्टा काय तें ठरवा. मी तिकडे येऊन विशेषसा उपयोग होईल असें वाटत नाही. कारण उमेदवारांचा क्रम व प्रतवारी कशी लावावयाची हें ठरलेलें आहे. तुम्हीच युनिव्हर्सिटीकरिता उभे राहिलां तर पक्षाकडून बॅप्टिस्टा यांना काय जबाब मिळेल हें त्यांना माहित आहे. आणि तुम्ही न राहिलांत तर बॅप्टिस्टा आपला आग्रह सोडणार नाहीत. तेच पक्षाचे उपाध्यक्ष, तेव्हा त्यांना सोडून डॉ. परांजपे यांना मात्र पाठिंबा देतां येणार नाही. पं. मोतीलाल नेहरू हे आपल्याविरुद्ध मोहिमेला निघाले कीं नाही हें मध्यंतरीं समजेल. ते मुंबईंत आले तर फारच उत्तम. उत्तर हिंदुस्थानांत या उन्हाळ्याच्या दिवसांत तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे व्याख्यानाचा दौरा काढावा असें माझ्या मनांत येत नाही. पण तितकी जरूरच वाटली तर खात्रीने तें काम मी अंगावर घेईन.

५७२

**२१ मे १९२६—केळकर यांचें जयकरांना पत्र**

तुमच्या विनंतीप्रमाणे मुंबईस यावें असें मनांत येतें पण कार्यक्रम सारखे लागलेले असल्यामुळे इलाज नाही. उद्या व परवा येथे संस्थानी प्रजा-प्ररिषद आहे व मी सेक्रेटरींपैकी एक असल्यामुळे मला हजर राहिलेंच पाहिजे. त्या सुमारासच लायब्ररी कॉन्फरन्स आहे. हैद्राबादचे ना. केशवराव हे माझ्या विनंतीखातर अध्यक्ष झाले म्हणून मला दुसरीकडे जातां येत नाही. २३ तारखेस भारत इतिहास मंडळांत मल्हारराव

होळकरांचें चित्र श्रीमंत खासेराव पवार उघडणार त्या वेळीं मला हजर राहिलें पाहिजे. अशा रीतीने शनिवार व रविवार गेला. सोमवारीं नित्याचें केसरींचें काम आहे. म्हणजे मंगळवारशिवाय येथून निघतांच येत नाही. तिकडे येण्यापूर्वी डॉ. परांजपे यांची गांठ पडून एकदा बोलणें झालें पाहिजे.

५७३

२८ मे १९२६—विजयराघवाचारियर, सालेम

अगत्य व स्नेह यांनी ओतप्रोत भरलेल्या तुमच्या पत्राबद्दल फार आभारी आहें. पण सध्या मन असें गोंधळलें आहे कीं कोणत्याच पक्षांत आपण मिळूं नये, नीट विचार करावा असें वाटतें. जुन्या राष्ट्रीय पक्षाची पुनर्घटना करण्याचा मी प्रयत्न केला पण दुर्दैवाने यश आलें नाही. कॉंग्रेसचें वैशिष्ट्य नाहींसें होऊन ती पूर्णपणें स्वराज्यपक्षाच्या हातीं गेली आहे. आणि स्वराज्यपक्ष कॉंग्रेसच्या नांवाचा हवा तसा दुरुपयोग करीत आहे हें देशांतील लोकांना कळत नाही ! माझी प्रकृति सध्या बरी नाही. शक्य असल्यास तुम्हींच इकडे येऊं शकाल काय !

५७४

११ जून १९२६—केळकर यांचें जयकर यांना पत्र

कामत व परांजपे माझ्याकडे येऊन डॉ. परांजपे यांच्या उमेदवारीबद्दल त्यांनी मला विचारलें. मी त्यांना सर्व गुंतागुंतीची परिस्थिति सांगितली. डॉ. परांजपे हे प्रतिसहकारपक्षाला मिळत असतील तर यांतून कांही मध्यम मार्ग निघेल. कार्यकारी मंडळाचीः सभा भरवून बॅप्टिस्टा यांना उभें राहण्यापासून परावृत्त करण्याची विनंति करण्याचा ठराव करतां येईल. या बाबतींत कार्यकारी मंडळाच्या सभेनेच बॅप्टिस्टा यांच्याबद्दल कोणताहि ठराव करावा. व्यक्तिशः ती जबाबदारी कोणीच अंगावर घेऊं नये असें मला वाटतें.

५७५

२ जुलै १९२६—चोइतराम गिडवानी, सिंध ( हैद्राबाद )

' हिंदुस्थान टाइम्सचे ' संपादक जयरामदास दौलतराम यांच्यावरील कौन्सिलच्या निवडणुकीसंबंधी निर्बंध दूर करण्याला तुमच्याकडून मदत झाल्यास हवी आहे. जयरामदास यांनी ता. २४ एप्रिलला अर्ज केला होता, व वरून

त्याला मान्यताहि मिळाली होती. पण ही गोष्ट आता मुंबई सरकारच्या हातीं आहे. कदाचित् याकूब हसन वगैरेंचाहि त्याला विरोध असेल. तरी तुम्ही योग्य ती खटपट करून मला कळवाल काय !

५७६

## २७ ऑगस्ट १९२६—केळकर यांचें जयकर यांना पत्र

तुमचीं सर्व पत्रें पोहोंचलीं. पुण्यांतील आमच्या सर्व मंडळींना विचारून निवडणुकीसंबंधीं हें अखेरचें निर्णायक उत्तर पाठवीत आहें. पक्षाचे मुख्य या दृष्टीने आम्ही मुंबईसंबंधी सर्व गोष्टी तुम्हावर सोपविल्या आहेत. तशीच पुण्या-संबंधीची सर्व बाब तुम्ही सर्वस्वी आमच्यावर सोपवावी. डॉ. परांजपे यांना पुण्यातर्फे उभें रहाण्याविषयी विचारिलें पण त्यांनीच नकार दिला. म्हणून आता कोणाहि नेमस्ताची सोय पहावी असें आमच्यावर यत्किंचितहि बंधन नाही. आम्ही शब्दांतून मोकळे झालों आहोंत. शेट हणमंतराम रामनाथ यांच्या मनांत निवडणुकीला उभें रहावयाचें होतें. म्हणून डॉ. लोहकरे यांचें नांवहि निश्चित करतां येईना. हणमंतराम हे प्रतिसहकार पक्षाच्या नांवानेहि उभे रहाण्यास तयार होते, यावरून उमेदवारांच्या या गुंतागुंती सोडवण्यांत मला किती प्रयास व कष्ट पडत असतील हें दिसून येईल. रा.ब. हणमंतराम हे जर स्वतंत्र पक्षीय म्हणून उभे रहाण्यास नाकबूल असतील तर, डॉ. लोहकरे यांना त्यांच्या जुन्या मतदारसंघातर्फे उभें रहाण्यास सांगितलें पाहिजे; आणि तसें झालें म्हणजे मग माझ्या स्वतःच्या निवडणूकीला किती प्रतिस्पर्धी होतात तें तुम्हीच पहा ! इतक्या अडचणींत आम्ही नेमस्तांची कुठून सोय पाहाणार व कां पाहावी ? ते आमच्याकडे खऱ्या मनाने कधीहि आले नाहीत व आम्हांला त्यांनी विचारलेंहि नाही. म्हणून 'आम्ही नेमस्तांची सोय करावी' ही कल्पना तुम्ही अजिबात सोडून द्यावी. मुंबईच्या तुमच्या व्यवस्थेंत आम्ही हात घालीत नाही व त्याबद्दल इतकेंच मागून घेतों कीं, पुण्यांत तुम्ही लक्ष घालूं नये. पुणें व मुंबई शहर सोडून उमेदवारांच्या निवडणुकीचा प्रश्न तेथील स्थानिक पुढाऱ्यांकडे सोपवावा हें बरें.

कारण या बाहेरच्या कित्येक ऋणानुबंधी लोकांनी आम्हाला अनेकदां संकटकाळीं मदत केली आहे. त्यांच्या स्थानिक अडचणी खरे तेच जाणतील. तथापि मुंबई शहरांत तुम्ही काय तें स्वतंत्रपणें ठरवावें. पुणें शहर, मध्यभाग इत्यादि मतदार

संघासंबंधी आमचें आम्ही कायतें ठरवूं. इतर जिल्हे व उपनगरें यांची गोष्ट पक्षाचे अध्यक्ष या दृष्टीने तुम्ही हवी तशी ठरवावी. स्थानिक लोकांची नांवें सुचविणें इत्यादि होईल ती मदत आम्ही करूं.

५७७

**२४ ऑक्टोबर १९२६—केळकरांचें बॅप्टिस्टा यांना पत्र**

मी नुकताच निवडणुकीच्या दौऱ्यावरून परत आलों. तुमच्याकरिता मतांची खटपट चांगली झाली आहे असें मला सर्वत्र दिसत आहे. मीहि माझ्या व्याख्यानांतून तुमच्याबद्दल बोलत होतों. येथे आल्यावर तुमचें पत्र पाहून आश्चर्य वाटलें. कारण त्यांत उमेदवारी परत घेता असें लिहितां ! मला वाटतें ठिकठिकाणीं इतका चांगला पाठिंबा तुम्हांला मिळाला असतां तुम्हीं उमेदवारी परत घेण्याने पक्षावर त्याचा फार वाईट परिणाम होईल. तुमच्याविरुद्ध आक्षेपांना जाहीर उत्तर देणें हा मार्ग आहे, उमेदवारी परत घेणें हा नव्हे.

५७८

**२ नोव्हेंबर १९२६—कृ. सि. हिर्लेकर, बार्लिन**

गेल्या दोन महिन्यांपासून युरोपांतील मोठी फिल्म कंपनी 'आगफा' तिच्या परकीय खात्यांत मला नोकरी मिळाली आहे. युनायटेड पिक्चर्स सिंडिकेटने सर्व चित्रपटांची कथानकें मजकडे पाठवून दिलीं होतीं, व त्यांतील 'तोतयाचें बंड' या देशांतील लोकांना पसंत पडेल असा या कंपनींतलि तज्ज्ञाने अभिप्राय दिला आहे. यु. पि. सिं. ला कॉंग्रेसचा बोलपट घेण्याची सूचना केली आहे. पैशाच्या व राजकीय चळवळीच्याहि दृष्टीने या चित्रपटापासून फायदा होईल याबद्दल कंपनीची खातरजमा केली आहे. या बाबतींत आपणास कंपनीला उत्तेजन देतां आलें तर जरूर द्यावें.

५७९

**१२ नोव्हेंबर १९२६—पी. ए. वाडिया, मुंबई**

पं. मालवीय हे येथे आले असून, आम्ही त्यांच्याशीं गोल्ड स्टॅन्डर्डला प्राधान्य देण्याबद्दल चर्चा करीत आहोंत. सर पुरुषोत्तमदास यांनी कमिटीच्या रिपोर्टावर सही केली ही त्यांची मोठी चूक झाली; तथापि लीगला जर आपल्या

बाजूला वळवितां आलें तरीहि पुष्कळ कार्य होईल. आम्ही पं. मालवीय यांना गोल्ड स्टॅन्डर्डबद्दल आता पुष्कळच पढविलें आहे !

५८०

२० नोव्हेंबर १९२६—केळकरांचें शिवस्वामी अय्यर यांना पत्र

मी सध्या आजाराने अन्थरुणाला अगदी खिळून गेल्यामुळे तुमच्या पत्राचें उत्तर पाठवितां आलें नाही. गेले दोन-तीन दिवस मला अन्थरुणांत केवळ उठून बसण्याची शक्ति आली आहे. तथापि तोंडाने होईल तेवढें निवडणुकीसंबंधाचें काम चालूच आहे. आता आजार व निवडणुकीचें काम दोनाहि संपलीं. तथापि अंगांत थोडा अशक्तपणा आहेच. २४ तारखेला निवडणुकीचा निकाल काय होतो हें पाहावें. स्वतंत्र पक्षीय कॉंग्रेसवाले व प्रतिसहकार पक्षीय लोक मिळून बहुमत नसलें तरी त्यांचा एक मोठा गट होईल. पण स्वराज्य पक्षीयांना मात्र आता बहुमत मिळत नाही हें खास. आता कांही देवघेव करण्याची बुद्धि आणि शहाणपणा त्यांच्या अंगीं असेल, तरच दोनहि पक्षांचा तरणोपाय आहे. विधायक कार्य दोघांनाहि पाहिजे आहे आणि सर्वसामान्य तत्त्वाचें बंधन पाळून इतर तपशिलाच्या बाबतींत स्वातंत्र्य ठेवलें, तर दोनाहि पक्षांची एकमेकांस चांगली मदत होण्यास कांहीच हरकत नाही. पक्षाचें बंधन अगदी काटेखोर झालें म्हणजे त्रास होतो असा माझा असेंब्लींतील अनुभव आहे. मद्रासेंत स्वराज्य पक्ष विजयी झाला, पण स्वतंत्रः पक्षीयांना दिवाणगिऱ्या स्वीकारण्यांत पाठिंबा देऊन आपलें पासंगाचें वजन योग्य बाजूला टाकतील तरच उपयोग. एरवीं त्यांना मिळालेल्या यशाचा ते काय उपयोग करणार ? एकूण तुम्ही आणि पं. नेहरू यांच्या बळाबळाची परीक्षा आहे म्हणावयाची !

५८१

२६ नोव्हेंबर १९२६—बॅ. बॅप्टिस्टा, मुंबई

तुमच्या निवडणुकींतील यशाबद्दल अभिनंदन करतों. करंदीकर पडले, व्हाईट झालें. पण त्याचा अर्थ असा नव्हे कीं, आपला प्रतिसहकार पक्ष कमजोर होता. छेः, तसें शक्यच नाही. कांही तरी करावयाचें राहून गेलें असावें. आपण पुनः होमरूल लीग सुरू केली पाहिजे.

५८२

## २६ नोव्हेंबर १९२६—श्री. कृ. कोल्हटकर, जळगांव

माझी प्रकृति बरी नव्हती. पूर्ववत् होण्यास एकदोन महिने लागतील. म्हणून युनिव्हर्सिटी रजिस्ट्रारकडे जावयाचा अभिप्राय इंग्रजींत लिहून काढण्याची आपणास विनंति करण्यावांचून गत्यंतर नाही. अभिप्राय आपणच तयार करून तो सहीसाठी माझ्याकडे पाठवावा. मुंबई युनिव्हर्सिटीकडे जावयाचा अभिप्राय जसा सुंदर व प्रगल्भ भाषेंत ग्रथित केला पाहिजे, तसा तो आपणच लिहूं शकाल.

५८३

## २९ नोव्हेंबर १९२६—केळकर यांच बापुजी अणे यांना पत्र

पुष्कळ दिवसांत तुम्हाला लिहिलें नाही. पण मनाने तुमच्याशीं बोलत होतों. प्रतिसहकार पक्षाचें बीज रुजलें असें या निवडणुकविरून वाटतें. या यशाची परि-समाप्ति आता आसाम कॉंग्रेसने दिवाणगिऱ्यांबद्दल गुळमुळीत ठराव पास केला म्हणजे, अगर स्वतंत्र पक्षाच्या लोकांना मद्रासच्या स्वराजिस्टांनी कौन्सिलांत पाठिंबा दिला म्हणजे, होईल. बंगालमध्ये अगर इतर प्रांतांतदेखील पुढे काय होईल हें आता ठरल्यासारखें आहे. कानपूर कॉंग्रेसने कौन्सिलांतून उठून येण्यास सांगितलें. पण आता तें कोणी ऐकत नाही. स्वराज्य पक्षीयांनी दिवाणगिऱ्या घेऊं नयेत इतकेंच आता राहिलें. पण स्वतंत्र पक्षाच्या लोकांशीं मिळाल्या-शिवाय स्वराजिस्टांचें बहुमतच होत नाही तर त्यांना दिवाणगिऱ्या तरी देतो कोण ? मद्रासच्या स्वराजिस्टांना मिळालेलें यशच त्यांना मारक होणार ! ते सत्तेला स्पर्श करत नाहीत; मग मिळालेल्या यशाचा त्यांना उपयोग काय ! जस्टिस पक्षाचें त्यांना वावडें आहे. म्हणून स्वतंत्र पक्षाला ते दिवाणगिऱ्या घेण्याला पाठिंबा देतील असें वाटतें. आसाम कॉंग्रेसमध्ये विषयनियामक कमिटींत आपण यासंबंधी ठराव मांडूं नये. आपण प्रथम बोललों तर स्वराज्य पक्षांतून जे दुवे दुभंग होत आहेत ते एक होतील. याच्या उलट त्यांनाच प्रथम ठराव करूं द्यावे म्हणजे त्यांच्यांत मतभेद पडून आपणाला पाहिजे तें निष्पन्न होईल. आपणा सर्व प्रतिसहकार पक्षीयांत डॉ. मुंजे यांच्या यशाने मला अतिशय समाधान झालें. कारण मध्यप्रांतांत त्यांचें यश ही एक कसोटीच होती. प्रतिपक्षाला चारी मुंडे

चीत केल्याने, मुंजे यांनी गेले दहाबारा महिने जी निंदा सहन केली त्याची भरपाई झाली.

५८४

२९ डिसेंबर १९२६—रा. ग. प्रधान, नाशिक

मुंबई कौन्सिलाच्या अध्यक्षाच्या जागेकरिता मी खटपट करीत आहें; तरी आपण मला पाठिंबा द्यावा अशी विनंति आहे. मी निवडून आल्यास माझ्या पगारापैकीं एक–तृतीयांश रक्कम मी पक्षाच्या सार्वजनिक फंडाला देईन.

५८५

३१ डिसेंबर १९२६—लाला लजपतराय, लाहोर

श्रद्धानंद यांच्या स्मारकाकरिता एक ऑल–इंडिया ट्रस्ट करीत आहें; व त्याचा उद्देश :शुद्धि व अस्पृश्यता–निवारणाकरिता : निधि जमविणें हा आहे. आर्यसमाज व हिंदुसभा यांचे प्रमुख पुढारी ट्रस्टी करावेत असें योजलें आहे. तरी ट्रस्टी होण्यास व विनंति–पत्रावर तुमचें नांव घालण्याला संमति द्या. (तार)

५८६

२ जानेवारी १९२७—मार्गारेट कौझिन्स, मद्रास

अखिल भारतीय महिला परिषदेचा कार्यक्रम यासोबत तुम्हांस पाठवीत आहें. परिषद ५ तारखेस भरणार. सार्वजनिक रीतीने आमंत्रण तुम्हाकडे गेलेंच आहे. या पत्राने तुम्हाला विशेष आग्रहाने आमंत्रण देत आहें. कारण स्त्री-शिक्षण व प्रगति या बाबतींत तुम्ही पुष्कळ लक्ष घालतां हें मला माहीत आहे. म्हणून तुम्ही याल अशी मला आशा आहे.

५८७

१० जानेवारी १९२७—हेलेना नार्मंटन, लंडन

लंडन येथे इन्फर्मेशन ब्यूरो काढण्याकरिता तीन हजार पौंड खर्च करण्याचें ठरविण्यांत आलें हें तुम्हांला माहीत असेलच. पण हा शुद्ध वेडे-पणा नाही काय ? येथे हॉर्निमन असतां अशी वेगळी योजना कॉंग्रेस काय म्हणून करते ! आणि बेनस्पूरसारख्या कॉंग्रेसच्या धोरणाविरुद्ध असलेल्या मनुष्याला

कॉंग्रेस हातीं कां धरते ? हॉर्निमनसंबंधाने माझा पूर्वी दूषित ग्रह होता. पण मला आता असें दिसतें कीं, हिंदुस्थानाविषयी इतकी खटपट करीत असतां त्याचें चीज होत नाही. कसेंहि असो. कृपा करून पटेल यांना मात्र इकडे पाठवूं नये.

५८८

११ जानेवारी १९२७—के. एस. हिर्लेकर, बर्लिन

तिकडे हिंदुस्थानांत आल्यावर मी कोणतें कार्य हातीं घ्यावें ह्यासंबंधी आपल्या पत्राने मनाला उत्तेजन आलें. या कामीं रा. बापूजी अणे, डॉ. मुंजे, श्री. दादासाहेब खापर्डे वगैरे असेंब्लीच्या महाराष्ट्रीय सभासदांचें मला पाठबळ मिळाल्यास बरें होईल. सिनेमाचा उपयोग इकडे पाश्चात्य देशांत फार करतात. हिंदी प्रचाराच्या दृष्टीने मी ह्या कलेचा थोडाबहुत उपयोग करण्याचें ठरविलें आहे. न्यूज सर्व्हिस प्रमाणे चित्रें व माहिती पुरविली तर त्यावर पैसेहि मिळतात. 'फिल्म वुइकली'सारखे सिनेमा सृष्टीला वाहिलेलें साप्ताहिक तिकडे काढावें असें माझ्या मनांत आहे. प्रचाराच्या दृष्टीने सिनेमाच्या कलेचा उपयोग करावा असें दादासाहेब खापर्डे यांच्याजवळ लो. टिळकांनी अनेकदा बोलून दाखविलें होतें. टिळक-स्वराज्य संघांतून किंवा कोणा खाजगी व्यक्तीकडूनहि सुमारें ३५० पौंड मला कर्ज मिळेल तर हें काम मी करूं शकेन. प्रतिसहकार पक्षाला कौन्सिल निवडणुकींत यश मिळाले हें वाचून आनंद वाटला.

५८९

२२ जानेवारी १९२७—केळकर यांचें लाला लजपतराय यांना पत्र

माझ्या कानाच्या ऑपरेशनकरिता दिल्लीहून निघून मी येथे तांतडीने आलों. उद्या माझें ऑपरेशन होईल. एका नाजूक तथापि निकडीच्या बाबतींत हें पत्र लिहीत आहें. तुम्ही आम्ही मनाने सर्व एकच आहों यामुळे राष्ट्रीय पक्ष व प्रति-सहकारपक्षः एक करण्याला हरकत नाही. तथापि ही गोष्ट करण्यांत जयकरांच्या दृष्टीने थोडा धोका आहे. विठ्ठलभाई पटेल हे एखादें स्थान प्राप्त झालें कीं लगेच त्याचा फायदा घेऊन बरोबरीच्या माणसांनाहि मग कसें ओळखीत नाहीत, त्यांचा पाणउतारा करतात, हें दिसून आलेंच आहे. यामुळे नव्या एकत्रित पक्षांत जर जयकरांना विशिष्ट स्थान नसेल तर त्यांचा हिरमोड होईल. कारण आपणाला जास्त

व्यापक क्षेत्र मिळावें म्हणून मुद्दाम प्रांतिक कौन्सिलापेक्षा यंदा ते असेंब्लीला उभे राहिले. तुम्हीच पक्षाचे अध्यक्ष राहावें हें पटेल यांचें म्हणणें सहेतुक आहे. तसें झालें तर जयकर यांच्यावर वरचष्मा करण्याला पटेल यांना वारंवार संधि मिळेल. म्हणून माझी सूचना अशी कीं, आहे तो प्रतिसहकार पक्ष मोडूं नये, व दोन्ही पक्ष एक करावयाचे तर तुम्हाऐवजीं तुम्ही जयकरांना अध्यक्षपद द्यावें. याने इतर अनेक गुंतागुंती वांचतील. आणि जयकरांनाहि योग्य संधि मिळेल. ही सूचना तुम्हाला करणें कांहींसें अवघड व नाजूक आहे. तथापि कांही विशिष्ट हेतु डोळ्यांपुढे असल्यामुळेंच मी ती केली आहे असें समजावें व त्याबद्दल गैरसमज मानूं नये. अणे, जयकर, तुम्ही आम्ही सर्व उत्तम स्नेही आहों. याकरिता तुम्हीच त्यांना भेटून आपसांत खुल्या दिलाने या प्रश्नाची चर्चा केली तर बरें होईल. स्वतः जयकर विनयी व भिडस्त आहेत. त्यांच्याकरिता आपणच या गोष्टींत लक्ष घातलें पाहिजे.

### ५९०

### २८ जानेवारी १९२७—लाला लजपतराय, लाहोर

राष्ट्रीयपक्षाचे अध्यक्ष होण्याबद्दल जयकर यांना विचारलें पण त्यांनी तें नाकारलें. असेंब्लींतील एक प्रमुख सभासद व पुढारी या दृष्टीने जयकरांना योग्य मान मिळेल अशी आशा आहे.

### ५९१

### ३ फेब्रुवारी १९२७—बॅ. एस. जी. वेलिणकर, मुंबई

लँड ॲक्विझिशन ॲक्ट या माझ्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति सध्या छापण्याचें काम चालू आहे. या कायद्याची दुरुस्ती करण्यासंबंधी जें बिल तुम्हीं असेंब्लींत आणलें आहे त्याचा सारांश टाइम्समध्ये वाचून मला असें वाटतें कीं, तुमचें बिल पास झाल्यास लँड ॲक्विझिशन ॲक्टांत अनेक मूलग्राही फरक होतील. आणि तसें झाल्यास माझ्या पुस्तकाच्या नव्या आवृत्तीचा कांहींच उपयोग होणार नाही! तरी तुमचें बिल पास होईपर्यंत किती कालावधि आहे हें कळवावें. तुमच्या बिलाची एक प्रत मला पाठविल्यास आभारी होईन.

५९२

### १४ फेब्रुवारी १९२७—हिंदु० सरकारचे गृहमंत्री, दिल्ली

इन्शुअरन्स बिलासंबंधी विलायतमध्ये जी कमिटी बसली आहे तिच्या रिपोर्टाचें टांचण नुकतेंच माझ्या हातीं आलें आहे. न्यायमूर्ति क्लॉसन हे या कमिटीचे अध्यक्ष असून, विलायतेंतील इन्शुअरन्स कायद्यांत ही कमिटी कांही आमूलाग्र फेरफार करणार आहे. आमचें बिल असेंब्लीपुढे यावयास यामुळेंच उशीर होत आहे. मीहि या दृष्टीने सदर रिपोर्ट वाचून बिलाची फेरतपासणी करणार आहें. पण त्याला उशीर लागेल, व कदाचित् असेंब्लीच्या सप्टेंबरच्या बैठकींत माझ्यानंतरचा गृहमंत्री तें बिल मांडील. सिलेक्ट कमिटींत कोणकोण येतील व एखादा हिंदी तज्ज्ञ घेतां येईल कीं नाही याबद्दल आज कांहीच सांगतां येत नाही.

५९३

### १४ फेब्रुवारी १९२७—ना. व्यंकटराजू, विजगापट्टण

लँड ॲक्विझिशन ॲक्टासंबंधी एकदोन मुद्द्यांकडे तुमचें लक्ष वेधतों. सार्वजनिक हिताकरिता कायद्याने कोणाचीहि जमीन सरकारला घेतां येते. पण यासंबंधाने कोणालाहि फिर्याद करतां यावी, म्हणजे ‘सार्वजनिक हित’ हें कोर्टांत शाबीत होण्यासारखें असावें, असें तुमचें म्हणणें. 1925 A. C. 338 यांत असें ठरलें आहे कीं सरकारने एका हेतूकरिता सक्तीने जमीन खरेदी केली तर दुसऱ्या हेतूकरिता तिचा पुढे उपयोग करतां येत नाही. माझ्या अनुभविक माहितीप्रमाणे सरकार किंमती पाडून कायद्याखालीं जमिनी घेतें. पण त्या कशाकरिता तर पुढे त्या मिळकतीची जबर किंमत येईल ती उपटण्याकरिता! जमीन घेण्याची नोटीस बजावल्यानंतरहि अनेक वर्षे सरकार ती घेत नाही. बिचाऱ्या मालकाला ती विकतां येत नाही किंवा त्याच्या सुधारणा मशागतीवर खर्च करतां येत नाही. याकरिता मूळ मालकाला कांही वर्षांनंतर ती परत विकत घेण्याचा हक्क असावा.

५९४

### १६ फेब्रुवारी १९२७—केळकरांचें प्रॅ. वेलिणकरांना पत्र

लँड ॲक्विझिशन ॲक्टासंबंधी माझे बिलावर लोकमत घ्यावें असें असेंब्लींत

आज ठरलें. यानंतर एक वर्षाने तें सिलेक्ट कमिटीकडे जाणार, आणि जरी तें असेंब्लींत पास झालें तरी बहुत करून तें कौन्सिल ऑफ स्टेटमध्ये नापास होणार. सामान्यतः बिनसरकारी बिलांची अशीच वासलात लागते. जरी माझें बिल पास झालें तरी सर्व पास न होतां कांही थोड्या दुरुस्त्यांसह होईल, आणि तेवढ्या तुमच्या पुस्तकाच्या परिशिष्टांत तुम्हाला सहज घालतां येतील. म्हणून माझ्या बिलाबद्दल तुम्हाला भिण्याचें कारण नाही. कायदेपंडित व या विषयावरील ग्रंथकार या नात्याने या विषयाचा अभ्यास माझ्यापेक्षां तुम्ही सहजच अधिक कसोशीने केला असेल; तरी माझ्या बिलासंबंधाने तुमच्या सूचना व मत मला कळल्यास आभारी होईन.

५९५

१९ फेब्रुवारी १९२७—बॅ. वेलिणकर, मुंबई

तुमच्या पत्राबद्दल फार आभारी आहें. लँड ॲक्विझिशन बिल हातीं आल्यावर मी माझे विचार आपणांकडे पाठवीन. तसेंच तें बार ॲसोसिएशनपुढे आल्यावर ज्या दुरुस्त्या सार्वजनिक हिताच्या आहेत त्यांना पाठिंबा मिळण्याची जरूर खटपट करीन.

५९६

२३ फेब्रुवारी १९२७—प्रो. वा. गो. काळे, पुणें

स्नेह्यांच्या आग्रहावरून यंदा युनिव्हर्सिटीच्या निवडणुकीला उभें राहण्याचें मी ठरविलें आहे. तरी याबद्दल आपली सल्ला—मदत आणि पाठिंबा मला हवा आहे. निवडणुकीच्यावेळीं आपण दिल्लीस असाल, परंतु आपलें व केसरीचें पाठबळ मला मिळाल्यास अतिशय उपयोग होईल. जयकरांच्या जवळहि आपण ही गोष्ट बोलावी.

५९७

९ मार्च १९२७—केळकरांचें क्रॉनिकलचे संपादक यांना पत्र

जयकर हे जिना यांच्या पक्षाला येऊन मिळाले नाहीत म्हणून कांही दिवसांपूर्वी ना. जिना यांचे सहकारी मि. छागला व हेरल्ड पत्र यांनी जयकर यांच्यावर टीकेची झोड उठविली होती. पण या पक्षांत कोण कोण आहेत हें

सर्वांनाच माहीत होतें. मी विचारतां जयकर म्हणाले, 'कांही दिवसांनी आपो- आपच या पक्षाचें बेंड बाहेर पडणार आहे. मग टीकेला उत्तर कां द्या?' या पक्षांत पुरुषोत्तमदास ठाकुरदास व कॅनेराचे सर्वोत्तमराव हे दोन हिंदु सभासद नांवाला असून बाकी सगळे अस्सल मुसलमानच आहेत! स्टीलप्रोटेक्शन बिलाच्या बाबतींत, पुरुषोत्तमदास वगळून जिना यांच्या पक्षांतील सर्वांनी सरकारच्या बाजूने मतें दिलीं! आणि सोळा विरुद्ध अठरा पेन्सांच्या बिलांतहि तेंच घडलें. इतकेंच नव्हे तर जिनांच्या पक्षाचे मुख्य व्हिप सर्वोत्तमराव यांनींहि १८ पेन्सांच्या बाजूने मत दिलें! आणि अशा पक्षाला जयकर जाऊन मिळाले नाहीत म्हणून छागला जयकरांची नालस्ती करणार! पण जिनांचा पक्ष हें थोतांड आहे हें दिल्लीस सर्वांनाच माहीत आहे. याच्या उलट राष्ट्रीय पक्षांतल्या एकूण एक सभासदांनी १६ पेन्सांच्या बाजूने मत नोंदविलें आहे. जातवार मतदारसंघाला राष्ट्रीयपक्ष मान्यता देत नाहीं हाच जिना यांचा त्या पक्षावर राग, आणि कॉंग्रेसलाहि तें कबूल नाहीं, म्हणून जिना दोन्ही पक्षांत जाऊं शकत नाहीत. कालच्या महत्त्वाच्या प्रसंगीं देखील मुसलमानांनी सरकारला मतें दिलीं:हें एक उदाहरण देखील जातवारीचें तत्त्व देशाला किती घातुक आहे हें दाखविण्याला पुरेसें आहे.

५९८

### १४ मार्च १९२७—केळकरांचें बाळ गंगाधर खेर यांना पत्र

तुमचें पत्र पोंचलें. लँड ॲक्विझिशन ॲक्टाच्या दुरुस्तीचें जें बिल मी असेंब्लींत आणलें आहे, त्यावर प्रत्येक छेदकाच्या (clause) नोट्स मी अद्याप लिहिल्या नाहीत. पण त्या लवकरच लिहून तुमच्या लॉ जर्नलकडे पाठविणार आहें. तुमच्या पाठिंब्याची मला आवश्यकता आहे. बॅ. वेलिणकर हेहि या बिला- संबंधाने मला मदत करणार आहेत. तुम्हालाहि त्यांत आणखी कांही सुचलें तर ताबडतोब माझ्याकडे पाठवून द्या. माझ्या पत्राची वाट पाहूं नका.

५९९

### २० मार्च १९२७—तारकनाथदास, जर्मनी

कांही आठवड्यांपूर्वी मी व माझी बायको जर्मनींत बेडन येथे आलों.

बायकोला औषधोपचार सुरू आहे. तुम्ही माझ्या कामांत लक्ष घालून माझें हित पाहात आहां याबद्दल मी कृतज्ञ आहें. पूर्वी माझी व तुमची गांठ पडली नव्हती. पण आजपर्यंत माझ्या स्नेह्यांपैकीं कोणीहि माझ्याबद्दल जितकें लक्ष घातलें नाही तितकें तुम्ही घातलें. अमेरिकेंत मला अटक झाली त्यावेळीं तुम्ही कौन्सिलांत प्रश्न विचारले असें माझ्या भावाने मला लिहिलें आहे. कोणी एकाने 'टाइम्स ऑफ इंडिया'ला माझ्याबद्दल खोटी तार केली. त्याचा हेतु बहुधा हा असावा कीं, मी हिंदी लोकांना अमेरिकेंत नागरिकत्व मिळविण्यासंबंधी प्रयत्न करीत आहें त्याच्यामध्ये वांधा पडावा. फिरून प्रश्न विचारण्याची संधि येईल तेव्हा, यासोबत मी जे कांही प्रश्न पाठवीत आहें ते विचारावे. तुम्ही व तुमचे स्नेही उत्कृष्ट काम करीत आहां त्याबद्दल फार आभारी आहें.

६००

## २४ मार्च १९२७—प्रो. वा. गो. काळे

युनिव्हर्सिटीच्या निवडणुकींत आपण व केसरीनेहि मला जी बहुमोल मदत केली त्याबद्दल आपले कृतज्ञतेने मनःपूर्वक आभार मानतों. आपल्या मदतीचा मला फार उपयोग झाला. निवडणूक फार चढाओढीची आणि स्पर्धेची झाली. आणि सुट्टयांचे दिवस व इतर कारणांनी नेहेमीपेक्षा मतेंहि कमी नोंदावलीं गेलीं. निकाल कांहीहि होवो. पण महाराष्ट्रांत या कामीं स्नेही व कार्यकर्ते यांनी कसून मदत केली यांत शंका नाही.

६०१

## ८ एप्रिल १९२७—रामस्वामी अय्यंगार, मद्रास

कॉंग्रेसचे अध्यक्ष श्रीनिवास अय्यंगार यांची हिंदु-मुस्लिम ऐक्याकरिता तसेंच कॉंग्रेसमधील अनेक पक्षांतील भेद काढून टाकण्याकरितां समेट करण्याची इच्छा आहे. आणि त्याकरिता एक आठवडाभर महाराष्ट्रांत दौरा काढण्याची त्यांची इच्छा आहे. तरी त्यासंबंधी व्यवस्था होईल काय? (तार)

६०२

## १० एप्रिल १९२७—चिंतामणराव वैद्य, मुंबई

माझें गीतेच्या भाषांतराचें पुस्तक केसरीकडे पाठविलें आहे. त्यावर अभि-

प्राय लिहावा. माझें म्हातान्याचें हें शेवटचें अपत्य ! तेव्हा त्यावर माझें अतिशय प्रेम असणारच. ता. १७ रोजीं झांशीला बृहन्महाराष्ट्र परिषदेचा अध्यक्ष म्हणून जात आहें, तरी त्याबद्दल तुमच्या कांही सूचना असल्यास कळवाव्या.

६०३

१५ एप्रिल १९२७—रंगस्वामी आय्यंगार, मद्रास

तुमची तार पोंचली. श्रीनिवास अय्यंगार ठरल्याप्रमाणे महाराष्ट्रांतील दौऱ्याकरिता येत आहेत. मेच्या पहिल्या आठवड्यांत त्यांचे कार्यक्रम ठेवावेत. तुमच्या सूचनेप्रमाणे या दौऱ्यांत ते पक्षभेदाविषयीः वाद करणार नाहीत. (तार)

६०४

२४ एप्रिल १९२७—म. का. कोल्हटकर, बडोदें

आपण इतक्या आस्थेने व कळकळीने दिलेल्या आश्वासनाबद्दल फार आभारी आहें. आपणांस प्रत्यक्ष माझें काम दाखविण्याची संधि प्राप्त झाल्यास पाहात आहें. कदाचित् पुण्याच्या प्रदर्शनांत लोकमान्यांचाच बस्ट माझ्याकडे कास्टिंग केलेला दिसेल. माझ्यासारख्या अपरिचित व्यक्तीसंबधाने इतकी आस्था दाखविल्याने मला विशेष उत्साह आला आहे.

६०५

२३ मे १९२७— सी. विजयराघवाचारियर, सालेम

कलकत्त्याच्या युरोपियन अॅसोसिएशनच्या सेक्रेटरीने भारतमंत्र्याला अशी तार केली आहे कीं, कमिशनवर एकहि हिंदी गृहस्थ असूं नये ! याबद्दल निषेधात्मक तार पाठविण्याविषयीं मी श्रीनिवास अय्यंगार यांना कळविलें. पण ऑ. इं. कॉं. कमिटीच्या सभेंत त्याचा उच्चारहि झाला नाही. मला असें वाटतें कीं, प्रतिसहकार पक्षातर्फे तुम्ही व जयकर यांनी हिंदी राज्यघटनेचा एक मसुदा करून, व त्यांत प्रजेच्या मूलभूत हक्कांची घोषणा करून, तो भारतमंत्र्यांकडे पाठवावा. तुम्हाला वाटल्यास मीहि त्यांत सहकार्य करीन. हिंदी संस्थानिकांनी कशी प्रतिगामी चळवळ चालविली आहे हें तुम्ही पाहिलेंच असेल !

६०६

## २६ मे १९२७—भा. रा. नानल, रत्नागिरी

येथील टिळकांचे स्मारकाचे बाबतींत आपण येथून निघून गेल्यानंतर मी पुनः अंदाज काढिला. परंतु बाई मजकूर गोगटे यांचे सल्ल्याचे बाहेर जाण्यास तयार नाही. यामुळे तूर्त खरेदीखत हातीं येण्याचा संभव नाही. मी गांवाहून परत येतांच आपली रक्कम इन्शुअरने पाठवून देईन.

६०७

## २६ मे १९२७—सुरेंद्रनाथ सेन, बारिसाल

तुमच्या पुस्तकाचें भाषांतर करण्याची तुम्ही मला परवानगी दिल्याबद्दल फार आभारी आहें. पुस्तकाबद्दल मॉडर्न रिव्ह्यूमध्ये मी लेख लिहिला असता. पण संपादकांचे व माझे संबंध पूर्वीप्रमाणे स्नेहाचे राहिले नाहीत. याकरिता फॉरवर्ड-मध्ये परीक्षण लिहिणार आहें. कलकत्त्यास येतांच भाषांतराचें काम हातीं घेत आहें.

६०८

## २८ मे १९२७—केळकरांचें कौजलगी यांना पत्र

समेट मोडल्याचा दोष आमच्याकडे नाही असें श्रीनिवास अयंगार यांना वाटतें हें वाचून बरें वाटलें. तुम्हाला खरोखरच सांगतों कीं, वर्किंग कमिटीमध्ये समेटाच्या मसुद्याला पं. नेहरूंखेरीज सर्वजण कबूल होते. आणि हा वर्किंग कमिटीचा ठराव ऑ. इंडियाच्या सभेंत आम्हाला सहज पास करून घेतां आला असता. पण पं. नेहरू यांनी अवांतर गोष्टी काढून वर्किंग कमिटीच्या दोन बैठकी फुकट घालविल्या, व ऑ. इं. कॉं. कमिटीला मिळणारें समेटाचें श्रेय हिरावून घेतलें. ऐक्यासंबंधी माझ्या सूचना तुम्ही मागतां पण आणखी नवीन सूचना मी काय सांगणार ? श्रीनिवास अयंगार यांना दिलेल्या समेटाच्या सूचना तुम्हास मान्य नसतील तर, पहिल्याने वर्किंग कमिटीपुढे जो ठराव होता तो पसंत असल्यास पहा. आम्ही तो मान्य करूं. प्रांतिक स्वातंत्र्य मान्य असल्या-बद्दल श्रीनिवास अयंगार बोलले. माझ्या मतें कॉंग्रेसच्या राज्यांत प्रांतांना प्रांतिक स्वातंत्र्य व स्वायत्तता देणें हा एकच मार्ग आहे; व याने गोहत्ती कॉंग्रेसच्या ठरावाला बाध येत नाही. अशा दोन्ही गोष्टी साधतील. मद्रासचा प्रश्न जर

प्रांतिक स्वातंत्र्यानेच सुटला तर हेंच स्वातंत्र्य तुम्ही इतर प्रांतांना कां देत नाही? एकदां प्रांतिक स्वायत्तता दिली कीं दिवाणगिऱ्या घ्याव्या अगर घेऊं नयेत याबद्दल कॉंग्रेसने मॅंडेट काढण्याचा संबंधच येत नाही. आणि तीन-चार प्रांतांत जर द्विदल राज्यपद्धति अशक्य आहे असें प्रयोगाने ठरलें, तर ऑ. इं. कॉं. कमिटीला इतर प्रांतांनाहि तें उदाहरण दाखवितां येईल. प्रत्येक प्रांतांत वेगळी परिस्थिति असणार. जी गोष्ट एका ठिकाणीं साधणार नाही ती दुसरीकडे कदाचित् साधेल. म्हणून अधिकार स्वीकार कोठेच करूं नये हा सरसकट नियम बरोबर नाही.

श्रीनिवास अय्यंगार गांधीना भेटून परतहि आले असतील म्हणून आता हा युक्तिवाद करण्यांत अर्थ नाही. आम्हीहि पुढे कांही दिवस वर्तमानपत्रांत हा वाद लिहिणार नाही. म्हणजे कांही दिवसांनी कॉंग्रेसला वेगळ्या दृष्टीने पुनः या प्रश्नाकडे पाहतां येईल. आमचें म्हणणें लोकांना आज मान्य झालें नाही याबद्दल आम्ही तक्रार करीत नाही. पण आज ना उद्या तरी महाराष्ट्राचें म्हणणें लोकांना मान्य होईल. पुष्कळांना हें म्हणणें पटूं लागलें आहे ही, आजवर महाराष्ट्राने जी निंदा सहन केली त्याची, नुकसानभरपाईच असें आम्ही समजतों. स्थानिक व प्रांतिक राजकीय गाऱ्हाण्यांवर भर द्यावा असें श्रीनिवास अय्यंगार महाराष्ट्रांतील दौऱ्यांत म्हणाले तें बरोबर आहे. कारण त्रिदल बहिष्कार उठला, आणि कायदेभंगाची भाषाहि कॉंग्रेसने बंद केली, तेव्हा अर्थातच लोकांचें तेज कायम ठेवण्याला प्रांतिक गाऱ्हाणींच पुढे ओढून नोकरशाहीशीं झुंज कायम ठेवली पाहिजे. सुधारणा कशाहि असल्या तरी त्यांचा उपयोग करून घ्या, याचाच अर्थ असा नव्हे काय कीं, त्यासाठी सरकारशीं योग्य तर झगडा करावा ! अशा दृष्टीने पाहिलें तर आमच्या म्हणण्याबद्दल कोणाचाहि गैरसमज होऊं नये !

६०९

### ११ जून १९२७—बॅ. डॉ. भीमराव आंबेडकर, मुंबई

सर बेसिल ब्लॅकेट यांच्या करन्सी स्कीमला उत्तरादाखल चलन सुधारणेसंबंधीं माझी योजना तुम्ही कदाचित् सिलेक्ट कमिटींत पुढे मांडाल असा संभव आहे असें ' नवाकाळ ' कचेरींत मला कळलें. तसें असल्यास मी पुण्यास आपली गांठ घेऊं इच्छितों. तुमचा माझा आजपर्यंत कधी संबंध आलेला नाही, व पुष्कळ बाबतींत आपले मतभेदहि आहेत. तथापि सार्वजनिक हितसंबंधाच्या बाबतींत

आजपर्यंत एकमेकांशीं असहकार असलेल्यांनीहि एखादे वेळीं सहकार्य करण्यास हरकत नाही.

६१०

## १५ जून १९२७—जयरामदास दौलतराम, सिंध हैद्राबाद

डॉ. चोवीतराम गिडवानी यांना अगर मला मुंबईच्या ऑ. इं. कॉ. कमिटीच्या सभेस येतां आलें नाही. तथापि सिंधच्या विभक्तीकरणाचा जो ठराव सभेंत पास झाला त्यामुळे येथे फार असंतोष उत्पन्न झाला आहे. सिंधमधील फार मोठें हिंदु बहुमत ठरावाविरुद्ध आहे, आणि सिंध वेगळा करा म्हणणारांची संख्या केवळ हाताच्या बोटावर मोजण्याइतकी आहे. त्यांनी वर्तमानपत्रांत खोट्या तारा कराव्या, यापेक्षां त्यांत तथ्य नाही. लहानमोठ्या गांवच्या पंचायतींनी, तसेंच मोठ्या शहरीं भरलेल्या अनेक सभांतून, सिंध–विभागणीविरुद्ध ठराव झाले आहेत. राजकीय व आर्थिक दृष्टीने आक्षेप घेतात त्यांच्याबद्दल मी लिहीत नाही. पण सामान्य बहुमत याविरुद्ध आहे. सिंध हा मुसलमानी प्रांत व्हावा या गोष्टीला सभेंतल्या हिंदु सभासदांनी कशी संमति दिली याचें नवल वाटतें.

सर्व हिंदुस्थानची पुनः भाषावार प्रांतिक पुनर्घटना झाल्याखेरीज सिंध तेवढा वेगळा काढण्याची भाषा कां ? जातवार मतदारसंघ जाऊन उद्या संयुक्त मतदारसंघ दिले तरी मुसलमानांची मनोवृत्ति जी आहे ती उद्या थोडीच बदलणार आहे ! म्हणून आजच्या परिस्थितींत संयुक्त मतदार संघाचाच फक्त आग्रह धरावा. याने इतर प्रांतांतहि लोकसंख्येचा आग्रह धरतां येईल, व कायदे मंडळांतील प्रतिगामी वृत्तीच्या अनेक लोकांना पायबंद बसेल. केसरींतून आम्हांला तुम्ही पाठिंबा द्याल अशी आशा आहे.

६११

## १८ जून १९२७—बॅ. डॉ. भीमराव आंबेडकर, परेळ

मी ता. २६ रोजीं पुण्याला तुमची भेट घेऊन करन्सी बिलाबद्दल बोलेन. ब्लॅकेट यांनी सिलेक्ट कमिटीला पाठविलेल्या मेमोरँडमची प्रत मला पाठविल्यास मला आपणांशीं त्यासंबंधीं नीट व्यवस्थितपणें बोलतां येईल.

६१२

### २५ जून १९२७—केळकरांचें जयरामदास दौलतराम यांना पत्र

सिंध विभागणीसंबंधीः तुमचें पत्र पोंचलें. क्रॉनिकल व मराठा यांतील माझे मुलाखतीवरून माझें मत कळेल. सिंधमधील हिंदुबांधवांच्या हिताला आम्ही अपाय कसा करूं ? ऑ. इं. काँ. कमिटीचा मूळ ठराव, व वर्किंग कमिटींत पास करून घेतलेली दुरुस्ती हीं तुम्ही नीट काळजीपूर्वक पहाल तर, आन्ध्र व तामीळनाड यांचाहि सिंधबरोबर समावेश करून या प्रश्नाला मी अगदीं वेगळीच दिशा दिली असें तुम्हाला दिसेल ! जो ठराव पास झाला त्याची अंमलबजावणी करावयाची तर सिंधबरोबरच आन्ध्र व तामीळनाड यांनाहि ओढलें पाहिजे. यांचाच अर्थ हा प्रश्न आता इतक्यावरच न राहतां भाषावार प्रांतरचनेइतका व्यापक होतो !

६१३

### १ जुलै १९२७—बॅ. एम्. आर. जयकर, मुंबई

नुकत्याच घडलेल्या हिंदुमुसलमान विवाहाप्रमाणे आणखी एक विवाह होणार अशी येथे बातमी पसरली आहे. एका थोर महाराष्ट्रीय पुढाऱ्याची नात व एक मुसलमान गृहस्थ यांचा तो विवाह आहे म्हणतात. बातमी वारंवार कानावर येते, आणि ती बोलणारी व्यक्तीहि गैरविश्वास करण्यासारखी नसल्यामुळे, मित्रांच्या आग्रहावरून यांतील खऱ्याखोट्याची शहानिशा करण्याकरिता तुम्हास पत्र लिहीत आहें. कांहीं हिंदु स्त्रिया स्वेच्छेने मुसलमानाशीं लग्न करीत असतील. पण हल्ली हसन निझामी याच्या विशिष्ट प्रचारामुळे अशीं उदाहरणें घडत असल्यामुळे त्याला पायबंद घातलाच पाहिजे, अशी येथल्या हिंदुसभावाल्यांत प्रबळ भावना उत्पन्न झाली आहे. आणि तसा प्रचार करण्याबद्दल येथल्या कार्यकर्त्यांचा माझ्या पाठीमागे तगादा चालू आहे. अद्याप अशीं उदाहरणें किरकोळ अपवादात्मक आहेत. आणि त्यांचे पाठीमागे कांहीं पद्धतशीर प्रचार असावासें दिसत नाही, म्हणून मीहि माझ्या मनाची स्थिरता अद्याप सोडली नाहीं. तथापि मी यासंबंधी तुमचें मत विचारतों. तिकडे पुण्यांत खासगी अगर सार्वजनिक रीतीने या प्रश्नासंबंधाने तुम्ही काय धोरण ठेवलें आहे ? खासगी रीतीने हिंदु स्त्रियांना अशा लग्नापासून उपदेशाने परावृत्त करण्याचा प्रयत्न कोणीहि अवश्य करावा.

६१४

### १ जुलै १९२७—बॅ. एम्. आर. जयकर, मुंबई

माझे स्नेही डॉ. सुकथनकर यांनी सध्या इतर कांही विद्वानांचे सहाय्याने महाभारताची संशोधनात्मक सटीक आवृत्ति छापण्याचें कार्य अंगावर घेतलें आहे. अनेक दक्षिणी संस्थानिकांची तुमची ओळख आहे. त्यांची मदत डॉ. सुकथनकर यांचे प्रकाशनाला मिळवून दिल्यास त्यांना उपयोग होईल. मी स्वतः इतर रीतीने त्यांना मदत मिळविण्याची खटपट करीत आहें. तथापि संस्थानिकांची व माझी व्यक्तिशः तितकीशी ओळख नाही म्हणून आपणास लिहिलें.

६१५

### २२ जुलै १९२७—श्री. राजवाडे, इचलकरंजी

जी. आर. रड्डी यांना परदेशाला अभ्यासार्थ शिष्यवृत्ति देऊन पाठविण्याबद्दल आपलें पत्र पोंचलें. ट्रस्टला सांपत्तिक अडचण असल्यामुळे कदाचित् तें शक्य होणार नाही असें प्रथम वाटलें होतें. पण श्री. केरकर (?) यांनी त्यांच्या हप्तेबंदीचे पैसे एकवट रकमेने देऊन टाकल्यामुळे, रड्डी यांना आता शिष्यवृत्ति देऊन पाठवितां येईल असें श्रीमंतांनी आपणांस कळविण्यास सांगितलें आहे.

६१६

### २९ जुलै १९२७—श्री. ना. बनहट्टी, मुंबई

नागपुरांतील मॉरिस कॉलेजांत मराठीच्या प्रोफेसरशिपकरिता ता. २ तारखेस मी अर्ज करणार आहें. तरी आपणाकडून प्रशस्तिपत्र उलट टपालीं यावें म्हणजे तें मला रविवारीं मिळेल. एलफिन्स्टन कॉलेजांतील मराठीची जागा सरकारने केवळ काटकसरीच्या सबबीवर काढून टाकली हें खरोखर अक्षम्य व अनुचित असें कृत्य झालें आहे.

६१७

### ४ ऑगस्ट १९२७—सर एम्. विश्वेश्वर अय्या, मुंबई

सोबत माझ्या भाषणाची प्रत पाठवीत आहें, त्यांतील पृष्ठें ११—१२ पाहावीं. तुमचें माझें संभाषण वर्तमानपत्रांत येईलशी कल्पना नव्हती ! देशांतील

अनुभवावरून या देशाच्या औद्योगिक वाढीसंबंधी मी सूचना करूं शकेन. पण या देशांत कच्चा माल काय काय आहे, हें पाहून प्रथम त्यासंबंधी तुम्ही किर्लोस्कर व इतर कांही मंडळी यांच्याशीं तपशीलवार चर्चा केली पाहिजे. तुमच्या अनेकविध व्यापांतून या विषयाकरिता तुम्ही कसा वेळ काढूं शकाल इतकेंच मनांत येतें.

६१८

**९ ऑगस्ट १९२७—नामदार राय गोविंददास, जबलपूर**

तुमची भिन्न मतपत्रिका पोंचली. त्यांत आणखी कांही मुद्दे घालून मी ती पाठवून दिली आहे. सदर टांचण करतांना मला तुमची फार मदत झाली, व अशीच इतर रीतींनी नेहमीं मदत होईल अशी आशा आहे.

६१९

**१० ऑगस्ट १९२७—एस. श्रीनिवास अयंगार, मद्रास**

माझी प्रकृति आता सुधारत आहे. १० तारखेच्या सुमाराला बाहेर पडेन. पटेल यांच्या मुलाखतीवरून निराशा झाली. मुसलमानांचा उपद्रव सुरूच आहे. तरी काय करावें असें तुम्हास वाटतें? तुमच्या प्रांतांत यावें असें फार फार वाटतें. मी जसा जसा वयाने मोठा होतों तसें तसें मला वाटतें कीं महाराष्ट्र होता म्हणून टिळक झाले.

६२०

**२१ ऑगष्ट १९२७—धर्मगुरु, अहमदियापंथ, सिमला**

शेख याकुबअली तूर्फानी हे आज सकाळीं आपणास भेटले. त्यांच्याशीं आपलें जें संभाषण झालें तें ऐकून धर्मगुरु खलिफतसाहेब यांचा आपलेबद्दल अनुकूल ग्रह झाला. ता. २३ ऑगष्ट रोजीं सायंकाळीं आपण त्यांचेकडे चहाला आल्यास त्यांना आनंद होईल.

६२१

**१ सप्टेंबर १९२७—तारिणीप्रसाद सिंह, लंडन**

बर्मिंगहॅम येथील कॉलेजांतील अध्यापक होरेस ॲलेक्झांडर तिकडे येत आहेत. हिंदी जीवनाचा सर्वांगीण अभ्यास हा त्यांचा विषय आहे. तरी या व इतर बाबतींत त्यांना लागेल ती मदत आपणांकडून व्हावी.

### ६२२

### २ सप्टेंबर १९२७—डॉ. बेलवलकर व इंजीनियर आगाशे, पुणें

मुंबई सरकारचे सेक्रेटरी टर्नर यांचा संस्कृत कॉलेजकरिता आमचे शिष्ट-मंडळाने भेट घेतली. सरकारचा विचार चालू असून शेंकडा ४० टक्के आशा वाटते. तथापि हिंदुस्थान सरकारकडून या वेळेला मदत मिळाली तर हें काम नक्की होई-लसें वाटतें. कारण पुण्यांत संस्कृत कॉलेज असावें ही कल्पना प्रथम हिंदुस्थान सरकारचीच आहे. विश्रामबागवाड्याबद्दल आम्ही अर्ज केला असून दोन-तीन महिन्यांत त्याचें उत्तर मिळेल.

### ६२३

### ५ ऑक्टोबर १९२७—प्रो. श्री. मा. साने, लखनौ

टिळकबंधूंचा वाद कोर्टांत गेला हें पाहून वाईट वाटतें. तथापि तो मिट-विण्याचे तुम्ही शक्य तितके प्रयत्न केले याची मला जाणीव आहे. सध्याच्या बिकट परिस्थितीमध्ये मला खरोखरच तुमच्याबद्दल सहानुभूति वाटते.

### ६२४

### १५ ऑक्टोबर १९२७—मिलिटरी मेंबर हिं. सरकार, सिमला

तुम्हांस कळविण्यांत येतें कीं, पुण्यानजीक लोहोगांव येथे ता. २९ नोव्हेंबर १९२३ रोजीं अर्जुना नांवाचा इसम डोल्जरांची गोळी लागून मेला. त्याच्या विधवा बायकोला, मेहेरबानी म्हणून, सरकारने रु. १५०० द्यावयाचें ठरविलें आहे. तुमच्या खासगी संभाषणांत तुम्ही सुचविली इतकी ही रक्कम मोठी नाही हें खरें. पण असल्या नुकसानभरपाईच्या बाबतींत सरकारला कांही एका पद्धतीने धोरण संभाळावयाचें असतें. अशा अपघातांत यापूर्वी ज्या रकमा सरकारने दिल्या त्या आताच्यापेक्षा कमीच होत्या.

### ६२५

### १९ ऑक्टोबर १९२७—दीपचंद जव्हेरी, नीस (इटली)

लंडनहून मी सुमारे एक महिन्याने मुंबईस येईन. माझ्या मुलाला सुरेख, उंच व सुशिक्षित मुलीशीं लग्न करावयाचें आहे. तिकडे सेवासदनांत अशी मुलगी

आहे काय ? असल्यास कळवा. तुम्ही आम्ही पूर्वी लंडनमध्ये भेटलों. तेव्हांपासून परमेश्वरकृपेने सर्व सुस्थिति व सुख आहे. वृद्धापकाळीं कांही काम म्हणून समाज-सेवा करण्याची इच्छा आहे.

६२६

**२९ ऑक्टोबर १९२७—वि. पां. दांडेकर, नडियाद**

विठ्ठलभाई पटेल हल्ली येथेंच आहेत. त्यांचेकडून Relief work संबंधी सर्व हकीगत मिळविली. पुढील आठवड्यांत ती लिहून आपणांकडे पाठवीन. नोव्हेंबरमध्ये असेंब्लीची बैठक आहे असें पटेल म्हणाले. त्यांनी असेंहि विचारलें कीं, आपणाला व्हाइसरॉयसाहेबांचें मुलाखतीसंबंधी निमंत्रण आलें आहे कीं काय ?

आपण पुनः टिळक-चरित्र पुढें लिहावयाला सुरुवात केली असाल. तें लिहीत असतां पांचगणी येथे आपल्या सहवासांत घालविलेला काळ हा मी माझ्या आयुष्यांतील अत्यंत संस्मरणीय काळ समजतो.

६२७

**३१ ऑक्टोबर १९२७—सर एम. विश्वेश्वर अय्या, बंगलोर**

म्हैसूरमध्ये दिवाण असतांना मी दोन मोठीं कामें केलीं. त्यासंबधांत माझ्यावर टीका असलेल्या एका लेखाबद्दल तुम्ही मला पुण्यास बोललां होतां तो लेख तुम्ही मला पाठवाल काय ? तिकडील उद्योगधंद्याच्या वाढीच्या प्रश्नांत तुम्ही काळजीपूर्वक मन घालीत असालच.

६२८

**९ नोव्हेंबर १९२७—बॅ. एम्. आर. जयकर, मुंबई**

कमिशनसंबंधी व्हाइसरॉय यांचें जाहीरपत्रक तुम्ही पाहिलेंच असेल. त्यासंबंधी गेल्या आठवड्यांत मी पुण्यास आलों होतों, पण तुमची गांठ पडली नाहीं. व्हाइसरॉय साहेबांशीं माझी मुलाखत झाली त्यांत कमिशनवर एकाहि हिंदी गृहस्थाची नेमणूक नाहीं म्हणून मी फार तीव्र निषेध केला. आपल्या पक्षाचें मत म्हणून सांगितलें नाहीं. फ्री प्रेसच्या मुलाखतींत तेंच धोरण ठेवलें आहे. तथापि बॅ. जिना यासंबंधी मुंबईस परिषद बोलाविणार त्यांत आपणाला धोरण निश्चित जाहीर करावें लागेल. जिना हे पूर्ण बहिष्कारवादी झाले आहेत हें मात्र नवल आहे !

१९२१ सालच्या त्रिबळ बहिष्काराची आठवण त्यांना देऊन या बहिष्कारांतील अडचणी त्यांना मी काल सांगितल्या. पण असेंब्लींतल्या व देशांतल्या अनेक पुढाऱ्यांचा पाठिंबा मिळेल या कल्पनेने त्यांनी संपूर्ण बहिष्कार घालण्याचें ठरविलें आहे. म्हणून तुमचें मत बनवितांना या गोष्टीची पूर्वसूचना दिली आहे. कमिशनवर हिंदी गृहस्थ घेतला नाही याचा राग पुष्कळांना सहजच येतो. पण नंतर दुसरा असाहि विचार मनांत येतो कीं, १९१९ च्या कायद्याप्रमाणे कमिशन नेमलें जाणें अपरिहार्य आहे आणि व्हाइसरॉय यांच्या पत्रकाप्रमाणे जर खरोखरच व्यवस्था केली गेली तर, केवळ हिंदी मनुष्य कमिशनवर घेतला नाही ही बाब गौण मानतां येईल. आजचा निषेध कालांतराने मावळेल व वाईटांतून चांगलें निवडून घेण्याची विवेचक वृत्ति प्रभावी होईल असें वाटतें.

उद्यापासून वर्तमानपत्रांत अनेकांच्या मुलाखती व मतें प्रसिद्ध होतील. नेमस्त रागावले आहेत. त्याचें कारण त्यांच्यापैकी कमिशनवर कोणालाच घेतलें नाही. त्यांच्याचप्रमाणे अबदुल रहीम व सर महंमद शफी यांची गोष्ट. पण असेंब्लीचे पुढारी काय धोरण अंगिकारतात ही महत्त्वाची गोष्ट आहे. मालवीयजी व लजपतराय यांनाहि माझ्याप्रमाणेच वाटतें कीं, अगदी अपरिहार्य झाल्याशिवाय बहिष्कारांत सामील होऊं नये.

तुम्ही आपली मुलाखत प्रसिद्ध करण्यापूर्वी या सर्व गोष्टींचा विचार करावा, व माझ्याप्रमाणे बापूजी अणे व मुंजे यांनाहि सावधगिरीचें धोरण ठेवण्याची सूचना द्यावी. ॲनी बेझंटहि बहिष्कारासंबंधी बोलण्याचें टाळतात. ॲसेंब्लीच्या सुधारणा विषयक कमिटीवर काम करूं नये हें म्हणणें वेगळें व कमिशनवरच बहिष्कार घाला हें म्हणणें वेगळें! अशा गोष्टीला यश येण्याइतकी तयारी तरी देशांत कोठे आहे? तरी यासंबंधी तुमचें मत ताबडतोब कळवावें.

६२९

१० नोव्हेंबर १९२७—लाला लजपतराय, लाहोर

बॅ. जिना हे ता. १५ नोव्हेंबरच्या परिषदेस येण्याबद्दल मला तार करून मुंबईस बोलावितात. पण मी नुकताच दिल्लीहून आलों आणि इतक्या थोड्या मुदतींत पुनः इतक्या दूर प्रवासाला निघणें अशक्य आहे. केवळ एका दिवसाच्या कामा-

करिता चाळीस तास प्रवास करणें कांही सुखकारक नाही ! शिवाय मुसलमानांच्या-च्या धमक्यांमुळे मला हल्ली दोन नोकर बाळगावे लागतात. त्यांतला एक सतत माझ्याजवळ असतो. मला स्वतःला भीति वाटते म्हणून नव्हे. पण मित्रांनी आग्रहाने माझ्याकडून असें करण्याचें वचन घेतलें आहे. या कारणास्तव मी सभेला येणार नाही असें समजा. कमिशनवर बहिष्कार घालावा असें मी निश्चितपणें जाहीर केलें नाही. पण दुसरें तरी काय करावें ? जिना परिषदेंत काय ठरतें हेंहि लिहा.

६३०

११ नोव्हेंबर १९२७—बॅ. महमदअली जिना, मुंबई

कमिशनवर सर्वांनी बहिष्कार घालण्यास मला सार्वत्रिक पाठिंबा मिळाला आहे. आधीच माझे अनेक कार्यक्रम ठरलेले असल्यामुळे मुंबईस सभा बोलावितां येत नाही. तथापि माझा मसुदा तुम्हांकडे धाडीत आहे त्याला तुमची संमति तारेने कळवावी म्हणजे मसुद्यावर तुमचीहि सही घालूं. हिंदी प्रश्न पार्लमेंटपुढे येण्याचे वेळीं तारेने हा मसुदा पाठवावयाचा आहे. तरी १५ तारखेच्या आंत तुमची संमति कळवावी.

६३१

१४ नोव्हेंबर १९२७—बापूजी अणे, यवतमाळ

ना. जिना यांच्या मसुद्याला मान्यता देऊन, कमिशनवर बहिष्कार घालावा कौन्सिलांवर घालूं नये, असें लालाजीना माझें मत तारेने कळविलें. ता. १३ रोजी प्रतिसहकार पक्षाच्या सभेंत या संबंधाने काय ठरतें तें कळवा.

६३२

२९ नोव्हेंबर १९२७—मिसेस ॲनी बेझंट, मद्रास

पुढील राजकीय चळवळ योग्य दिशेनेः चालण्याकरिता माझी अशी सूचना आहे कीं, मध्यवर्ति व प्रांतिक कायदेमंडळांच्या सभासदांनी कमिट्यांतून कामें करूं नयेत. कमिशन नुकतेंच उपस्थित झाल्याकारणाने अशा अपीलावर तुम्ही सही घाल काय ?

६३३

**५ डिसेंबर १९२७—विश्वेश्वर देवस्थानचें पंच, महाड**

दे. भ. दा. वि. गोखले व दे. भ. करंदीकर यांनी हिंदुसभेचा संदेश सांगितला. अस्पृश्यतेसंबंधी त्यांची विचारसरणी येथील पुढारी लोकांस मान्य झाली नाही. येथपर्यंत ठीक झालें. परंतु त्या दिवशीं आमचे वहिवाटीचे देवस्थानचे जागेंत आम्ही सार्वजनिक सभा भरविण्याची मनाईची नोटीस लाविली असतांहि, आमचें तोंडीं व लेखी सांगणें न मानतां, वरील मंडळींनी त्या जागेंत सभा उरकून घेतली ! आमच्या मतें ही गोष्ट चांगली झाली नाही.

६३४

**९ डिसेंबर १९२७—ना. भि. परुळेकर, न्यूयॉर्क**

माझा PH. D. चा अभ्यास आटोपला असून निबंध युनिव्हर्सिटीकडे रुजू केला. तें काम आटोपल्याने आता वर्तमानपत्राकडे वेळ खर्च करतों. अमेरिकन पत्रांना माहिती पुरविण्याकरिता न्यूज एजन्सी काढणें, हिंदुस्थानांतल्या वर्तमानपत्रांचें संघटन करण्याच्या दृष्टीनेः येथील तशा सिंडिकेट्सची पाहणी करणें, इत्यादि कामें पुढील वर्षांत करण्याचा विचार आहे. कॉंग्रेसने येथे राजकारणाची शाखा काढावी म्हणून गेल्या वर्षांपासून आमचा प्रयत्न आहे. मिस मेयोच्या पुस्तकाने सर्वांच्या डोळ्यांत अंजन पडलें. त्याचा उपयोग होऊन कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांना आमचें म्हणणें पटलें तरं उपयोग होईल. बरेच दिवसांत केसरीला बातमीपत्र लिहिणें झालें नाही.

६३५

**११ डिसेंबर १९२७—बॅ. एम. आर. जयकर, मुंबई**

तुम्ही पाठविलेला ठराव पोंचला; त्यांत मी किंचितसा फरक केला आहे. तुम्ही असेंब्लींत विचारण्याकरिता पाठविलेले प्रश्नहि पोंचले, त्यांवर सही करून मी ते सेक्रेटरीला पाठविले आहेत.

६३६

**२३ डिसेंबर १९२७—सर विश्वेश्वर अय्या, बंगलोर**

सोबतच्या वर्तमानपत्रीय कात्रणावरून जपान सरकार हें लहान व्यापारी

व उद्योगधंदेवाले यांकरिता काय करतें हें दिसून येईल. पुण्याला ११ सप्टेंबरला अनेक औद्योगिक कारखानदार आपणाला भेटले. त्यांना मुंबईसरकारकडून अशी मदत करतां आल्यास पहा.

६३७

## डिसेंबर १९२७--किंजवडेकरशास्त्री, कलकत्ता

आपण आतापर्यंत आमच्या कार्यास व आम्हांस मनापासून दिलेल्या आश्रया-मुळेच जीं आमच्याकडून कार्यें झालीं तीं झालीं आहेत. कलकत्त्यास जें कार्य झालें त्याचें पत्रक सोबत पाठवीत आहें. जस्टिस मन्मथनाथ मुकर्जी यांनी आपला नाम-निर्देश करून कलकत्त्यास लोकमान्यांच्या परिचयांत आपलें नांव व आपली कर्तव्यनिष्ठा लोकमान्यांच्या तोंडून ऐकली आहे. त्याचा त्यांनी गौरवपूर्ण उच्चार आपल्या भाषणांत केला. आतापर्यंत तीन प्रॉव्हिन्शिअल कामिट्या झाल्या. कल-कत्त्यांत मीमांसाशिक्षणाची सोय या शाखेने केली. या कार्याकडे आपले चिरं-जीव रा. काशिनाथपंत हायकोर्ट वकील यांनी लक्ष पुरवावें. यास हिंदु लॉ रिस-र्चची फार गरज आहे. फुरसत होईल तेव्हा त्यांस ही सल्ला द्यावी. हेंहि अनेक देशकार्यांपैकी एक अत्यंत जरूरीचें कार्य आहे.

६३८

## २८ डिसेंबर १९२७—श्री. शं. नवरे, मुंबई

कालच्या केसरींतील 'निवेदन' वाचून मन विषण्ण झालें! कां तें शब्दांनी व्यक्त करतां येत नाही; पण हृदयाला धक्का बसल्यासारखें झालें खरें. कमिशनवरील बहिष्कारामुळे महाराष्ट्रांतील दोन्ही पक्ष एक होण्याची सुसंधि आलेली, अशा वेळीं केसरी आपल्या हातांत नाही! अशा वेळीं महाराष्ट्राच्या पुढारीपणाची आपण रजा घेणार या गोष्टी कशाशाच वाटतात. तात्यासाहेब! आपल्या एक वर्षाच्या रजेंत कायम रजेचा वास आमच्यासारख्या भाबड्यांना येतो व मन अधिकच खिन्न होतें. आपल्या मागे आपली गादी चालणें कठिण असेंहि लोक उद्गार काढ-तात. आपल्यामध्ये तसेंच कांही अद्वितीय गुण जनतेला दिसतात. परमेश्वरकृपेने, टिळकांच्या पुण्याईने व आपल्या दूर दृष्टीने लोकांची भीति खोटी ठरो!

### ६३९

### (?) १९२७—बॅ. एस्. जी. वेलणकर, मुंबई

लँड ॲक्विझिशन विषयावरील पुस्तक मी तुम्हाला पाठविलें. त्याला सर न्यायाधीश नॉर्मन मॅकलाउड यांची प्रस्तावना आहे. त्यांत तुम्हाला बरीच माहिती मिळेल. याहून आणखी हवी असेल तर मी आनंदाने पुरवीन. मी तुम्हाला शक्य ती मदत करीन यावर विश्वास ठेवा.

### ६४०

### १२ फेब्रुवारी १९२८—सर तेजबहादुर सप्रू, दिल्ली

उद्याच्या परिषदेस मला हजर राहतां येत नाही. पण माझें मत असें कीं, संयुक्त मतदारसंघाच्या तत्त्वाचा स्वीकार करावयाचा तर कांही गोष्टींबद्दल स्वार्थ-त्याग करावयास आपण तयार झालें पाहिजे. आपण स्वयंनिर्णय मागतों. सिंध-लाहि आपणांस तो नाकारतां येणार नाही. आर्थिक व राजकीय दृष्टीने सिंध स्वयं-शासित होऊं शकत नसेल तर सिंधबद्दल मुसलमानांची मागणी आपण अमान्य करावी. पणं त्यापूर्वी ( १ ) आर्थिक दृष्टीने सिंधची परिस्थिति काय आहे, तसेंच ( २ ) तेथील हिंदूंच्या हिताचें संरक्षण कसें करतां येईल, याकरिता एक तज्ज्ञांची कमिटी नेमावी. या कमेटीचे अध्यक्ष डॉ. अनसारी, बेझंट बाई अगर ज्यावर हिंदु व मुसलमान दोघांचाहि विश्वास असेल असा गृहस्थ असावा. तेंहि शक्य नसेल तर तडजोडीचा कांही तरी ठराव मांडून मार्ग काढावा.

### ६४१

### १ मार्च १९२८—अ. वि. लैले वकील, अलीबाग

चौल–रामेश्वरची सभा फार मोठी झाली. तीन हजार लोक होते. सभेचें काम फार परिणामकारक झालें. ब्राह्मणेतरांचा विश्वास फार चांगला उत्पन्न झाला आहे. धारावाढीची चळवळ आता दुसऱ्या हप्त्याचे वेळीं जोरांत येईल. जयकर यांचें कायदेशीर मत लवकर पाठवावें.

### ६४२

### १ मार्च १९२८—द. के. केळकर, पांचगणी

आपलें टिळक चरित्र वाचून मुकतेंच संपविलें. कोणताहि मोठा ग्रंथ समग्र

वाचण्याचा मला जात्या कंटाळा आहे. पण या चरित्राच्या प्रत्येक पानांत कांहीं तरी मजा आढळत असल्याने गेल्या चारपांच वर्षांत येवढा मोठा ग्रंथ समग्र वाचला असा येवढाच. सुरस ग्रंथाला कादंबरीची उपमा देण्याचा प्रघात आहे. पण ताईमहाराज व चिरोल हीं प्रकरणें कादंबरीलाहि मागे टाकतील. चरित्राच्या अनुषंगाने कांहीं जुने वाद उपसण्याचा संभव होता. पण बहुतेक ठिकाणीं मिळतेपणा व विनोद यांच्या पाण्याने तो दाबून टाकला आहे. आणि चरित्रनायक व चरित्रकार यांचा निकट व अपरिहार्य संबंध प्रत्येक महत्त्वाच्या प्रसंगीं असतांहि तो इतक्या बेमालूमपणें टाळला आहे कीं, मुद्दाम हुंगणाऱ्या वाचकालाहि चरित्रकाराच्या व्यक्तीचा वास न यावा. चरित्रांत अनुस्वारांची अडगळ काढून टाकली आहे तेव्हा आता ही सुधारणा रूढ होईलसें वाटतें. गेल्या वर्षी केसरींत मी यासंबंधी लेख लिहिला होता.

६४३

**५ मार्च १९२८—शंकरराव देव यांना केळकरांचें पत्र, दिल्ली**

खादीसंबंधी आमचीं मतें काय आहेत तें तुम्हांस माहीत आहेच. हात-मागाचे व गिरणीचे इतर कापडाची मदत खादीस घेतल्याशिवाय कापडावरील बहि-ष्काराचा प्रचार यशस्वी होणें शक्य :नाही. राष्ट्रीय सभेंतून खादीच्या पोषाखाची अट काढून टाकावी असेंहि आमचें म्हणणें आहे. खादी विरुद्ध न लिहिणें आणि खादीला अनुकूल लिहितां येईल तें लिहिणें यापेक्षा मला व आमच्या मंडळींना अधिक कांहीं करतां येणार नाही. म्हणून मला वाटतें कीं, तुम्ही मला खादी संमेलनाचा अध्यक्ष करण्याचा विचार सोडून दिल्यास फार चांगलें होईल.

६४४

**७ मार्च १९२८—चिंतामणराव वैद्य, पुणें**

बापूजी अणे यांना ग्वालेरच्या संमेलनाचे अध्यक्ष निवडलें याबद्दल मुंबईच्या साहित्य परिषदेने नापसंतीचा ठराव केला आहे. कां तर ते ग्रंथकार नाहीत म्हणून! हें एक चहाच्या पेल्यांत वादळच म्हणावयाचें. माझ्या मतें अध्यक्ष हा उत्तम कुशाग्र टीकाकार व मराठी भाषेचा आस्थेवाईक अभ्यासक असला म्हणजे झालें. तो स्वतः ग्रंथकार असलाच पाहिजे असें नाही. निदान बापूजी अणे हे चापेकर

वगैरेपेक्षा पुष्कळच अधिक लायख आहेत. तुम्ही स्वतः हजर राहून संमेलन यशस्वी केलें पाहिजे व महाराष्ट्रांतील इतरांनाहि हजर राहण्यास सांगितलें पाहिजे.

६४५

१० मार्च १९२८—तारकनाथ दास, पालेरमो ( सिसिली )

लंडन टाइम्सच्या ६ मार्चच्या अंकांत हिंदुसभा जातिनिष्ठ आहे असें म्हटलें आहे. पण त्याच तारेंत डॉ. मुंजे यांना जातवार मताधिकार नको असेंहि म्हटलें आहे ! तुम्ही, लालाजी, मालवीय व मुंजे चौघांनी याबद्दल एक स्टेटमेंट प्रसिद्ध करावें. डॉ. मुंजे यांनी इटलीस येऊन 'रोमन चर्च' ही संस्था पहावी व त्याची धार्मिक व शैक्षणिक वगैरे प्रत्येक बाबतींत कशी उत्कृष्ट संघटना आहे हें एकवार जरूर अवलोकन करावें.

६४६

१६ मार्च १९२८—ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर

माझ्या लेखाला आपण उत्तर देऊन माझा आपण बहुमान केला असेंच मी समजतों. अनुस्वारासंबंधी आपल्या लेखांत आपण दिलेलीं उदाहरणें समर्पक आहेत. पण तीं वाचून मला आपल्या मार्मिकपणाबद्दल जरी सादर कौतुक वाटलें, तरी माझें समाधान मात्र झालें नाही. शब्दसिद्धीचा मुद्दा माझ्याहि ध्यानांत होता. पण तो केवळ तात्त्विक व टिकण्यासारखा नसल्यामुळे मी विचारांत घेतला नाही. खरा प्रश्न अर्थभेद आणि विशेषतः लिंगभेद व वचनभेद दर्शविणाऱ्या उपयुक्त अनुस्वारांचाच आहे. परंतु आपण त्यांची मुळी उपयुक्तताच अगदी गौण मानतां, व मग ते साहजिकच अनावश्यक ठरतात. पण मला हें आपलें म्हणणें पटत नाही. टिळकचरित्राचा तिसरा खंड मी सध्या वाचीत असून चिरोल केसपर्यंत येऊन पोंचलों आहे. पहिल्या खंडाच्या मानाने हे दोन खंड थोडे फिके वाटतात. भाषा तितकी सौष्ठवपूर्ण नाही व विवेचनांतहि प्रमाणबद्धता त्या मानाने कमी आहे. तथापि आपल्या प्रामाणिक टीकाकारांनाः येवढी गोष्ट कबूल करावी लागेल कीं, महाराष्ट्रामध्ये गेल्या पाऊणशें वर्षांत झालेल्या प्रायः सर्वच सार्वजनिक चळवळींचा अलिखित पूर्व इतिहास या तीन खंडांत सांठविलेला असून, त्याचें समालोचन जसें सरस आणि सुंदर तसेंच न्यायबुद्धीचा तोल न ढळूं देतां केलेलें आहे.

आपल्या ग्रंथाचा हा विशेष मी अत्यंत स्पृहणीय समजतों. लोकमान्यांचे गुण जसे उत्कट होते तसेच कांही दोषहि उत्कट होते. त्यांचे शत्रु त्यांच्या दोषांची अतिशयोक्ति करतात, तर त्यांचे भक्त त्यांच्याकडे दुर्लक्ष करतात. हे दोनहि अतिरेक आपण टाळले असून लोकमान्यांच्या दोषांचेंहि दिग्दर्शन आपण सौम्य पण स्पष्ट शब्दांनी केलें आहे. चरित्र नायकाचा ऋणानुबंधी चरित्रकार इतका निःपक्षपाती निघालेला निदान माझ्या तरी पाहाण्यांत नाही.

६४७

२६ मार्च १९२८—चिंतामणराव वैद्य, ग्वाल्हेर

जबलपूरच्या हिंदुमहासभेचे अध्यक्ष म्हणून तुमची निवडणूक झाल्याचें कळलें. तुम्ही ग्वाल्हेरच्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाला यावयाचें कबूल केलें होतें. बापूजी अणे यांचें भाषण उत्कृष्ट होईलच. पण तुम्ही न आला तर समारंभ सुना होईल. हिंदुसभेचें अधिवेशन एक दिवस पुढे ढकलण्यासारखें असलें तर तुम्हाला दोन्ही सभांना हजर राहतां येईल.

६४८

७ एप्रिल १९२८—लाला रामशरणदास, लाहोर

बद्रीनाथ जम्मूचे माजी दिवाण यांच्या मुलीकरिता, म्हणजे माझ्या नाती-करिता, दिलरुबा व हार्मोनिअम शिकविण्याकरिता एखादी स्त्री–शिक्षक असल्यास जरूर कळवा. ती स्त्री जुन्या वळणाची असावी. माझ्या नातींचा स्वभाव सत्प्रवृत्त असून शास्त्रादिकांची तिला आवड आहे. याकरितां जुन्या मतांकडे कल असणारी व संस्कृत जाणणारी अशी स्त्रीशिक्षिका असावी.

६४९

८ एप्रिल १९२८—तारकनाथ दास, फ्लॉरेन्स (इटली)

जोहान्सबर्गचे पी. एस. जोशी यांनी मजकडे जें 'कटिंग' पाठविलें तें सोबत धाडीत आहे. दक्षिण आफ्रिकेंतील वस्तुस्थिति पाहण्याकरिता तुमची जाण्याची इच्छा असल्यास जोहान्सबर्गचे जोशी आणि दरबानचे मि. अय्यर तुमचा प्रवासखर्चहि सोसतील. तुमच्या तेथें जाण्याने त्यांना फार समाधान होईल.

६५०

**१५ एप्रिल १९२८—तारकनाथ दास, म्यूनिच, जर्मनी**

अलाहाबादला तुम्ही केलेल्या भाषणाचा रिपोर्ट लंडन टाईम्समध्ये वाचला. त्याबद्दल तुमचें अभिनंदन करतों. हिंदी पुढाऱ्यांनीं यापुढे तरुण पिढीला असें तयार केलें पाहिजे कीं, यापुढे कोणतीहि संघटना करण्याला त्यांना जुन्या पुढाऱ्यांची प्रत्यक्ष मदत लागूं नये. प्रिव्ही कौन्सिलच्या न्यायाधीशांप्रमाणे त्यांनी फक्त वेळप्रसंगीं सल्ला मसलत द्यावी. हिंदुमहासभेच्या तुमच्या अध्यक्षीय भाषणांत हिंदूंनी आपसांतील मतभेद मिटवून संघटण केलें पाहिजे यावर तुम्ही जोर दिला आहे. तथापि रोमन कॅथॉलिक चर्चचें उदाहरण डोळ्यापुढे ठेवून कायम स्वरूपाचा निधि व संघटणा केली पाहिजे. आणि मुसोलिनीने ज्याप्रमाणे १७।१८ वर्षांच्या मुलांना उत्तेजनाकरिता पदकें वगैरे देऊन फॅसिस्टांची संघटना केली असें या हिंदु समितीने केलें पाहिजे. मिस मेयो या इकडे फेरी मारून गेल्या. माझा कयास असा आहे की, ' मदर इंडिया ' या पुस्तकाचें लवकरच 'जर्मन'मध्ये भाषांतर होणार ! त्याचा प्रतिकार कसा व्हावयाचा ? मला वाटतें की, हिंदु विश्वविद्यालयाने रोमला जर कांही विद्यार्थी पाठविले तर, 'कॅथॉलिक चर्च' ही संस्था स्थापून सर्व युरोपभर ख्रिस्ती लोकांनी आपल्या धर्माची संघटना कशी केली व लोकांच्या मनावर केवढें नैतिक आधिराज्य त्यांनी स्थापलें आहे, याची त्यांना कल्पना येईल.

६५१

**१८ एप्रिल १९२८—अबदुल कायम, पेशावर**

तुमच्या पत्राबद्दल आभारी आहे. सरहद्दीच्या दौऱ्यांत माझा तुम्हाला झाला याहून अधिक उपयोग झाला असता तर, त्या दौऱ्याचा मनोरंजकपणा वाढला असता. असेंब्लीच्या कामानंतर सध्या तुम्ही पुण्यास विश्रांति घेत असाल. सरहद्दीच्या लोकांशीं जी तुमची प्रत्यक्ष ओळख झाली त्यामुळे त्यांच्याविषयींच्या प्रश्नांवर मत देण्याला आता तुम्हाला अधिक मदत होईल !

६५२

**५ मे १९२८—सुभाषचंद्र बोस, दिल्ली**

पुण्यांत तुमच्या सहवासांत जो काळ मी काढला तो मला किती आवडला

म्हणून सांगूं ? बिकट राजकीय परिस्थितींत दिवस काढल्यावर तुम्हा सर्वांच्या गांठी पडून फार आनंद झाला. हिंदु–मुस्लिम ऐक्याबद्दल मला तुमच्याशीं मुद्दाम चर्चा करावयाची होती; पण तितका वेळ सांपडला नाही. मुंबईस सर्वपक्षीय परिषदेकरिता तुम्ही याल तेव्हा मी तुमची जरूर गांठ घेईन.

६५३

११ मे १९२८—तारकनाथ दास, म्यूनिच ( जर्मनी )

मी पुनः जर्मनीमध्ये आलों आहे. हिंदु-मुस्लिम ऐक्याच्या आशेकरिता जातवारीला हातभार लावण्याचें कारण नाही असें धोरण तुम्ही अंगिकारलेलें पाहून बरें वाटलें. महाराष्ट्रांतील सुभाषबाबूंचा दौरा व कलकत्ता कॉर्पोरेशनचा अनुभव याने पुष्कळ बंगाली पुढाऱ्यांचे डोळे उघडतील. जातवार मतदार संघावर ज्यांचा विश्वास नाही अशांनी एक जाहीर मॅनिफेस्टो काढावा असें मला वाटतें. तुम्हांला बहुमताचें पाठबळ नसेना का, पण एकी ईर्ष्या आणि संघटना असेल तर अल्पमतवाला पक्षहि राष्ट्राचें पुढारीपण करूं शकतो. तुम्ही व तुमचे स्नेही यांना राजकारणांत अप्रियता सहन करावी लागत असेल ! तुम्ही मला पुस्तकें पाठविण्याचें आश्वासन दिलें त्याबद्दल आभारी आहे.

६५४

१४ मे १९२८—व्ही. एस. सुंदरम्, सेक्रेटरी, सेंट्रल रेव्हेन्यू बोर्ड, सिमला

मुंबई इलाख्यांतील इन्कमटॅक्स डिपार्टमेंटमधील नोकरांची भरती कोणत्या खात्यांतून होते व त्यांच्या पगारांची वाढ कसकशी होते, यासंबंधी तुम्ही कांहीं आक्षेप सर बेसिल ब्लॅकेट यांच्या भाषणावर घेतले होते. तसेंच कांहीं मुद्देहि मि. आर्व मुदा अयंगार यांच्याकडे दिले होते. सेंट्रल रेव्हेन्यू बोर्डाने याबाबत चौकशी केली. सर ब्लॅकेट यांनी आपल्या भाषणांत जें सांगितलें त्यापेक्षा आम्हाला जास्त खुलासा करण्यासारखें कांहीं नाही. सर भूपेंद्रनाथ मित्र यांचेंहि असेंच मत आहे.

६५५

२७ मे १९२८—तारकनाथ दास, म्यूनिच ( जर्मनी )

मिस मिलर विवाहबद्दल तुम्ही विचारले होतेत. इकडे कांहीं त्याबद्दल चांगलें

लोकमत नाही. हिंदुस्थानांत बहुपत्नीकत्व कायदेशीर असलें तरी अमेरिका व इतर ख्रिस्ती देशांत त्या लग्नासंबंधी भलतेच गैरसमज आहेत. नव्या विद्वानांपैकी कोणाला तरी हिंदी राज्यघटनेवर पुस्तक लिहावयास सांगा. जातवार मतदार संघ आणि संस्थानिकांचे व बादशहांचे प्रत्यक्ष संबंध काय असावे याविरुद्ध कटाक्ष ठेवून तें पुस्तक लिहिलेलें असावें.

६५६

**२८ मे १९२८—चारुचंद्र मित्र, कलकत्ता**

बालविवाहाच्या कायद्यासंबंधी माझें पुस्तक मी तुम्हांस पाठविलें आहे. त्यांत मी असें दाखविलें आहे कीं, शारीरशास्त्र अगर तर्कशास्त्र या दोहोंच्याहि दृष्टीने बालविवाहामुळे स्त्रियांचे अगर अर्भकांचे मृत्यु होतात असें निस्संदिग्ध सिद्ध होण्यासारखा पुरावा नाही. सेन्सस रिपोर्टावरूनहि असें दिसत नाही. रशिया, हंगेरी वगैरे युरोपियन देशांत प्रौढविवाह आहे, पण तेथेहि बालमृत्यूंची संख्या थोडी नाही! बालविवाहाला प्रतिबंध करावा म्हणणारांचा युक्तिवाद भ्रामक आहे. आणि तुलनेनेच पाहावयाचें तर आपल्यांत रजोदर्शन अगर वयांत येणें (Puberty) ही जी विवाहाची शास्त्रमर्यादा सांगितली आहे ती बरोबर आहे. म्हणून या बाबतींत कायद्याने हात घालण्याने आपली रूढी, स्मृतिशास्त्र, राणीच्या जाहीरनाम्यांतील वचनें यांना हरताळ लागेल, आणि लोकशाहीचे मूलभूत सिद्धांतहि आपणांस माहीत नाहीत असें होईल. या देशाची विशिष्ट परिस्थिति पाहिली तर बालविवाहच आवश्यक आहे असें दिसेल. माझें पुस्तक नीट वाचून तुमचा कोठे मतभेद असल्यास तुमचीं कारणें मला कळवा. आणि जर तुम्हालाहि असा समाजक्रांति-कारक कायदा पास होऊं नये असें माझ्याप्रमाणेच वाटत असेल, तर तुम्ही तुमच्या वजनाचा उपयोग या कायद्याला विरोध करण्याला खर्च कराल अशी आशा आहे.

६५७

**२७ जून १९२८—बापूजी अणे, यवतमाळ**

मी २२ तारखेला अलाहाबाद सोडलें. अलाहाबादेस ता. २० रोजीं कॉन्स्टिटयूशनसंबंधी चर्चा होऊन बहुतेकांचें एकमत झालें, आणि जातवार प्रति-निधित्व आणि प्रांतांची पुनर्घटना येवढे दोनच प्रश्न अनिर्णित राहिले. मी, सरदार

मुंगळसिंग, आणि मोतीलाल नेहरू यांनी नव्या कॉन्स्टिटयूशनमधून जातवारीच्या तत्त्वाचें पूर्ण उच्चाटण करावें असें प्रतिपादन केलें, यावर मुसलमान सभासदांचें म्हणणें काय व त्यांना इतर कोणत्या रीतीने आपल्या हक्कांचें संरक्षण हवें याची चर्चा केली. पण या बाबतींत फार मतभेद होऊन मतैक्य होण्याचें चिन्ह दिसेना व मी अलाहाबाद सोडल्यावर सुभाषचंद्र बोस तेथे आले, त्यांनीहि एकमत होण्याची खटपट करून पाहिली. पण ता. २३ रोजीं रीतसर सभा भरतांच सभासदांच्या मताचा रंग पालटला; आणि त्यांत असें स्पष्ट दिसून आलें की, मुस्लिम लीगच्या आज्ञेबाहेर जाण्याची मुसलमान सभासदांना इच्छा नाही व अधिकारहि नाही! सरतेशेवटीं सभासदांनी भिन्न मतपत्रिका रिपोर्टांत लिहाव्या असा ठराव झाला!

**ता. क.**—पुनः ता. ७ रोजीं अलाहाबादेस येण्याबद्दल नेहरूंची मला तार आली आहे तशी तुम्हालाहि आली असेलच. तुम्ही, जयकर व डॉ. मुंजे आलांत तर जातवारीच्या तत्त्वाची हाकलपट्टी करण्याकरिता कांही तरी युक्ति अगर तोड काढून तुम्ही कमिटीला मदत करूं शकाल. तरी अवश्य याच.

६५८

**२९ जून १९२८—मदनमोहन मालवीय, पुणें**

मसूरकर महाराजांना अद्याप देणें असलेल्या रुपये दोन हजारांचे रकमे-करिता श्रद्धानंद स्मारक फंडाच्या चिटणीसांना मी आज लिहीत आहे. लौकरच ते पैसे तुम्हाला मिळतील. किर्लोस्करवाडी व ओगलेवाडीकडे मी पुनः केव्हा तरी जाईन. हरिकीर्तन ऐकण्याची मला अतिशय आवड आहे. पण उद्या ८ वाजता हें तुम्हाला घडवून आणतां आलें तरच मला येणें शक्य आहे. गोव्यांतील तुमच्या मुलाखतीचा सरकारी अधिकृत रिपोर्ट पाहिला. त्याने मला समाधान वाटलें.

६५९

**७ जुलै १९२८—बलवंतराय पी. ठाकूर, अहमदाबाद**

बार्डोली प्रश्नासंबंधाने अहमदाबाद जिल्हा परिषद भरावयाची असून तिच्या स्वागतसमितीने तुम्हांला अध्यक्ष म्हणून निवडलें आहे. महात्मा गांधी व वल्लभभाई पटेल यांचे मताने परिषदेचे अध्यक्ष होण्याला तुम्हीच सर्वांत लायक आहां. तरी कृपा करून तुमची संमति कळवावी.

६६०

७ जुलै १९२८—मणेरीकर, मुंबई

उद्या दुपारीं माडगांवकर यांच्या येथे सभा आहे. तुम्ही हजर असणें फार अवश्य आहे असें त्यांनीं सांगितलें आहे तरी शक्यतोंवर याच. (तार)

६६१

७ जुलै १९२८—स्वागताध्यक्ष, शेतकरी परिषद, अहमदाबाद

ता. १५ जुलै रोजीं बार्डोली-प्रश्नाचा विचार करण्याकरिता अहमदाबादला जिल्हा परिषद भरणार आहे. स्वागत समितीने अध्यक्ष म्हणून तुमचें नांव सुचविलें आहे. तरी आपली मान्यता कळवावी. (तार)

६६२

१० जुलै १९२८—ग. र. वैशंपायन, अहमदाबाद

आपण येथील जिल्हा परिषदेच्या अध्यक्षस्थानीं येणार अशी बातमी आताच कळली म्हणून पत्र लिहिण्याचें धाडस करीत आहे. आपण जिल्हा परिषदेचे अध्यक्ष व्हावे व अंबालाल साराभाई यांनी स्वागताध्यक्ष व्हावे ही महात्माजींची योजना आहे. शेठ अंबालाल व श्री. वल्लभभाई यांचे एकमेकांशीं मुळीच सूत नाही. परंतु सर्व देखावा असा पाहिजे की, त्यांत महात्माजींचा संबंध नाही असें दिसावें. महात्माजी येथे असूनहि परिषदेस येणार नाहीत. आपण सरकारचे उत्तम टीकाकार म्हणून आपली योजना केली आहे असें प्रांतिक समितीच्या कार्यालयांत सांगण्यांत आलें. हें सहजीं कळविलें. पण आपण येतांच आहां तेव्हा येथील 'हिंदु समाजा'ला जागें करावयास हवें. येथे हिंदु सभा स्थापन होऊन दोन वर्षें झालीं. पण गेल्या सहा महिन्यांत एकाहि सभेचें पत्र आलें नाही. कार्यकारी मंडळांत खासगी द्वेषाचे दोन पक्ष आहेत. ते उघड सांगतात की, आम्हाला दुसऱ्या पक्षांचें वर्चस्व नको. येवढ्याचसाठी आम्ही कार्यकारी मंडळांत आहों. आपलीं दोन व्याख्यानें जर झालीं तर तरुण मंडळी कार्यास सिद्ध आहेत. आणि येथे मुख्य काम म्हणजे 'अनाथालय' स्थापन व्हावयास पाहिजे. मारवाड-राजपुताना अित्यादि प्रांतांतून या स्टेशनवर अनाथ येतात ते मुसलमान होतात अशी ओरड आहे. आम्हांला सांपडलेलीं माणसें आम्ही बडोद्यास पाठवितों. श्री. आनंदप्रिय हे या कामीं पुष्कळ

खटपट करतात. परंतु अहमदाबादेस त्यांचें कांहीं चालत नाहीं व येथील असहकारी कंपूला तर हिंदुसभा त्यांच्या ताब्यांत पाहिजे! यावाचून दुसरें काम होऊं द्यावयाचें नाहीं! अशी ही परिस्थिति आहे. मला प्रसिद्धपणें कांहींच करता येत नाहीं व आपणांस भेटणेंहि जड जाईल कीं काय असा प्रश्न पडला. म्हणून हें पत्र लिहीत आहे. तरी योग्य तें व्हावें.

६६३

११ जुलै १९२८—पां. श्री. आपटे, येवलें

केसरींतील आपल्या बेळगांवच्या दौऱ्याची साग्र हकीकत वाचून फार आनंद झाला. पण त्याबरोबर असें वाटलें की, असा आपला दौरा इकडे येवल्यास कां होऊं नये ? केसरींतलें बातमीपत्र वाचून असें वाटलें की, आपला हा दौरा अत्यंत यशस्वी असा झाला. ता. १५ ला आपण अहमदाबादला जाणार आहां. ता. १ ऑगस्टला इकडे येऊं शकाल काय ? मागे एकदा दोनदा स्वस्थपणाने येईन म्हणाला होता त्याची आठवण देतों. आम्ही लहान माणसें, आमचें गांव एकीकडे, म्हणून आमच्या निमंत्रणाचा अव्हेर न व्हावा!

६६४

१३ जुलै १९२८—मुकुंदराव जयकर, मुंबई

लाला लजपतराय यांची गांठ घेऊन तुम्ही पत्रांत उल्लेख केलेल्या गोष्टी संबंधी बोललों. मुंबईचे गव्हर्नर हे व्हाईसराय यांची भेट घेणार आहेत. सिमला व सुरत येथील त्यांच्या भेटींत काय निष्पन्न होतें हें कळेपर्यंत, कौन्सिलच्या सभासदांचें जाहीर पत्रक इतक्यांत प्रसिद्ध करूं नये असें आम्हां दोघांनाहि वाटतें. त्यावर मुंबई कौन्सिलांतील सर्व सभासदांच्या सह्या मिळाल्या तरच उपयोग. तुम्ही मुंबईला जातच आहां. या बाबतींत सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास वगैरेंचें मत अजमावून पाहा.

६६५

२१ जुलै १९२८—मुकुंदराव जयकर, मुंबई

देवगड तालुक्यांतील सारावसुलीसंबंधाचें अपील फेंटाळलें गेलें, व या प्रश्नासंबंधाने तड लावण्याकरिता गव्हर्नरकडे डेप्युटेशन नेण्याचें ठरलें आहे.

अर्थात् तुमचा या तालुक्याशीं संबंध म्हणून शिष्टमंडळाचें नेतृत्व साहजिक तुम्ही पत्करावें असें त्यांना वाटतें. बार्डोलींतील सारा तहकुबी व सत्याग्रह यासंबंधी तुम्ही जे विचार निर्भयपणें प्रसिद्ध केले ते सरकारला अर्थात् माहीत असतीलच. म्हणून या बाबतींत तुम्ही नेतृत्व पत्करल्यास तुमच्या म्हणण्याचा सरकारच्याहि मनावर फार परिणाम होईल.

६६६

२५ जुलै १९२८—के. सुंदरम्, बनारस

आमचे व्हाइस चॅन्सेलर व बनारस हिंदु युनिव्हर्सिटीचे सभासद यांच्या वतीने, संस्थेला तुम्ही तीनशें रुपयांची देणगी देण्याचें कबूल केलें, याबद्दल तुमचे आभार मानतों. कृपा करून सदर रक्कम पाठवून द्यावी व महाराष्ट्रांतील इतर लोकांनाहि संस्थेचा फायदा करून घेण्यास सांगावें.

६६७

२६ जुलै १९२८—सेक्रेटरी हिंदुसभा, बडोदें

येथे प्रांतिक हिंदु संमेलन ता. ४ व ५ ऑगस्ट रोजीं भरणार आहे. अध्यक्ष म्हणून तुमचें नांव सुचविलें आहे. तरी आपली मान्यता कळवावी.

६६८

७ ऑगस्ट १९२८—ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर

मुंबईचे माझे कांही स्नेही वाङ्मय सेवकांचा कोश तयार करीत आहेत. त्यासाठी आपलें चरित्र (ॲप्रीसिएशन) लिहिण्याचें मी कबूल केलें आहे. आपल्या मनोविकासाचें व मनोरचनेचें विवेचन मला करतां आलें पाहिजे व ही माहिती आपणच पुरवूं शकाल. कोल्हटकरांइतका फक्त आपल्याच वाङ्मयाचा, विचारांचा, आणि सहवासाचा परिणाम मजवर झाला आहे. तेव्हा केवळ सर्वसामान्य आदर बुद्धीने नव्हे तर, अनुयायित्वाच्या कृतज्ञताविशिष्ट आदर बुद्धीनेहि, आपलें चरित्र लिहिण्यांत मला आनंद आहे. आणि मीहि खासगी माहिती इतक्या धिटाईने आपणांस मागतों ती अनुयायित्वाच्या हक्काची जाणीव मनांत वागत असल्यामुळेच !

६६९

**११ ऑगस्ट १९२८—मदनमोहन मालवीय, बनारस**

मसूरकर महाराज यांना (श्रद्धानंद फंडांतून शुद्धिकार्याकरिता) पाठविलेला रु. २००० चा चेक पोंचलाच असेल. कॉन्स्टिटयूशन कमिटीचा रिपोर्ट अद्याप मिळाला नाही. त्यावर नीट सांगोपांग विचार झाल्याशिवाय कमिटीने तो प्रसिद्ध करूं नये. सिंधच्या मागणीला डॉ. मुंजे यांनी चांगलें तोंड पाडलें यांत शंकाच नाही. सर्व पक्षीय कॉन्स्टिटयूशन कमिटीवर याचा काय परिणाम होतो तें पहावें! या प्रश्नावर आपले मतभेद मिटत नाहीत म्हणून इतर सर्व प्रश्नांवरहि मिटत नाहीत असें दुर्दैवानें झालें आहे खरें.

६७०

**१४ ऑगस्ट १९२८—महमुदाबादचे राजे, लखनौ**

सर्वपक्षीय परिषदेकरिता येथे ता. २८ रोजीं याल तेव्हा आपण माझ्याकडे उतरून माझा पाहुणचार घ्यावा.

६७१

**१४ ऑगस्ट १९२८—चीफ ऑफ भोर**

येत्या १८ तारखेस मला ५० वें वर्ष लागतें. तरी या शष्टयद्बि समारंभाच्या दिवशीं प्रजेला प्रातिनिधिक स्वराज्याचें हक्कदान करून कौन्सिलच्या अनावरण समारंभ करावयाचा आहे. सुधागड तालुकासभा, अखिल भोर प्रजापरिषद, तसेंच इनामदार सभा, इत्यादिकांच्या शिष्टमंडळांच्या मी त्या दिवशीं भेटी घेणार आहे व त्याबाबत पुष्कळ सन्माननीय पाहुणे येणार आहेत. तरी तुम्ही अगत्य यावें, अशी फार इच्छा आहे. तुमचे वडील बंधू कै. नारायणराव हे पूर्वी मला शिक्षक होते. असा तुमच्या घराण्याचा आमच्याशीं ऋणानुबंध आहे. तरी आपण मला निराश करणार नाही अशी आशा आहे.

६७२

**१९ ऑगस्ट १९२८—द. बा. कालेलकर, अहमदाबाद**

आपलें पत्र व पुस्तकें पोंचलीं. गुजराथी विद्यापीठाच्या वतीने आपणाला धन्यवाद देतों. आपल्या जुन्या काव्यांपैकी 'माझा आवडता फकीर' हें मला

अत्यंत आवडलें होतें. 'काव्योपहारां'तील कवितांमध्ये राणीपद "फुलराणीच्या ओवाळणीलाच" दिलें पाहिजे. कोमल फुलांच्या बाबतींतील इतका कोमल भाव टिळकांच्या "वनवासी फुलांत"हि नाही. "विरहिणीची प्रणयपत्रिका" यांतील दोन नमुने पाहून जुन्या आणि नव्या संस्कृतीचा भेद आपोआप मनांत येतो. मातृपद प्राप्त झाल्यानंतरच्या विरहावस्थेंतील वर्णन शाकुंतल किंवा उत्तर रामचरित्र यांत सांपडतें. कवींना त्यांची फारशी गोडी नाही. 'विशिष्टाद्वैत' या नमुन्यांत भवभूतीची परंपरा उत्तम रीतीने उतरलेली आहे. आपली ही कविता आधुनिक मराठी काव्यांत कायमचें आणि उच्चस्थान मिळवील यांत शंका नाही. पहिला नमुना आशुक वृत्तीचा आहे, दुसरा नमुना माशुक वृत्तीचा आहे. वेदांती नांवापेक्षाहि सुफी नांवें आपणाला जास्ती अनुरूप वाटत नाहीत काय ? 'आमचें नवें राज्य' ही कविता, भावनगरला परवा गणपती उत्सवांत गेलों होतों तेथे ती, तेथील दक्षिणी मंडळींना फारच मौजेची वाटली. फुलराणीला ओवाळणी यांत जो कोमलभाव आहे तो रामकृष्ण परमहंसांच्या जीवनांत आढळतो. ते पूजेसाठींसुद्धा फुलें तोडीत नसत, आणि म्हणत कीं, फुलें झाडावर आहेत तेथेच ती ईश्वराला अर्पित नाहीत काय ?

### ६७३

### १९ ऑगस्ट १९२८—चंद्रोजीराव आंग्रे, शिवपुरी

'महाराष्ट्र शारदा मंडळा'ची योजना आपणांस मिळाली असेलच. सप्टेंबरांत उभयता राजमाता बालराजे व राज्य संस्थेंतील सभासद सर्वच येथे शिवपुरीस असतात व शारदामंडळास त्यांच्याकडून भरपूर साहाय्य मिळण्याचा पुष्कळ संभव आहे. विशेषतः आपण, श्री. अणे, श्री. किबे, ना. केशवराव इत्यादि मंडळी जमल्यावर कार्यास आरंभ चांगला होईल व विजयादशमीच्या सुमारास शारदापूजन करून आपण शारदामंडळहि स्थापूं. तरी सिमल्याहून येतांना सवड काढून अवश्य यावें.

### ६७४

### २० ऑगस्ट १९२८—द. वा. कठाळे, नागपूर

बॅ. जयकर हे हिंदु कायद्याच्या सुधारणेसंबंधी बिलें तयार करीत आहेत असें कळलें. ही गोष्ट ठीक आहे; तथापि हिंदुमहासभेचे अध्यक्ष या नात्याने तुम्ही

या गोष्टींत लक्ष घातल्यास तुम्हाला आंतरप्रांतीय सहकार्य सहज मिळूं शकेल. नागपूरचें महाराष्ट्र पत्र व मद्रास लॉ जर्नल यांतील माझे लेख पुष्कळांना आवडले.

६७५

**२४ ऑगस्ट १९२८—सी. डी. थॉम्सन, अलाहाबाद युनिव्हर्सिटी**

तुमचें पत्र व पुस्तकांची यादी मिळाली. तिचा मि. दुबे यांना फार उपयोग होईल. अर्थशास्त्रांतल्या पारिभाषिक शब्दांना मराठी प्रतिशब्द हुडकून काढण्याची खटपट पुण्यांतील जी मंडळी करीत आहेत, त्यांची नांवें व पत्ते त्यांना हवे आहेत. तुमचें सहकार्य मि. दुबे यांना मिळालें तर त्यांना फार आनंद होईल. अर्थशास्त्रांतील पारिभाषिक शब्द हे मराठी हिंदी गुजराथी बंगाली इ. भाषामध्येंहि एकच असावे ही तुमची सूचना त्यांना मान्य आहे.

६७६

**२७ ऑगस्ट १९२८—गोविंदराव रानडे, वकील, मिरज**

आपण अनुच्चारित अनुनासिकांना फाटा देण्याचा प्रघात सुरू केला याबद्दल आपलें अभिनंदन करणें अवश्य आहे. आपल्यासारख्या अधिकारी लेखकानें हा प्रघात नीट विचार करून सुरू केल्यामुळे तो रूढ होत जाईल याविषयीं शंका नाही. अनुच्चारित अनुनासिकें गाळल्यामुळे घोटाळे उत्पन्न होतात अशा प्रतिपक्षाच्या विधानाला टिळक चरित्रांतील अशी स्थळें १०० काढून दाखवावींत असें आव्हान दिल्याचें वर्तमानपत्रांतून वाचल्याचें आठवतें. त्यास प्रतिपक्षाकडून उत्तर मिळालें नाही ! गेल्या 'रत्नाकरा'च्या अंकांत 'शृगाल संमेलन' या लेखांत आपण आणखी एक पाऊल पुढे टाकलें आहे तें मात्र योग्य आहे असें मला वाटत नाही. या बाबतींत योग्य धोरण मला असें वाटतें की, अनुस्वार गाळावा पण मात्रा गाळू नये !

६७७

**? सप्टेंबर १९२८—हेलेना नॉर्मिटन, लंडन**

तुमचें पत्र व मेमोरँडम वाचून मला फार आनंद झाला. मला वाटतें कीं, महात्मा गांधींच्या धोरणाला पुष्कळ अवसर मिळाला. आता टिळकांचें धोरण हिंदुस्थानानें चालू करून पहावें. राजकारणांत धोरणांची अशीच आलटा पालट

होते. फक्त पुढाऱ्यांनी प्रामाणिक राहिलें पाहिजे आणि यशावर दृष्टी दिली पाहिजे. गांधी काय, टिळक काय, कोणाहि पुढाऱ्याला देव मानणें हा मूर्खपणा होय. मी लवकरच शस्त्रक्रिया करवून घेणार आहे. त्यांत जगलें तर आहेच, नाही तर एकादा नवा अवतार घेईन! त्या अवतारांत चिनी मॅंडॅरिन किंवा एलिझाबेथ राणीच्या वेळचा इंग्रज सरदार व्हावे असें वाटतें! भूत व वर्तमान दोन्ही काळ अखंड वाटतात. हॉर्निमन काल भेटले ते आता बरे झाले आहेत.

६७८

२० सप्टेंबर १९२८—कृ. ल. सोमण, बेळगांव

भडकमकर यांच्याकडून आपल्या 'गोतयाचें बंड' (दैवलीला) या नाटकाचें निमंत्रण आलें होतें. शनिवारचा व मंगळवारचा असे दोन प्रयोग अगदी आरंभापासून शेवटपर्यंत पाहिले. भारत नाटक मंडळीचा प्रयोग मी कित्येक वर्षांपूर्वी पाहिला होता. नंतर चित्ताकर्षक मंडळीचाहि पहाण्याचा योग आला. त्यांची आठवण पुसट झाली होती. पण हे प्रयोग पाहून ती ताजी झाली व नव्याने आनंदलाभ झाला. नानांचें काम सोहनी यांनी फारच समजून केलें. त्या कामाला त्या पात्राचा गोरा चेहरा व डोळे सर्वतोपरी अनुकूल असेंच होतें. अमलेचें काम सदाशीव करतो. त्याची आवाजी अत्यंत गोड असल्यामुळे २।३ दा वन्समोर झाली. या भूमिकेला त्याची काठी अनुकूलच आहे. पहिल्या अंकांत संगीताचें वातावरण नीट उत्पन्न होत नाही. सुखनिधानास पदें घातल्यास बरें होईल. सुखनिधान व अमला ही दोघेहि गायनाची शोकीन होती असें दाखविल्यास जास्त उचित व सोयीचें होईल.

६७९

२९ सप्टेंबर १९२८—बी. शिवराव, मद्रास

मद्रासला ॲनीबेझंट यांच्या अध्यक्षतेखाली सर्वपक्षीय परिषद भरत आहे. त्याकरिता कृपा करून तुमचा संदेश पाठवा. या प्रांतांतील शेंकडो प्रमुख लोकांना निमंत्रणें पाठविलीं आहेत. नेहरू रिपोर्ट आणि लखनौचे ठराव मान्य असणारांनांच या परिषदेंत भाग घेतां येईल एवढीच अट ठेवली आहे. तसेंच निरनिराळ्या म्युनिसिपालिट्या व जिल्हा लोकलबोर्डें यांनाहि राज्यघटनेच्या मसुद्यासंबंधी कांही सूचना करणें असल्यास कळवावें असें लिहिलें आहे.

६८०

११ ऑक्टोबर १९२८—सुभाषचंद्र बोस, जमशेदपूर

सायमनसाहेब आपल्या दौऱ्याला पुण्यापासूनच सुरुवात करणार असल्याने पुण्यांत खळबळ आणि प्रक्षुब्ध वातावरण लवकरच निर्माण होणार असें दिसतें. तुमच्यावर अर्थात् मोठीच जबाबदारी आहे. पुणें आणि पुणेकर यांच्याबद्दल मी सदिच्छा व्यक्त करतों.

६८१

१४ ऑक्टोबर १९२८—जेकब बी. इस्रायल, बांद्रें

सात तारखेच्या ज्ञानप्रकाशांत औंधच्या राज्यव्यवस्थेबद्दल कारभारी यांनी केसरीवर टीका केली ती पाहिलीत का? 'पहिलें हिंदी लोकसत्ताक संस्थान' म्हणून औंधची ज्ञानप्रकाशकारांनी कौतुकाने स्वित्झरलंडाशीं तुलना केली आहे! कोठें तें शुभ्र हिमाच्छादित स्वित्झरलंड व कुठें तें भिकार व मागसलेलें औंध!! त्यांत कचरा व सापसराटे कितीतरी!! स्वित्झरलंडचें उदाहरण डोळ्यांपुढे ठेवण्यास हरकत नाही. पण वर्तमानपत्रकर्त्यांनी लिहितांना वस्तुस्थिति थोडी तरी पाहिली पाहिजे.

टिळकांच्या एका मुलाने आत्महत्या केली हें ऐकून वाईट वाटलें. मोठ्या माणसांचीं मुलें क्वचितच मोठीं निघतात! त्यांची समजूत काढण्याचा तुम्ही प्रयत्न करीत आहां हे ऐकून बरें वाटलें.

१८९६ सालीं फॅमिन कोडच्या कामाबाबत साताऱ्यास असतांना, तुम्ही जो राजकारणांतला एक धडा माझ्या ऑफिसांत शिकलां त्याची मला आठवण आहे. विंइचेस्टर कलेक्टर व मी कायद्याच्या शब्दावर जोर देण्यापेक्षा सारासार बुद्धि व तारतम्यच अधिक वापरीत असूं; पण त्यानेच फार हित झालें. दुष्काळी कामांत गोषा वापरणाऱ्या दक्षिणी व मुसलमान स्त्रियांशीं वागतांना आम्हाला मोठी पंचाईत पडे, पण आम्ही स्वयंसेवकांची मदत घेतली. आणि कायद्यावर भर न देतां व्यवहारज्ञान व तारतम्य यांनी मार्ग काढला. पहिल्या प्लेगांतहि हेंच धोरण आम्ही अंगीकारल्यामुळे रँडच्या खुनासारखा प्रसंग साताऱ्यांत ओढवला नाही.

तुमचे बंधु माझ्या बरोबर सहसेवी होते. हल्ली ते कोठे आहेत?

६८२

**१६ ऑक्टोबर १९२८—तारकनाथ दास, म्यूनिच**

नेहरू रिपोर्टाच्या दोन प्रति तुम्ही पाठविल्या त्या पोंचल्या. तो रिपोर्ट वाचून माझें फार चांगलें मत झालें. सायमन कमिशनचा रिपोर्ट इतक्या लवकर तयार होत नाही. तरी नेहरू रिपोर्टाला ज्यांचा पाठिंबा आहे त्या सर्वांचा एक मोठा पक्ष करून त्याने १९२९ सालच्या निवडणुकी जिंकाव्या. नेहरू रिपोर्ट लिहिणारांनी हिंदी राज्यघटनेचें बिल तयार करून येत्या काँग्रेसपुढेच मांडलें तर फारच उत्तम. ‘India in world politics’ या माझ्या पुस्तकाची जर्मन भाषेंत आवृत्ति काढीत आहें. हिंदी राज्यघटनेच्या बिलाची प्रत मिळाल्यास त्या पुस्तकांत परिशिष्ट म्हणून घालण्याचा विचार आहे.

६८३

**१९ ऑक्टोबर १९२८—मुल्ला कालिमुद्दीन हुसेनी (‘ निसीम शाहिरे ’ वर्तमानपत्राचे उपसंपादक ) पुणें**

नेहरू रिपोर्टाला पाठिंबा देण्याला येत्या २५ तारखेस पुण्याला तुम्ही सर्वपक्षीय परिषद भरवीत आहां याबद्दल तुमचें व तुमच्या सहकाऱ्यांचें अभिनंदन करतों. या बाबतींत तुम्ही विशेष परिश्रम घेतले व त्याचाच परिणाम म्हणजे सर्व महाराष्ट्राने नेहरू रिपोर्टाला पाठिंबा दिला. सर्व प्रांतांतून व निरनिराळ्या पक्षांनीहि नेहरू रिपोर्टाला पाठिंबा दिला. यावरूनच त्याचें महत्त्व व लोकप्रियता हीं सिद्ध होतात. मुसलमानांचे पुढारी म्हणविणाऱ्या कांही जणांनी या रिपोर्टावर धूळफेक करण्याचा प्रयत्न केला. पण ते देशाचें पाऊल पाठीमागे खेचण्याचा प्रयत्न करीत आहेत असें म्हटलें पाहिजे. सर्व हिंदी राष्ट्राचे हक्क विसरून, केवळ आपल्याच धार्मिक व सामाजिक हक्कांना जपण्याकरिता हे मुसलमान नेहरू रिपोर्टावर बहिष्कार घालतात ! पण सरकारने नेहरू रिपोर्टाला मान्यता दिली तर मुसलमानांच्या हक्कांना कोणताहि बाध येईल असें मला मुळींच वाटत नाही. पुण्याच्या परिषदेंत मुसलमानांकरिताहि संयुक्त मतदार संघाचाच ठराव होईल अशी मला आशा आहे.

६८४

**२७ ऑक्टोबर १९२८—सर तेजबहादुर सप्रू, अलाहाबाद**

तुमच्या परिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याबद्दल तुम्ही मला विनंति केली

याबद्दल फार आभारी आहे. आज तुमची परिषद सुरू झाली असेल व ती नीट यशस्वी रीतीने पार पडेल. कांही अंशीं माझ्या कारकुनाच्या हयगयीमुळे तार वेळेवर हातीं आली नाही व दोनतीन दिवस मीहि प्रवासांत होतों. म्हणून मला वेळेवर तारेचा जबाब देतां आला नाही याबद्दल फार वाईट वाटतें.

६८५

३० ऑक्टोबर १९२८—सौ. शारदा मेहता, बडोदें

ता. ४ ते ६ नोव्हेंबर रोजीं दरबार गोपाळदास यांचे अध्यक्षतेखाली आमच्या बडोदें राजप्रजामंडळाचें वार्षिक संमेलन आहे. त्या वेळी तुम्ही आल्यास फार आनंद होईल. तथापि न येऊं शकल्यास परिषदेकरिता निदान एखादा संदेश पाठवा.

६८६

(?) नोव्हेंबर १९२८—हेगडे देसाई, केंपे (गोवा)

पोर्तुगीज सरकारने मजविरुद्ध आणखी एक खटला उभारला आहे. निदान सहा हजार रुपये तरी दंड लादून त्यांत 'भारता'सह माझी स्वतःची होळी करण्याचा त्यांचा बेत चाललेला आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, सरकारच्या या दुष्ट काव्याला आमच्यांतीलच कांही घरबुडवे अधम आंतून मदत करीत आहेत. आजपर्यंत मी अत्यंत हाल सहन करून 'भारता'ला वांचविलें आहे. गोमांतकीय जनता कर्तव्यदक्ष असली तर तिच्याच आधारावर तो जगला असता. पण ती आशा नाही. म्हणून कसेंहि करून 'भारताला वांचवा' अशी प्रार्थना आपणांला करण्याचें धैर्य करीत आहें.

६८७

१६ नोव्हेंबर १९२८—वालचंद हिराचंद, मुंबई

महाराष्ट्र इंडस्ट्रियल स्कीमचे प्रॉस्पेक्टस सोबत पाठवीत आहें. याची अशीच एक दुसरी प्रत सर विश्वेश्वर अय्या यांना पाठविली आहे. तरी त्याचे तुम्ही डायरेक्टर व्हाल काय ?

६८८

१२ डिसेंबर १९२८—जी. सी. चंद्र, (सुपरिंटेंडेंट, आर्किआलॉजिकल सर्वे)

रायगड स्मारक कमिटीचे अध्यक्ष श्री. गोसावी यांच्याकडून मला कळतें कीं,

तुम्ही लवकरच रायगडास जाणार आहां. तरी केव्हा जाणार तें कळवावें म्हणजे मीहि त्या वेळीं येण्याचें करीन.

६८९

**१३ डिसेंबर १९२८—जे. कुमारप्पा, कोइमतूर**

मी नुकताच अमेरिकेहून परत आलों. माझें खरें नांव जॉन कार्नेलियस. पण आजाचे हिंदु नांव 'कुमाराप्पा' असें हल्ली वापरतों. ना. भि. परुळेकर यांचा मी स्नेही असून जपान वगैरे पौर्वात्य देशांत जाऊन तेथे अभ्यास करावा अशी त्यांची इच्छा आहे. तिकडील कांही हिंदी संपादकांनी त्यांच्याकरिता कांही मदत करतां आल्यास पहा असें सांगितलें आहे. येत्या कलकत्ता काँग्रेसला मी येईन त्या वेळीं यासंबंधी तुमची भेट घेईन.

६९०

**२० डिसेंबर १९२८—मा. ग. पाटणकर, काशी महाराष्ट्र संघ, बनारस**

आगाशे यांच्या पत्रावरून आपला बनारसला येण्याचा मनोदय आहे असें कळलें. कांही कामानिमित्त पं. मदनमोहन मालवीय यांची भेट जाहल्या वेळीं आपल्या आगमनासंबंधी गोष्टी निघाल्या. त्यांत पंडितजींनी संतोष प्रदर्शित करून आपलें येथे येणें जाहल्यास मी जरूर भेटेन असें सांगितलें. तरी आपला प्रोग्रॅम नक्की कळविण्याबद्दल विनंति आहे.

६९१

**२१ डिसेंबर १९२८—अ. स. गोखले, संपादक 'रत्नाकर' पुणें**

१९१२ सालापासून ज्या एका विशिष्ट लोभाने आपण मला वागविलें, मदत केली, यश चिंतिलें व आपुलकीची भावना वृद्धिंगत केली ती सर्व स्मरून पत्र लिहिण्याचें धाडस करीत आहें. रत्नाकरांत आपली कादंबरी येणार इतकें जाहीर करण्याची मी परवानगी मागतों. त्याचें कारण वर्गणीदारांना खात्री हेंच होय. याने मी आपला सतत ऋणी राहीन.

६९२

**२२ डिसेंबर १९२८—श्रीमंत बाळासाहेब मिरजकर, मिरज**

आपलें पत्र पोंचलें. आपणास आनंद झाल्याचें पत्रावरून पाहून मला दोन

प्रकारचा आनंद वाटला. एक 'वृत्तपत्रकार' या नात्याने आपणास जें लिहावें लागलें त्याबद्दल आपण जें पत्रीं लिहिलें त्याविषयी व दुसरा, आपण आमचे आहांत तेव्हा माझ्याबद्दल आपणास जो आपलेपणा वाटत आहे तो. ही तडजोड प्रथमच होऊन गेली असती. पण फुकट पुढाऱ्यांच्या नादीं लागून मला लोकांनी थोडा त्रास दिला. आता वर्तमानपत्रकार या नात्याने मलाहि सूट द्या असें आपण लिहिलें त्याबद्दल मी कांही लिहूं शकत नाही. कारण वर्तमानपत्रकार या नात्याने आपणांस जरी कांही लिहावें लागलें तथापि तें लिहिते वेळीं आपलें लक्ष माझ्या हिताकडे होतें व ते तसेंच कायम असावें अशी प्रार्थना करून पत्र पुरें करतों.

६९३

२४ डिसेंबर १९२८—वा. दा. मुंडले, इस्लामपूर

आपण येथील कौजलगी यांना प्रचारक नेमून कांही रक्कम देण्याचें कबूल केलें होतें असें त्यांच्याकडून मला कळलें. सध्या येथे कांग्रेस कमिटीत कांही भानगड उपस्थित होऊन त्याचें अखेर पर्यवसान कौजलगींच्या राजीनाम्यांत झालें. व यापुढे ते ब्राह्मणांशीं उघड वैर करणाऱ्या ब्राह्मणेतर कंपूच्या तंत्रांत उघडपणें जाणार ! व त्यामुळे येथील स्थानिक मंडळींची सहानुभूति त्यांच्याबद्दल नष्ट होणार आहे. अशा स्थितींत त्यांची प्रचारक म्हणून नेमणूक करण्यापूर्वी म्हणजे आपण त्यांना जे सुमारें रु. तीनशें पुढील सालाकरिता कबूल केले आहेत ते देण्यापूर्वी मजला एकवार विचारण्याची कृपा करावी.

६९४

२९ डिसेंबर १९२८—त्र्यं. ग. मराठे, मुंबई

आपल्या पत्राप्रमाणे ता. ९ ते १३ पर्यंतचा कार्यक्रम ठरविला आहे. नुसती देवगडास परिषद भरविल्यास ती व्हावी तितकी योग्य होणार नाही व निरनिराळ्या ठिकाणीं सभा झाल्याने जागृति होऊं शकेल म्हणून सभांचा कार्यक्रम ठरविला आहे. आपण एकदा तालुक्यांत जाऊन आल्यावर अवश्य ती संघटना होऊं शकेल व मग परिषद योग्य प्रकारें भरवितां येईल.

६९५

६ जानेवारी १९२९—ब्रह्मचारी क्षीरसागर, मसूर

गुरुवारीं मसूरकर महाराज पणजीला पोंचतांच शेंकडो नवहिंदूंनी त्यांचें

स्वागत केलें. तरुण मित्रमंडळ व अखिल भारतीय हिंदु मंडळ यांनी मात्र शत्रुत्व पत्करलें. डॉ. बोरकर, डॉ. साखरदांडे, काकुले, आंग्ले यांनी सशस्त्र पोलीस आणून महाराजांच्या बंगल्याला वेढा घातला. आश्रमाचे लोक राजद्रोह आणि बोलशेविझम शिकवितात अशी बातमी त्यांना दिली होती. पण पोलीस सार्जंट वर येतांच त्याला वस्तुस्थिति समजावून सांगितली. नंतर त्यांनी बाहेरच्या जमावाला घालवून दिल व कुटाळ कंपूला तंबी दिली.

६९६

११ जानेवारी १९२९—तारकनाथ दास, रोम

लॉर्ड रेडिंगनी बोलाविलेल्या गोलमेज परिषदेला गांधी गेले नाहीत तसला घोंटाळा ते पुनः करणार नाहीत अशी आशा आहे. डॉ व्हॅलेरा यांनी काय केलें हें दाखवून येत्या नोव्हेंबरांतील निवडणुकी तुम्ही जिंकाव्या. ब्रिटिश लेबरपक्ष किंवा ब्रिटिश ट्रेड यूनियन्स यांचे जवळजवळ चाळीस लक्ष सभासद असून त्यांचें वर्गणीचे सालीना उत्पन्न सत्तर लाख पौंड आहे. कॉंग्रेसजवळ दहा लाख सभासद नाहीत अगर दहा लक्ष पौंडांची शिल्लक नाही. नुसत्या तोंडच्या वल्गनांनी सरकार कसें दबणार ! त्याला देशभर संघटना केली पाहिजे. हिंदी संस्थानिक व मुसलमान यांचे कार्यकर्ते विलायतेत आहेत. आणि कॉंग्रेसला हिंदुस्थानांत संघटना नाही आणि परदेशांत प्रचार नाही !

६९७

२० जानेवारी १९२९—ब्रह्मचारी क्षीरसागर, मुंबई

दिवसानुदिवस जटिल होत चाललेल्या गोमंतकाचे प्रश्नासंबंधी आपणाला उद्विग्नता यावी हें ठीकच आहे. आपल्या आज्ञेनुसार प्रतिपक्षाबद्दल आम्ही कोठेहि चकारशब्द काढला नाही अगर लिहिलें नाही. म्हणून कृपा करून आपला गैरसमज करून घेऊं नये. आपल्या चरणीं सादर केलेला शुद्धिकार्याचा हिशोब कशा पद्धतीने प्रसिद्ध करावा तें व गोमंतकीं उभारण्याच्या स्मारकाचें काय करावयाचें तें सवडीप्रमाणे कळविण्याची कृपा करावी.

६९८

२५ जानेवारी १९२९—तारकनाथ दास, मॉन्टेफालो (रोम)

१९२९ सालच्या निवडणुकी जिंकण्याबद्दल डॉ. मुंजे व तुम्ही कसून खट-

पट कराल अशी आशा आहे. जर तुमच्या राष्ट्रीय पक्षाने निवडणुकी जिंकल्या तर तुम्हांला हिंदी राष्ट्रीय मागणीबद्दल सरकारशी वाटाघाट करतां येईल. आयरिश लोकांनी अगर अलास्कामधील राष्ट्रीय पक्षाने जें धोरण पत्करलें तसें तुम्ही करावें. पुढची कॉंग्रेस पुण्याला भरणार हें ऐकून आनंद झाला.

६९९

१६ फेब्रुवारी १९२९—द. के. केळकर, पांचगणी

आपल्या पत्रांतील अरसिक वेडा आणि कवि या श्रेणींत 'संत' याची भर घालून 'भक्तिरसाचें काव्यांतील स्थान' या नवीन लेखांत मी त्याचा उपयोग करणार आहे. मला वाटतें 'संताला' कवि व वेडा यांमध्ये कोठेतरी बसविलें पाहिजे. कवि आणि संत दोघेहि देहभान हरपविण्याच्या उद्देशाने कल्पनाकाशांत उड्डाण करतात. पण कवीला मधून मधून स्वस्थानाकडे दृष्टिक्षेप करण्यांत आनंद वाटतो, तर संतांस समाधिभंग झाला म्हणून विषाद वाटतो. अशा प्रकारचें विवेचन मी करणार आहें. लेख लिहून झाला म्हणजे आपणांकडे पाठवीन.

७००

९ मार्च १९२९—सी. न. साने, आबादान

केसरीचे फिरते बातमीदार रा. श्रीपादराव टिकेकर गेल्या महिन्यांत इकडे आले होते. ते येथे असतांना आमचे १०।१२ दिवस अतिशय आनंदांत गेले. प्रवासी बातमीदार परदेशी पाठविण्याचें धाडस प्रथम केसरीनेच केलें. आपला हा नवा उपक्रम केसरीच्या आश्रयदात्यांस पसंत पडला असावा असे वाटतें. इकडून मनोरंजक माहिती केसरीकरिता पाठविण्याबद्दल आपण सुचविलें आहे. तथापि लेखनाची संवय नसल्याकारणाने प्रयत्न केल्यास साधेल कीं नाही याची खात्री नाही. तथापि आपल्या आज्ञेप्रमाणे प्रयत्न करीत जाईन.

७०१

२८ मार्च १९२९—डॉ. ना. भि. परुळेकर, न्यूयॉर्क

मी येथून निघणार असून इजिप्त, तुर्कस्थान, पॅलेस्टाईन, इराण वगैरे देशांत प्रवास करणार आहें. केसरीचा बातमीदार म्हणून आपणांकडून पूर्वी आलेल्या अधिकारपत्रांत बदल करून घ्यावा लागेल. तो करून दाखल्यांच्या नकला केतकर यांच्याकडे पावत्या केल्यास मला मिळतील.

७०२

**८ एप्रिल १९२९—हरविलास शारदा, दिल्ली**

लो. टिळकांच्या चरित्राच्या इंग्रजी भाषांतराची एक प्रत तुम्हीं मला पाठविली त्याबद्दल फार आभारी आहे. हें चरित्र लिहून तुम्ही मोठी सार्वजनिक कामगिरी बजावली आहे. लो. टिळक हे जसे हिंदुस्थानांतले अत्यंत श्रेष्ठ देशभक्त तसाच त्यांचा चरित्रकारहि विद्वानांत श्रेष्ठच असावयास पाहिजे. एखाद्या शतकांत होऊन जाणारी अशीच टिळक ही लोकोत्तर व्यक्ति होती. तिचें व समकालीन लोकस्थितीचें यथार्थ वर्णन करणें हेंहि असामान्य बुद्धिमत्तेलाच शक्य आहे. गेल्या अर्धशतकाचा इतिहास लिहिणाराला तुमचें पुस्तक वाचणें अनिर्वाह्य होऊन बसेल. तुमच्या कांही नाटकांचें इंग्रजींत भाषांतर झालें तर बरें होईल असें मला वाटतें.

७०३

**१८ एप्रिल १९२९—जे. टी. संडरलंड, पुणकीपसी (?) (अमेरिका)**

माझें 'इंडिया इन बॉंडेज' हे पुस्तक देशी भाषांमधून भाषांतर करण्यासारखें आहे इतकें चांगलें आहे असें तुम्हाला वाटतें हें पाहून बरें वाटलें. मराठी भाषांतर तुमच्या देखरेखीखाली तयार करविणार, अर्थात् तें समाधानकारक होईल यांत शंकाच नको. तथापि भाषांतरासंबंधी हक्क व व्यवस्था मी सर्व रामानंद चतर्जी यांच्याकडे सोपविली आहे तेव्हा तुम्ही त्यांना लिहावें. मीहि त्यांना लिहीत आहें. हिंदुस्थानांत तुमची व माझी अद्याप भेट झाली नाही, तथापि तुमचे लेख मी फार पूर्वीपासून काळजीपूर्वक वाचत असल्याने तुमच्या लेखणीची व हिंदी स्वातंत्र्याकरिता तुम्ही जी आस्थापूर्ण व महनीय सेवा केली आहे तिची मला चांगली ओळख आहे. तुमच्याबद्दल मला फार आदर वाटतो.

७०४

**२ जून १९२९—राजा नरेंद्रनाथ, पोर्ट सय्यद**

शिक्षण कमिटीबरोबर मी दौरा करीत असतां अनेक प्रांतांत सरकारचें धोरण काय आहे, याची बारकाईने चौकशी केली. त्यांत जातीयता आणि पक्षपात यांचेंच धोरण सगळीकडे पसरलें आहे. आणि या पक्षपाती धोरणाचा रोख हिंदू-

विरुद्ध होत आहे असें आढळून येऊन फार आश्चर्य व वाईट वाटलें. विलायतेंत पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन जातीय पक्षपाताचें हें राजकीय धोरण नवीन राज्यघटनेंत कायद्याच्या स्पष्ट शब्दांनी यापुढे थांबविण्यांत यावें अशी मी खटपट करणार आहें. विशेषतः सरकारी नोकऱ्या, शिक्षण खातें, व्यापारउदीम व मिळकतीचें स्वामित्व यांत तरी जातीय पक्षपाताला कायद्याने आळा बसला पाहिजे. एकीकडे डोमीनियन स्टेटस जरी मिळालें तरी दुसरीकडे जोपर्यंत जातीयता व पक्षपात यांचा अंमलबजावणीत बुजबुजाट आहे, तोंपर्यंत डोमीनियन स्टेटस मिळालें तरीदेखील तें मिळून फुकटच गेल्यासारखे होईल. माझी सर्व शक्ति व प्रयत्न विलायतेंत पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन ही गोष्ट पटवून देण्यांत मी खर्च करणार आहें. सध्याच्या सर्व राजकीय असंतोषाचें कारण सर्व राज्यकारभाराच्या खात्यांत व सर्व प्रांतांत सरकारने ठेवलेलें हें जातिपक्षपाताचें धोरणच होय, अशा अर्थाचें तुम्ही मला एखादें पत्र पाठविलें तर विलायतेंतील अनेक मुत्सद्द्यांना मला तें दाखवितां येईल.

७०५

### ५ जून १९२९—पद्मराज जैन, कलकत्ता

तुमच्या सोयीकरिता डाक्का प्रांतिक परिषदेची तारीख पुढे ढकलली आहे. तरी कृपा करून अध्यक्षस्थान स्वीकारावेंच. ( तार )

७०६

### १० जून १९२९—एच्. डी. व्हीटनन ऊर्फ सत्यानंद नारायण, नाशिक

ग्वाल्हेरचे आंग्रेसाहेब यांच्याकडे वर्षापूर्वी आपण दोघे पाहुणे असतांना तुमची व माझी गांठ पडली होती. हिंदु तत्त्वज्ञानावर श्रद्धा असल्यामुळे मी उघड-पणें हिंदुधर्म स्वीकारला याबद्दल तुम्हाला माझें कौतुक वाटलें होतें. या प्रवाहांत मी असतां अनेक अडचणी व संकटें माझ्यावर आली. पण आपल्या पूर्व कर्मांच्या सिद्धांताप्रमाणे त्यांना तोंड दिलेंच पाहिजे. सध्या माझी अडचण असल्याने मला एखादी नोकरी पाहिजे. धारवाडच्या जिल्हा लोकल बोर्डांत एंजीनियरचे जागे-करिता मी अर्ज पाठविला आहे व तुम्ही तुमचें वजन खर्च करून श्री. कंबळी यांना एक पत्र पाठविलेंत तर माझें काम होण्यासारखें आहे.

७०७

## १२ जून १९२९—बॅ. जयकर, मुंबई

संगमनेर प्रकरणाच्या अपीलाकरितां उद्या कोर्टांत हजर राहात आहें. तुमच्या टीकेबद्दल नेहरूंना काय वाटेल याची फिकीर करूं नका. ती टीका अगदी न्यायाची व योग्य होती. तुम्ही ती उघडपणें बोलून दाखविलीत हें बरें केलेंत.

७०८

## १३ जून १९२९—बॅ. जयकर, मुंबई

संगमनेर प्रकरणाची केस नुकतीच संपली असून ऑर्डर बेकायदेशीर होती असा निकाल झाला आहे. या खटल्यांत मी अशीलांकडून वकील फी घेऊं नये अशी तुमची इच्छा असल्याचें समजलें. तुमच्या इच्छेला मान देऊन मी तसेंच केलें आहे.

७०९

## १३ जून १९२९—घनश्यामदास बिर्ला, कलकत्ता

मिठाच्या करासंबंधीचें पुस्तक तुम्ही काळजीपूर्वक वाचून उपयुक्त सूचनाहि केल्या त्याबद्दल मी तुमचे मनःपूर्वक आभार मानतों. सदर पुस्तक प्रसिद्ध करण्याच्या वेळीं तुमच्या बहुमोल सूचनांचा फार उपयोग होईल यांत शंका नाही. आणखीहि कांही कळविण्यासारखें असल्यास कळवा.

७१०

## २४ जून १९२९—एस्. एल. सिलम व पी. जी. सहस्रबुद्धे, मुंबई

१९२५ सालीं चौपाटीवर लो. टिळकांचें स्मारक उभारण्याकरिता जी कमिटी स्थापन झाली तिच्या हातून अद्याप कांहीच काम झालें नाही. येथील कॉंग्रेस कमिटी आम्हाला दहा हजार रुपये देणार आहे. आम्ही जमविलेले रु. ३००० आहेत. म्युनिसिपालिटीने व सरकारनेहि स्मारक उभारण्याला परवानगी दिली आहे. याकरिता पुढील १२ महिन्यांत तीस हजार रुपये जमविण्याचा यत्न करून पुतळ्याची ऑर्डर द्यावी असें आम्ही योजलें आहे. याकरिता अनेक सभा भरविणें, वर्गण्या जमविण्याचे दिवस निश्चित करणें, वगैरे कामें आहेत. येत्या रविवारीं ता. ३० जूनला पहिली सभा जयकर यांच्या अध्यक्षतेखाली आहे. तरी

तुम्ही व अण्णासाहेब परांजपे यांनी सभेंत भाषण करावें. कृपा करून नकार देऊं नये. चार वर्षें होऊन गेलीं तरी अद्याप मुंबईत टिळक स्मारकाला पत्ता नाही ही आम्ही शहराला लज्जास्पद गोष्ट मानतों तरी आपली संमति तारेने कळवावी.

७११

**२५ जून १९२९—डॉ. अन्सारी, दिल्ली**

मीरत केस डिफेन्स फन्डाकरिता केसरी ऑफिसतर्फे पाठविलेला रु. ३१०चा चेक पोंचला त्याबद्दल फार आभारी आहें. आपणाकडून दुसऱ्या हप्त्याची वाट पाहात आहें.

७१२

**२५ जून १९२९—एम. पी. गांधी, सेक्रेटरी, चेंबर ऑफ कॉमर्स, कलकत्ता**

फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲण्ड इंडस्ट्रीचे अध्यक्ष मि. जी. डी. बिर्ला यांनी तुम्हास असें कळविण्यास सांगितलें आहे की, मिठाच्या करासंबंधी असेंब्लींतील वादविवाद सदर पुस्तकांत घालून ते अद्ययावत् करावें, ही तुमची सूचना त्यांना मान्य आहे. सरकारकडून कोणत्या मागण्या करावयाच्या याबद्दल निश्चित सूचना कराव्यात अशीहि एक सूचना आलेली आहे. पण इतकीच दृष्टि साधनसंशोधनांत न ठेवतां, इंग्रजी राज्यापूर्वी मिठाचा धंदा व कर यासंबंधी माहितीदेखील जमवावी असें कमिटीने ठरविलें आहे. मग या साधनांवरून संशोधकांना काय काय निर्णय काढता येतील हें पुढे पाहतां येईल. गेल्या पन्नास वर्षांत या बाबतींत इतिहाससंशोधन झालेलेंच नाही. या बाबतींत तुम्ही विशेष लक्ष घातलें असल्यामुळे, सदर पुस्तकास तुम्ही प्रस्तावना लिहून मिठाचा धंदा व कर यासंबंधी प्राचीन काळापासून तों असेंब्लींतील वादविवादापर्यंत सर्व हकीगती-चा यथायोग्य परामर्श घ्यावा अशी बिर्ला यांची इच्छा आहे.

७१३

**१४ जुलै १९२९—श्री. त्र्यं. केतकर, पुणें**

येत्या मार्च महिन्यांत इंग्लंडला जाण्याचा विचार आहे. जाण्याचा आद्य हेतु ‘ महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास ’ पुरा करावा हा आहे. पण इंग्लंडांत काय-मची वस्ती करावी हाहि हेतु आहे. जाण्यापूर्वी ज्या मंडळींचीं मनें दुखावलीं

असतील त्यांच्याशीं समेट करून जावे असेंहि वाटतें. मागे मी जें पत्र तुम्हांस लिहिलें होतें त्याचा तुम्ही विपर्यास केलात. तें मी सद्भावनेने लिहिलें होतें. जर तुमची अशी समजूत असेल कीं टिळकपुत्र व तुम्ही ट्रस्टी यांच्यामध्ये भांडण मी लावलें किंवा वाढविण्याचा प्रयत्न केला तर ती खरी नव्हे. जेव्हा तुमचे खटले कोर्टांत गेले तेव्हा टिळकपुत्रांना अनुकूल असें वातावरण उत्पन्न करण्याचा मी प्रयत्न केला. पण त्याबरोबर माझ्या मनांत होतां होईल तों तुमचें जुळावे ही भावना मी जागृत ठेवली होती.

७१४

## १५ जुलै १९२९—विठ्ठल रामजी शिंदे, पुणें

मी एक केसरीचा अगदी विद्यार्थिदशेपासून चहाता आहे. हें पत्र दैनिक व्हावे निदान द्विसाप्ताहिक व्हावे अशी माझी फार दिवसांची इच्छा! ती आपण आता ता. ३ ऑगस्ट १९२९ पासून पुरी करणार हें वाचून मला हर्ष होत आहे. केसरीचें जातिविषयक धोरण मला मुळीच पसंत नाही. सामाजिक सुधारणेत तर लोकमान्यांशीं माझा उघड विरोध होता. पण तरी माझी या पत्राची आवड कमी झाली नाही. मी माझा विरोध शब्दांनी व लेखांनी कांही प्रसंगीं प्रदर्शित केला असूनहि, केसरीने माझ्या स्वतःविषयी कधी उघड लेख लिहिले नाहीत हें मी कृतज्ञपणें जाणत आहे. लोकमान्यांनी मी केवळ लहान म्हणून गय केली असेल व आपण मित्र म्हणून गय केली असेल. आता माझें मागणें आहे कीं आपल्या या ब्राह्मणब्राह्मणेतर धोरणांत थोडा तरी फरक कराल काय ? तुम्ही फरक केलात तरी ब्राह्मणेतर आपल्या धोरणांत फरक करणार नाहीत हें मी जाणतों. पण मला वाटतें आपण उदाहरण घालावे. हा वाद आपल्यापेक्षा लहान वर्तमानपत्राकडे सोपवून आपण राष्ट्रीय व्हावे.

७१५

## १५ जुलै १९२९—विठ्ठल रामजी शिंदे, पुणें

रा. जवळकर अलीकडे शेतकरी पक्ष निर्माण करीत आहेत, व त्यांत ब्राह्मणांनाहि घेणार असें ऐकतों. त्यांचें सहकार्य आपण साधाल काय ?

७१६

## २४ जुलै १९२९—ॲट्‌किनसन (मिशनरी), खानापूर, (बेळगांव)

केसरी आठवड्यांतून दोनदां निघणार असें कळतें. पुढचा अंक येईपर्यंत माझा मागला सर्व अंक वाचून होतच नाही म्हणा. तरीहि केसरी घ्यावासा वाटतो. केसरी जी मराठी भाषा लिहितो त्या भाषेंत मी· ख्रिस्ती धर्मोपदेश केला तर या जिल्ह्यांतल्या मराठी शेतकऱ्यांना माझें म्हणणें कळेल अशी मला आशा वाटते. मी कांही साम्राज्यवादी नाही. आणि कोठल्याहि कारणाकरिता शत्रुत्वाने भांडण्यापेक्षा मी तुरुंगांत बसून राहणें पत्करीन. तुम्ही केसरींत एक सारखें राजकीय व तेंच तेंच लिहितां याने कंटाळवाणें होतें. ज्यामुळे वाचकांचें मन उदात्त श्रेष्ठ होईल अशा संधि संपादकाकडे कितीतरी येतात. देशभक्ति ही उदात्त भावना असेल. पण कोणाहि मनुष्याला तुमचा शेजारी मानणें ही विश्वबंधुत्वाची भावना त्याहून अधिक मोठी आहे. देशभक्तीशिवाय इतर भावनांचें शिक्षण तुमच्या पत्रांत येत नाही. कदाचित् वाचकांनी किर्लोस्कर-खबर सारखी इतर मासिकें वृत्तपत्रें वाचून तें मिळवावें असेंहि तुमचें मत असेल. 'चिल्ड्रेन्स न्यूजपेपर' यांत वृत्तसारामधून त्रोटकपणाने कां होईना लहानमोठ्या स्वार्थत्यागाच्या बातम्या चटकदारपणाने दिलेल्या असतात. मला वाटतें खेडोपाडीं अशा घडणाऱ्या हकीकती मुद्दाम निवडून केसरींत देण्यास जर तुम्ही संपादक वर्गास सांगितलें तर केसरी अधिक वाचनीय होईल.

७१७

## २९ जुलै १३२९—शंकर गणेश लवाटे, संकेश्वर

हैद्राबाद संस्थानांत श्रीसंकेश्वर मठाचें पुरातन उत्पन्न निदान निदान तीन चार हजारांचें तरी आहे. इंग्रजसरकारने संस्थान उत्पन्न जप्त केलें तेव्हा निजामसरकारने त्यांच्या मुलखांतलें जप्त केलें. आज वीस वर्षें हें उत्पन्न जप्त आहे व इंग्रजसरकारकडील परत मिळालें तसें निजामाकडील परत मिळावें अशी खटपट आता करावयाची आहे. तेथे वामनराव नाईक जहागिरदार, माजी न्यायाधीश केशवरावजी, व हल्लींचे नवे न्यायाधीश हे सर्व आपल्या परिचयाचे व स्नेह्यांतले आहेत, अशी माझी समजूत आहे. दुसरेहि तेथे कोणी आपल्या परिचयाचे

असतील. तरी त्यांपैकी प्रत्येकाला याबाबतींत शक्य तितकी मदत करण्याविषयी आपण शिफारसपत्र दिल्यास फार उपयोग होईल.

७१८

**३ ऑगस्ट १९२९—दत्तात्रय यशवंत शहाणे, मुंबई**

केसरी पत्राला ता. ४ जानेवारी १९३१ रोजीं ५० वर्षें पुरीं होतील. त्या प्रसंगी केसरी पत्राचा ज्युबिली समारंभ व्हावा अशी अखिल महाराष्ट्राची इच्छा असणारच. तो समारंभ केसरीला शोभेल अशा थाटाने व्हावा अशी प्रस्तुत लेखकाची तीव्र इच्छा आहे. सतत अर्ध शतक सामान्यतः हिंदुस्थानाला व विशेषतः महाराष्ट्राला ज्ञानामृत पाजणाऱ्या केसरीचें अशा तऱ्हेनें अभिनंदन करणें उचित होय. गेल्या वर्षाप्रमाणे यंदाहि म. प्रां. कॉंग्रेस कमिटीने आमंत्रण दिल्यास कॉंग्रेस पुण्यास भरण्यास हरकत पडणार नाही. कॉंग्रेसनिमित्त परप्रांतांतील अनेक पुढारी पुण्यास येतील. कॉंग्रेसच्या तारखा व ज्युबिलीची तारीख जवळजवळ असल्याने ह्या पुढाऱ्यांना ज्युबिलीनिमित्त पुण्यास थांबवून घेतां येईल, व असें झाल्यास समारंभास विशेषच शोभा येईलसें वाटतें.

७१९

**९ सप्टेंबर १९२९—वामनराव मुकादम, गोध्रा**

गतवर्षी याच दिवसांत पुरुषोत्तमदास मगनलाल शहा वकील यांचा मुसलमानांचे हस्तें सिटी पोस्ट व पोलीस चौकी समोर भर दिवसा अमानुषपणें खून झाला. हिंदूंच्या हक्कांकरिता झगडून त्यांनी वीरमरण पत्करिलें. येत्या १० तारखेस त्यांची पुण्यतिथि साजरी करण्याकरिता ‘ शहा हिंदु आखाडा ’ या नांवाने, राजा नारायणलाल बन्सीलाल यांचे हस्ते, एक समारंभ आम्ही करणार आहों. तुम्ही समारंभास आल्याने हिंदु संघटनास निश्चितपणें उत्तेजन येईल. तुम्ही येऊं न शकल्यास एखादा स्फूर्तिदायक संदेश तरी येथील हिंदूंना अवश्य पाठवा.

७२०

**२२ सप्टेंबर १९२९—बॅ. सच्चिदानंद सिंह, सोलन**

सिमल्याहून जवळच सोलन येथे मी राहात आहे. आणि हल्लीं माझा उद्योग म्हणजे शारदा बिल, कैद्यांच्या उपोषणासंबंधीचें बिल, इत्यादिकांवर तुम्ही व तुमची

ॲसेंब्लीतील स्नेहीमंडळी यांनी केलेली भाषणें हा होय. डाक्का प्रांतिक परिषदेच्या तुमच्या अध्यक्षीय भाषणाची प्रत मिळाली. तुमच्या मुख्य विचारांशीं माझें एकमत आहे. कालच क्रॉनिकलमध्ये तुमच्या Pleasures and Privileges of the pen पुस्तकावरील संपादकीय अभिप्राय पाहिला. सदर पुस्तकाची मला एक प्रत ताबडतोब पाठवून द्या, अगर तुमच्या जवळ नसल्यास पुण्यास लिहा. मी तें पुस्तक वाचून हिंदुस्थान रिव्ह्यूमध्ये त्यावर अभिप्राय लिहिणार आहे.

७२१

**१० ऑक्टोबर १९२९—श्री. रा. टिकेकर, केसरीचे बातमीदार (मुंबई)**

कलकत्याच्या 'इंडिया' पत्राच्या चालकांनी 'आशियाभर आमच्यासाठी प्रवास कराल का' म्हणून पृच्छा केली आहे. तरी आपलें व 'हिंदू' चें एक एक सर्टिफिकेट मजजवळ असल्यास बराच कार्यभाग होईल. अशा पत्रांचा उपयोग फार होतो म्हणून तसदी देत आहे. क्षमा करावी.

७२२

**१२ ऑक्टोबर १९२९—भीमराव आंबेडकर, परळ**

महाडच्या चवदार तळ्यासंबंधी चाललेल्या वादासंबंधी जें वाङ्मय मला हवें होतें तें पाठवून दिल्याबद्दल आभारी आहें. तुम्ही समक्ष येऊन सदर प्रकरणांत आमच्या बाजूने साक्ष दिलीत तर मी आपला ऋणी होईन.

७२३

**२३ ऑक्टोबर १९२९—स्वामी सत्यानंद, सत्याग्रह ऑफिस, मुनशीगंज, डाक्का**

पर्वती सत्याग्रहाच्या समेटाचें काम तुम्ही अंगावर घेतलें आहे हें पाहून बरें वाटलें. मी सध्या तेंच काम करीत आहे. डाक्का परिषदेचे तुम्ही अध्यक्ष झाल्यावर एकच महिन्याने मुनशीगंजच्या कालिमंदिरांत नामशूद्रांनी सत्याग्रह सुरू केला. पंधरा दिवसांत आणखी कित्येक देवळांत तो सुरु होईल असें वाटतें. मंदिर-प्रवेशाचा पूर्ण हक्क मान्य झाल्याशिवाय अस्पृश्यांचें समाधान होणार नाही. हा प्रश्न सुटला नाही तरी चालेल; पण तडजोडीमध्ये अर्धवट सुटला असें होऊं नये. हिंदुमहासभेचे तुम्ही अध्यक्ष आहां. प्रत्येक हिंदुमात्राला कोणत्याहि सार्व-

जनिक देवळांत जाण्याचा स्वयंसिद्ध हक्क आहे. या तत्त्वापासून हिंदुसभेच्या प्रमुख कार्यकर्त्यांनी रतिमात्र ढळू नये.

७२४

**२५ ऑक्टोबर १९२९—सी. विजयराघवाचारियर, सालेम**

मंदिर प्रवेशाबाबत सत्याग्रह करणारांना यश मिळेल अशी मी आशा करतो. न्याय व दया बुद्धीने वागण्यास मंदिराच्या ट्रस्टींना तुम्ही तुमच्या वजनाचा उपयोग करून प्रवृत्त करावे. मोक्षाला वर्ण आडवा येत नाही. भक्तीनेंहि मोक्ष मिळतो असें रामानुजाचार्यांचें मत होतें. अतिशूद्रांच्या एका गांवांतहि ते गेले होते. याचें स्मारक म्हणून म्हैसूरजवळील श्रीरंगपट्टमचें देऊळ अस्पृश्यांना वर्षांतून तीन दिवस खुलें असतें. हिंदुमहासभेच्या वर्किंग कमिटीने हिंदूंचा राजकीय व आर्थिक प्रश्न लीग ऑफ नेशन्समार्फत सोडवून घ्यावा अशी खटपट मी करीत आहे. पण त्याला फारसें यश आलें नाही. आणि गंमत ही कीं, मुसलमान व अँग्लो-इंडियन यांनाहि मध्यस्ती पसंत नाही. मद्रासच्या लॉ कॉलेजचे प्रिन्सिपाल आर्थर डेव्हिस यांनी एका लेखांत माझ्याप्रमाणेच मत दिलें आहे.

७२५

**२८ ऑक्टोबर १९२९—एन्. बी. मावळणकर, रणपुरा आगबोटीवरून**

मी तुम्हांस भेटण्यासंबंधी तुमचा निरोप पोंचला आणि इतक्या वर्षांनी तुमची भेट झाल्याने फार आनंदहि झाला असता. पण फार तातडीमुळे आगगाडी पकडावयाची असल्याने तें जमलें नाही. नाहीतर माझा सर्वच पुढील कार्यक्रम फसतो. तुमचा माझा स्नेह फार दाट असल्यामुळे गैरसमज होण्याची मला भीति नाही. पुढल्या वर्षी हिंदुस्थानांत परत येईन तेव्हा एक दिवस तुमच्याकडे राहून आता भेट चुकविल्याचा वचपा काढीन. कॉलेजमध्ये आपणांबरोबर जे सहाध्यायी होते त्या सर्वांपेक्षा सार्वजनिक मोठेपणा व उपयुक्तता इत्यादि गोष्टींत तुम्ही फारच पुढे आघाडी मारलीत.

७२६

**२९ ऑक्टोबर १९२९—बॅ. एम्. आर. जयकर, मुंबई**

शुक्रवारीं व्हाइसरॉय जाहीर पत्रक प्रसिद्ध करणार त्यापूर्वी विचार करण्या-

करिता यावे अशी पं. मोतीलाल नेहरू यांची मला तार आली आहे. नॅशनॅलिस्ट पक्षाची सभा आपण भरवावी अशी अणे यांनीहि तारेने सूचना केली आहे. व्हाइसरायांचें पत्रक काय निघतें हें पाहून आपण स्वतंत्रपणें मत ठरवावे. कॉंग्रेस-वाले अगर स्वातंत्र्यवाले काय म्हणतात तें लक्षांत घेऊं नये. पंडितजी दोन्ही पक्षांतले आहेत म्हणून त्यांच्याच मताबद्दल थोडी पंचाईत!! अणे यांचा विचार मला पसंत आहे. तुम्हाला काय वाटतें.

७२७

### २९ ऑक्टोबर १९२९—आर. आर. काळे, सातारा

तुमचें पत्र पोंचलें. आबासाहेब चाफळकर यांनी बेपर्वाईची वृत्ति स्वीकारली असल्याने डोसाभाई यांनी लवादाचे काम पुढे चालवावयाचें नाही असें ठरविले आहे. तुम्ही सुचविल्याप्रमाणे कोर्ट ऑफ वार्डस्लाच् इस्टेटीची वहिवाट करण्या-करिता अर्ज करणें इतकाच मार्ग उरला. इतर सहभागीदारांनी अर्ज केल्यास कलेक्टर या कामांत लक्ष घालील. दादासाहेब चाफळकर तेथे असल्यास त्यांना वरील हकीकत कळवावी.

७२८

### ८ नोव्हेंबर १९२९—फेन्नर ब्रॉकवे, लंडन

पार्लमेंटरी कमिटीची सभा काल लवकर आटोपली. त्यामुळे मला माझी सूचना मांडता आली नाही. गोलमेज परिषदेला संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींना अवश्य घ्यावे अशी माझी सूचना अगर ठराव मी मांडणार होतो. तथापि वेजवूड बेन यांना भेटतो व त्यांत काय निष्पन्न होतें तें तुम्हाला कळवितो.

७२९

### ९ नोव्हेंबर १९२९—सी. विजयराघवाचारियर, सालेम

गोलमेज परिषदेहून इकडे परत येतांना हिंदुमहासभेच्या प्रतिनिधींनी लीग ऑफ नेशन्सच्या प्रतिनिधींची भेट घ्यावी ही तुमची कल्पना मला पसंत आहे. याच ओघाने आणखीहि पुष्कळ सुचतें. गोलमेज परिषदेंत हिंदुस्थानाला डोमि-नियन स्टेट्स मिळावे या मुद्यावर फार तर एकमत होईल. पण अनेक प्रांतांची पुनर्घटना वरिष्ठ सरकार, व प्रांतीय सरकारांचे संबंध, आणि अल्पसंख्याकांचा दुर्दैवी

प्रश्न यांवर मतभेद मिटणें कठीण आहे. मला वाटतें की हा प्रश्न लीग ऑफ नेशन्सच्या तज्ज्ञांकडे सोंपविण्यास सरकाराला सांगावें. त्यांनी इकडे येऊन आर्थिक वगैरे सर्व परिस्थिति पाहून साक्षीपुरावा घ्यावा आणि अल्पसंख्याकांच्या तसेंच प्रांतीय पुनर्घटनेच्या प्रश्नासंबंधींहि आपला अखेरचा निर्णय सांगावा. हिंदुमहासभेचे प्रतिनिधि मुख्य प्रधानांकडून बोलावले जातील काय ? तसें असल्यास विलायतेस जाऊन हिंदुसभेचें उत्कृष्ट प्रतिनिधित्व करणारी अशीं पांचसहा नावें मला सुचवा. तुम्ही त्यांपैकीं एक म्हणून गेले पाहिजे हो ! अस्पृश्यांना जेथे मंदिर प्रवेश मिळतो असें श्रीरंगपट्टणाजवळ तिरुनारायणापुरम् हें एक मंदिर आहे. परंतु त्या चालीचा उगम अगर व्याप्ति काय आहे याची मी चौकशी करीत आहे, ती माहिती हातीं आल्यावर मग तुम्हांस लिहीन.

७३०

**९ नोव्हेंबर १९२९—विठ्ठलभाई पटेल, मुंबई**

तुमच्या पत्राबद्दल फार आभारी आहे. पुढल्या मंगळवारी मी सरदारगृहांत तुम्हाला भेटेन. माझे बंधु येथेच आहेत. पण तुम्ही येईपर्यंत त्यांचें राहणें होतें की नाहीं याची शंका आहे. कसेहि असो तुम्ही आम्ही मौजेची चर्चा करूं.

७३१

**१३ नोव्हेंबर १९२९—भाई परमानंद, लाहोर**

पंजाबांतील हिंदूंची परिषद येत्या नाताळांत भरवीत आहो. कृपा करून अध्यक्षस्थान स्वीकारावे. (तार)

७३२

**१४ नोव्हेंबर १९२९—मोतिलाल नेहरू, लखनौ**

तुमची तार पोंहोचली. माझे सन्मान्य पाहुणे म्हणून मी तुमचें आनंदाने स्वागत करतो. (तार)

७३३

**१६ नोव्हेंबर १९२९—शा० अमृतलाल काशिनाथ, मांडवी**

तुम्ही आमचा संयुक्त प्रांतांतील साखरेचा कारखाना कांही वर्षांमागे समक्ष

पाहून साखर देशी व शुद्ध आहे याची खात्री करून घेतली, व केसरींतहि त्याबद्दल शिफारस केली. बेलापूरच्या कारखान्यांतील साखरेची विक्रीहि आमच्याकडेच सोंपविली जाण्याचा संभव आहे. कारण हा कारखाना महाराष्ट्रांतील असला तरी स्थानिक गिऱ्हाइकी मिळविण्याची व्हावी तितकी खटपट अद्याप झाली नाही. येथे संयुक्त प्रांतांतील साखरच अजूनहि शेकडा नव्वद टक्के खपते. तरी आमच्या कामांत तुम्ही आम्हांला मदत कराल अशी आशा आहे.

७३४

## २२ नोव्हेंबर १९२९—सर बी. एन. मित्र, दिल्ली

ता. १८ सप्टेंबर रोजीं तुम्ही असेंब्लींत जो प्रश्न विचारला होता त्याबद्दल आम्ही चौकशी केली. इगतपुरीच्या सबपोस्टांत एक मनीऑर्डर ५५ रु. ची पाठविण्याची असतां नजरचुकीने सबपोस्ट मास्तराने ५०० रु. ची मनीऑर्डर पाठविली. पैसे पाठविणारा अगर घेणारा दोहोंकडून रु. ४४५ ची जादा रक्कम वसूल न झाल्या कारणाने पोस्टमास्तराने हे पैसे हप्तेबंदीने भरावे असें पोस्टमास्तराला कळविण्यांत आलें होतें. पोस्टमास्तर जनरल व डायरेक्टरजनरल यांनी याबाबत फेरविचार करून असें ठरविलें आहे कीं, दंडादाखल फक्त त्याजकडून रु. ४५ घेऊन बाकीची रक्कम बुडींत खातीं नांवें लिहावी. सरकारतर्फे मीहि या गोष्टीस संमति दिली आहे.

७३५

## १४ डिसेंबर १९२९—गुणबाशीव प्रभुदेसाई, शिरोडें (गोंवा)

आमचा भट्ट प्रभु ब्राह्मण समाज ज्ञातिविषयक विस्तृत क्षेत्राभावीं कसा हालअपेष्टेंत पडला आहे हें आपणांस आपल्या अध्यक्षतेखाली भरलेल्या कपिलेश्वराच्या ऐक्य—परिषदेपासून ठाऊक आहेच. ‘ रूढी ही पाऊलवाटेसारखी रुंद होत जाते ’ या आपल्या उपदेशाप्रमाणें येथे कोंकणस्थप्रभृति कांही द्राविड ब्राह्मणांनी आमच्याशीं प्रत्यक्ष अन्नादि संबंधाची रूढी ठेवण्यास सुरुवात केली त्याचेंच सुफळ म्हणजे आमच्याशीं प्रत्यक्ष संबंध ठेवणारे शेकडों द्राविड ब्राह्मण अनुकूल झाले असून त्यांचे आमचे सात आठ विवाह देखील झाले. आपण आमचे साहाय्यकर्ते आणि अभिमानी आहांत. सोबतचा मजकूर ( श्रींचें इकडे आगमन न व्हावें म्हणून ) केसरींत प्रसिद्ध झाल्यास बरें होईल.

७३६

**१५ डिसेंबर १९२९—सर मोरोपंत जोशी, उमरावती**

तुम्ही माझ्या पत्राचें उत्तर ताबडतोब तारेने पाठविलें यावरून लो. टिळकांचे चिरंजीव व त्यांचें कुटुंब याबद्दल तुम्हाला किती कळकळीचा जिव्हाळा वाटतो हें व्यक्त: झालें. तुमचें पत्र अकोल्यास बापट यांना पाठवीत आहें, म्हणजे ते श्री. शांताबाई टिळक यांना पहावयास पाठवितील.

७३७

**१८ डिसेंबर १९२९—वऱ्हाड सहकारी संस्था, उमरावती**

वऱ्हाड सहकारी संस्थेमार्फत सहकारी परिषद मेहेकर येथे भरावयाची आहे. त्याची तारीख: तुमच्या सोईप्रमाणे ११–१२ अगर १८–१९ ठरवितों. तरी कृपा करून अध्यक्ष व्हावें.

७३८

**२१ डिसेंबर १९२९—आनंदराव नारायण सुर्वे, उमरखाडी**

असेंब्लीच्या डेप्युटी सेक्रेटरीच्या जागेच्या नेमणुकीकरिता पब्लिक सर्व्हिस कमिशनची जाहिरात आली असून तिच्याकरिता मी अर्ज करणार आहे. तुमचेकडून मला शिफारसपत्र अगर माहितगार (रेफरी) म्हणून तुमचे नांवाचा उपयोग करण्याची परवानगी द्यावी.

७३९

**२१ डिसेंबर १९२९—दिवाण कृष्णम्माचारी, बडोदें**

अलीकडील नवविचार व ऐतिहासिक टीकापद्धतीहि ज्यांना परिचित आहे, अशा कांही शास्त्री लोकांचीं नांवें तुम्ही मला सुचवूं शकाल काय? श्रीमन्महाराजांशीं चर्चा करण्याला असा एखादा शास्त्री मिळाल्यास त्याची तैनातींत नेमणूक करावयाची आहे.

७४०

**२९ डिसेंबर १९२९—संपादक विविधवृत्त, मुंबई**

महात्मा गांधींना तुम्ही (लाहोर कॉंग्रेसमध्ये) जो विरोध केला त्याबद्दल

तुमचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. तुम्ही आपल्या मताचा चिकाटीने आग्रह धरा. सर्व महाराष्ट्राचा तुम्हाला पाठिंबा आहे.

७४२

**५ जानेवारी १९३०—श्रीमंत बाळासाहेब पंत, चीफ ऑफ औंध**

औंध प्रातिनिधिक सभेच्या गेल्या अधिवेशनांत हल्लींची राज्यघटना जास्त लोकमतानुवर्ती व्हावी याबद्दल योजना ठरविण्याबद्दल कमिटी नेमण्याचा ठराव झाला आहे. या कामीं आपल्या अनुभवाचा व ज्ञानाचा फायदा संस्थानास मिळावा अशी आमची फार इच्छा आहे. तरी कमिटीचे सभासद नेमले असतां आपण सदर कमिटीवर काम करूं शकाल अगर कसें हें कळवावें.

७४३

**१० जानेवारी १९३०—श्री. कृ. कोल्हटकर,**

रा. दप्तरींचे शास्त्रीय ग्रंथ लाभाची अपेक्षा न धरतां प्रसिद्ध करणारा एक प्रकाशक सुदैवाने त्यांस मिळाला आहे. 'करणकल्पलते'चा दुसरा भाग प्रसिद्ध करण्याची परवानगी पं. सं. कमिटीने दिल्यास रा. दप्तरी यांची कुचंबणेंतून सुटका केल्याचें श्रेय तुम्हाला मिळणार आहे. माझ्या सांप्रतच्या असाहाय्य स्थितींत मजकडून ग्रंथरचना जरी झाली नाही तरी इतरांच्या ग्रंथरचनेस अगर ग्रंथप्रसिद्धीस मजमुळे विघ्न येऊं नये अशी माझी इच्छा आहे.

७४४

**१२ जानेव ^ १९३०—तारकनाथ दास वीसबादेन (जर्मनी)**

लाहोर कॉंग्रेसमध्ये तुम्ही कौन्सिल बहिष्काराच्या ठरावाला विरोध केला असें समजलें. कौन्सिलच्या पुढल्या निवडणुकी सायमन परिषदेचा रिपोर्ट होऊन व गोलमेज परिषद होऊन गेल्याशिवाय होत नाहीत. राष्ट्रीय पक्षाने या निवडणुकी जिंकून सायमनच्या सूचना लोकांना नापसंत आहेत हें दाखवावें. ईजिप्तमध्ये स्वातंत्र्याच्या मुद्द्यावर (Issue) निवडणुकी जिंकून, बाहेर इतर राष्ट्रांताहि, इजिप्तमधील राष्ट्रीय पक्षाने आपणांला अनुकूल लोकमत केलें. सायमन परिषद किंवा गोलमेज परिषद हिंदुस्थानला डोमीनियन स्टेटस तावडतोब देण्याची सूचना देणार आहे असें थोडेंच आहे !

७४५

## १९ जानेवारी १९३०—तेजबहादुर सप्रू, अलाहाबाद

डोमीनियन स्टेटसची एक कैफियत तयार करून लंडनमध्ये गोलमेज परिषदेपुढे मांडली पाहिजे. सर्वपक्षीय परिषद भरविण्याच्या विनंतिपत्रकावर तुम्ही सही करावी अशी माझी इच्छा आहे. कोणत्याहि पक्षाला प्रामुख्य न देतां अगर दुसऱ्या पक्षांत विलीन होण्यास न सांगतां, किंबहुना प्रत्येक पक्षाचें अस्तित्व व वैशिष्ट्य कायम ठेवूनहि, परिषद भरवावयाची आहे. तरी हें मान्य असल्यास तुम्ही स्वतःतर्फे व तुमच्या पक्षातर्फे मला तसें कळवावें.

७४६

## २८ जानेवारी १९३०—सी. एच्. सेटलवाड, मुंबई

गोलमेज परिषदेंत भाग घेऊं नये, आणि कायदेकौन्सिलवर बहिष्कार घालावा, हे जे दोन ठराव लाहोर काँग्रेसने केले ते फार गैरमुत्सद्दीपणाचे होते असें आम्हा सर्वांना वाटतें. काँग्रेसने पूर्वीचें क्रीड बदलून पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय जाहीर केलें ही धोरणाच्या दृष्टीने मोठीच चूक झाली. पण ती गोष्ट आता होऊन गेल्यामुळे, देशाला योग्य मार्ग दाखविण्याची तुमच्यासारख्या पुढाऱ्यांवर मोठीच जबाबदारी येऊन पडली आहे. याकरिता, डोमीनियन स्टेटसचें ध्येय पत्करून, ज्यांना गोलमेज परिषदेला जावयाचें असेल त्यांनी सर्वपक्षीय परिषद भरवून आपली मागणी एकमुखी करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. सर्वपक्षीय परिषदेला जातीय प्रश्न सोडवितां येईल. पण हे प्रश्न गोलमेज परिषदेला जाण्यापूर्वी हिंदुस्थानांतच सोडविले पाहिजेत. कारण विलायतेंत या प्रश्नांची चर्चा करून आम्ही घोटाळा माजवूं तर ब्रिटिश प्रधानमंडळ आम्हाला साहजिकच हंसेल ! मात्र सर्वपक्षीय परिषदेला येतांना आपलें म्हणणें अमुकच आहे असें पूर्वीच ठरल्याचा आग्रह धरून उपयोग नाही. लिबरलपक्ष किंवा व्यक्तिशः नेमस्त लोक यांनी मुसलमानांच्या मागण्यांबद्दल आपलें कांहीच धोरण जाहीर केलें नसल्यामुळे, त्यांना मोकळ्या मनाने या प्रश्नाची चर्चा करतां येईल. तरी अधिक वेळ न गमावतां हा प्रश्न हातीं घेऊन सर्वपक्षीय परिषद लौकर घडवून आणण्याचें काम तुम्ही मनावर घ्याल अशी आशा आहे.

७४७

### ३० जानेवारी १९३०—चेअरमन रेल्वे यूनियन, शेलारवाडी

इंजिनिअरींग ट्रॅन्सपोर्टिंग इंटर लॉकिंगच्या कामगारांची काल जाहीर सभा झाली. फेब्रुवारीच्या ४ तारखेला निषेध म्हणून संप पुकारावा असा सर्वानुमतें ठराव झाला. यांतून कांही तरी तडजोडीचा मार्ग आपण काढावा अशी विनंति आहे.

( तार )

७४८

### ३१ जानेवारी १९३०—न. चिं. केळकर यांचें चिमणलाल सेटलवाड यांना पत्र

तुमचें पत्र पोंचलें. डॉ. सप्रु यांनीहि मला याबद्दल लिहिलें होतें. सप्रूंची व माझी डॉ. मुंजे व अणे यांची जयकरांच्या खोलींत गांठ पडून भरपूर बोलणें झालें व आमचे विचार ऐकून सप्रूंना समाधान वाटलें. दिल्लीला कांही प्रमुख हिंदु व मुसलमान पुढाऱ्यांची सभा बोलवून मोकळ्या मनाने प्रत्येक मुद्द्याची चर्चा व्हावी असें ठरलें आहे. हिंदु-मुस्लिम प्रश्न सुटला तर एक मोठी गोष्ट निकालांत निघून सर्वपक्षीय परिषदेचें काम बरेंच सुकर होईल.

पण हिंदु–मुस्लिम तडजोड फसली तर मग सर्वपक्षीय परिषद भरविण्यांत स्वारस्यहि नाही. डॉ. सप्रू यांना ही गोष्ट विचारान्तीं मान्य झाली आहे.

डोमीनियन स्टेटसच्या मागणीबद्दल जर सर्व पक्षांनी एकजूट करण्याचा प्रयत्न केला तर स्वातंत्र्याची मागणी व प्रचार अधिक बळकट कालांतराने होईल. कांही संरक्षक बंधनें नेहरू रिपोर्टाने मान्य केली असून त्यावर डॉ. सप्रूंची सही आहे. म्हणून नेहरू रिपोर्टाला धरून जर सर्वपक्षीय परिषदेने डोमीनियन स्टेटसची मागणी केली तर पुष्कळ हित होईल.

मुसलमानांच्या मागणीबद्दल नेमस्तांनी यापूर्वी कधींच कांही म्हटलें नसल्याने ते पूर्वग्रहापासून अलिप्त आहेत, असें तुम्ही म्हणतां. पण त्यांच्या उदासीन निर्विकारी धोरणाचा फारसा उपयोग नाही. हिंदूंनी आणि मुसलमानांनी आपलें म्हणणें काय व आपणांला हवें काय हें स्पष्ट आणि उघड रीतीने सांगितलें आहे. नेमस्तांना जर सद्बुद्धि आहे तर, यांत बरोबर कोण, चूक कोण हें त्यांनी कोणाची भीड मुर्वत न धरतां धैर्याने पुढे येऊन मोकळ्या मनाने सांगण्यास हरकत काय ?

नेमस्तांनी या प्रश्नांत कधी लक्षच घातलें नाही. आणि काय वाटेल ते देऊन हिंदूंनी मुसलमानांशीं सलोखा करावा, असे उद्‌गार कांही नेमस्तांनी काढल्याची बोलवा आहे. मुसलमानांच्या धोरणाविषयी आपलें मत आता तरी स्पष्ट जाहीर करून, या बातम्यांत तथ्यांश किती आहे नाही ही गोष्ट नेमस्तच चांगल्या रीतीने करूं शकतील !

७४९

४ फेब्रुवारी १९३०—सत्यपाल, लाहोर

तुमचें पत्र पोंचलें. लाहोरच्या आरोपींच्या बाबतींत लक्ष घालण्याचे तुम्ही आश्वासन दिलें त्यामुळे आनंद झाला. अगदी साध्या सुखसोयी त्यांना मिळत नाहीत. कायदेपंडिताची देखील सल्ला मिळू शकत नाही ! मला भिती वाटते कीं, अशा स्थितींत ते अन्नसत्याग्रह जाहीर करतील ! जेलचौकशी कमेटीच्या सूचना होममेंबरांनी स्वीकाराव्या याबद्दल तुम्ही खटपट केली तरच ही आपत्ति टळेल.

७५०

८ फेब्रुवारी १९३०—अ. वि. पटवर्धन, पुणें

२५ तारखेला गोलमेज परिषदेस प्रतिनिधि पाठविण्याकरिता पुढाऱ्यांची सभा भरणार आहे. संस्थानी प्रजामंडळाला या सभेचें निमंत्रण डॉ. सप्रू पाठविणार नाहीत अशी भीति वाटते. तरी तुम्ही डॉ. सप्रू यांना सांगून, संस्थानी प्रजेच्या प्रतिनिधींना वरील सभेस येण्याचें निमंत्रण मिळण्याची व्यवस्था कराल अशी आशा आहे. संस्थानी प्रजेलाहि स्वयंनिर्णयाचा हक्क कां नसावा ?

७५१

११ फेब्रुवारी १९३०—वीरनगौडा वीरबसाप्पा पाटील, बेळगांव

राष्ट्रीय पक्षातर्फे मी निवडणुकीला उभा राहिलों आहे. येथील ब्राह्मणेतर चळवळ नामशेष झाली आहे. जातीय चळवळींनी देशाचें फार नुकसान केलें आहे असें मला वाटतें. महाराष्ट्रांत रा. गुंजाळ वगैरेंना पाठिंबा देऊन जसें राष्ट्रीय ब्राह्मणेतरांना तुम्ही पुढे आणलें आहे, त्याचप्रमाणे कर्नाटकांत मला पाठिंबा देऊन मदत कराल अशी आशा आहे.

७५२

२१ फेब्रुवारी १९३०—घनश्याम दास बिर्ला, कलकत्ता

माझा खासगी सेक्रेटरी नोकरी सोडून जात असल्याने मला नवीन मनुष्य नेमण्याची गरज आहे. तरी तुम्ही अगर अणे यांच्या पाहण्यांत एखादा मनुष्य असल्यास कृपा करून सांगा. सदर मनुष्य कष्टाळु, अभ्यासी, सुदृढप्रकृतीचा इंग्रजी चांगलें जाणणारा व सभ्य वृत्तीचा असावा.

७५३

४ मार्च १९३०—वाय. ए. गोडबोले, आय. सी. एस, जनरल मॅनेजर, बनायली राज्य, भागलपूर

येथील कोणी सदाशिवशास्त्री यांच्या पुरस्काराने एक जाहीर सभा भरून ‘करण-कल्पलता’ या ग्रंथाचें हिंदी भाषांतर करावें असा ठराव झाला आहे. त्या भाषांतराकरिता तुमची परवानगी मिळविण्याचें काम माझ्याकडे आलें आहे. बनायली इस्टेटतर्फे हिंदी प्रांतांत या कार्याचा प्रसार करण्याकरिता १००० रुपये मिळाले असून शक्य तर येथे आणखीहि देणग्या मिळवितां येतील.

७५४

६ मार्च १९३०—बिपिनचंद्रपाल, कलकत्ता

‘फ्रीडम आणि फेलोशिप’ या वर्तमानपत्राचें संपादकत्व हल्ली मी स्वीकारलें आहे. त्याची एक प्रत अवलोकनार्थ पाठविली आहे. त्या पत्रांत भारतीय संस्कृतीवर अधिक भर द्यावा असा माझा हेतु आहे. तुमचेंहि आयुष्यांतील उच्चतम ध्येय केवळ राजकीय नसून जास्त व्यापक, म्हणजे सांस्कृतिकच, असेल असें मला वाटतें. तरी मराठी वाङ्मयासंबंधी कांही लेख मला पाठवाल काय ?

७५५

१९ मार्च १९३०—एस. ए. डांगे, मिरत जेल

तुमचें पत्र मिळालें. आम्हां आरोपींचे वकील मि. सिंह हे उद्या दिल्लीहून पुढे जातील. त्यांच्याबरोबर तुम्ही पाठविलेले असेंब्लीच्या ग्रंथ–संग्रहांतील रिपोर्ट परत पाठवीत आहे. जेल रिपोर्टाबरोबर मुंबईच्या जेल मॅन्यूअलची प्रतहि पाठवा. कारण सध्या तिकडे असलेले इन्स्पेक्टर जनरल ऑफ प्रिझन्स यांची साक्ष व्हावयाची आहे.

७५६

२३ मार्च १९३०—तेजबहादुर सप्रू, अलाहाबाद

दिल्लीस ता. २६, २७ व २८ रोजीं जी अनौपचारिक परिषद भरविण्यांत आली तिच्या पुढील बैठकी ६ एप्रिलनंतर मुंबईस भरणार आहेत, असें कमिटीचे अध्यक्ष सर ए. पी. पेट्रो यांच्याकडून समजतें. ज्या अगत्याने तुम्ही कमिटीला आपली मदत दिली त्याच भावनेने तुम्ही यापुढे कमिटीला मदत कराल अशी आशा आहे.

७५७

२९ मार्च १९३०—सोमण, बुलढाणा

मालवीय व अणे यांच्याकडून पुढील आशयाची तार आली आहे. 'ऑफीशियल सभासदांना मत देता येते किंवा नाही, याबद्दल point of order मागण्यांत आला आहे.' अध्यक्षांनी अद्याप आपला निर्णय दिला नाही. तरी आता मतें कशी घ्यावयाची याबद्दल मोठीच काळजी उत्पन्न होऊन आणिबाणीची वेळ आली आहे. एक सभासद जरी गैरहजर राहिला तरी तेवढ्यानेहि पारडें फिरेल. तुमचें उत्तर तारेने ताबडतोब कळवा. ( तार )

७५८

२९ मार्च १९३०—दांडे ( ? ), बुलढाणा

कृपा करून निदान परिषदेंत अध्यक्षिय भाषण करावें आणि उद्याच्या मेलने शेगांव मार्गें ताबडतोब दिल्लीस रवाना व्हावें. (त र)

७५९

२९ मार्च १९३०—गुंडप्पा, अध्यक्ष, स्वागत कमिटी, नवी दिल्ली

कृपा करून बंगलोरच्या संस्थान प्रजापरिषदेचें अध्यक्षस्थान स्वीकारावे अशी विनंति आहे. परिषदेच्या तारखा एप्रिलच्या तिसऱ्या अगर चौथ्या आठवड्यांत तुमच्या सवडीनुसार ठरवूं. नकार मात्र देऊं नये. ( तार )

७६०

३१ मार्च १९३०—बी. शिवराव अड्यार, मद्रास

हिंदुस्थानाला पूर्ण डोमीनियन स्टेटस मिळण्याकरिता ' कॉमनवेल्थ ऑफ

इंडिया लीग'ने लेबर पक्षाची सहानुभूति मिळवून विलायतेंत फार चांगली कामगिरी चालविली आहे. या प्रयत्नाला निरनिराळ्या पक्षांकडून नैतिक व आर्थिक पाठबळ मिळणें अवश्य आहे. तरी तुमचें नांव व संमती या दोहोंचा फायदा या कामाला मिळावा.

७६१

**२ एप्रिल १९३०—चंद्रोजीराव आंग्रे, उज्जैन**

इकडून मुद्दाम श्री. आचार्य मास्तर यांस पाठविलें आहे. इकडे उत्सवाची सर्व तयारी उत्साहाने चालू आहे. आणि इकडील जनताहि त्यासाठी किती उत्सुक आहे, हें रा. आचार्य आपणांस सांगतीलच. तथापि हें सर्व आपल्या आगमनाने सफल होणारें असल्यामुळे, मुद्दाम विनंतिपत्र देऊन मास्तर यांस पाठवीत आहें. तरी केव्हा येणार ते कळल्यास तजवीज करतां येईल.

७६२

**९ एप्रिल १९३०—दत्तात्रय व्यंकटेश पै, चिटणीस, साहित्य संमेलन, गोवा**

आपण असेंब्लीच्या सभासदत्वाचा राजीनामा दिल्याचें केसरी व ज्ञानप्रकाश यांत वाचलें. आपण व्हाइसरॉयसाहेबांस लिहिलेल्या पत्रांत "चालू कायदेभंगाच्या चळवळींत कदाचित् समाविष्ट झाल्यास मला सिमला येथील बैठकीस हजर राहतां येणार नाही." असें वाक्य वाचलें. कायदेभंगाच्या चळवळीचा संमेलनावर कसा काय परिणाम होईल याची धाकधुक आम्हांस तेव्हापासून लागून राहिली असून आता ती वाढूं लागली आहे. कारण महाराष्ट्रांतील राजकारणी तेच पुढारी आणि तेच वाङ्मयसेवक असा प्रकार असल्याने, अशा गृहस्थांनी आपणांस सत्याग्रहांत समाविष्ट करून घेतलें म्हणजे अर्थातच: पुढे संमेलनाच्या अधिवेशनाला हजर राहूं शकणें न शकणें त्यांच्या हातीं राहणार नाही. गोमांतकाशीं ज्यांचा ऋणानुबंधाचा संबंध आल्यामुळे ज्यांच्याविषयी गोमतकीयांना आपलेपणा वाटत आहे, त्या महाराष्ट्रीयांत आपलें स्थान पहिलें आहे हें आपणांस लिहिण्याचें मुळीच कारण नाही. बृहन्महाराष्ट्रांतून कितीहि विद्वान् आणि मान्य साहित्यसेवक संमेलनास हजर राहिले, आणि त्यांनी संमेलनाविषयी कसेहि बरेवाईट उद्गार काढले, तरी त्यामुळे म्हणण्यासारखें सुख :ख होणार नाही. पण आपण संमेलनास आलां

नाहीत तर मात्र आम्ही इतका काळ सोसलेली दगदग आणि काढलेले त्रास हे व्यर्थ पाण्यांत गेले असें आम्हांस तर वाटेलच; पण इतरांसहि संमेलन अगदी ओकें ओकें वाटल्याशिवाय राहणार नाही याची आपण खात्री बाळगावी. आपली राजकारणविषयक जबाबदारी आम्ही पूर्ण जाणून आहों. पण तिचा परिणाम संमेलनास आपलें आगमन होण्यावर घडून येणार आहे अशी आमची खात्री आहे.

७६३

११ एप्रिल १९३०—म. गांधी, जलालपूर

तुम्ही कौन्सिलचा राजीनामा देण्याचें ठरविलें, अशी तार वाचून कल्पनातीत आनंद झाला. तरी तुम्ही आता सत्याग्रहांत पडावें. तुमची प्रकृति कशी काय आहे हेंहि कळवावें. माझ्या हालचालींबद्दल प्रसिद्ध होणाऱ्या बातम्या अतिशयोक्तीच्या असतात. आजची सभा येथून सात मैलांवर भरविली. (तार)

७६४

१२ एप्रिल १९३०—शंकरराव देव, मुंबई

तुम्ही कायदेभंगांत भाग घेण्याचें ठरविलें याबद्दल आनंद झाला. महाराष्ट्र कायदेभंग कमिटीतर्फे या बाबतीत आमच्याकडून तुम्हाला पूर्ण सहकार्य मिळेल. (तार)

७६५

१५ एप्रिल १९३०—बी. जी. खेर, सॉलिसिटर, विलेपार्लें

तुमचें पत्र पोंचलें. कागदपत्र तुम्हाकडे यापूर्वीच सही करण्याकरिता पाठविले असतील. येथील कँपमध्ये मी तारीख पांचपासून येऊन राहिलों आहें. सत्याग्रहाच्या मोहीमेंत भाग घेत आहां हें पाहून फार आनंद झाला. तुम्ही आणि भोपटकर आमच्या तुकडींत येऊं शकल्यास येथील कामाची व्यवस्था तुमच्या नजरेस येईल व लोकांनाहि मोठा उत्साह वाटेल.

७६६

२६ एप्रिल १९३०—विठ्ठलभाई पटेल, सिमला

आज माझ्या असेंब्लींतील जागेचा मी राजीनामा दिला आहे. सिमल्याहून येत्या रविवारीं निघेन. (तार)

७६७

**२२ मे १९३०—डी. डब्ल्यू. कठाळे, ॲडव्होकेट, नागपूर**

सोबत हिंदु कायद्यासंबंधी मी सुचविलेल्या १२७ दुरुस्त्यांचीं छापील कात्रणें पाठवीत आहें. संपूर्ण बिल लौकरच तयार करीन. एखाद्या युनिव्हर्सिटीतर्फे हिंदु कायद्याच्या सुधारणेबाबत माझीं कांही व्याख्यानें घडवून आणतां येणार नाहीत काय ?

७६८

**२ जून १९३०—ए. रंगस्वामी आय्यंगार, संपादक, हिंदु, मद्रास**

मुंबईला वर्तमानपत्रांच्या संपादकांची परिषद भरली. तेथे तुमची गांठ पडली नाही. तथापि परिषदेच्या ठरावांना तुमची संमति असेल. व्हाइसरॉयसाहेब व सरकारतर्फे मि. हेग यांनी पांच-सहा जणांच्या शिष्टमंडळाची भेट घेऊन चर्चा करण्याचें योजिलें आहे. शिष्टमंडळांत तुम्ही येऊं शकाल तर फार आभारी होईन.

७६९

**८ जून १९३०—विट्ठल विश्वंभर गांवकर, बोरी ( शिरोडा )**

शिरोळकर स्वामींची स्वारी श्रीशंकराचार्यांच्या मूर्तीच्या प्रतिष्ठापनेसाठी गोमांतकांत आली होती. ज्येष्ठ शु॥ पंचमीच्या दिवशीं प्रतिष्ठा झाली. दशमीच्या दिवशीं भट्टप्रभु प्रकरणाचा अनुकूल निकाल जाहीर करण्यांत आला व लगेच तीनशें साडेतीनशें ब्राह्मणांचें सहभोजन झालें. भ. प्र. ऐक्य परिषद झाल्या-पासून विरुद्ध पक्षाकडून फार त्रास झाला; परंतु त्यांतून धिमेपणाने वाट काढून अनुकूल पक्षाने सहभोजनें व सहासात विवाह घडवून आणले. येवढ्या थोड्या काळांत मिटलेलें जातिप्रकरण म्हणून इतिहासांत या निकालाला महत्त्व आहेच; पण त्याहीपेक्षा तें शिरोळकर स्वामींच्या कारकीर्दींत मिटलें म्हणून त्याला फार महत्त्व आहे. भट्टप्रभु समाजाने दरमहा तीस रुपये देऊन श्रीशांकर-विद्यालय व श्रीपूजा चालविण्याचें कबूल केलें आहे. आपण परिषदेच्या वेळीं भाकीत केल्याप्रमाणे पांच वर्षांपूर्वीचें हें प्रकरण मिटून आनंद झाला. हें सगळें आपल्या सारख्यांच्या कृपेचें व आशीर्वादाचें फळ आहे. परिषदेची मुहूर्तमेढ आपणासारख्या

थोर व वंदनीय पुरुषाकडून रोविली गेली याबद्दल भट्टप्रभु समाज आपणांशीं सदैव कृतज्ञ आहे.

७७०

## ९ जून १९३०— ए. रंगस्वामी आय्यंगार, मद्रास

मुंबईच्या संपादक परिषदेने ऑर्डिनन्सबाबत व्हाइसरॉयांकडे योग्य वाटल्यास शिष्टमंडळ पाठविण्याचा अधिकार कमिटीकडे सोंपविला. ऑर्डिनन्सच्या अंमलबजावणीमुळे वर्तमानपत्रांच्या संपादकांना किती अडचणी येतात, हें मी व्हाइसरॉयसाहेबांना बोललों व त्यांनीहि यासंबंधाने आपण शिष्टमंडळाशीं बोलूं असें आश्वासन दिले आहे. केवळ शिष्टमंडळ जाऊन आल्याने ऑर्डिनन्स रद्द होण्याची आशा नाही हें खरें; तथापि आपण आपलें म्हणणें पुढे मांडण्याचें कर्तव्य केल्यावर दडपशाहीबद्दल सरकारच्या डोक्यावर जबाबदारी टाकतां येईल ! डेप्युटेशन फक्त प्रेस ऑर्डिनन्ससंबंधाने बोलणार; इतर राजकीय बाबींसंबंधाने शिष्टमंडळ चर्चा करणार नाही, असा माझ्या लिहिण्यामुळे तुमचा गैरसमज झालेला दिसतो. पण तसें कांहीएक नाही.

७७१

## ९ जून १९३०—सी. विजयराघवाचारीयर, कोडायकनाल

सर्व पक्षांना मान्य होतील अशा राजकीय सुधारणांबद्दल तुम्ही जे विचार प्रकट केले ते वाचले. या वेळीं हिंदुसभेची बैठक न भरवितां आली तरी निदान वर्किंग कमिटीची सभा तरी ताबडतोब बोलाविली पाहिजे. कारण, गोलमेज परिषद भरत असतां हिंदुसभेने अगदीच कांहीं न बोलणें हेंहि धोक्याचें आहे. गोलमेज परिषद हिंदुस्थानांतच भरवावी असें मला वाटते. महात्माजींना भेटून तुम्ही ही गोष्ट त्यांच्या मनावर बिंबवूं शकाल काय ?

७७२

## ९ जून १९३०—वालचंद हिराचंद, मुंबई

तुमचें पत्र पोंचलें. अणे (सोलापूर) कमिटीवर येऊं शकले ही फार चांगली गोष्ट झाली. पण कमिटीवर चौघांपेक्षा अधिक लोक असूं नयेत अशी माझी इच्छा आहे. भुलाभाई मुंबईस येऊं शकत नसल्याने मी आज रात्रीं त्यांना भेटण्याकरिता

अहमदाबादेस जात आहे. आल्यावर तुम्हांला कळवीन. मार्शल लॉची मुदत आणखी वाढविली आहे! ती कां व किती दिवस कांहीच कळत नाही.

७७३

**१४ जून १९३०—भुलाभाई देसाई, मुंबई**

तुमचें २६ मेचें पत्र पोंचलें. सोलापूरचा मार्शल लॉ संपल्यावर काम करण्यास जी चौकशी कमिटी नेमली आहे त्यांत सभासद म्हणून मी आनंदाने काम करीन. कमिटीचे इतर सभासद व तारखा मला सविस्तर कळवा.

७७४

**१६ जून १९३०—एम्. विंटरनित्झ, प्राग (जर्मनी)**

तुमचें 'फ्रेझर्स अँड प्रिव्हिलेजेस' हें पुस्तक पोंचलें, त्याबद्दल मी फार आभारी आहे. त्यांतील पुष्कळ लेख मी मोठ्या आवडीने वाचले. या पुस्तकांत मॅक्समुल्लर यांचा मृत्युलेख आला आहे. मॅक्समुल्लर हे माझे जुने मित्र असून ऑक्सफोर्डला आम्ही दहा वर्षे एकत्र काढली. सायणभाष्यासहित ऋग्वेदाची दुसरी आवृत्ति काढण्याच्या वेळी त्यांचा मी साहाय्यक होतों. तुमची मुलगी येथे शिकण्याला आली आहे तिच्या अभ्यासाकडे मी आनंदाने लक्ष देईन. मागे हिंदुस्थानांत मी एकच वर्ष राहिलो त्या वेळीं, अनेक हिंदी मित्रांनी माझ्याबद्दल इतकी ममता दाखविली की, प्रत्युपकार या नात्याने येथे येणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांना मदत करणें हें मी माझें कर्तव्यच समजतों.

७७५

**२६ जून १९३०—सी. विजयराघवाचॉरीयर, कोडायकनाल**

तुम्हाला पत्र लिहून टाकल्यानंतर मी त्याच दिवशीं गांधीजींना पत्र तुरुंगांत पाठविलें. त्यांना आपणांशीं चर्चा करावयाची आहे किंवा नाही ही गोष्ट तुम्ही अगोदर अजमावलेली बरी. गोलमेज परिषद भरणार या निमित्ताने सरकार काँग्रेसशीं तडजोडीची बोलणीं करण्यास तयार नसेल तर आपल्या या खटपटीचा कांही उपयोग होणार नाही असें मला वाटतें! काँग्रेस गोलमेज परिषदेंत भाग घेण्यास तयार असेल तर मला वाटतें ती परिषद हिंदुस्थानांत भरविल्यास अधिक चांगलें होईल.

७७६

## २७ जून १९३०—एल्. जी. क्रेसवेल, पुणें

'इंडियन डेलीमेल'मध्ये माझें जें पत्र प्रसिद्ध झालें त्याबद्दल ता. १५ च्या केसरींतील संपादकीय मजकुरांत तुम्ही त्याचा उल्लेख केला होता असें मला कांही मित्रांकडून कळलें. ज्या थोड्या इंग्रज लोकांना तुम्हा लोकांच्या राजकीय आकांक्षा कळतात त्यांना साहजिकच आपल्या जातभाईतून बाजूस पडावें लागतें. आणि सत्याची कांस धरूं कीं जातीचा अभिमान धरूं अशी त्यांच्यापुढे अडचण उभी राहते. मी आज तीस वर्षे हिंदुस्थानचा रहिवासी आहे. तुमची कधीतरी गाठ पडून बोलण्याचा सुयोग येईल. तुमच्याप्रमाणे मीहि हिंदुस्थानचा मित्रच आहे.

७७७

## ३ ऑगस्ट १९३०—श्रीनिवासराव कौजलगी, विजापूर

केसरीनें जो तीन लाखांचा ट्रस्ट केला त्याबद्दल तुमचें अभिनंदन करितों. त्याचा उपयोग तिन्ही प्रांतांना राजकीय कामाकरितां फार चांगला होईल. तुमच्या इच्छेप्रमाणे कर्नाटकातर्फे मी बोर्डावर आनंदानें काम करीन.

७७८

## ३ ऑगस्ट १९३०—रा. द. पंत पराडकर

कालच्या केसरीत राष्ट्रकार्याकरितां केसरीनें दिलेली तीन लक्षांची देणगी जाहीर झाल्याचें वाचून आनंद तर झालाच. पण त्यापेक्षाहि आपल्या टिळकनिष्ठे-बद्दल विशेष आदर वाटतो.

"आनृण्य न जोडावें तरि आम्ही अर्थ जोडिला काय" अशीच सज्जनांची भावना असते; व ही भावना आपण आपल्या आदर्श पुरुषाच्या बाबतींत व्यक्त केली हें विशेष अभिनंदनीय आहे. केसरी-मराठा हीं केवळ वर्तमानपत्रें नसून सर्वांगीण राष्ट्रकार्याला चालना देणारी संस्था आहे असें कै. लोकमान्यांनी लोकांना वाटाव-यास लावलें; व आपण उभयतांनीहि लोकांची ती भावना मूर्त स्वरूपांत आणली याबद्दल मी आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करितों.

७७९

**५ ऑगस्ट १९३०—भास्कर बहिरो महाबळ, जमखंडी**

गेल्या केसरींत आपण जी नवीन तीन लक्ष रुपयांची देणगी जाहीर केली आहे त्याबद्दल मी आपलें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करतों. खरोखर लोकमान्यांची परंपरा आपण शक्य त्या प्रकारें चालविली आहे. केसरी म्हणजे महाराष्ट्राची अभिमानाची संस्था. त्या संस्थेचें धुरीणत्व आपण घेतल्यापासून त्या संस्थेची भर-भराटच होत आहे, हें पाहून कोणा महाराष्ट्रीयाला आनंद वाटणार नाही ? मध्यंतरीं केसरीवर अनेक संकटें आली. पण त्या सर्व प्रसंगांतून आपण धीटपणें आपलें धोरण न सोडतां केसरीस निभावून नेलें याबद्दल महाराष्ट्र आपला ऋणी आहे. आपण म्हटल्याप्रमाणे हा लोकमान्यांच्या आशीर्वादाचा प्रभाव होय यांत संशय नाही.

७८०

**६ ऑगस्ट १९३०—पां. वा. काणे, मुंबई**

राष्ट्रीय चळवळीसाठी केसरी–मराठा संस्थेने तीन लाखांचा ट्रस्ट करून योजना प्रसिद्ध केली त्यामुळे अत्यंत आनंद वाटला. लोकमान्याना त्यांच्या अनुयायांनी फुल ना फुलाची पाकळी म्हणून पर्स फंड नजर केला, त्याची परतफेड फार उत्तम रीतीने केली. लोकमान्यांचें स्मारक करण्याच्या योजना १९२०–२१ सालीं येथे चालल्या असतांना, अशा प्रकारें चळवळ करण्यासाठी स्मारक फंडाचा उपयोग करावा, किंवा पोलिटिकल संस्था काढून त्यांत राजकीय चळवळीत पडणाऱ्या लोकांना तयार करण्याकरिता एक संस्था काढावी, अशी सूचना मी डॉ. भडकमकर वगैरे मंडळींपुढे ठेवली होती. आपण अशा रीतीने ट्रस्ट निर्माण करून त्यांपैकी एक पुरी केली ही गोष्ट अभिमानास्पद झाली. केसरी-मराठा संस्थेच्या प्रच्छन्न आणि उघड शत्रूंनी अनेक प्रकारच्या कुत्सित कल्पना संस्थेविषयी प्रसृत करण्याचा प्रयत्न कित्येक वर्षें सारखा चालविला आहे. तिकडे आपण लक्ष न देतां, संस्थेचा कारभार उत्तम रीतीने पाहून, दहा वर्षांत आपण इतकी रक्कम शिल्लक टाकून त्याचा ट्रस्ट करूं शकला, हीच गोष्ट आपल्या उत्तम व्यवहारदक्षतेची व सरळ व्यवहाराची साक्ष सर्वांस पटवील. पुढील वर्षी केसरी-मराठा संस्थेस ५० वर्षें होतात त्यानिमित्त इंग्रजी व मराठी असे दोन व्हाल्युम्स काढून आपण केसरी-मराठा संस्थेची काम-गिरी कायम स्वरूपांत लोकांपुढे ठेवाल अशी आशा आहे.

### ७८१

### ८ ऑगस्ट १९३०—श्री. मो. साने, लखनौ

ट्रस्टडीडची प्रत पोंचली. केसरींतहि तीन लाखांच्या ट्रस्टची योजना वाचून मनाला अत्यंत आनंद व समाधान वाटलें. इतकीं वर्षें या गोष्टीबद्दल तुम्ही माझ्यापाशीं कांहींच बोलला नाहीं. माझ्या मनांत असें कांहीं तरी व्हावें अशी कल्पना होती. पण तीच कल्पना तुमच्या मनांतहि असेल, आणि ही कल्पना शक्यतेच्या कोटींत उतरेल, असें मात्र मला कधी वाटलें नव्हतें. टिळकांचें ऋण परत करण्याच्या केवळ नैतिक बंधनाखेरीज दुसरी आवश्यकता नसतां, तुम्ही ती रकम परत केली याबद्दल तुमचें व बाबांचें मी मनःपूर्वक अभिनंदन करितों. या सत्कृत्याने तुमची महाराष्ट्रांतील लोकप्रियता अधिकच स्थिर होईल, व तुमच्या शत्रूंच्या टीकांना चोख उत्तर मिळेल.

### ७८२

### १० ऑगस्ट १९३०—बॅ. एस्. सत्यमूर्ति, मद्रास

केसरीच्या ट्रस्ट-फंडांतून केसरीतर्फे तुम्ही जो नवीन पर्स-फंड ट्रस्ट केला त्याबद्दल अभिनंदन करितो. या उत्कृष्ट कामगिरीबद्दल माझे त्रिवार धन्यवाद आहेत.

### ७८३

### १३ ऑगस्ट १९३०—गिरधारीलाल, दिवाणभवन, दिल्ली

ट्रस्टफंडाची प्रत व रिपोर्ट पोचला. त्याबद्दल आभारी आहे. दोन्ही कागद मी काळजीपूर्वक वाचले. लोकमान्यांची स्मृति चिरकाल टिकविण्याकरिता व्यवहारकुशलतेने सर्व गोष्टी करून ही उत्कृष्ट योजना तुम्ही केली याबद्दल तुमचें अभिनंदन करावेसें वाटतें. मूळ मुद्दलाला हात न लावतां प्रचारकार्याचा खर्च व्याजाच्या रकमेंतून परस्पर निभवावा ही योजना मला विशेष आवडली. अशा रीतींने चिकाटी व दक्षता ठेवून इतर लोकहि सार्वजनिक ट्रस्टचा व्यवहार करतील तर देशाचें कोटकल्याण होईल !

### ७८४

### १४ ऑगस्ट १९३०—लक्ष्मणराव किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी

आपण जें ट्रस्टडीड पाहण्यास पाठविलें तें पोंचलें. सदरहू ट्रस्टची माहिती

केसरी व मराठा यावरून झालेली होती. आपण या रकमेचा विनियोग याप्रमाणे राष्ट्रकार्याकडे केला ही फारच आनंदाची व अभिमानाची गोष्ट झालेली असून, सदर योजना माझ्या मतें छानदार झाली आहे. या रकमेचा राष्ट्रकार्याला अतोनात उपयोग होईल यांत संशय नाही.

७८५

**१५ ऑगस्ट १९३०—दत्तो अप्पाजी तुळजापूरकर, मुंबई**

केसरी-मराठा संस्थेने केलेल्या तीन लाखांच्या ट्रस्टची प्रत नुकतीच हातीं आली. ही जी उत्कृष्ट गोष्ट तुम्ही केली याबद्दल मला अत्यंत आनंद व कौतुक वाटते. तुम्हांला याबद्दल जितके धन्यवाद द्यावेत तितके थोडेच आहेत.

७८६

**१५ ऑगस्ट १९३०—आर. एस्. हुकेरीकर, प्रां. कॉं. कमिटी, धारवाड**

विधायक राजकीय कामाकरिता तुम्ही केसरीतर्फे जो ट्रस्ट केला त्याबद्दल कर्नाटक प्रांतिक कमिटीतर्फे तुमचें अंतःकरणपूर्वक अभिनंदन करितों. या गोष्टीने लोकमान्यांची उदात्त परंपरा तुम्ही चालविली आहे यांत शंका नाही. ज्याकरिता हा ट्रस्ट केला तें कार्य अंगावर घेऊन आमची प्रांतिक कमिटी त्याचा जरूर उपयोग करील.

७८७

**१५ ऑगस्ट १९३०—श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, हिराबाग, मिरज**

परवाच्या केसरींत ट्रस्टडीड वाचलें. किती आनंद वाटला, लिहितां येत नाही. केसरी या नांवाला शोभतो. याच्यापेक्षा जास्ती कांहीं लिहित नाही. आपद्धर्म हा आपत्तीपुरताच असतो. आपत्ती संपतांच पूर्वस्थळावर यावें लागतें. त्याचप्रमाणे केसरीने, केसरीकारांची आपत्ति संपतांच, केसरी या नांवाला शोभेल असेंच करून सर्व रुपये परत केले. ही खरी देशसेवा. शारदा नाटकांत कोदंडाला आपलें हित झाल्यावर राहिलेल्या वेळांत हितोपदेश करावा त्याप्रमाणे केसरीकारांनी आपली तुंबडी भरून उपदेश केला नाही! हें केसरीचें सौजन्य वर्णन करावें तेवढें थोडेंच आहे, व ते माझ्यासारख्याच्या हातून पुरेंहि होणार नाही. केसरी या नांवाप्रमाणे पाहिलें तर ते वनराजच आहेत.

पण सुभाषितांत म्हटल्याप्रमाणे

वनेपि सिंहाः मृगमांस भक्षकाः ॥
बुभुक्षिता अपि नैव तृणे चरन्ति ॥
एवं कुलीना व्यसनाभिभूताः ॥
न नीचकर्माणि समाचरन्ति ॥

याच न्यायाने आपत्ति संपतांच जो सिंहपणा केसरीने दाखविला त्याचें कौतुक करावें तेवढें थोडेंच ! मात्र केसरीकारांनी दुसऱ्यावर फार आपत्ति आणली आहे. त्यांच्या पोटांत दुखूं लागेल. त्यांनी लाखो कोट्यवधि फंड जमविले त्याची वाट काय ? असें वाटून ती मंडळी मात्र खळबळतील !

७८८

१६ ऑगस्ट १९३०—चंद्रिका पोसदा (?) गंडेरताल, काश्मीर

केसरींत जी ट्रस्टयोजना प्रसिद्ध झाली तिची योजना व उद्दिष्टः ही इतकीं प्रशंसनीय आहेत कीं, तुमचें उदाहरण पाहूनः हिंदुस्थानांत इतरांनीहि असेंच ट्रस्ट निर्माण करावें. ट्रस्टची प्रत पाठविल्याबद्दल आभारी आहे.

७८९

१६ ऑगस्ट १९३०—यशवंत सूर्यराव सरदेसाई, गोवा

केसरी-मराठा ट्रस्टने सार्वजनिक कार्याकरिता तीन लाखांचा ट्रस्ट करून ठेविला, ही हकीगत वाचून संस्थेविषयी आदरांत भर पडेलच. पण ज्यांच्या परिश्रमामुळे व सदिच्छेमुळे हें सत्कार्य सिद्ध झालें त्या आपण व रा. विद्वांस यांजबद्दल प्रत्येक महाराष्ट्रीयांस आनंद वाटेल यांत शंका नाही. लोकमान्यांच्या कारागृहवासाच्या वेळच्या बिकटच्या परिस्थितींत केसरी संस्था टिकवून धरण्यांत जी कुशलता व व्यवहारज्ञता आपण दाखविली, तिचा कळस या दातृत्वामुळे झाला आहे ! महाराष्ट्रांतील सार्वजनिक कार्याचे चाहते या आपल्या योजनेबद्दल सदैव उपकृत असतील यांत शंका नाही. याबरोबरच एक गोष्ट विचारावयाची आहे आणि ती ही की, महाराष्ट्राच्या कार्यक्षेत्रांत गोमांतक प्रांताचा समावेश होणें शक्य आहे काय ? व तसा तो झाल्यास कार्याची रूपरेखा काय याची माहिती द्यावी.

७९०

**१२ ऑगस्ट १९३०—निरंजन पाल, हॉटेल, मेनस्ट्रीट, कँप पुणें**

तुम्हांला हें पत्र लिहितांना मला अतिशय लाज वाटते. पण अत्यंत जरूरीमुळे मी हें लिहीत आहे. माझे वडील श्रीयुत बिपिनचंद्रपाल हे कलकत्त्यास फार आजारी आहेत. हिंदुस्थानांत मी इतक्या वर्षांनी आल्यानंतर वेळींच त्यांच्या भेटीस न गेलों तर उपयोग काय ? तरी माझी तात्पुरती अडचण निभावण्याकरिता जर तुम्ही मला एक हजार रुपये देऊं शकला तर मला मंडळींसह कलकत्त्यास जातां येईल. या रकमेच्या जामिनकीबद्दल कांही सिनेमाचीं कथानकें आणि एक दोन चित्रपट, कांहीं करार (?) याखेरीज मजजवळ कांही एक नाही. शेवटचा उपाय म्हणून मी तुमच्याकडे आलों आहे. तरी तुम्ही मला मदत कराल अशी आशा आहे.

७९१

**२९ ऑगस्ट १९३०—विरुमल, अध्यक्ष, हिंदुसभा, सक्कर**

सक्करला हिंदु-मुसलमानांत दंगा झाल्यामुळे हिंदूंवर मोठी आपत्ति आली आहे. चाळीस हिंदूंचे खून करण्यांत येऊन नव्वद हजार किंवा लाख रकमेची मिळकत मुसलमानांनी लुटून नेली ! घरादारांना आगी लावण्यांत आल्या. सरकारने परवानगी दिली आहे असें सांगून ही हत्या आणि लूटमार दिवसा ढवळ्या चालली होती. गुन्हेगारांना पकडण्याकरिता अद्याप कांहींहि तजवीज झाली नाही ! ! सिंधमधल्या हिंदूंचें जीवित आधीच असुरक्षित. अशा स्थितींत या गोष्टी घडल्याने येथील हिंदूंचें धाबेंच दणाणून गेलें आहे. हिंदूंचे सर्व पुढारी तुरुंगांत आहेत. आणि कोणीहि,मुसलमान पोलीसाने देखील,हिंदूंना हवेंतसें वागवावें अशी स्थिति आहे. आमची सिंध हिंदु प्रांतिक सभा याविषयीं रिपोर्ट प्रसिद्ध करणार आहे. सक्करमधील हिंदु पंचायतींचे मुख्य मुखी विछलदास यांचा नुकताच खून करण्यांत आला. प्रि. शहाणी लालचंद, भोजसिंग पहेलजानी अित्यादि असेंब्लीच्या सभासदांनी सरकारी अधिकारांच्या भेटी घेऊन पुनः शांतता निर्माण करण्याचा यत्न केला. पण आम्ही असें योजिलें आहे कीं, सिंधमधील हिंदूंच्या अंगीं धीर येऊन त्यांनी संघटण करावें, आणि आपल्या संरक्षणाकरिता उपाययोजना करावी, यासाठी प्रांतिक हिंदुसभेचें येत्या नाताळांत अधिवेशन भरवावें. सिंध हैद्राबाद येथे १९२६, १९२७, व

१९२८ सालीं जीं अधिवेशनें भरलीं त्यांचे जयकर, लाला लजपतराय व डॉ. मुंजे यांनी अध्यक्षस्थान स्वीकारिलें होतें. येत्या अधिवेशनाचें अध्यक्षपद तुम्ही स्वीका-रून येथील हिंदूंना स्फूर्ति व धीर द्यावा अशी विनंति आहे. तुम्ही आम्हाला निराश करणार नाही अशी आशा आहे.

७९२

**१६ सप्टेंबर १९३०—एम्. सी. मित्र, कलकत्ता**

तडजोडीच्या वाटाघाटी फसल्यामुळे पुढे काय करावयाचें हें आता एकत्र बसून ठरविलें पाहिजे. राज्यघटनेच्या प्रस्तुत वादांत सन्मान्य तडजोड इष्ट आहे असें नव्हे तर शक्यहि आहे. सुभाषबाबू, किरणबाबू, व सेनगुप्त इत्यादि मंडळी २४ तारखेच्या सुमारास सुटतील. तरी तुम्ही त्या वेळीं कलकत्त्यास येऊं शकल्यास आपणांस एकत्र बसून चर्चा करता येईल.

७९३

**२३ सप्टेंबर १९३०—एम्. के. आचार्य, मद्रास**

मला राजकारणाचा अगदी वीट आल्यामुळे मी तें सोडून द्यावयाचें ठरविलें आहे. लोकशाही, प्रातिनिधिक संस्था, आणि मतदारींवर उभारलेलें सरकार हें सर्व पाश्चात्य: वळणाचें राजकारण आहे. आम्ही इंग्रजी शिकून या सर्व भिकार कल्पनां-च्या उगाच मागे लागलों आहोंत. समजा, उद्या डोमीनिअन स्टेटसहि मिळालें तरी त्यांत जनतेला काय लाभ ! कांही थोड्यांना दिवाणगिऱ्या मिळतील आणि लोकांत मात्र भांडणाची भर भरपूर पडेल ! म्हणून या सर्व बौद्धिक गुलामगिरीच्या कल्प-नांचा पाठीमागे लागण्याचें मी सोडून दिलें आहे. सोबत तुम्हाला सांस्कृतिक स्वराज्याविषयी माझें एक पुस्तक पाठवीत आहे. हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास व कालगणना या संबंधाने एक पुस्तक प्रसिद्ध करावयाचें योजिलें आहे. पुण्याला भरलेल्या पहिल्या प्राच्य परिषदेंत ' हिंदी कालगणना ' करतांना आमची मुलभूत चूक काय होत आहे याबद्दल मी एक निबंध वाचला होता. तो टिळकांच्या पाहण्यांतहि आला होता. पाश्चात्य विद्वानांच्या चुका दाखविण्यापेक्षा विधायक दृष्टीवर भर देऊन या विषयांत लक्ष घालावें, असेंहि टिळकांनी त्यावर मला सुच-विलें होतें. 'आर्क्टिक होम' या पुस्तकासंबंधाने मी त्यांच्याशीं पुष्कळ चर्चा केली.

पाश्चात्यांच्या बौद्धिक गुलामगिरीचा ज्याच्यावर ठसा उमटला नाही असा गेल्या पंधरा वर्षांत हा एकच मनुष्य माझ्या पाहण्यांत आला. टिळकांच्या पुस्तक-संग्रहांत हिंदुस्थान, बाबीलोनिया इत्यादि प्राचीन इतिहासाविषयक पुस्तकें असतील तर एकदोन वर्षे त्यांच्या वाचनांत घालवून माझें प्राचीन इतिहासाचें पुस्तक मी तयार करावें असें योजिलें आहे. तुम्ही यांत मला कांही मदत करूं शकाल काय ? शेक्सपियरच्या धर्तीवर 'लोकमान्य अगर हिंदी स्वराज्य' या नांवाचें इंग्रजी नाटक मी लिहिलें आहे ! या बौद्धिक गुलामगिरींतून मी तरी कोठे सुटलों आहे ?

७९४

**११ ऑक्टोबर १९३०—पं. जगतनारायणलाल, बांकीपूर ( पाटणा )**

माझी एक ऑक्टोबरला तुरुंगांतून मुक्तता झाल्यावर लगेच दुसऱ्या दिवशीं मी व पंडित देवरत्न यांनी डॉ. मुंजे यांची मुंबईस आगबोटीवर गांठ घेतली. त्यांनी हिंदुसभेचें कार्य त्यांच्या पश्चात् तुम्हांवर सोंपविलें आहे. अध्यक्ष व उपाध्यक्ष यांच्या गैरहजेरीत तुम्ही काम करूं शकता. डॉ. मुंजे व तुम्ही दोघेहि महाराष्ट्रीय म्हणून डॉ. नारंग, किंवा उपाध्यक्षांपैकी एक पंडित मालवीय, यांच्यावर ते काम सोंपवावें असें तुम्ही सुचवितां. पण तुम्हांला दोघांविषयी तसा संकोच वाटण्याचें कारण नाही. सर्व हिंदु लोकांचा तुम्हांवर पूर्ण विश्वास असून, डॉ. मुंजे यांच्या गैरहजेरींत इतर कोणाहिपेक्षा तुम्हीच हें काम उत्तम करूं शकाल. पंडित मोतीलाल व जवाहिरलाल हेच केवळ नव्हे पण त्यांच्या कुटुंबांतील इतर माणसें तितकीं पात्र नसूनसुद्धा काँग्रेस त्यांना पुढारीपण देतें हें आपण पहातांच !

गोलमेज परिषदेला जावें की न जावें, ही गोष्ट मोठी नाज़ुक होऊन बसली आहे. सरकारने मुसलमानांबाबत पक्षपाती धोरण पत्करलें आहे. ठिकठिकाणी झालेल्या दंग्यांच्या बाबतींत, कौन्सिलांत, सरकारी नोकऱ्यांत सगळीकडेच सरकारने हिंदूंच्या हिताकडे डोळेझांक केली आहे. मग गोलमेज परिषदेला जाऊन हात उघडा करून दाखविण्यांत अर्थ काय ? अजून या विषयावर मी पक्कें मत बनविलें नाही. वर्किंग कमिटीची सभा सहा महिन्यांत भरली नाही असें मालवीयजींचे चिरंजीव पंडित रमाकांत म्हणत होते. तथापि या नाजुक परिस्थितींत तुमचें मत कळेपर्यंत बिहार व आग्रा येथील प्रांतिक हिंदु सभांनी कोणतीच बैठक भरवूं नये अशी मी सल्ला दिली आहे. डॉ. मुंजे हे

गोलमेज परिषदेस हिंदुसभेतर्फे जातों असें न म्हणतां स्वतःच्या जबाबदारीवर जात आहेत. तरी यासंबंधाने हिंदुसभेने आपलें धोरण काय प्रसिद्ध करावें याबद्दल तुमचें मत कळवावें.

७९५

**२६ नोव्हेंबर १९३०—लालजी नारायणजी, मुंबई**

कापडाच्या व्यापाऱ्यांची सभा तुम्ही जी येत्या २९ तारखेस बोलविणार ती ६ डिसेंबरला बोलवावी. लँकाशायरच्या तोडीचा आमचा तलम माल असतो. त्याचे नमुने मी मध्यंतरीं गोळा करीत आहें. याबद्दल डोळ्यांनी पाहून व्यापाऱ्यांची खात्री झाली म्हणजे मग परदेशी माल त्यांनी मागविण्याचें कारण नाही.

७९६

**१० डिसेंबर १९३०—लालजी नारायणजी, मुंबई**

वल्लभभाई पटेल यांस भेटण्याकरिता मी अहमदाबादेस गेल्यामुळे ता. ४ रोजीं तुम्ही भरविलेल्या सभेस मी हजर राहूं शकलों नाही. आपली नाताळात भेट होऊं शकेल. मध्यंतरीं पुण्यास भरणाऱ्या प्रदर्शनांत आमच्या गिरण्यांचा माल व्यापाऱ्यांना पहावयास मिळेलच.

७९७

**११ डिसेंबर १९३०—एम्. के. आचार्य, लखनौ**

'हिंदी स्वराज्याचे भविष्यवादी लोकमान्य' या नांवाचें इंग्रजी नाटक मी लिहिलें असून त्याचे पहिले तीन अंक आज तुम्हाकडे पाठवीत आहें. ते वाचून तुमच्या चिकित्सक सूचना कळविल्यास आभारी होईन. टिळक विलायतेला गेल्या वेळीं जो फंड जमविला त्यांतून कांही रक्कम शिल्लक आहे असें ऐकतों. सदर नाटक छापण्याकरिता त्यांतून कांही आर्थिक मदत मला मिळूं शकेल काय ?

७९८

**१८ डिसेंबर १९३०—रामराव देशमुख, नागपूर**

नागपूर वऱ्हाडकडे विशेष लक्ष ज्यांत पुरविलें जाईल असें इंग्रजींत साप्ता-हिक असावें असें मला व बरेच मित्रमंडळींना वाटूं लागलें आहे. नवीन पत्रापेक्षा

मराठ्याचाच उपयोग करतां आला तर करून घ्यावा असेंहि वाटतें. मध्यप्रांत व वऱ्हाड प्रांतांकरिता जो ट्रस्ट केला आहे त्याचें पुढे काय करावें यासंबंधीं आपण सूचना केल्यास आगाऊ धोरण बांधून ठेविल्यास उपयोगी होईल. तसेंच आमच्या लोकल बोर्डाच्या निवडणुकी येत्या जानेवारीपासून सुरू होणार आहेत, त्याकरिता एखादा प्रोग्राम जर ठेवितां आला तर बरीच मदत होईलसें वाटतें.

७९९

## २६ डिसेंबर १९३०—रामराव देशमुख, नागपूर

आपलें ता.२१ चें पत्र पावलें. त्याप्रमाणे दोन्ही कागदांवर सह्या करून पाठवीत आहें. आपण माझ्या नम्र सूचनांचा विचार करून परत सूचना केल्याबद्दल मी आपला फार आभारी आहें. कांहीं योग्य चुकाहि आपण पदरांत टाकल्या आहेत. त्याहि मला व्यक्तिशः मान्य आहेत. पुढील तजविजीस लागत आहें.

८००

## १ जानेवारी १९३१—बॅ. एस्. सत्यमूर्ति, मद्रास

अखेर मी तुरुंगांत जाण्याचें ठरविलें आहें. ता. ८ रोजीं मला बहुधा सहा महिन्यांची शिक्षा होईल. तुमची त्यापूर्वी भेट होणें अशक्यच आहे. आणखी कांहीं वर्षे हा राजकीय लढा चालेल. तरी सरकारशीं प्रत्येक तोंडावर लढून तेथे आपलें जास्तीत जास्त बळ एकवटलें पाहिजे. देशबंधु दास यांच्याप्रमाणे माझेहि विचार आहेत. पुढील निवडणुकीमध्ये कौन्सिलें व स्थानिक स्वराज्य संस्था या सर्व आपण काबीज केल्या पाहिजेत. राष्ट्रीय सभेचें मत आपल्या बाजूस वळविलें पाहिजे. आणि तें न शक्य झालें तर तिच्याकडून या बाबतींत प्रांतिक स्वायत्तता मागून घेतली पाहिजे. तुम्ही अशा रीतीने लोकमत वळविण्याची खटपट कराल अशी आशा आहे.

८०१

## ७ फेब्रुवारी १९३१—डॉ. मुंजे, लंडन

तुमची तार पोंचली. येथील पुष्कळ लष्करी शिक्षण संस्था पाहून घेतल्या. फ्रान्स, जर्मनी, इटाली वगैरेमध्ये जाऊन नंतर अमेरिकेस जाणार आहे व जपानमार्गाने हिंदुस्थानास येईन. पैसे इंडिया ऑफिसच्या पत्त्यावर पाठवावे. ( तार )

८०२

१२ फेब्रुवारी १९३१—विठ्ठलभाई पटेल

अंबाला तुरुंगांत असतांना मला जो पोटदुखीचा विकार जडला तो कमी होण्याचें लक्षण दिसत नाहीं. म्हणून डॉक्टरांच्या सल्ल्याने मी या महिन्याच्या चोवीसाव्या तारखेस युरोपांत जाण्यास निघत आहे. तेथे प्रकृतीला बरें वाटलें तर परदेशांत कांहीं काळ प्रचार करावा असें योजिलें आहे. त्यापूर्वी भेटून बोलण्याची इच्छा आहे. तरी तुम्ही शक्य तितक्या लवकर येऊं शकाल काय ?

८०३

२० फेब्रुवारी १९३१—जगदीशचंद्र चतर्जी, डायरेक्टर, इंडिया ॲकेडेमी ऑफ अमेरिका

सोबत मी लिहिलेलें "India's outlook on life" हें पुस्तक पाठवीत आहें. सदर पुस्तक इंडिया ॲकेडेमी ऑफ अमेरिका या संस्थेतर्फें प्रसिद्ध केलें आहे. शिक्षणविषयक प्रचाराकरिता चाललेल्या आमच्या प्रयत्नांचे सदर संस्था हें नवें रूप आहे. सदर संस्थेचे तुम्ही सन्मान्य सभासद आहांतच. आमच्या शैक्षणिक कार्यांत पुष्कळच अडचणींना आम्हाला गेलें दीड वर्ष तोंड द्यावें लागलें. पण हळुहळू आम्ही डोकें वर काढीत आहों. मि. जॉन होल्म्स यांनी सदर पुस्तकाबद्दल फारच चांगला अभिप्राय दिला आहे. वेळ फावल्यास तुम्हीहि माझें पुस्तक चाळून पहा.

८०४

१२ मार्च १९३१—लक्ष्मण दत्तात्रय जोशी, वकील, पुणें

आपली विद्वत्ता, साहित्य व संगीत या विषयांतील अधिकार जाणून थोडी तसदी देऊं इच्छित आहे. संगीताची ध्येयमर्यादा म्हणजे इच्छित रसोत्पत्ति होय असें विद्वानांचें मत आहे. या गोष्टीचा विचार करतां जे प्रश्न व शंका माझ्यासमोर उभ्या राहिल्या त्या खाली लिहीत आहें:—

( १ ) आपल्या जुन्या संस्कृत ग्रंथांपैकी कोणत्या ग्रंथांनी संगीताचा विचार केला आहे ?

( २ ) कोणत्या आर्वाचीन ग्रंथांनी केला आहे ?

( ३ ) कोणत्या पाश्चात्यग्रंथांनी केला आहे ?

( १ ) त्यांत पाश्चात्यांचे व आमचें विचारसाम्य आहे काय ?

( २ ) संगीताचा रसाशी कितपत संबंध येतो ?

( ४ ) विशिष्ट ताल रसोत्पादक किंवा रसपूरक आहेत काय ? त्या त्या ठिकाणी ते न लावल्यास रसहानी होते काय ? अमुक तालाने अमुक रस उत्पन्न होतो असें ठरलें आहे काय ? असल्यास तें कोणत्या तत्त्वाने ठरलें आहे ?

( ५ ) कांही विशिष्ट राग रसोत्पादक आहेत किंवा सर्वच राग रसोत्पादक आहेत ? राग रसोत्पादक आहेत की स्वर रसोत्पादक आहेत ? एकच स्वर रसोत्पत्ति करतो की स्वर-समुदाय रसोत्पादक असतो ?

( ६ ) संगीताच्या रसोत्पत्तीला अर्थाची अपेक्षा आहे काय ?

८०५

### १६ मार्च १९३१—सी. विजयराघवाचारीयर, सालेम, मद्रास

मराठ्याचा अंक पोंचला. तडजोडीच्या नांवाखाली म. गांधींनी ज्या गोष्टी कबूल केल्या त्या पाहून मलाहि तुमच्याचप्रमाणे वाईट वाटतें. तडजोड फुकट जाऊं नये हें खरें. पण गोलमेज परिषदेंत आता जें ठरलें तें पत्करणें म्हणजेहि राष्ट्रावर मोठी आपत्तीच होय ! सरकारने प्रसिद्ध केलेल्या पत्रकांत संरक्षण बंधना-(सेफगार्ड)वरच जोर दिलेला आहे. गांधींनी त्या मताला अनुमोदन दिलें. आणि वर्किंग कमिटीनेहि त्याला मान्यता दिली ही गोष्ट सर्वांत वाईट झाली. आता कॉंग्रेसने आणि देशाने काय धोरण पत्करावयाचें हा मोठाच प्रश्न आहे ! नेमस्तांनी गोलमेज परिषदेला जाऊन इंग्लंडचा दृष्टिकोण बदलण्याचें थोडेबहुत उपयुक्त काम केलें. इकडे व्हाईसरॉयांशी गांधींनी तडजोड केली हेंहि ठीक झालें; पण संरक्षक बंधनाला मान्यता देण्यांत गांधीनी शब्दाची जेवढी खबरदारी घ्यावयास पाहिजे होती तितकी घेतली नाही हें उघड आहे. वर्किंग कमिटी अगर म. गांधींचा निर्णय कांही कॉंग्रेसवर बंधनकारक नाही. आणि गोलमेज परिषदेचे निर्णयाहि अद्याप कायद्याच्या स्वरूपाने पक्के झाले नाहीत तोपर्यंत कॉंग्रेसने मनांत आणलें तर ही गोष्ट पाहिजे तशी बदलून घेतां येईल. हें वेळींच न झालें तर देशाच्या राजकारणाचीं आणखी किती वर्षें फुकट जातील हें सांगवत नाही.

८०६

**१७ मार्च १९३१—हणमंतराम रामनाथ, अध्यक्ष, पुणें शहर म्युनिसिपालिटी**

केसरी–मराठा संस्थेला ५१ वें वर्ष लागलें त्याबद्दल म्युनिसिपालिटीने आपल्या संस्थेच्या अभिनंदनार्थ सभेंत खालील ठराव पास केला आहे—

अखिल हिंदुस्थानांत पुणें शहरास जें महत्त्व आहे, व पुणें म्हणजे महाराष्ट्राच्या राजकारणाचें स्थान म्हणून प्रसिद्ध आहे, त्यास मुख्यत्वें करून कारणीभूत असलेल्या केसरी–मराठा संस्थेला ५१ वें वर्ष लागलें, यानिमित्त ही म्युनिसिपालिटी सदर संस्थेचें अभिनंदन करीत आहे.

हिंदुस्थानास स्वराज्य मिळविण्याच्या कामीं निर्भयतेने, हालअपेष्टांस तयारी ठेवून, स्वार्थत्यागपूर्वक काम करणाऱ्या संस्थांच्या परंपरेंतील सदर संस्था ही पहिली असून, स्थानिक स्वराज्य हें एक स्वराज्याचें साधन आहे या जाणिवेने लोकमान्य टिळक, रा. नामजोशी वगैरे सदर संस्थेच्या चालकांनी प्रत्यक्ष सभासद होऊन या म्युनिसिपालिटीच्या कामांत मन घातलें होतें. सदर संस्थेचे मुख्य ट्रस्टी श्रीयुत रा. तात्यासाहेब केळकर यांनी तर आपल्या सार्वजनिक आयुष्यांतील फार मोठा काळ या म्युनिसिपालिटीचा कारभार लोकमतानुवर्ति करण्याकडे खर्च केला असून, हल्लींहि त्यांचें म्युनिसिपालटीचे कारभारावर पूर्ण लक्ष आहे. याबद्दलहि ही म्युनिसिपालिटी कृतज्ञता प्रदर्शित करीत आहे.

८०७

**१८ मार्च १९३१—डॉ. बा. शि. मुंजे, लंडन**

जातीय प्रश्नाचा निर्णय करण्याकरिता मुस्लीम लीगने गांधीजींना बोलाविलें आहे. येथे सभेंत विचारविनिमय झाल्यावर लंडनहून जें स्टेटमेंट प्रसिद्ध झालें त्यांत महासभेचें म्हणणें काय आहे हें स्पष्टपणें सांगितलें आहे. त्यांत बदल करणें गैर होईल. सदर तडजोडीमध्ये दोन अटी आहेत. पहिली म्हणजे, पंजाब व बंगाल यांत संख्याधिक असलेल्या पक्षाला कायद्यानेहि मताधिक्य देऊन जातीय राज्य स्थापू नये. आणि दुसरी म्हणजे अल्पसंख्याकांचा मताधिकार त्यांच्या लोकसंख्येच्या प्रमाणाहून कमी होऊं नये. गांधीजी ता. १५ एप्रिलच्या सुमारास हिंदुस्थानांत येतील तेव्हा त्यांना ताबडतोब भेटा. तसेंच याविषयीं पद्मराज व देवरत्न यांनाहि कळवा.

८०८

१९ मार्च १९३१—पद्मराज जैन, दिल्ली

गांधीजींशीं चर्चा करण्याला हिंदुमहासभेच्या प्रतिनिधींना डॉ. अन्सारी यांनी बोलाविलें आहे. तुम्ही येणें फार आवश्यक आहे. (तार)

८०९

१९ मार्च १९३१—पंडित देवरत्न, दिल्ली

हिंदुमहासभेचे पुढारी व मुस्लिम प्रतिनिधि यांच्याशीं विचारविनिमय करण्याचें गांधीजींनी योजिलें आहे. तुम्ही हजर असणें आवश्य आहे. तरी कृपा करून या. (तार)

८१०

२२ मार्च १९३१—गोपाळराव ओगले, संपादक, 'महाराष्ट्र', नागपूर

आमच्या राजद्रोहाच्या खटल्याचा सोमवारीं निकाल लागेल. वर्ष सहा महिने शिक्षा व भक्कम दंड असा निकाल बहुधा होईल. सध्या आमच्या प्रांतांतील सरकाराच्या कारभारांत हिंदी सभासदांचें बहुमत आहे. तीन सभासद एकाच्याच तंत्राने चालतात. त्यांना ब्राह्मण व आपल्याला अनुकूल न होणारें पत्र नको. तें डोळ्यांत खुपतें. पुढे होणाऱ्या स्वराज्यांत आरंभीं आरंभीं अनेकांना पक्षभेदासाठी त्रास व छळ सोसावा लागणार यात शंका नाही. अजून पक्षभेदाच्या भांडणांत व्यापक दृष्टि व सहिष्णुता जितकी अंगीं उतरण्यास पाहिजे तितकी आपल्या लोकांच्या अंगीं उतरली नाही व लौकर उतरेल असें वाटत नाही. म्हणून वर्तमानपत्रकारांना यापुढे या संकटांस तोंड देणें भाग आहे. राघवेंद्रराव हे प्रथम कॉंग्रेसमन झाले, नंतर स्वराजिस्ट झाले, नंतर प्रतिसहयोगी किंवा कॉंग्रेस इन्डिपेंडन्ट झाले, आता सरकारांत सामील झाले आहेत. त्यांना "महाराष्ट्र" पत्र 'हितवाद' पत्रासारखें, त्यांच्या ताटाखालचें मांजरें होऊन राहण्यास तयार नाही, म्हणून राग आहे. यांत आश्चर्य कांही नाही. वर्ष सहा महिने तुरुंगांत जाऊन आल्याने कांही मोठेसें नुकसान होणार नाही. आपल्यासारख्यांच्या कृपेने व लोकांच्या मदतीने पत्र बहुधा चालेल.

८११

### ३ एप्रिल १९३१—आर. एस्. निमकर, मिरत तुरुंग

ता. १८ पासून मीरत कटाच्या खटल्यांतील आरोपींच्या कैफीयतींना सुरुवात होईल व जूनअखेर या कैफीयती संपतील. फ्री प्रेसचे येथील बातमीदार हलीम यांना केसरी-मराठ्याकरिता आमच्या खटल्याचे रिपोर्ट पाठविण्यास सांगितलें आहे. गेल्या २८ तारखेपासून ते पाठवीतच असतील. पण जर ते रिपोर्ट तुम्हांला न मिळाले तर सरकाराच्या गुप्तखात्याकडून त्याला कात्री लागली असें समजा. बाहेरच्या चळवळीसंबंधाने व विशेषतः सोलापूर व लाहोर येथील आरोपींना फासांवर चढविलेले पाहून, आम्हांला उत्साह वाटेनासा झाला आहे. सोलापूरला फाशी गेलेले कुरबान हुसेन हे मूळ १९२८ मधील मुंबईच्या गिरणीकामगार चळवळींतले. लाहोरला फांशीं गेलेले लोकहि शेवटीं सोशालिझमचींच मतें बोलत होते. आम्हांला तुमच्याकडून जीं पुस्तकें पाहिजेत त्यासंबंधाने पुनः केव्हा तरी लिहीन.

८१२

### १५ एप्रिल १९३१—एस्. ए. डांगे, मीरत तुरुंग

केसरीच्या ज्युबिली समारंभांतून तुम्ही मोकळें झाला असाल असें समजून आमच्या खटल्यासंबंधीं हकीकत लिहितों. सरकारतर्फे :फिर्यादपिक्षाचा पुरावा सेशन्समध्ये चौदा महिन्यानंतर ता. १६ मार्च रोजीं संपला. त्यानंतर ता. १५ एप्रिलपर्यंत आरोपींपैकीं सहा जणांचीं स्टेटमेंट्स झालीं. या जबान्यांचीं २१४ फुलस्केप पृष्ठें आहेत ! अजून इतर आरोपींच्या जबान्या आहेतच. या सहांपैकीं पांचांनी आपण कम्युनिस्ट आहों असें सांगितलें व फक्त एकाने आपण कम्युनिस्ट नाही असें म्हटलें. यावरून पुढची कल्पना येईल. हें वर्ष संपून पुढलें वर्ष लागेपर्यंत खटल्याचा निकाल होत नाही असें वाटतें. 'केसरी-प्रबोध' ग्रंथांची एक प्रत आम्हाला पाठवून द्या.

८१३

### ७ जून १९३१—प्रो. वि. पां. दांडेकर, बडोदें

मागे मी आपणाला आपल्या सर्व नाटकांचें परीक्षण करण्याचें कळविलें

होतें. त्याप्रमाणे या सुट्टीत सर्व नाटकें नीट अभ्यासून मी त्यांचें परीक्षण लिहून काढलें आहे. तथापि, या कामांत आपल्या मदतीची फार अपेक्षा आहे. भावी वाचकांच्या व विद्यार्थ्यांच्या दृष्टीने पुस्तक मार्गदर्शक व्हावें अशी माझी इच्छा आहे. त्याकरिता टीकाकारांच्या मताबरोबरच स्वतः लेखकाचें मत वाचावयाला मिळालें तर तें विद्यार्थ्यांना फार चांगलें. असें मत देण्याचा प्रसंग वादग्रस्त प्रश्नांच्या वेळींच येणार. असे बरेच प्रसंग मी नाटकांचा अभ्यास करीत असतांना आढळले. अशा वेळीं आपलें मत पृष्ठाखालील टीपांमध्ये द्यावें असें मला वाटतें. टीकाकारांनी कितीहि सांगितलें तरी लेखकाची दृष्टि हीच शेवटीं निर्णायक ठरणार. वाचकांना दोन दोन मतें एकाच वेळीं कळण्यांत एक प्रकारची मौज वाटते.

### ८१४

### २४ जून १९३१—कोंडा वेंकट्टापय्या, गंटूर

ता. २९ रोजी भरणाऱ्या आंध्र हिंदुसभेचे आम्ही तुम्हाला अध्यक्ष निवडले आहे. तरी कृपा करून नकार न देतां अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंति आहे. ( तार )

### ८१५

### ४ जुलै १९३१—ए. ए. आळवे, मिरत

तुम्ही मला चांगलें ओळखत असाल. गेले अठ्ठावीस महिने मी तुरुंगांत होतो, व नुकताच जामिनावर सुटलों आहें. मी गिरणी-कामगार असल्याकारणाने मला वेतन फारसें नसे व अडचणीची वेळ निभावण्यास गांठीं कांही शिल्लकहि नाही. मी तुरुंगाबाहेर असलों तरी मला मिरतलाच राहवें लागतें व सगळ्या गोष्टींची तरतूद करावी लागते. खिशांत एक दमडी नाही. अशा स्थितींत फार हाल होतात. माझे मित्र म्हणविणाऱ्यांनी मला संकटसमयांत गोता दिला आहे. अशा परिस्थितींत निराश्रितांचें आश्रयस्थान असणाऱ्या तुमच्याखेरीज मला दुसरी कोण मदत देणार ! एकाहि युनियनने अगर उदारधि गृहस्थाने मला मदत केली नाही. तरी तुम्ही मला शक्य तितक्या लवकर मदत म्हणून कांही पैसे पाठवूं शकाल काय !

८१६

## २५ जुलै १९३१—जॉर्ज जोसेफ, मदुरा

मिस्टर बी. आर. रेड्डी यांची व तुमची मी या पत्राने ओळख करून देतों. सदर गृहस्थ पूर्ण बहिरे व मुके आहेत. पण अमेरिकेस जाऊन पुढे आणखीहि प्रवास करण्याची त्यांची इच्छा आहे! त्यांच्या जवळील कागदपत्रांवरून त्यांचे संबंधाने तुम्हांला कळेलच. तथापि ज्यांचा यांना उपयोग होईल अशा कांही गृहस्थांची माहिती त्यांना द्या. तुम्हाला मी भेटून पुष्कळ दिवस झाले. राजकारणांत तुम्ही लक्ष घालण्याचा काळ राहिलेला नाही. कारण सध्या 'गांधीराज्य' असल्याने 'सत्य', 'अहिंसा' यांचीच चलती आहे.

८१७

## १५ ऑगस्ट १९३१—सुभाषचंद्र बोस, कलकत्ता

कांही दिवसांपूर्वी आमच्या 'लिबर्टी' वर्तमानपत्रास, लिमिटेड कंपनीचे कांही शेअर घेऊन अगर देणगी देऊन, आपण मदत करावी, असें विनंतिपत्र पाठविलें होतें. टिळक पर्सफंडांतून कांही शेअर्स विकत घ्यावे असेंहि मी पुण्यास असतांना सुचविलें होतें. २।३ आठवड्यांपूर्वी यासंबंधाने आपणांस तार केली होती. पण आपलें कांहीच उत्तर आलें नाही. कदाचित् तुम्ही कामकाजाच्या गर्दीत असाल. म्हणून मदत करण्याबद्दल कळकळीची विनंति करीत आहे. कारण आम्हांस या आर्थिक मदतीची फारच आवश्यकता आहे.

८१८

## १५ ऑगस्ट १९३१—जे. बेकेट, सरकारी विद्याधिकारी, पुणें

जी. बी. लिमये स्कॉलरशिप्ससंबंधाने दुरुस्त केलेल्या योजनेची प्रत सोबत पाठवीत आहें. यांतील दुरुस्त्या शाईच्या लिहिल्या असून तुमच्याबरोबर केलेल्या चर्चेनुसार केल्या आहेत. यांत तुमचे आणखी कांही शोध अगर दुरुस्त्या असल्यास सुचवा. म्हणजे लीगल रिमेंब्रन्सरचें त्यावर मत घेऊन नंतर त्याला सरकारी मंजुरी मिळविता येईल.

८१९

२० ऑगस्ट १९३१—ए. बी. ध्रुव, प्रिन्सिपॉल आणि प्रो. चॅन्सलर, हिंदु युनिव्हर्सिटी, बनारस

मराठ्यांच्या इतिहासाचा तुमचा अभ्यास महशूर आहे. तरी येत्या डिसें-बरांत, अगर ज्या वेळीं तुम्हांस सवड होईल तेव्हा, मराठ्यांच्या इतिहासांतील एखाद्या भागावर आमच्या युनिव्हर्सिटीतर्फे तुम्ही ५।६ व्याख्यानें द्यावींत अशी विनंति आहे. पंडित मालवीय हे पुण्याला असतांना त्यांनी तुम्हाला येण्याला आमंत्रण दिलेंच होतें व तुम्हीहि तें कबूल केलें होतें. मी त्याच निमंत्रणाचा पुनरुच्चार करतों.

८२०

१७ सप्टेंबर १९३१—जगत नारायणलाल, बांकीपूर, हिंदुमहासभा, पाटणा

डॉ. मुंजे सध्या विलायतेंत आहेत व हिंदुसभेचे उपाध्यक्ष रामानंद चतर्जी यांची प्रकृति बरी नाही. यामुळे वेळोवेळीं सल्ला विचारण्यास मोठी अडचण पडते. त्यांच्याबद्दल तुम्ही हें काम करूं शकाल काय ? मला असें गंभीरपणानें वाटूं लागलें आहे की, इंग्लंडचे मुख्य प्रधान यांनी, डॉ. मुंजे, मालवीय, जयकर, म. गांधी इत्यादि लोकांना तार करून, सिंध विभागणीला संमति देण्यापूर्वी, पूर्व बंगाल, सर-हद्दप्रांत, डाक्का, चितागांग, डेराईस्मायलखान, शिकंदराबाद येथील हिंदूंच्या परि-स्थितीबद्दल कांहीतरी विचार केला होता काय असें गोलमेज परिषदेच्या सभासदांना विचारावें. रामानंद चतर्जी यांना ही कल्पना पसंत आहे. तुमचें मत काय आहे ?

८२१

२४ सप्टेंबर १९३१—डॉ. बा. शि. मुंजे, लंडन

आज एक फारच चिंताजनक गोष्ट ऐकली. म. गांधींनी आगाखान यांची रिश हॉटेलांत गांठ घेतली. आणि आता आगाखान मुसलमानांच्या मागण्या सगळीकडे जाहीर करीत आहेत. कायदेभंगाच्या चळवळींत मुसलमानांचा पाठिंबा मिळावा म्हणून मुसलमानांच्या बहुतेक सर्व मागण्या गांधींनी कबूल केल्या असें येथे सर्वजण उघड बोलतात. पं. मालवीय यांनाहि गांधींनी आगाऊ विचारलें

नाही. मग माझा सल्ला ते कोठून घेणार ? शौकतअली यांनी येथे एक खिलाफत ऑफिस थाटलें असून प्रचाराला सुरुवात केली आहे. त्यांना पैशाची कधींच वाण नाही !

८२२

३० सप्टेंबर १९३१—डॉ. मो. ना. आगाशे, सातारा

डॉ. सोहोनी यांच्याकडून तुम्ही मला प्रेमळपणाने नजर केलेलीं पुस्तकें पोंचलीं. "खरें पितृधन हेंच आहे व परमेश्वर कृपेने त्याचीच वाढ तुमच्या हातून व्हावी ही इच्छा आहे." हें वाक्य "आधुनिक जर्मनीची उत्क्रांति" या पुस्तकाच्या पहिल्या पानावर लिहून, तें पुस्तक माझ्या वडिलांनी मी मेडिकल कॉलेजांत विद्यार्थी असतांना पाठविलें होतें. वरील प्रेमळ व मार्मिक वाक्याची आज मला आठवण होते. पितृधनापैकी एक वाटा मला तुम्ही दिलांत या एका गोष्टीवरून मजबद्दल तुमच्या अंतःकरणांत कोणत्या भावना आहेत तें स्पष्ट होतें. काय कारण असेल तें असो, तुम्ही सर्व केळकर मंडळी मजवर प्रेम करतां ही गोष्ट मला धन्यता वाटण्याजोगी आहे यांत शंका नाही. तुमच्या लेखांवर माझें उत्कट प्रेम आहे. ते वाचीत असल्यावेळीं मी स्वतःला विसरून जातों. ती एकः तऱ्हेची समाधीच म्हणावयाची. कोणत्याहि विषयाशीं एकतानता झाली की, शारीरिक व मानसिक यातनांचा शेवट होतो. सध्याच्या माझ्या प्रकृतीच्या स्थितींत अशा तऱ्हेची एखाद्या आवडीच्या विषयाशीं एकतानता होणें म्हणजे त्या रोगावर तें एक अत्यंत गुणकारी औषधच होय. माझ्या रोगावर तात्यांच्या पुस्तकाचें वाचन म्हणजे एक त्रैलोक्य चिंतामणीच म्हणावयाचा ! ही मात्रा अत्यंत श्रद्धेने घेण्यास सुरुवात केली आहे व तिचा इष्ट तो परिणाम घडण्यास सुरुवात झाल्याची स्पष्ट चिन्हें दिसावयास लागलीं आहेत हें कळविण्यास आनंद वाटतो.

८२३

१२ ऑक्टोबर १९३१—ना. सि. फडके, कोल्हापू

माझ्या 'प्रतिभासाधन'च्या पुस्तकाच्याः प्राति तयार झाल्या असून आपणांस एक प्रत देण्याविषयी मी प्रेसकडे लिहिलें आहे. आपण अभिप्राय लिहिल्यास तो मार्गदर्शक होईल व पुस्तकांतील गुणावगुण मला अधिकारी व्यक्तीकडून समजल्या-

सारखें होईल. तरी विनंति कीं, आपण कृपा करून सवड काढावी व शक्य तितक्या लौकर केसरींत अभिप्राय लिहावा.

८२४

**१५ ऑक्टोबर १९३१—डॉ. बा. शि. मुंजे, लंडन**

तुमचा चेक पोंचला. त्याबद्दल फारच आभारी आहे. सर्व मुसलमानांनी येथे एकजूट केलेली आहे. सायमन कमिशनवरील हिंदुस्थान सरकारने काढलेल्या पत्रकांत मुसलमानांच्या मागण्या सरकारने आधीच कबूल केल्या असल्यामुळे, मुसलमान आपली मागणी एक रतिभरहि कमी करण्यास तयार नाहीत. मुस्लीम लोक प्रचार कार्याकरिता येथे पाण्यासारखा पैसा खर्च करीत आहेत. येथे 'टाईम्स'मध्ये प्रसिद्ध झालेल्या बातमीप्रमाणे, मुसलमानांच्या सर्व मागण्या कॉंग्रेस-तर्फे कबूल करून गांधीजी मुसलमानांच्या पूर्ण कह्यांत गेले आहेत ! शीख लोक रागारागाने या गोष्टीचा निषेध करतात व मीहि त्यांचें म्हणण्याला पाठिंबा देत आहें. मायनॉरिटी सब् कमिटीच्या सभेंत व खुद्द महात्मा गांधीनाहि, मी स्पष्ट सांगितलें कीं, हा प्रश्न वाद करून सुटणार नाही. यापेक्षा ज्यांनी या विषयावर कसलेंच मत दिलें नाही अशा त्रयस्थ पंचाकडे तो प्रश्न सोंपवावा. मग ते त्याबद्दल कांहीहि निर्णय देवोत.पंजाबांत मुसलमानांना मताधिक्य द्यावें व हिंदूंना कायद्याने अल्पसंख्याक करावें, ही जी सर जॉफ्रे कॉरबेट यांची योजना आहे त्याला गांधींनी पाठिंबा देऊन पंजाबांतले हिंदु आणि शीख यांचा विश्वासघात केला असें म्हटलें पाहिजे. पंजाबमधून अंबाला डिव्हिजन वगळावा, तसेंच मुलतान आणि रावळपिंडी हे प्रांत सरहद्द प्रांतांत ढकलावे, अगर त्यांचा एक वेगळा छोटा प्रांत करावा, अशी कॉरबेटसाहेबांची योजना आहे. नोकरशाहीचे हें पाजीपणाचें कावे गांधीजींच्या लक्षांतच येत नाहीत ! आणि मुसलमानांच्या बाबतींत ते नेहेमीच पडखाऊपणा करतात. यामुळे हिंदु आणि शीख यांचेंच नव्हे तर सर्व हिंदी स्वराज्याचेंहि कल्पनातीत नुकसान होत आहे. सर्व पाहून माझ्या मनाला काय यातना होतात तें काय लिहूं !

८२५

**मिति पौष शु॥ ३ बुधवार शके १८५२—शंकर गणेश लवाटे, पुणें**

गेल्या रविवारच्या सभेंत भाषण करून परत फिरलों त्या क्षणापासून मनाला

असमाधान वाटावयास लागलें. आणि आज १२ वाजता रा. सदाशिवराव बापट यांची गांठ पडली तेव्हा, माझ्याकडून किती अनुचित कृत्य घडलें याचा माझ्या मनावर पक्का प्रकाश पडून मन अत्यंत खजील झालें. मी आपल्याला साष्टांग नमस्कार घालून क्षमा मागतों. आपण शत्रूंचे अपराध पोटांत घातलेले आहेत. तेथेंच हित-बुद्धीने वागतो म्हणणाऱ्याची एक अक्षम्य आगळिक घाला हें म्हणण्याची सुद्धा लाज वाटते. परंतु मला आपल्याला माझें अंतःकरण सांगण्याखेरीज कोणताहि मार्ग उरलेला दिसत नाही.

८२६

१९ ऑक्टोबर १९३१—एस्.व्यंकट पतिय्या, चिटणीस, हिंदुमहासभा, बंगलोर

येथील हिंदुसभेचा तिसरा वार्षिकोत्सव पुढील महिन्यांत आहे. तरी तुमच्यासारख्या योग्यतेच्या हिंदु पुढाऱ्यांची अध्यक्ष म्हणून निवडणूक केल्यास सभेच्या सामाजिक कार्यास योग्य दिशा मिळूं शकेल. तरी तुमच्या अनेकविध कार्यांतून एकदोन दिवस सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्यास बंगलोरला यावें अशी आग्रहाची विनंति आहे.

८२७

२० ऑक्टोबर १९३१—डॅ. बी. जी. परांजपे, मुंबई

टिळक विरुद्ध नेने खटल्याचा निकाल काय लागणार, हें बहुतेक ठरल्या-सारखेंच होतें. अद्याप जज्जमेंट बाहेर पडावयाचें आहे. त्या निकालावर लोक उघड टीका करतील. नेने यांना अपील करावें लागणार. तुम्ही दिलेला सल्ला किती योग्य होता, ही गोष्ट या निकालाने नेने यांना आता कळेल ! तडजोड करण्याबद्दल तुम्ही किती तरी प्रयत्न केला, पण कांही आग्रही लोकांच्या हट्टामुळे तें घडून आलें नाही. आणि त्यांत खेदाची गोष्ट ही की, तुम्हांला मात्र कोर्टांतील उलट तपासणीच्या अग्निदिव्याला तोंड द्यावें लागलें, आणि नेने यांना उलट सल्ला देणारे मात्र परस्पर निसटून गेले ! नेने यांनी तुमची हितकर सल्ला ऐकली असती तर हा प्रसंग न येता !

८२८

२२ ऑक्टोबर १९३१—डॉ. बा. शि. मुंजे, लंडन

माझ्या मागील पत्रांत अमेरिका–जपानच्या प्रवासाचा अंदाज सुमारे पांच

हजार येईल असे कळविलें होतें. त्यासंबंधाने तुमचें मत शक्य तितक्या लौकर कळवावें. मला या सफरीची कल्पना सोडून द्यावी लागणार नाही अशी आशा आहे. मी अतिशयोक्ति करीत नाही, पण इंडियन मिलीटरी कॉलेज कमिटीच्या बाबतींत, तसेंच येथे अनेक हिंदु गृहस्थांच्या मताला विरोध करून, जें कार्य मी साध्य केलें त्याने महाराष्ट्राच्या नांवाचा लौकिक पुष्कळच वाढला आहे यांत संशय नाही. पंडित मालवीय यांनी बनारस हें जसें विद्येचें आदिपीठ केलें त्याप्रमाणे, महाराष्ट्र हें लष्करी शिक्षणाचें आदिपीठ करावें अशी आपणहि महत्त्वाकांक्षा बाळगिली पाहिजे. वरील देशांत मी केलेल्या प्रवासाच्या ज्ञानाचा या कामीं अतिशय उपयोग होईल. वेस्ट पॉईंट व किंगस्टन येथील लष्करी कॉलेजें अत्यंत प्रख्यात आहेत.

८२९

८ नोव्हेंबर १९३१—बॅ. बी. जी. परांजपे, मुंबई

जस्टिस तयबजी यांनी 'टिळक विरुद्ध नेने' खटल्याबद्दल भलतीच समजूत करून घेतली असें दिसतें. त्यांनी जजमेंट लिहिलें नाही किंवा मुद्द्यासंबंधाने जीं शॉर्टहँड टिपणें घेतलीं त्यांवरहि त्यांनी सही केली नाही! ते कोर्टांत तोंडाने जेवढें बोलले तेच जजमेंट असें समजावयाचें की काय? तसें कसें समजता येईल? चीफ जस्टीस यांच्या कानावर ही गोष्ट गेली आहे. तुम्ही सांगितलेल्या खटल्यासंबंधी गोष्टी मी लक्षपूर्वक पाहिल्या. समक्ष भेटींत त्यासंबंधी बोलूं.

८३०

१२ नोव्हेंबर १९३१—आय्. बी. सेन, लंडन

आणखी कांही तासांनी तुम्ही लंडनला पोंचाल. इतर लोकांना इंग्लंडच्या किनाऱ्यावर पाय ठेवतांना इंग्रजांचा जो अनुभव आला तोच तुम्हांलाहि येईल. इंग्रजांच्या राज्यकारभाराचा हिंदुस्थानांतल्या लोकांच्या मनावर काय परिणाम होतो, हें कटू सत्य त्यांना सांगितलेलें आवडत नाही! ज्या गोष्टी महत्त्वाच्या नाहीत त्यांचें खरें कारण सांगून अप्रियता घेण्याचें कारण नाही. आणि महत्त्वाच्या मुद्द्यासंबंधाने सत्याची कडू गोळी विलायती मुत्सद्द्यांच्या घशाखाली उतरवायची तर त्याला शर्करावगुंठण केलें पाहिजे. तुम्ही राष्ट्रीय

पक्षाचे व हिंदुसंघटनवाले व राष्ट्रीयसभावालेहि असला तरी हिंदुस्थानचा प्रश्न नीट योग्य रीतीने मांडू शकाल असें माझें मत येथे मी पुष्कळांजवळ बोललों आहे.

८३१

### १२ नोव्हेंबर १९३१—विजयराघवाचारीयर, सालेम

गोलमेज परिषदेला अपयश येणार हें आता उघड आहे. तरी परिषदेच्या सूचनांना प्रत्यक्ष कायद्याचें स्वरूप येण्यापूर्वी पार्लमेंटपुढे आणि जगापुढे हिंदूंचें काय मत आहे, हें जाहीर करण्यासाठीं हिंदुमहासभेची जादा बैठक बोलवावी, आणि कांही निवडक माणसांच्या सिलेक्ट कमिटीकडून एक रिपोर्ट तयार करवून तो हिंदुसभेमार्फत पार्लमेंटकडे पाठवून घ्यावा. माझें मत तुम्हांला पसंत पडून हिंदुमहासभेची बैठक शक्य तर पुण्यास तुम्ही तांतडीनें बोलवाल अशी आशा आहे.

तुमचें Pleasures and Privileges हें पुस्तक मी मधूनमधून वाचलें. त्यांतला नाना फडणविसावरला लेख मला सर्वांत आवडला. आधुनिक काळांतील अत्यंत श्रेष्ठ मुत्सद्दी म्हणून नाना फडणविसांबद्दल माझ्या मनांत अत्यंत आदर आहे.

८३२

### १४ नोव्हेंबर १९३१—माधवराव अणे, यवतमाळ

तारीख ७ चें सर्क्युलर पोंचलें. टिळक ज्युबिली ट्रस्ट फंडासंबंधाने उद्भवलेल्या महत्त्वाच्या प्रश्नासंबंधाने विचार करण्याकरिता जी सभा तुम्ही ता. २७ व २८ रोजीं मुंबईंत सरदारगृहांत भरवीत आहां त्याला मी अवश्य हजर राहीन. मुंबई हायकोर्टाच्या निकालामुळे सदर ट्रस्टची स्थिति मोठी अनिश्चित झाली आहे असें तुमच्याप्रमाणेच मलाहि वाटतें. म्हणून कायदेशीर सल्ला घेऊन पुढे कसें काय धोरण ठेवावयाचें हें मॅनेजिंग कमेटीच्या सभासदांनी वेळींच ठरविलें पाहिजे.

८३३

### १६ नोव्हेंबर १९३१—न. वि. गाडगीळ, पुणें

आपल्याकडे काल ज्या पत्राचा उल्लेख केला त्याची नक्कल धाडली आहे. कालच्या गोष्टीमुळे आपला मजबद्दल गैरसमज झाला असला तर तो दूर व्हावा अशी विनंति आहे. आपलें चारित्र्य अनेक बाबतींत मजला आदर्शभूत आहे आणि त्याचमुळे आपल्याविषयीं राजकीय मतभेद असूनसुद्धा आदर पूर्ववत्

कायम आहे. तो अंतःकरणांत आहे, अस्तनीवर मी तो दाखवीत नाही. आपला राग कमी झाला म्हणजे मी भेटेन.

८३४

**६ डिसेंबर १९३१—खानबहादूर डी. बी. कूपर, सातारा**

किर्लोस्कर बंधूंच्या व आमच्या बाबतींत मी पुण्यास आल्यावेळीं तुम्ही लक्ष घातलें याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें. तुमच्या म्हणण्याचा फिरून विचार केल्यानंतर, पूर्वी चालत आलेलीच व्यवस्था कांहीं काळ पुढे चालवावी असेंच माझें मत बनलें व त्याप्रमाणे मी किर्लोस्कर बंधूंना कळविलें आहे. तुमच्या सल्ल्याबद्दल फार आभारी आहें.

८३५

**७ जानेवारी १९३२—शंकर रामचंद्र दाते, लंडन**

प्रथम जर्मनींत गेलों. पण तेथे माझें काम होऊं शकलें नाही म्हणून लंडनला येऊन येथील मोनोटाईप कंपनीबरोबर तें करण्याचें ठरविलें. मराठी मोनोटाईप करण्याचें काम दोन महिने चालू होतें. त्या यंत्रावर काढलेलें पहिलें मुद्रणाचें काम या सोबत पाठवीत आहे. या यंत्राने मी पंधरा दिवसांच्या संवयीने एका तासांत केसरीच्या १२० ओळींपर्यंत कंपोज करूं शकतों. अधिक संवयीने १५० ओळी करता येतील असें वाटतें. मराठी लिपींत फरक न करतां ती या यंत्रावर बसविता आली आहे. टाईपांत कांहीं किरकोळ दोष आहेत ते एक दोन आठवड्यांत नाहींसे करितों. तरी आपणहि या बाबतींत लक्ष घालून मला टाईपांतील दोष कळविल्यास ते दुरुस्त करीन. मोनोटाईपाप्रमाणे मराठी लिनोटाईपहि करण्याची कल्पना कारखानदारांना पटली आहे. परंतु व्यापारांतील मंदी व हिंदुस्थानांतील चळवळ यामुळे नवीन प्रयोगाकरिता पैसे खर्च करण्यास ते तयार नाहीत. आणि ते करण्याला स्वतः मजजवळ तर पैसे नाहीतच नाहीत. त्याशिवाय शक्य झालें तें करून पाहिलें आहे व यशस्वी झालें आहे.

८३६

**१५ जानेवारी १९३२—प्रो. श्री. ना. बनहट्टी, एम्. ए., नागपूर**

आपलें कार्ड पोंचलें. आपण आमच्या मालेकरिता किती श्रम घेतले

आहेत याची मला पूर्ण जाणीव आहे. प्रतिकूल परिस्थितींतहि पुस्तक लिहिण्यास घेऊन आपण आम्हांला ऋणी केलें आहेच. परंतु त्याशिवाय प्रत्येक बाबतींत सल्ला देऊन, कांही ग्रंथकार मिळवून देऊन व इतर अनेक रीतींनी आपण ग्रंथमालेला साहाय्य केलें तें मी कधी विसरणार नाही. आपल्याच अनुग्रहाने खरोखर या कार्याची उभारणी झाली आहे. याबद्दल मला जी कृतज्ञता वाटत आहे ती शब्दांनी व्यक्त करतां येणार नाही.

८३७

### १८ फेब्रुवारी १९३२—शंकर रामचंद्र दाते, लंडन

माझ्या मराठी जुळणीयंत्रासंबंधाने आपलें अभिनंदनपर पत्र आलें तें पावलें. त्याबद्दल मी आपला फार आभारी आहे. अक्षरासंबंधाने आपण पाठविलेल्या सूचनांचा छापील कागदहि मिळाला. त्यापैकी कांही अक्षरांची दुरुस्ती मी अगोदरच केली होती. उदा. 'ख' लहान झाला होता तो मोठा केला; 'ळ' मोठा झाला होता तो लहान करून घेतला; याशिवाय 'य' जरा उभट झाला होता त्याचें वळण बदलून घेतलें. आकाराचा काना मूळ अक्षरापासून जरा दूर सरकला होता तो जवळ करून घेतला. वेलांटी, विशेषतः दीर्घ वेलांटी, डोक्याच्या रेघेपासून जास्त दूर गेली होती ती जरा अधिक खालीं आणली. आता ती रेघेपासून फार दूर दिसत नाही. यापेक्षा ती खालीं आणणें शक्य नाही. एकमात्रा व दोमात्रा यांचे खिळे जरा बारीक झाले होते ते मोठे करून घेतले आहेत. आपण 'द, द्र, द्व' यांच्या बाबतींत असें सुचविलें आहे कीं, त्याचा भाग जरा वाढवून घ्यावा. पण तसें करण्याने एक अडचण येते ती अशी कीं, 'द'चा दूकार करतां येणार नाही.

असो. माझ्या लक्षांत आल्या तेवढ्या सुधारणा मी केल्या आहेत. 'मोनोटाईप' यंत्रावर एकंदर २२१ अक्षरें व चार स्पेस बसवितां येतात. तेवढीं अक्षरें मी बसविलीं आहेत. परंतु यापेक्षा जास्त अक्षरें बसवावयाचीं असल्यास तशी सोय होऊं शकेल. पण त्याची जरूरी पडत नाही.

गेल्या आठवड्यांत येथे, मोनोटाईप यंत्रावर, केसरीच्या चालू वर्षाच्या पहिल्या अंकाच्या अग्रलेखांतील कांही ओळी कंपोझ करून तो टाईपच आमच्या संस्थेकडे पाठविला होता तो आपणांस पाहण्यास मिळेल. जरूर व शक्य तर तो टाईप केसरीच्या एखाद्या अंकांत छापावा.

८३८

### ७ मार्च १९३२—रामचंद्र शंकर राजवाडे, सोलापूर

तारीख १ रोजीं विजापूर तुरुंगांतून सुटून आलों. पूर्वीच्या अटी चालू आहेत. पोलीस ठाण्यावर हजेरी देत असतो. तूर्त तरी या सर्व अटी पाळीत आहें. चळवळींत भाग न घेण्याच्या अटी मान्य केल्यास बाकीच्या तीन अटी सरकार काढून घेईल. पण आम्ही कोणचीच अट लिहून देण्यास तयार नाही. शेट गुलाबचंद यांनी करमाळें येथेच रहावयाचें आहे. अंत्रोळीकर, गुलाबचंद, बापट वगैरे सर्वांनाच अटींचें बंधन आहे. हजेरीची अट मानहानीकारक उघड आहे. तरी ती मोडून पुन्हा तुरुंगांत जावें, किंवा सार्वजनिक जीवनाचें जें कार्य हजेरी देऊनहि करता येण्यासारखें आहे तें करणें एवढाच लाभ समजून अट पाळून रहावें, हा प्रश्न मनापुढे उभा राहिला आहे. तरी काय करावें, यासंबंधी आपण सल्ला द्यावा. आपणांस समक्ष भेटावें अशी इच्छा होती. परंतु सोलापूराहून बाहेर जाण्यास परवानगी नाही. तरी आपण खुलासेवार सल्ला कळवावा.

८३९

### ११ मार्च १९३२—बाबूराव मिस्त्री, पेंटर, कोल्हापूर

चित्रकार फडके यांनी केलेला मातीचा पुतळा येथे आणविला आहे. त्यावरील मेणाचें काम करणें व तों ओतविणें हीं आता व्हावयाचीं. त्याला प्रथम २५०० रुपये पाहिजेत. मुंबई स्मारक कमिटीने फडके यांना देण्याची उरलेली रक्कम आपणाकडे दिली आहे. मात्र ती फडके यांच्या हातीं न देतां पुतळा ओतण्याच्या कामाकडेच खर्ची लावावी, अशी अट त्यांनी आपणांस कळविल्याचें समजतें. तरी ती रक्कम या कामीं आगाऊ देण्याची म्हणून मजकडे आल्यास किर्लोस्करवाडी येथे पुतळा ओतवून घेण्याची सर्व तयारी मी करीन.

८४०

### ५ एप्रिल १९३२—सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, मुंबई

देवळें व स्मशानघाट या ठिकाणीं अस्पृश्यांना प्रवेश करूं देण्याविषयी तुम्हाला काय वाटतें ? माझ्या कांही स्नेह्यांच्या मतें तुम्ही आम्ही व इतर कांही लोकांनी आपला अभिप्राय प्रकट करणारें एक पत्रक प्रसिद्ध करावें. त्याचा मसुदा

सोबत पाठविला आहे. त्यांत कांहीं फेरबदल करावासा वाटल्यास तसें कळवाल, आणि पत्रकावर सही कराल, तर आभारी होईन. तुमचा स्पष्ट अभिप्राय मला कळवावा.

### ८४१

### ८ एप्रिल १९३२—द. वि. ताम्हनकर, लंडन

मी हल्लीं महात्मा गांधींचें चरित्र लिहित आहे व त्याकरिता वाचीतहि आहे. त्यांत १८।३।१९२३ च्या 'यंग इंडिया' पत्रांत महात्मा गांधींच्या खटल्या-वरील तुमचा लेख दृष्टीस पडला तो वाचला व वाटतें तें खऱ्या मनानें लिहितों. मराठी लेखक या नात्यानें तुमच्या लेखनशैलीचा मी एक नेहमी भक्त व चाहता आहेच. तुमचा सूक्ष्म व नाजूक विनोद, वाक्याची सुंदर तालबद्धता, आणि त्यांतील प्रसाद, हे गुण इतर कोणांतहि आढळणार नाहींत हें निःसंशय. तुमचे लेख वाचले म्हणजे ती एक मेजवानी वाटे. पण वाटे की, मराठी ही तुमची मायभाषाच असल्यामुळे तुम्ही तींत असें लिहूं शकता हें स्वाभाविक आहे. परंतु तुमच्या इंग्रजी लेखनांतहि हे गुण पाहून मला आश्चर्य वाटते. गांधीवरील या तुमच्या लेखाला तोड मिळणार नाही. पहा की, हा लेख तुम्ही त्या खटल्यानंतर एक वर्षानें लिहिला. पण तुम्ही त्या लेखांत न्यायाधीश, आरोपी, वकील, कोर्ट हाऊस, श्रोतृ-समाज या सर्वांचें चित्र काढलें तें आज माझ्या डोळ्यापुढे मी तेथे हजर असल्याप्रमाणे उभें राहत आहे. त्या चित्रांत फक्त एका आकृतीचें वर्णन नाही. ती मात्र मी मनानें आता त्या चित्रांत बसविली आहे. आणि तो सर्व देखावा तुम्ही बसल्या बसल्या किती मार्मिक नजरेनें न्याहाळीत असला पाहिजे याची कल्पना करण्यांत मला मौज वाटते. तुम्ही आपले सगळे गुण या लेखांत ओतले आहेत. चवदा वर्षांपूर्वीच्या लोकमान्यांची प्रतिमाहि वाचकांच्या डोळ्यापुढे तुम्ही उभी केली आहे. मी माझें हें कर्तव्य समजूत लिहीत आहे. वडिलांची धाकट्यांनी स्तुति केली तर तिचा कित्येक वेळीं भलताच अर्थ होतो म्हणूनच हें मुद्दाम लिहीत आहे.

### ८४२

### ११ एप्रिल १९३२—सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, मुंबई

तुम्ही सविस्तर अभिप्राय पाठविला याबद्दल आनंद वाटतो. तुमच्या विचा-

राची दिशा व धोरण हीं माझ्या लक्षांत आलीं. कमींत कमी विरोधाच्या बाजूने पुढे पाऊल टाकावें असें तुमचें म्हणणें दिसतें. माझी मात्र खात्री झाली आहे कीं, या कामीं तुमच्या माझ्यासारख्या लोकांनी शक्य तितक्या लवकर लोकमताचा धक्का देऊन पाऊल पुढे टाकल्याशिवाय आता गत्यंतर नाही. तुम्ही मुंबईस याल तेव्हा समक्ष व बरोबर चार स्नेही मंडळी घेऊन खाजगी चर्चा करूं. सनातनी पक्षाच्या विचारसरणीला केवळ रूढि व भावना याशिवाय दुसरें पाठबळ नाही. यामुळे त्यांच्याविषयी सहानुभूति वाटणें शक्य नाही. तथापि आपण सर्व एक विचाराचे असतांहि नक्की काय करावें हें लक्षांत येत नाही एवढी गोष्ट खरी. तुम्ही याल तेव्हा मी खालील गृहस्थांना चर्चेला बोलावीन. ते म्हणजे १ जयकर २ सर चुनीलाल मेथा ३ वालचंद हिराचंद ४ डहाणूकर ५ लालजी नारायणजी ६ मनमोहनदास रामजी ७ त्रिकमदास द्वारकादास ८ सर लल्लुभाई सामलदास. यांत मी आडमुठ्या सनातनी अशा कोणाचा समावेश केला नाही. पण या कामीं तुम्ही जो मार्ग दाखवाल तो स्वीकारीन.

८४३

११ एप्रिल १९३२—रामचंद्र शंकर राजवाडे, सोलापूर

मी अजून पॅरोल देत आहें. अद्यापि मोडण्याचा विचार नाही. परवा डि. मॅ. नाइट यांची भेट घेतली. त्यांनी राजकीय चळवळींत भाग घेणार नाही इत्यादि अटी लिहून मागितल्या, त्या तशाच जवळ जवळ पॅरोलमध्ये असतां वेगळ्या लिहून कां मागतां असें मी विचारलें. त्याचा खुलासा त्यांनी केला नाही. आणि मीहि त्यांस लिहून देण्याचें नाकारलें. कर्मयोगी प्रेसच्या बाबतींत झाला असा जुलूम इतर कोठेहि झालेला नाही, नवजीवन प्रेसदेखील परत दिला आहे, इत्यादि गोष्टी नाइटसाहेबांना मी बोललों. परंतु उत्तर नाही. गुलाबचंदांच्या खटल्याचा निकाल होऊन वीस हजार रुपये दंड, दीड वर्षे सक्तमजुरी व दंड न दिल्यास आणखी चार महिने अशी शिक्षा मॅजिस्ट्रेटने दिली. सबंध चळवळींत येवढा दंड इतर कोणास कधीं झाला नाहीं ! यावरून सरकारचा खुनशीपणा किती हें लक्षांत येईलच.

८४४

४ मे १९३२—तारा दत्त, एल्एल्. बी. चिटणीस, विधवाश्रम, आग्रा

हें पत्र घेऊन येणारी एक आर्यसमाजी स्त्री आहे. तिच्या दोन मुली कोणा

ख्रिस्ती मिशनरीच्या ताब्यांत असून त्या परत मिळविण्याच्या कामीं तिला अद्यापि यश येत नाही. मुली चौदा व अकरा वर्षांच्या आहेत. तरी त्या परत मिळवून देण्याच्या कामीं आपण साहाय्य करावें.

८४५

**१० मे १९३२—आर. एस. निंबकर, मिरत तुरुंग**

यासोबत मी स्वतः व एकंदर अठरा आरोपी यांच्या वतीने कोर्टांत दाखल करण्याकरिता तयार केलेलें जबाबाचें पत्रक तुम्हाकडे पाठवीत आहें. वकीलांच्या तक्रारी सुरू आहेत. सरकारी वकीलाचें भाषण या महिनाअखेर सुरू होईल. जुलै महिन्यांत चौकशीचें काम संपून सप्टेंबरांत कोर्ट निकाल सांगेल असें वाटतें. मध्यंतरीं थंड हवेच्या ठिकाणच्या तुरुंगांत आम्हाला पाठवितील असें वाटतें.

८४६

**२३ मे १९३२—प्रो. ना. सी. फडके, कोल्हापूर**

तुमची लेखी मुलाखत पोंचली. सर डेनीस ब्रे यांनी तुम्हांला जो स्तुतीचा करभार दिला आहे तो कोणालाहि अभिमानास्पद वाटेल. तुमच्याप्रमाणेच इतर मोठ्या वक्त्यांचे अभिप्रायहि मी जमविणार आहें. आणि वक्तृत्व या विषयावर एकजिनसी सामुदायिक विचारसंग्रह तयार करणार आहें. फडके यांनी तयार केलेला प्लास्टरचा टिळकांचा पुतळा कोल्हापुरांत आला आहे. बाबूराव पेंटर यांनी मेणाचे छाप घेण्याचें काम पत्करलें आहे. आणि प्रत्यक्ष ब्रॉंझचा पुतळा ओतण्याचें काम किर्लोस्कर बंधु करणार आहेत. तरी या कामीं तीन हजार रुपये लागतील ते कोठून तरी मिळाले पाहिजेत. फडके व बाबूराव पेंटर या दोघांनाहि ही रक्कम उभारतां येत नाही. तरी मुंबईच्या स्मारक कमिटीकडे खटपट करण्याविषयीं विनंति आहे. पुतळ्यासंबंधीं आजवर झालेल्या हकीगतीवरून तुमच्या मनांत काय काय शंका येतात, याची कल्पना मला चांगली करतां येते. परंतु तुम्ही आपलें वजन खर्च कराल तरच हें काम अखेर तडीला जाईल.

८४७

**२६ मे १९३२—ब्रह्मचारी दिनानाथ, संचालक, धर्मप्रचार मंडळ, बडोदें**

गोव्यांतील भारतकार हेगडे देसाई यांच्या आग्रहावरून आम्ही तेथेच कार्य

ऽरीत असतों हें आपणांस कळलें असेलच. हल्ली आम्ही एक मठमंडळ स्थापून सांघिक रीतीने धर्मप्रचाराचें काम सुरू केलें आहे. शुद्धीकरणाचें काम सुरू आहे. कीर्तनद्वारें मतप्रचार करवितों. आर्थिक दृष्ट्या व अितर रीतीनेहि आम्हांला फारच त्रास होतो. परंतु आला पाहुणा विन्मुख धाडीत नाही. द्रौपदीच्या थालीप्रमाणे आमची झोळी आमचें रक्षण करीत असते. आमच्या कार्यास आशीर्वाद द्यावा व मार्गदर्शक उपदेश करावा.

८४८

### ३० जून १९३२—प्रो. ना. सी. फडके, कोल्हापूर

आपली लेखी मुलाखत पोंचली. उत्तरांची वांटणी प्रश्नवार करण्याचा विचार नाही. आपलीं सर्व उत्तरें एकत्रच घालणार आहें. टिळकांचा पुतळा ओतून हाता-वेगळा होऊन मुंबईस बसविला जावा याविषयी अडचण आली ती पैशाची. म्हणजे ओतकामाच्या किर्लोस्कर कंपनीच्या बिलाची नव्हे. तर ओतकामास प्रारंभच करतां येण्याच्या पूर्वतयारीकरिता ही रक्कम निदान दोन हजार तरी हवी. मुंबईच्या स्मारक मंडळाजवळ पांच हजार रुपये आहेत त्यांतून ती मिळण्यास मदत कराल काय ? आम्ही एक हजार रुपये जमविण्याची खटपट करीत आहों. फडके आर्टिस्ट मुंबईहून आले आहेत. तरी आता मातीच्या पुतळ्यावरून मोल्ड घेण्याचें व मेणाचें काम लवकरच सुरू होईल अशी खात्री असूं दे. तरी या दोन हजार रुपयांची तजवीज आपण कसेंहि करून करून द्या.

८४९

### १ जुलै १९३२—रामचंद्र शंकर राजवाडे, सोलापूर

माझ्यावर बजावलेल्या ऑर्डिनन्स नोटीसची मुदत येत्या तीन तारखेपर्यंत होती. पण काल एक नवी नोटीस बजावली आहे. तींत सर्व जुन्या अटी असून Until further orders एवढे शब्द आहेत. ऑर्डिनन्स ३ जुलैला संपणार असून, त्यांत खूपअधिक कालपर्यंत अंमलांत राहणारी व अनिश्चित कालमर्यादेची नोटीस सरकारास कशी काढतां येते असा प्रश्न आहे. ती बेकायदेशीर आहे असें वकिलांचें मत आहे. आपण मंडळी विचार करून कळवावें. ती बेकायदेशीर म्हणून मोडून, पण पॅरोलभंग म्हणून नव्हे, खटला करून घेऊन कोर्टांत भांडावें कीं काय

तें ठरविण्याचा मानस आहे. आपला अभिप्राय उपयोगी व महत्त्वाचा आहे हें सांगणें नकोच. कर्मयोगी छापखान्याचें सामान विकून त्याच्या जागेंतून हलविलें तें सरकारने विकूं नये अशी खटपट डॉ. वैशंपायन यांनी हॉडसन साहेबांकडे केली पण फुकट गेली.

८५०

२४ जुलै १९३२—ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर

कोल्हटकर—लेखसंग्रहाच्या आपल्या प्रस्तावनेचीं प्रुफें मी पाठविलेलीं पोचलीं असतील. तसेंच कर्नाटक प्रेसकडूनहि प्रुफें आलीं असतीलच. तीं सर्व तपासून पाठविल्यावर त्यांच्यासंबंधाने मला कांही सूचना करावयाच्या असल्यास कराव्या. स्वतः तात्यासाहेबांनी ( कोल्हटकर ) फक्त एकदोन ठिकाणीं ज्या दुरुस्त्या सुचविल्या आहेत, त्या मी प्रुफांवर करणार आहें.

'मराठीचें अंतरंगदर्शन' लौकरच ॲकॅडेमीकडे पाठवितों. पण उपयोग होणार नाही. कारण या प्रांतांतल्या ग्रंथकारांनाच बक्षिसें द्यावीं असा नियम असावा असें वाटतें.

८५१

६ ऑगस्ट १९३२—ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर

आंपलें पत्र व त्यानंतर लगेच प्रुफेंहि मिळालीं. तात्यासाहेब कोल्हटकरांना तीं सर्व अेकवार वाचून दाखविलीं. आपण त्यांच्या प्रतिभास्वातंत्र्याविषयी लिहितांना त्यांनी कशावरून काय घेतलें आहे, वगैरेबद्दल जें लिहिलें आहे त्यांत त्यांनी फरक सुचविले होते. त्यांतले जे ग्राह्य वाटले ते मी केले, व जे मतभेदाच्या सदरांत मोडतील असे वाटले ते केले नाहीत. आपण प्रस्तावनेच्या प्रुफांत नवी भर कांहीच घातली नाही, व पृष्ठसंख्येची मर्यादा अगदीं कांटेतोलपणाने पाळली! आणखी थोडा मजकूर लिहिला असता तरी चाललें असतें. अेक इच्छा अशी आहे कीं, ग्रंथ मनाजोगा छापून जर चांगली रक्कम हातीं आली तर तात्यासाहेबांच्या नांवाचीं सुवर्णपदकें दोन्ही युनिव्हर्सिट्यांतून मराठीच्या पदवीधरांना ठेवून त्यांचें स्मारक करावें.

८५२

२१ ऑगस्ट १९३२—मुकुंदराव जयकर, मुंबई

ठरल्याप्रमाणें माझ्या घरीं सभा झाली. तुम्ही येऊं शकलां नाही .याबद्दल

वाईट वाटतें. पुरुषोत्तम ठाकुरदास, चुनीलाल मेथा, माडगांवकर, जोशी, पी. बाळू, नटराजन् व स्वतः मी असे होतों. दोन तास खल झाला. अखेर बहुमताने असा निर्णय ठरला: कीं, अॅवार्ड तर वाईटच आहे; तथापि तुम्ही आपल्या पत्रांत सुचविलात तो मार्ग स्वीकारावा. म्हणजे हिंदूंनी सबूरी करून कॉन्स्टिटयूशनली काय काय नवीन घटना बनून येतील त्यांवर लक्ष देऊन असावें. सर पुरुषोत्तमदास यांचें मत विरुद्ध पडलें. गांधी आणि काँग्रेस करतील तें शिरोधार्य! त्यांनाच एकट्याला हिंदुस्थानच्या वतीने बोलण्याचा हक्क. हें आपलें नेहमीचें मत त्यांनी मांडलें. अर्थात् त्यांचें म्हणणें आम्हांस बिलकूल पसंत पडलें नाही. शेवटीं असें ठरलें कीं, सर्वांनी मिळून संयुक्त पत्रक काढण्याच्या भानगडींत पडूं नये. ज्याने त्याने इच्छेस येईल तर आपलें मत स्वतंत्रपणें वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करावें. मी माझें मत प्रसिद्धीसाठी दिलें आहे. तें मंगळवार किंवा बुधवारीं तुम्हास वाचावयास मिळेल.

तुमच्या ६१ व्या वाढदिवसाबद्दल मी तुमचें व्यक्तिशः मनःपूर्वक अभिनंदन करतों. नाना कार्यक्षेत्रांत तुमची कामगिरी उठून दिसण्यासारखी झाली आहे. तुम्हाला अनेक शत्रु निर्माण झाले आहेत, हाच तुमच्या कर्तृत्वाचा एक पुरावा होय. या उत्सवप्रसंगीं स्वतःचा सन्मान करून घेतांना तुम्हास साहजीकच संकोच होईल; पण त्याला इलाज नाही. तुम्ही लोकप्रसिद्ध कां झालांत!

८५३

**३ सप्टेंबर १९३२—ए. रंगस्वामी अय्यंगार, संपादक ' हिंदु ' मद्रास**

तुमच्या षष्ठ्यब्दिपूर्ति समारंभाच्या मुंबई, पुणें वगैरे ठिकाणच्या सभांच्या हकीकती वाचून फार संतोष झाला. असो, हें पत्र मुद्दाम लिहिण्याचें कारण असें कीं, या प्रांतांतील सर्वांत प्रमुख अशा 'स्वदेशमित्रन्' पत्राची गोल्डन ज्युबिली ८ ऑक्टोबर रोजीं व्हावयाची ठरली आहे. त्या वेळी तुम्ही अध्यक्षस्थान स्वीकारावें अशी आमच्या वाचकांची व हितचिंतकांची तीव्र इच्छा आहे. टिळकांनी स्थापलेल्या, महाराष्ट्रांतील सर्वांत अग्रेसर अशा, 'केसरी' पत्राचे संपादक म्हणून, 'स्वदेशमित्रन्'चे संपादक व संस्थापक सुब्रह्मण्य अय्यर यांचे स्नेही व सहकारी म्हणून, व देशी संपादकीय व्यवसायांतले खडतर अशा—गेल्या ३० वर्षांतील तज्ज्ञ म्हणून—या सर्वच दृष्टींनी तुम्हीच अध्यक्षस्थान स्वीकारलें पाहिजे. ताबडतोब उत्तर पाठवा.

८५४

## २६ सप्टेंबर १९३२—श्रीमंत राजे बाबासाहेब पंतसचिव, पुणें

तुमच्या ६१ व्या वाढदिवसाचे दिवशीं मी अन्य जरूरीच्या व्यवसायांत गुंतल्यामुळे मला तुमच्या विषयींचा आदरभाव व्यक्त करतां आला नाहीं. आता ही दुसरी संधि आली आहे ती मी दवडणें शक्य नाही. तुम्ही देशाची सेवा एकनिष्ठपणें व अखंडपणें इतक्या विविध प्रकारांनी केली आहे की, तरुण पिढीला तुमचा खुशाल आदर्श ठेवावा. मराठी भाषेच्या व वाङ्मयाच्या क्षेत्रांतील तुमची कामगिरी तशीच अभिनंदनीय व खरोखर कोणालाहि मत्सर वाटण्याइतकी सरस झाली आहे. तुमच्या ठिकाणी असलेली कुशाग्रबुद्धि, विद्वत्ता, आणि सूक्ष्म कायदेपांडित्य हीं अनुकरणीयच ठरतील. सामाजिक, धार्मिक, विषयांत तुमची मतें जुन्यांतलें चांगलें स्वीकारून नवें आत्मसात् करावयाचें अशी आहेत हिंदी संस्थानांबाबतचें तुमचें धोरण हें त्याचें अेक उदाहरण म्हणतां येईल. हिंदी संस्थानांना हळुहळू 'कॉन्स्टिटयूशनल मॉनर्कीज'मध्ये परिणत करून भावी फेडरेशनचे घटकावयव त्यांना बनविणें, हें तुमचें ध्येय मला अभिनंदनीय वाटतें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे 'नृपतिजनपदानाम् दुर्लभः कार्यकर्ता' या संस्कृत श्लोकांत वर्णिलेली महनीय योग्यता तुमचे ठिकाणी आहे असें मी मानतों.

८५५

## २६ ऑक्टोबर १९३२—सर शिवस्वामी अय्यर, मद्रास

गोलमेज परिषदेकरिता लंडनला तुमचा प्रवास सुखकर होवो. बृहस्पति आणि हनुमान तुमचें रक्षण करोत. लष्कराचा प्रश्न कॉन्स्टिटयूशनच्या बाहेरचा आहे हें तत्त्वतः खरें असलें तरी, प्रत्यक्ष व्यवहारांत देशाच्या रक्षणाची म्हणजे लष्कराची तरतूद असल्याखेरीज कोणताहि देश राष्ट्र या पदवीला पोंचणार नाही. सध्या लष्करांत पंजाब्यांची फार भरती होते, आणि मुसलमान व शीख या दोन जातींतलेच लोक घेतले जातात. हिंदुस्थानच्या लष्करांतून गोऱ्या लोकांची हकालपट्टी खुशाल आधी करा, पण तें साध्य झाल्यावर भावी हिंदी सरकाराची मोठी अडचणीची स्थिति होईल. एकाच प्रांतात म्हणजे शीख व मुसलमान या दोनच जातींचा वरचष्मा होईल. तें मोठेंच संकट आहे. त्याला उपाय लष्करभरतीची पद्धति सुधारली पाहिजे. अमुक एक प्रांताचा, अमुक एक जातीचा, किंवा अमुक एक घराण्यांतला, म्हणून

सध्या होत असलेल्या निवडी बंद करून कोणालाहि प्रवेश करून घेण्याची सवड मिळविली पाहिजे. याखेरीज दुसरीहि एक गोष्ट साधून घेतां आल्यास पहा. ती म्हणजे लष्करावरील ब्रिटिशांचा ताबा काढून घेऊं अशाविषयी मुदतबंद आश्वासन. मुदत थोडी मागे पुढे झाली तरी चालेल. तीस वर्षे कां होईना तीहि चालेल. पण तसें निःसंदिग्ध व स्पष्ट आश्वासन पाहिजे. असो. प्रत्यक्ष तेथे काय घडेल तें घडो; पण तुमचें म्हणणें ठणठणीत रगें सांगा व तें रेकार्डवर नमूद होईल असें करा.

८५६

६ नोव्हेंबर १९३२—इंदुभूषण सेन, लंडन

गेल्या कॉन्फरन्सला येण्यांत तुम्ही जें मनोधैर्य दाखविलेंत त्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. इंग्रज लोकांशीं, किंवा भावनाप्रधान राष्ट्रीय पक्षाच्या हिंदी लोकांशीं वागतांना तुम्ही मनोधैर्य दाखवाल याविषयी मला शंका नव्हती. पण मला अचंबा वाटला तो सर तेजबहादूर सप्रूंच्या मनोवृत्तीचा. त्यांच्या-विषयी मला अत्यंत आदर वाटत असे. गांधींनी आपल्या कायदेभंगाच्या व सत्या-ग्रहाच्या कार्यक्रमासाठी लोकांना भुलवून आपल्या कार्यक्रमाला लोकप्रियता आणण्याची खटपट चालविली आहे. त्या बिचाऱ्याचा त्या कार्यक्रमावर पोरा-सारखा पूर्ण विश्वास बसला आहे. अर्थात् त्यांच्या वर्तनाचें कोडें सुटूं शकेल, पण तेजबहादूरांच्याबद्दल मात्र उलगडा होत नाही.

गेल्या फेब्रुवारींत मी हिंदुस्थान सोडलें आणि इजिप्त, ग्वायना, पॅलेस्टाईन, तुर्कस्तान इकडे प्रवास केला. आंगोऱ्याहून कॉन्स्टॅंटिनोपल, ग्रीस, ज्यूगोस्लाव्हिया, रूमानिया, हंगेरी वगैरे वगैरे ठिकाणीं गेलों. नंतर ३ आक्टोबर १९३२ पासून लंडनलाच आहें. यापुढे बॅरिस्टरी करावयाची नाही असें ठरविलें आहे. आजवर म्हणण्यासारखी पैशाची कमाई कांहीच केली नाही. तरीसुद्धा बॅरिस्टरी बंदच करणार आहें.

मी आता इंग्लंडांत १।२ महिनेच राहीन. तुम्हाला भेटण्याची इच्छा आहे. श्री. जयकरांना मी थोडेसें ओळखतों. माझा तुम्हास कांही उपयोग होण्यासारखा असल्यास मी तयार आहें. अलिकडे फार दिवसांत आपली भेट झाली नाही म्हणून इतकें लिहिलें. तुमच्या घरीं मी पुण्यास जेवावयास आलों होतों तीच शेवटची भेट.

८५७

८ नोव्हेंबर १९३२—धनंजयराव गाडगीळ, पुणें

तुमच्या पत्राचें उत्तर जाण्यास उशीर होत आहे याबद्दल दिलगिरी वाटते. मी नागपुरास गेलों होतों तेथून आल्यानंतर महाजनी व परांजपे यांच्याशीं बोलणें होण्यास विलंब लागला. त्यांच्याकडून तुमच्या व गव्हर्नराच्या भेटीची हकीकत कळली. पण विशेष तपशील कळूं शकला नाही. शिवाय तुम्ही गव्हर्नरास त्याबाबत काय लिहिलें याचीहि मला कल्पना नव्हती. आणि मी गव्हर्नराची गांठ घ्यावयाचें म्हटलें तर महाराष्ट्र युनिव्हर्सिटी वर्किंग कमिटीचा चिटणीस या किंवा अशा नात्याने घ्यावयास पाहिजे. अद्याप तर वर्किंग कमिटीनेंच आपल्या कल्पना स्पष्टपणें आंखल्या नाहीत व योजना तयार केलेली नाही. अशी स्थिति असल्यामुळे माझी अडचणीची स्थिति झाली आहे. रा. ब. काळे यांचा व इतरांचा मी सल्ला घेतला. त्यांचेंहि म्हणणें असें कीं, इतक्यांतच इंटरव्ह्यू मागूं नये. मध्यंतरीं कांही लोकांच्या मदतीने मी एक तपशीलवार योजना करीत आहें. तुम्ही व जयकर विलायतेहून परत येईपर्यंत त्याला स्वरूप येईल. मग कमिटीला प्रत्यक्ष पुढे पाऊल टाकतां येईल. माझी ही योजना तुम्हास मान्य होईल अशी आशा आहे.

८५८

१२ नोव्हेंबर १९३२—प्रो. एडवर्ड थॉमसन, ऑक्सफर्ड (इंग्लंड)

पुण्यास आपली भेट झाल्याचें तुम्हास स्मरण असेलच. तुम्ही राउंडटेबल कॉन्फरन्सला आलां आहांत हें ठीक झालें. तुम्ही हिंदुस्थानास परत जाण्यापूर्वी एकवार ऑक्सफर्डला आमच्याकडे यावें अशी विनंति आहे.

८५९

१४ नोव्हेंबर १९३२—ए. रंगस्वामी आयंगार, संपादक, हिंदु, मद्रास

सरकारचें ड्रॅफ्ट बिल पाहतां मर्यादित प्रांतिक स्वायत्ततेच्या पलीकडे कांही मिळणार नाही अशी सार्वत्रिक समजूत आहे. तपशिलांत शिरण्याच्या अगोदर तुम्ही शक्य तर आधी हा खुलासा सरकारकडून काढावा कीं, संस्थानिकांच्या-अलीकडील धोरणामुळे सरकारच्या धोरणांत कितपत बदल झालेला आहे, व त्यायोगें प्रांतिक स्वायत्ततेच्या सुधारणांचा आणखी किती संकोच होण्याचा संभव आहे.

ही फार महत्त्वाची गोष्ट आहे. तिचा सुरुवातीसच निकाल करून घेतला पाहिजे.

राउंडटेबल कॉन्फरन्समध्ये ज्या घटनेच्या मसुद्याचा विचार व्हावा असें सर्व ब्रिटिश पक्षांच्या अनुमताने ठरलें आहे त्यांत फेडरेशन, रिस्पॉन्सिबिलिटी, म्हणजे अधिकारदान, व सेफ् गार्ड्स् इतके विषय येतात. कॉन्झरव्हेटिव्ह पक्ष म्हणेल कीं, संस्थानिक ब्रिटिश-इंडियाशीं सहमत होऊन फेडरेशनला, कबूल असतील तरच मध्यवर्ती सरकारच्या कामकाजांत अधिकार देण्याचें आम्ही कबूल केलें होतें. तसें फेडरेशन कोणच्याहि कारणाने होत नसेल तर मध्यवर्ती सरकारच्या कारभारांत सत्ता देण्याचा प्रश्नच उत्पन्न होत नाही. या आक्षेपाला मुळांतच तुम्ही विरोध करा. सप्रू व जयकर यांच्याकडूनहि तसें करून घ्या. सप्रू-जयकरांना फेडरेशन होऊं शकेल व चालूं शकेल असें प्रामाणिकपणें वाटत असल्यामुळे ते मध्यवर्ती सत्तेचा प्रश्न आणि फेडरेशनचा प्रश्न एकत्र विचारांत घ्यावा असें म्हणतात. पण यदाकदाचित् फेडरेशनचा प्रश्न लांबला किंवा रद्द झाला तर काय परिणाम होईल याचा त्यांनी विचार केलेला दिसत नाही. नुसती प्रांतिक स्वायत्तता मुळींच स्वीकार्य नाही असें सप्रूंनीच वेळोवेळीं म्हटलें आहे. म्हणून फेडरेशनबाबत कांही वांधा येण्याचा संभव असेल तर त्यांनीच आता असें स्वच्छ म्हटलें पाहिजे की, मध्यवर्ति सरकारांतली सत्ता ब्रिटिश-इंडियापुरती आम्हाला पाहिजे. ती नसेल तर भावी फेडरेशनचा नुसता हवाला देऊन प्रांतिक स्वायत्ततेच्या केवळ गूळखोबऱ्याने आमचें समाधान होणार नाही. या प्रश्नांचा सुरुवातीसच निकाल झालेला बरा. कारण रिस्पॉन्सिबल सेंट्रल ऑथॉरिटीचा प्रांतावर चालणारा अधिकार आणि इरिस्पॉन्सिबल सेंटरचा अधिकार यांत फार फरक आहे. बेजबाबदार सेंटरच्या ताब्यांत प्रांतांचीं सूत्रें गेलीं तर प्रांतिक स्वायत्तता पोकळच ठरेल. पहिल्या दोन राउंडटेबल कॉन्फरन्समध्ये फेडरेशनची कल्पना जी ठरली, ती दुरुस्त करण्याची संस्थानिकांनी आता जी मागणी सुरू केली आहे, तिच्यायोगें फेडरल सेंट्रल ऑथॉरिटी हातीं येण्यांत तूर्त अडथळाच येईल. आणि म्हणून सुरुवातीसच सरकारकडून असा खुलासा काढला पाहिजे कीं, आर्थिक राजकीय व घटनाविषयक तत्त्वें जीं पूर्वीच्या दोन कॉन्फरन्समध्ये मान्य केलीं गेलीं तीं तशींच अद्याप सरकारास मान्य आहेत ना ?

आमचे लंडन येथील बातमीदार फ्रेडरिक ग्रब म्हणून आहेत त्यांना तुम्हांस

भेटण्यास सांगितलें आहे. ते पूर्ण विश्वासू आहेत. त्यांचा तुम्हालों फार उपयोग होईल.

८६०

## १७ नोव्हेंबर १९३२—श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन, मिरज

आपण प्रथमपासून संस्थानांचे अभिमानी आहां ही गोष्ट महशूर आहे. चेंबर ऑफ् प्रिन्सेसूची जी घटना करण्यांत आलेली आहे ती किती सदोष आहे हें आपणांस पूर्ण अवगत आहे. मॉंटेग्यू–चेम्सफर्ड रिपोर्टामध्ये जे फुल-पॉवर चीफ्स असतील त्यांचा समावेश चेंबरमध्ये जाहला पाहिजे, असें तत्त्व प्रतिपादन केलेलें असून, त्यास बाजूस सारून तोफांच्या सलामीच्या प्रश्नास अवास्तव व फाजील महत्त्व देण्यांत आलेलें आहे. आम्ही दक्षिण महाराष्ट्रांतील संस्थानिक हिंदुस्थान सरकारच्या राजधानीपासून फार लांब असल्याने आमच्याकडे हिंदुस्थान सरकाराचें दुर्लक्ष झालें आहे; व अलीकडे तोफांच्या सलामीचा व पदव्यांचा जो नवीन उपक्रम करण्यांत आलेला आहे त्याचा लाभ आम्हांस न्यायाने जसा मिळावयास पाहिजे तसा बिलकूल मिळालेला नाही. दक्षिण हिंदुस्थानांतील आम्ही संस्थानिक यांतून अन्यायाने वगळले जात आहों, हीच आमची मुख्यतः तक्रार आहे. आपण अखिल हिंदुस्थानची राज्यघटना ठरविण्यास गेलां आहां, व त्यांत सबंध हिंदुस्थानचें फेडरेशन हा एक अतिशय महत्त्वाचा भाग आहे. तें ठरवितांना साहजिकच चेंबर ऑफ प्रिन्सेस व तिची घटना हा प्रश्न आपल्यापुढे येणार आहे. तरी तो तसा आल्या वेळीं अगर अन्य कांही संधि साधून आपण हा प्रश्न प्रातिनिधींच्या पुढे मांडून त्याचा योग्य रीतीने निकाल लावून घ्यावा अशी विनंति आहे. फेडरेशनमध्ये मिळण्यास आमची कोणत्याहि प्रकारची हरकत नाही.

८६१

## १९ नोव्हेंबर १९३२—श्री. कृष्णाबाई खरे, लंडन

आपलें पत्र मिळालें. मी उद्या तर येईनच. पण आपलें बोलावणें मिळालें नसतें तरी एकदा आगांतुकी करण्याचा माझा विचार होता. कमळाबाई व मी एकाच ठिकाणीं शिकलों व त्यांची माझी चांगली ओळख आहे. ही गोष्ट आपल्याला माहिती आहे कीं नाही हें मला माहित नाही. तरीपण आपण त्यांचे

वडील या नात्यानें मी तेवढा अधिकार घेणार होतें. असो. आपल्याबरोबर व सभोवती आपलें कोणतेंहि काम करण्यास उत्सुक अशी मंडळी असणारच. तरी पण जर मला कमळाबाईंची थोडी फार उणीव भरून काढता आली तर मला आनंदच होईल.

८६२

१९ नोव्हेंबर १९३२—रामभाऊ कानिटकर, वकील, बुलढाणा

तुमचें बोटींवरून लिहिलेलें पत्र पोचलें. वऱ्हाड निजामाला परत देण्याविरुद्ध चळवळ गेल्या वर्षी नोव्हेंबर डिसेंबरांत झाली. ऑल पार्टी कमिटीनें या प्रश्ना-संबंधी वऱ्हाडांतील म्युनिसिपालट्या, लोकलबोर्डें, ग्रामपंचायती, धान्याच्या व कापसाच्या कमिट्या वगैरे सर्व प्रमुख संस्थांकडून मत मागविलीं. त्या बहुतेक सर्वांकडून विरोधाला अनुकूल अभिप्राय आला. वरील संस्थांत मुसलमान सभासदहि होते. त्यांपैकी कांहींजणांचें मत वऱ्हाड स्वतंत्र करण्यास अनुकूल आहे.

वऱ्हाड स्वतंत्र प्रांत करण्याबाबत निजामाचें म्हणणें काय आहे त्यांतले मुद्दे तुम्हास ठाऊकच आहेत. १९०२ च्या तहानें वऱ्हाडच्या राज्यकारभाराचा निरंतरचा हक्क हिंदुस्थान सरकारास मिळाला. त्या तहानें कोणत्याहि स्थितींत वऱ्हाडाची अदलाबदल करणें अशक्य करून टाकलें. निजामाला पंचवीस लाख रुपये हिंदुस्थान सरकारकडून निर्वेध मिळत राहतील तोंपर्यंत, हिंदुस्थान सरकारच्या राज्यघटनेंत कितीहि बदल झाला तरी, निजामाला वऱ्हाडाचा प्रश्न उपस्थित करतां येणार नाही.

८६३

२५ नोव्हेंबर १९३२—अनंत व्यंकटेश देशपांडे, लंडन

सात वर्षांपूर्वी मी आपणांस पुण्यामध्ये भेटलों. त्यावेळीं मी Incorporated Accountant होण्याकरिता घ्यावें लागणारें Practical Training घेण्यास अत्यंत उत्सुक होतों. परंतु द्रव्यसाहाय्य अजीबात नसल्यामुळे हिंदु एज्युकेशन फंडामधून कांही मदत मिळाल्यास पहावी म्हणून आपणाकडून शिफारसपत्र घेण्याकरिता आपल्याकडे आलों होतों. आपण तसें शिफारसपत्र देऊन मला फार आभारी केलेंत.

८६४

## २६ नोव्हेंबर १९३२—डी. सी. सेन, इन्कॉर्पोरेटेड अकाउन्टंट, लंडन

मी गेल्या मे महिन्यांत माझी फायनल परीक्षा पास झालों. तेथपासून सात महिने नोकरी करून हिंदुस्थानला परत जाण्यापुरता पैसा मिळवावा म्हणून खटपट करीत आहें, पण नोकरी मिळत नाही. तूर्त मला एक हंगामी नोकरी मिळाली आहे. पण तेवढ्याने पोटच जेमतेम भागतें. राउंड टेबल कॉन्फरन्सच्या हिंदी डेलिगेटांपैकीं कोणाची चिटगिर्शी मिळाल्यास पहावी म्हणजे परत स्वदेशीं जाण्याइतका भरपूर पैसा मिळेल म्हणून खटपट केली पण जमलें नाही. आता तुम्ही तरी मला तशी मदत करून स्वदेशाला न्याल काय ?

८६५

## २ डिसेंबर १९३२—बॅ. रामराव देशमुख, अकोला

दुर्दैवाने वऱ्हाड स्वतंत्र प्रांत करण्याच्या प्रश्नांतच तो निजामाला परत देण्याच्या प्रश्नाची पुष्कळदा भेसळ केली जाते. सर्वसामान्य विधान करावयाचें तर मुसलमानाचें मत भावनादूषित आहे. निजामाकडे वऱ्हाड परत देण्याच्या प्रश्नावर जसें त्यांनी आपलें मत स्वच्छ सांगितलें आहे तसें, वऱ्हाड प्रांत स्वतंत्र करण्याच्या प्रश्नाबद्दल सांगितलेलें नाही. ज्या ज्या वळीं वऱ्हाडचा प्रश्न लोकांत चर्चेस निघाला त्या त्या वेळीं दिल्ली किंवा सिमला येथे हिंदुस्थान सरकारचा व निजामाचा वऱ्हाडाबाबत कांही तरी गुप्त खल झाला असल्याच्या तारा प्रसिद्ध झाल्या. माझा तर तर्क असा आहे कीं, मुख्य मुद्दा झाकून टाकण्यासाठी ती मुद्दाम व्यवस्थित रीतीने केलेली कारवाई असली पाहिजे. किंबहुना मध्यप्रांत सरकारच त्यांत प्रमुख असलें पाहिजे असाहि कयास आहे. कारण मध्यप्रांत सरकारचा वऱ्हाडशीं फारच निकट संबंध आहे. असो. कारणें कांहीहि असोत. मुसलमानांनी आपलें मत या प्रश्नावर निःसंदिग्ध रीतीने व्यक्त केल नाही हें खरें. शिवाय या प्रश्नावर अधिकृतरीत्या मत व्यक्त करू शकेल, अशी मुसलमानांची एकहि संस्था वऱ्हाडांत नाही. यामुळे जेवढ्या मुसलमानांनी आपलें मत नमूद केलें आहे तेवढेंच ग्राह्य धरलें पाहिजे. आमच्या ऑल पार्टी कमिटीवर एक मुसलमान सभासद आहेत. वऱ्हाडच्या प्रश्नाबाबत त्याचें आम्हांशीं सहमत आहे. दुसरे मुसलमान आम्हाशीं एकमत होत नाहीत, याचें कारण आपल्या या प्रश्नावरील अनुमतीमुळे आपण निजामा-

विरुद्ध आहोंत अशी टीका होईल, व त्यामुळे सामान्य अशिक्षित असलेल्या मुसलमान समाजांत आपली लोकप्रियता कमी होईल, अशी त्यांना भीति वाटते. कांही झालें तरी वऱ्हाड निजामाला परत मिळणें शक्य नाही, असे त्यांना पक्कें कळलें तर हे लोक मध्यप्रांताचें लोढणें झुगारून वऱ्हाडला स्वतंत्र प्रांत करा अशी मागणी केल्याशिवाय राहावयाचे नाहीत. सुशिक्षित मुसलमानांपैकींहि कोणी वऱ्हाड निजामाला द्यावा असें प्रतिपादलेलें नाही. तसा तो द्यावाच असें ठरलें तर कॉन्स्टिटयूशनल गॅरंटीज मागाव्यात असें त्यांचें मत आहे. म्हणजे त्यांत वऱ्हाडचे स्वतंत्र प्रांत म्हणून अस्तित्व येतेंच येतें.

८६६

२० डिसेंबर १९३२—वामन काशिनाथ कात्रे, रेनफ्रू, (स्कॉटलंड)

लंडन येथे आपला निरोप घेऊन मी येथे सोमवारीं पोंचलों. परत येतांना बरेंच वाईट वाटलें. तुमच्याकडून घरच्या मंडळींना माझी प्रत्यक्ष भेटीची हकीगत कळेल याबद्दल मला फार आनंद वाटत आहे. तुमच्यामागे बरीचशीं कामें असतांनादेखील तुम्ही मला तुमच्याशी बोलण्याची सुमारे ४।५ तास संधि दिलीत, याबद्दल खरोखरच मला अत्यानंद होत आहे. तुमच्याशीं बोलण्याचा हा माझा पहिलाच प्रसंग होय, त्यामुळे तर मला अधिकच आनंद होत आहे.

८६७

१५ जानेवारी १९३६—चि. श्रीधर देशपांडे, जलविजया आगबोट, पूर्वसमुद्र

मी कराचीहून १० तारखेस निघालों. आता कोलंबो मद्रासः या बंदरांवरून कलकत्त्यास आम्ही जात आहों. सध्या येथील हवा फारच सुरेख आहे. विशेषतः चांदण्या रात्रींची शोभा, बरोबर घरचीं माणसें नसल्यामुळे, या मोकळ्या समुद्रावर वाया जात आहे असें वाटतें. एखादें जहाज जर सर्व एकाच कुटुंबांतील माणसांनी चालवावयाचें म्हटलें तर मोठी मौज होईल ! बोटींवर जर कोणची एक गोष्ट कमी असेल तर ती म्हणजे घरचें आपलेपणाचें वातावरण. कलकत्त्यास नदीवरच्या लहान होड्यांत अथवा काश्मीरच्या गृहनावांत ज्याप्रमाणें एक कुटुंब राहून आपला चरितार्थ चालवितें त्याप्रमाणें समुद्रावरच्या या मोठ्या घरांत एखाद्या अविभक्त मोठ्या कुटुंबाचा योगक्षेम छान चालेल. इतर कोणच्याहि बोटीपेक्षा

अशी बोट सर्व दृष्टींनी जास्त कार्यक्षम ठरेल. प्रयोग करून पाहण्यासारखा आहे नव्हे!

डफरीनवरची पहिली बॅच मला १ वर्ष सीनियर असणारी या २।४ महि-न्यांनी ऑफिसर्सच्या प्रथम परीक्षेस बसेल. ती झाल्यावर हिंदी लोक अधिकारी म्हणून बोटीवर एकदम इतके जण येण्याचा हाच पहिला प्रसंग येईल. यानंतरच हिंदी व परकीय दर्यावर्दी ऑफिसर यांच्यामध्ये खरी तेढ येईल. कारण जितके हिंदी अधिकारी जास्त तितके बरोबर इतर अधिकारी कमी होणार. पण आमच्या कंपनीशिवाय दुसरी मोठी अशी एकहि हिंदी शिपिंग कंपनी नाही. आहेत त्या सर्व परदेशी, त्यामुळे तयार होणाऱ्या सर्व हिंदी लोकांना तरी वाव मिळेल कीं नाही कोणास ठाऊक! आणि मग मात्र मागणीपेक्षा पुरवठा जास्त यामुळे आमची किंमत एखादे वेळीं कमी व्हावयाची.

८६८

**६ फेब्रुवारी १९३३—सर सॅम्युअल होअर, स्टेट सेक्रेटरी, लंडन**

तुम्ही आपलें The pleasures and the privileges of the pen हें पुस्तक पाठविलेंत त्याबद्दल फार आनंद वाटला. तें मी वाचीनच. पण तुमच्या लंडनच्या मुक्कामांत आपला जो स्नेहसंबंध जडला त्याची स्मृति म्हणूनहि तें जपून ठेवीन.

८६९

**६ फेब्रुवारी १९३३—जिलबर्ट मरे, ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी**

तुमचें The Pleasures, Privileges पुस्तक पोंचलें. तें वाचनीयच असेल यांत शंका नाही. तथापि तुमच्या आमच्यांत ऑक्सफर्ड येथील भेटीचें स्मारक म्हणूनहि मी त्याकडे पाहीन.

८७०

**६ मार्च १९३३—डॉ. मुंजे, नागपूर**

काल अण्यांची गांठ पडून चर्चा करावयास सांपडली. राजगोपालाचारीयर यांनी काढलेलें स्टेटमेंट कसें आहे व पं. मालवीय आणि सुभाषचंद्र बोसांच्या बंगाली पक्षांतील लोकांचें कारस्थान कसें चाललें आहे हें मी त्यांच्या निदर्शनास

आणलें. विशेषतः काँग्रेस ज्यांना आपले म्हणून कवटाळते त्या राष्ट्रीय म्हणविणाऱ्या मुसलमानांनी जें पत्रक काढलें आहे त्याकडे त्यांचें लक्ष वेधलें. काँग्रेसने आपल्या धोरणाची आणि चळवळीची व्यापक पायावर पुनर्घटना करण्याची किती आवश्यकता उत्पन्न झाली आहे, तसें करण्यांत काँग्रेसचाच तरणोपाय कसा आहे हें त्यांना पटवून देण्याचा मी प्रयत्न केला. शेवटीं मी त्यांना असें सुचविलें कीं, तुम्ही स्वतः, केळकर आणि मी एक पत्रक काढूं व त्यांत पुढील गोष्टी सुचवूं. १ नव्या घटनेमध्ये आमच्या दृष्टीने जे दोष आहेत ते काढून टाकण्यास सरकारला भाग पाडण्यासाठी जरूर तेव्हा कायदेभंगाची चळवळ करणें. २ वर सांगितल्याप्रमाणे सरकारवर वजन आणण्यासाठी कायदेमंडळें काबीज करणें. त्यायोगे जी काय : सत्ता मिळेल तिचा सरकारशीं झगडण्याकरिता उपयोग करणें. ३ अस्पृश्यतानिवारण. ४ जरूर असेल त्याप्रमाणें एखादी नवी चळवळ सुरू करणें.

असें पत्रक काढलें म्हणजे काँग्रेस, प्रागतिक आणि प्रतिसहकारितावाले इत्यादि सर्व प्रमुख राजकीय पक्षांना संयुक्त भूमिका सांपडेल. वरील कलमांत कायदेभंग सोडून द्यावा अशी सूचना नाही. पण सध्या त्याची विशेष जरूर नसल्यामुळे तो शिथिल करतां येईल. नव्या घटनेप्रमाणें मिळणारी सत्ता भलत्याच लोकांच्या हातीं जाऊं देणें काँग्रेसला फायद्याचें नाही. माझ्या सूचनेमुळे काँग्रेसच्या इभ्रतीला कमीपणा तर येणार नाहीच; पण उलट देशांत एकी केल्याचें श्रेय तिला मिळून तिची उपयुक्तता व सरकारवरील तिचा धाक हीं वाढतील.

सारांश, गोष्ट इतकीच कीं महात्मा गांधीच काँग्रेसच्या धोरणांत बदल करण्याचें बोलूं लागले आहेत, व राष्ट्रीय म्हणविणारे मुसलमान कायदेमंडळांत गेल्याशिवाय सोडणार नाहीत हें उघड आहे; मग अशा वेळीं महाराष्ट्रीयांनीच व्यावहारिक विधायक मार्ग दाखविण्याचें श्रेय काय म्हणून दवडावें! कांही थोड्या जणांनी गिल्ला केला तरी बहुतेक सर्व प्रांतांतून आपणाला पाठिंबाच मिळाला अशी आज स्थिति आहे. अणे काँग्रेसचे अध्यक्ष आहेतच. ते यावेळीं धाडस करतील तर सर्व महाराष्ट्र व इतरहि प्रांत त्यांना खचित पाठिंबा देतील. अण्यांशीं तुम्ही याविषयी चर्चा करा व जरूर लागली तर मला केव्हाहि तार करून बोलवा; हें पत्र अण्यांना दाखवावयास हरकत नाही.

८७१

## ८ मार्च १९३३—मादाम मोरीन, पॅरीस

अद्यापपर्यंत तुमच्या वर्तमानपत्रासाठी लेख पाठवितां आला नाही याबद्दल क्षमा करा. आजारी असल्यामुळे इतका वेळ सवड झाली नाही. तुमचीं पत्रें व पुस्तक मिळालें. तुमच्या पुस्तकांत नानाविध मनोरंजक माहिती खचून भरली आहे. तुमचें संस्कृत भाषणहि मिळालें. तुमची भेट झाल्यामुळे फ्रान्स व हिंदुस्थानच्या स्नेहबंधनाचा आणखी अेक दुवा जोडला गेला यांत शंका नाही. त्रिलोकेकर आपलें पुस्तक पुरें करण्यासाठी लौकरच मुंबईंत परत येणार आहेत. आपल्या कन्येस माझे नमस्कार सांगा.

८७२

## २४ मार्च १९३३—मनोहर विष्णु काथवटे, वांई

आपल्यास पत्र लिहावें असें फार दिवस मनांत आहे. परंतु अव्यापारेषु-व्यापार होईल किंवा लहान तोंडाने मोठा घास घ्यावा असें होईल अशी मनांत शंका असल्याकारणाने पत्र लिहिण्याचें आजपर्यंत राहून गेलें.........

आपलें प्रचंड वाचन अनेक प्रसंगीं केलेल्या भाषणांवरून सहज समजतें. आपली समयसूचकता व प्रसंगविशेषीं वाद मोडण्याची अजब युक्ति ही पाहून कौतुक वाटतें. जळगांवच्या सभेंत आपण काढलेली युक्ति अद्याप स्मरणांत आहे. तेव्हा आपण प्रत्यक्ष लो. टिळकांचीहि परवा ठेवली नाही असें समजतें.लो. टिळकांच्या चरित्रांतहि आपण दाखविलेली समतोलबुद्धि आपल्या निःपक्षपातीपणाची चांगली सांक्ष देत आहे. आपले वाढदिवसाचे प्रसंगीं आपण केलेलीं भाषणें कोणच्याहि थोर मनाचे पुरुषास शोभण्यासारखीं आहेत. त्याप्रसंगीं आपण केलेला स्वार्थत्याग अलौकिक आहे, तो स्वार्थत्याग केल्याचा अभिमान न दाखवितां आपण काढलेले उद्गार अत्यंत प्रशंसनीय आहेत. हें पत्र लिहिण्याचें आजच कारण आपलें श्रीमंत सयाजीरावमहाराज यांच्या सत्काराचे प्रसंगाने केलेलें भाषण हें होय. मागणी करावयाची नाही असें म्हणून जी अत्युत्कृष्ट मागणी केली त्यांतील कौशल्य दुसऱ्या कोणासहि साधणार नाही. आपल्या भाषणांतील व लेखांतील उपमा फारच मार्मिक व मनास आनंददायक अशा असतात. पर्वतावरील बर्फाने आच्छादित झालेल्या दृश्यास वांगीभातावर

खोबऱ्याचा कीस घालून जशी शोभा येते त्याची आठवण झाली म्हणजे केव्हाहि हास्याची उकळी फुटल्याशिवाय रहात नाही.

असो; एकंदरीत बडोद्यास वगैरे केलेलीं भाषणें व केसरींतील लेख व आपले अनेक ग्रंथ यांचा विचार केला म्हणजे महाराष्ट्रांत आपल्या तोडीचा वाङ्मयामध्ये मनुष्य असेल असें वाटत नाही. आपली बुद्धी इतकी व्यापक आहे कीं, त्यांतून वाङ्मयांत कोणत्वाहि रस राहून गेला आहे असें वाटत नाही. अर्थात् माझें लिहिणें माझे मनांत आपल्याबद्दल वाटत असलेला आदर, पूर्णपणें व्यक्त करण्यास असमर्थ आहे हें मी जाणून आहे. आपला स्वभाव किती विनयशील आहे व किती मनमिळाऊ आहे हें मी लिहावें असें नाही. सार्वजनिक कामें करण्यांत महाराष्ट्रीय पुरुषांत आपला दर्जा फार वरचा आहे एवढेंच म्हणून व आपल्यास व आपले कुटुंबांतील माणसांस पूर्ण सुख व आयुरारोग्याचा लाभ होवो एवढें म्हणून मी हें पत्र पुरें करतो; व इतके दिवस कांही चुकले चुकलेसें वाटत होतें. तें एवढ्याने कांही अंशाने तरी नाहीसें झालें.

८७३

### १४ मार्च १९३३—अबदुल मतीन चौधरी, दिल्ली

तुम्ही माझ्यासाठी गुंजाळांना तार करून डेप्युटी प्रेसिडेंटशिपच्या उमेदवारीपासून परावृत्त केलें याबद्दल तुमचा अत्यंत आभारी आहें. निवडणूक चुरशीची झाली. मी विनंति न करतांहि तुम्ही आपण होऊन तार पाठविली यामुळे माझें कार्य फारच सुकर झालें. मी तुमचा फार ऋणी आहें. खुद्द गुंजाळांनीच मला चांगला पाठिंबा दिला. त्यांचें असेंब्लींतलें भाषण अगदी ठणठणीत व स्वतंत्र वृत्तीचें झाले, व तें लोकांना फार आवडलें.

८७४

### २४ मार्च १९३३—मा. श्री. अणे, दिल्ली

आपण यवतमाळला पाठविलेलें पत्र जतकर यांनी मजकडे बनारस येथे रवाना केलें. माझें आपलें सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटींत व त्यानंतर रेल्वे स्टेशनवर जेव्हा बोलणें झालें तेव्हाच आपण माझ्या इच्छेप्रमाणें पत्र पाठविणार नाही म्हणून कळविलें होतें, व त्यानंतर त्या बाबतींत मला कांहीच संशय उरला नसल्या-

मुळे आपण मुद्दाम निराळें पत्र पाठवून कळविण्याचें कांही कारण नव्हतें. आपल्या स्वभावासंबंधीं मी अपरिचित नाहीं. इतरांवर भीड घालण्याचा आपला स्वभाव नाही हें मी जाणून आहें, व मला या आपल्या स्वभावाबद्दल सकौतुक आदर वाटत असतो. असो.

आपल्या येथील वाटाघाटींच्या वावटळींतून बाहेर पडल्यानंतर, फिरून या तुफानांत बहुतकरून सापडावें लागणार नाही, अशा कांहीशा निर्धास्त मनःस्थितींत मी कलकत्याच्या राष्ट्रिय सभेच्या अधिवेशनाची तयारी करण्याचे कामास लागलों होतों. याच कामानिमित्त मला विशेषतः श्रीक्षेत्र काशी येथे पंडित मदनमोहन मालवीय यांचे सान्निध्यांत कांही दिवस काढावयाचे होते. परंतु " श्वेतपत्रिकेच्या " प्रसिद्धीनंतर पुन्हा हें वाटाघाटींचें व सल्लामसलतींचें बरसाती वारें वाहूं लागलें आहे. बंगालच्या उपसागराचे शेजारीं, हुगळीचे कांठीं, तुफानांतूनच कॉंग्रेसच्या अधिवेशनाची नौका हांकण्याचा निकराचा प्रयत्न करावयाचा असा मी आपल्या मनाचा निर्धार केला असला तरी, हें सल्लामसतींचे सोसाट्यानें वाहूं लागलेलें वारें मला उपद्रव दिल्याशिवाय राहत नाही. अशाच एका वावटळींत सांपडून मी दिल्ली येथे काल आलों, व ता २६ पर्यंत मला बनारस येथे राहावें लागणार आहे. वेळ सांपडल्यास ता. २२-२६ पर्यंतच्या सल्लेबाजीचे धक्के खात मला दिल्ली ते काशी व काशी ते दिल्ली अशा येरझारा कराव्या लागत आहेत ! त्याची त्रोटक हकीकत आपले स्वतःचे खास माहितीकरिता ( प्रसिद्धीकरिता अथवा मित्रमंडळींतील चर्चेकरितादेखील नव्हे ) पाठवून देण्याचा विचार आहे.

डॉक्टर मुंजे हे काल सायंकाळीं विमानोड्डाण करून ५॥ तासांत नागपुराहून दिल्लीला येऊन पोंचले. त्यांची व माझी काल रात्रीं व आज दुपारीं भेट झाली व बरेंच बोलणेंहि झालें. मी आपणांजवळ जें बोललों होतों तेंच त्यांच्याजवळहि कमीजास्त विस्तारानें बोललों. असो. पुन्हा जेव्हा भेटीचा योग येईल तेव्हा मोकळ्या मनानें हल्लींच्या प्रचलित पण त्या वेळच्या गतगोष्टींची चर्चा करावयास मिळेल.

८७५

## २८ मार्च १९३३—हेलेना नॉर्मन्टन, लंडन

अद्याप मजकडे मराठा कां येऊं लागला नाही ? गेल्या डिसेंबरांत तुम्ही हिंदुस्थानास परत गेलां त्यावेळीं तुमची भेट मला घेतां आली नाही. याचें कारण

कोर्टाचीं माझीं कामें फार तुंबलीं होतीं हें होय. नाताळानंतर मी लगेच मर्दीरी येथे विश्रांतीसाठी गेलें. त्यानंतर आता मला थोडीशी फुरसत झाली आहे.

'टाइम्स'मध्ये मीरत खटल्यासंबंधी अनेक गूढ सूचना येत असून खटल्याची 'रिव्हिजन' होण्यासंबंधी व्यंजना आहे. या खटल्यासंबंधी टीकेला व चौकशीला पुष्कळ वाव आहे असें मत आहे. येथे लंडनमध्ये त्यासाठी, म्हणजे वकिलांच्या फीसाठीं, दोन फंडहि उभारण्यांत आले आहेत. फंड पुरेसा झाल्यावर लेबर पक्षाचा कोणीतरी आवडता पित्त्या, कौन्सेल म्हणून, तिकडे पाठविण्यांत येईल. हिंदुस्थानविषयक राजकीय खटल्यांचा अनुभव असलेला एखादा बॅरिस्टर तिकडे कोणास पाहिजे असल्यास होरेस सॅम्युएल यांचें नांव कळवावें. व्यक्तिशः त्यांत माझें नफानुकसान नाहीं; पण योग्य खटला चालवण्यास योग्य माणूस असावा असें वाटतें. लेबरपक्ष लुच्च्यांनी भरलेला आहे. तुमचे विठ्ठलभाई पटेल लंडनला येणार आहेत म्हणे !

८७६

१९ एप्रिल १९३३—ए. रंगस्वामी अय्यर, मद्रास

गोलमेज परिषदेला मलाहि आमंत्रण आलें आहे, व बऱ्याच विचारानंतर मी तें स्वीकारलें आहे. कॅांग्रेस पॉलिसी बदलण्याविषयीं मी लेख लिहिला, त्यामुळे कॅांग्रेसमधील एका पक्षाचा मजवर जो घुस्सा आहे तो अधिक वाढेल यांत शंका नाहीं. पण आपल्या प्रामाणिक मतांना मुरड घालण्यास मी तयार होणार नाहीं. आपण सर्वांनी एक विचाराने, सरकारच्या हिंदुस्थानविषयक धोरणाविरुद्ध, एक धोरण स्वीकारावें असें होईल तर बरें होईल. तुमचा लंडनमधील कामकाजाचा कार्यक्रम कळवा. १० मेपर्यंत मला येथून निघतां येणार नाही.

८७७

( ? ) एप्रिल १९३३—लॉर्ड झेटलंड व एफ. डब्ल्यू. थॉमस, लंडन

अलीकडे हिंदुस्थानच्या कामांत, विशेषतः त्याच्या बौद्धिक जीवनांत, लक्ष घालणाऱ्या अनेक लोकांनी लंडनमध्ये एकत्र येऊन असा विचार केला कीं 'इंडियन अकॅडेमी' नांवाची एक सांस्कृतिक संस्था चालू करावी. त्याच लोकांनी असेंहि ठरविलें कीं, मी चेअरमन व मि. थॉमस व्हाइस चेअरमन या नात्याने आम्ही कित्येक हिंदी गृहस्थांना पत्रें लिहावीं. त्याप्रमाणे तुम्हास हें पत्र लिहित आहें.

युरोप, अमेरिका, जपान वगैरे देशांत अशा प्रकारच्या ॲकॅडेमीज म्हणजे संस्कृतीचीं केंद्रें स्थापण्यांत आलीं आहेत. विलायतेंतील रॉयल सोसायटी अशीच आहे. तिचें मुख्य काम म्हटलें म्हणजे संस्कृतिसंरक्षणाला व संघटनेला स्वतःच्या देशांत व परदेशांत सहाय्य करावें. हिंदुस्थानासंबंधी असे केंद्र निर्माण झाल्यास त्याचें महत्त्व किती आहे हें मला सांगण्याचें कारण नाही. आणि ही कल्पना तुम्हालाहि पसंत पडेल असें मला वाटतें.

पण या केंद्राच्या रचनेच्या व कामाच्या किरकोळ गोष्टींसंबंधीं मतभेद होणें शक्य आहे. उदाहरणार्थ सर्व हिंदुस्थानांत मिळून अेकच केंद्र असावें कीं अनेक असावींत? त्याचीं खातीं कोणकोणतीं करावींत? त्याचें काम नित्य असावें कीं नैमित्तिक असावें? रचना काय असावी? सभासद कोणत्या पद्धतीनें दाखल करावे? इ. युरोपांतील कांही सांस्कृतिक केंद्रें राजाच्या सनदेने किंवा तत्सम दुसऱ्या एखाद्या अधिकारी आज्ञापत्रानें अस्तित्वांत आणलीं जातात. परंतु हिंदुस्थानसंबंधी उपक्रम विलायतच्या रॉयल सोसायटीनें केला तरी आमच्यामतें मागण्यासारखा आहे. कोणीतरी, केव्हां तरी, प्रारंभ करावा लागतो. म्हणून हा उपक्रम आम्ही सुचवीत आहोंत. हें झाल्यानंतर स्टेट सेक्रेटरीला लिहिणें आवश्यक ठरलें तर लिहितां येईल. पण हिंदुस्थानांत या कल्पनेला कितपत पाठिंबा मिळतो तें पाहिलें पाहिजे. तरी याविषयी तुमचा अभिप्राय कळवावा: इतरांना कांही अभिप्राय कळवावासा वांटला तर त्यांनीहि कळवावा.

ता. क.—हेंच पत्र खालील गृहस्थांना पाठविण्यांत आलें आहे. ( यादी )

८७८

**५ मे १९३३—सर सॅम्युअल होअर, स्टेट सेक्रेटरी, लंडन**

प्रकृति नादुरुस्त झाल्यामुळे तुम्ही इकडे गोलमेज परिषदेला येऊं शकत नाही हें वाचून फार निराशा झाली.

८७९

**१९ जून १९३३—डॉ. बा. शि. मुंजे, पोर्ट सय्यद**

मी हिंदुस्थान सोडलें त्या दिवशीं मुद्दाम मसूरकर महाराज मला भेटावयास आले होते. त्यांचें म्हणणें असें की, मी पोर्तुगाल देशाचीहि सफर करावी, आणि

तेथल्या रिपब्लिकच्या प्रेसिडेंटची गांठ घेऊन, गोव्यांत चाललेल्या शुद्धिकार्याला ज्या कॉन्स्टिटयूशनल व लीगल हरकती आणल्यां जातात त्यांचें निराकरण करवून घ्यावें. त्यांची कल्पना मलाहि मानवली. पण पुढील दोन तीन अटींवर हें काम मी पत्करीन असें त्यांस सांगितलें. पहिली अशी—प्रथम एक इंग्रजी भाषेंत उत्तम अर्ज लिहवून घेऊन त्याचा पोर्तुगीज तर्जुमा करा. त्या अर्जांत अडथळे काय काय येतात व काय काय सवलती हव्यात तें खुलासेवार लिहावें. दुसरी अट— गोव्यांत अगर पुण्यास एक परिषद भरवावी. तें न जुळलें तर वरील दोन्ही ठिकाणी मास मीटिंगज भरवून पाठविण्यांत येणाऱ्या अर्जाला पुष्टि देणारे ठराव पास करावेत, व बोलणें करण्यास मला अधिकार द्यावा. यायोगे लोकमताचा पाठिंबा दिसून येईल. मसूरकर महाराजांनी केलेल्या या सूचना तुम्हांला पसंत असतील तर, मी सुचविल्या पद्धतीने किंवा तुम्हांला योग्य वाटतील ते फेरफार करून, चळवळ करावी. कांहीहि असलें तरी ही संधि आपण गमवावी असें वाटत नाही. चळवळ झाली तर इकडे त्याचा चांगलाच परिणाम होऊन हिंदुमहासभेची इभ्रत वाढेल. इकडे चळवळीचा गाजावाजा व प्रसिद्धि कशी करावयाची हें मी पाहून घेईन. कांही फ्रेंच व अमेरिकन जर्नालिस्टांचा व माझा परिचय आहे तेव्हा तें मी करूं शकेन. खेरीज या विषयासंबंधी फ्रान्समध्ये धार्मिक व वाङ्मय समित्यांतून मी डिसकशन्स घडवून आणीन. अर्थात् त्यामुळे कॉन्टिनेंटल पेपर्स-मध्ये या विषयाची पुष्कळ चर्चा होईल. म्हणून तुम्हांस विनंति कीं, तुम्ही मसूरकर महाराजांना बोलावून घेऊन ताबडतोब चळवळीस सुरुवात करावी. मी महाराजांना स्वतंत्रपणें लिहीत आहेंच. पण खरा पुढाकार पुण्याचा पाहिजे.

ता. क.—अखेर कॅ. मोडक आमच्या शिष्टमंडळांत आले नाहीत. त्यांना सर के. हक्सर आणि सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीने भेडसावलें! महासभेसारख्या जातीय संस्थेशीं तुम्ही संबंध ठेवाल तर तुमचे प्रॉस्पेक्ट्स् बुडतील अशी त्यांची समजूत करून देण्यांत आली. मोडकांनी माझी चांगलीच निराशा केली. माझ्या 'सर्व्हंटस् ऑफ दि हिंदु सोसायटीची' ड्रॅफ्ट कॉन्स्टिटयूशन तुम्ही वाचून टाकलीच असाल. सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटीच्या धर्तीवरच ती आंखली आहे. तो कागद पाटण्यास बाबू जगत् नारायण लाल यांना पाठवा. ते पुढे सर्व व्यवस्था करतील.

८८०

२ ऑगस्ट १९३३—अ. स. गोखले, पुणें

'रत्नाकर'ला सांप्रतचें यश प्राप्त होण्यास आपलें लेखनच सर्वस्वी कारणीभूत आहे, व त्याबद्दल 'रत्नाकर' आपला सदैव ऋणीच आहे.

'रत्नाकर'चा सयाजी महाराज अंक या आठवड्यांत प्रसिद्ध होईल व पुढील अंकहि लवकरच प्रसिद्ध करून मी पूर्वी झालेला विलंब—दिरंगाई—भरून काढणार आहें, व प्रकाशनाला नियमितपणा आणण्याचा प्रयत्न करणार आहें. असो, आपल्या साहाय्याने या सर्व गोष्टी करीन असा मला विश्वास आहे.

आपणाकडून अलीकडे बरेच दिवसांत कांही लेखनसाहाय्य आलेलें नाही. तरी आपणास नम्र विनंति आहे कीं, आपण 'रत्नाकर'वर पूर्ववत् कृपादृष्टि ठेवून त्याला लेखनसाहाय्य करावें; व 'रत्नाकर'ची वाङ्मयसेवा अधिक उत्साहपूर्ण व आशास्पद करावी. उत्तराची व लेखाची वाट पहात आहे.

८८१

१२ ऑगस्ट १९३३—प्रि. डॉ. बाळकृष्ण, कोल्हापूर

तुमच्या '५०० रुपयांच्या देणगीबद्दल कोणत्या शब्दांनी आभार मानूं! फॉरेन प्रॉपोगॅंड्याकरिता ही रक्कम मिळविण्यांत तुम्ही मदत केलीत यांत शंका नाही. आर्यसमाज कांही तरी देईल. संस्थानिकांनाहि पत्रें पाठवीत आहें. नाही तर बाकीचे स्वतःच खर्च करावे लागतील. मी २५ किंवा निदानी ३० सप्टेंबरला तरी निघणारच. नक्की तारीख पुढील आठवड्यांत मुंबईस ठरेल.

८८२

१४ ऑगस्ट १९३३—भी. ह. जतकर, वकील, यवतमाळ

आपल्या लोकप्रिय केसरी पत्राच्या १ ऑगस्टच्या अंकांतील अग्रलेख वाचून मला व माझे मित्रमंडळींना बरें वाटलें नाही. परंतु आपले केसरीचे व यवतमाळचे संबंध लक्षांत घेतां, आपल्याला खाजगी रीतीने येथील मित्रमंडळींच्या भावना स्पष्टपणें कळविलेल्या बऱ्या असें वाटून सोबतच्या पत्राची एक नक्कल पाठविली आहे. सदरहू पत्र लिहिल्याबद्दल कोणताहि गैरसमज करून न घेतां,

आमच्या भावना नीट विचारांत घेऊन, योग्य तें धोरण केसरीचें ठेविलें जाईल अशी आशा आहे. सदरहू पत्र आपल्या वर्तमानपत्रांत छापलें जावें अशी आमची इच्छा नाही.

८८३

**२४ ऑगस्ट १९३३—प्रि. डॉ. बाळकृष्ण, कोल्हापूर**

तुम्ही पाठविलेला चारशे रुपयांचा चेक पोंचला. फार आभारी आहे. आता मी डॉ. परुळेकरांकडून अवश्य ती माहिती (suggestions) व परिचयपत्र घेतों. तूर्त ३० सप्टेंबर ही प्रस्थानाची तारीख नक्की केली आहे. लोकांकडून आर्थिक मदत मिळण्याची फारशी आशा नाही; तथापि मी जाण्याचें ठरविलें आहे. मग स्वतःला काय खर्च पडेल तो पडो. श्री. इचलकरंजीकर तुमच्याकडे १०० रुपये पाठवतील. मिरजकरहि कांही देऊं शकतील. मुंबईच्या एकदोघा मित्रांनी पॅसेजमनीसाठी ३०० रुपये दिले आहेत.

८८४

**२९ ऑगस्ट १९३३—बॅ. सच्चिदानंद सिंह, सोलन (सिमला)**

तुम्ही वृत्तपत्रव्यवसायांतून निवृत्त होणार असें आजच्या वर्तमानपत्रांतून वाचलें. प्रकृति नादुरुस्त असल्यामुळे इंग्लंडचें आमंत्रण तुम्ही नाकारलेंत. अर्थात् त्याच कारणामुळे याहि व्यवसायांतून निवृत्त होत असाल. सध्या अँग्लो–मुस्लीम अलायन्सची मोठी कारवाई सुरू आहे. अशा वेळीं तुमच्यासारख्या हिंदु पुढाऱ्यांच्या सल्लामसलतीचा आम्हाला फार उपयोग होता.

८८५

**१९ ऑक्टोबर १९३३—मादाम अल् मोरीन, पॅरीस**

तुम्ही भेटल्यास फार दिवस झाले. मी लौकरच हिंदुस्थानास येणार आहे. तेथील प्रवासांत पुणेंहि आहे. तुमची भेट झाल्यास चांगलें. मी १० नोव्हेंबरलाच निघणार होतें. पण माझ्या वडलांना मध्यंतरीं मोटार ॲक्सिडेंट झाल्यामुळे २३ तारखेपर्यंत प्रयाण लांबलें. पुण्यास माझा फार थोडा मुक्काम होईल. कारण मला राममोहन रॉय यांच्या शताब्दिसाठी नाताळपर्यंत कलकत्त्यास पोंचलें पाहिजे. शिवाय मध्यंतरी उत्तर हिंदुस्थानांतील स्नेही सोबत्यांनाहि भेटणें आहे. कल-

कत्याहून परत येतांना, म्हणजे बहुधा मार्चांत, मला पुण्यामध्ये मुंबईस थोडें राहतां येईल. मला पाठवावयाचें पत्र कोदंडराव, सर्व्हंटस् ऑफ् इंडिया सोसायटी, या पत्त्यावर पाठवा म्हणजे मला मिळेल.

८८६

९ जानेवारी १९३४—प्रायव्हेट सेक्रेटरी, गव्हर्मेंट हौस, मुंबई

गव्हर्नरसाहेबांना आपणांस भेटावयाचें आहे. आपण मुंबईस लवकर केव्हा येण्याचा संभव आहे ?

८८७

९ जानेवारी १९३४—अश्विनीकुमार घोस, वंगीय प्रांतिक सभा

अखिल हिंदी वंगीय राजकीय परिषद ता. १८ व १९ जानेवारीला भरेल हें तुम्हाला माहीत आहेच. पण आताच थोडा वाद निघाला आहे, तो महात्मा गांधींनी केलेल्या पुणें करारासंबंधी. हिरेंद्रनाथ दत्त, बी. सी. चतर्जी, इत्यादिकांनी या कराराविरुद्ध पत्रकहि प्रसिद्ध केलें आहे. त्याला उत्तर म्हणून उलट पत्रकहि निघणार आहे. हा वाद वाढला तर परिषद कशी भरणार ? तरी दोन दिवस आधी येऊन तुम्ही सामोपचाराने या मंडळींत समेट घडवून आणाल तर पाहा. आम्ही स्पृश्य व अस्पृश्य समाजाच्या अनेक पुढाऱ्यांना बोलाविलें आहे. तुम्ही येथे येणें अत्यावश्यक आहे. पंडित मालवीय, जयकर, मुंजे, रावबहादूर राजा, डॉ. टागोर यांना बोलवीत आहोंत. तरी तुम्ही सर्व मंडळींनी येऊन बंगाल्यांतील ही पडणारी फूट या वेळीं बंद पाडावी.

८८८

८ फेब्रुवारी १९३४—पां. वा. गाडगीळ, पुणें

आता झालेल्या मुलाखतींत आपला वरिष्ठपणा विसरून मी रागावलों, व अशा तऱ्हेने शिस्तभंग केला, त्याबद्दल दिलगीर आहें. मी आपली माफी मागतों.

८८९

१७ मार्च १९३४—पां. वा. गाडगीळ, पुणें

मराठ्याचें काम करण्याची संधि आपण मला दिल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त

करण्यासाठीं हें पत्र मी लिहित आहें. हें काम माझ्याकडून होईल कीं नाहीं अशी काळजी प्रथम मला वाटत होती. पण आता सात महिन्यांच्या अनुभवाने बराच आत्मविश्वास मला आला आहे. इंग्रजी लेखनाची ही जी संधि मला मिळाली आहे तिचा सदैव उपयोग मला होईल. संताप व्यक्त करतांना वाटला त्याहून अधिक आनंद व समाधान आपल्याजवळ कृतज्ञता व्यक्त केल्याने मला वाटत आहे.

८९०

## २१ मार्च १९३४—डॉ. बा. शि. मुंजे, नागपूर

२३ तारखेस प्रांतिक परिषदेच्या अधिवेशनासाठीं पेशावरला रवाना होईन. केसरी मराठ्यांत माझ्या गोव्याच्या सफरीचा वृत्तांत छापावा. त्याचप्रमाणे त्याविषयक स्फुटेंहि लिहावीं. त्यामुळे शुद्धीकरणाच्या चळवळीस जोर येईल व प्रोत्साहन मिळेल. लंडनमधील पोर्तुगीझ वकिलास मी आभारप्रदर्शनार्थ पत्र पाठवीत आहें. माझ्या कामाबद्दल त्याने बरीच सहानुभूति दाखविली आहे.

८९१

## २८ मार्च १९३४—मा. श्री. अणे, यवतमाळ

वऱ्हाडच्या सर्व-पक्षीय-परिषदेस अध्यक्ष या नात्याने हजर राहावयाचें असल्याने, मला दिल्लीस डॉ. अन्सारींनी बोलाविलेल्या सभेस ३१ मार्च व १ एप्रिल या तारखांस हजर राहणें शक्य होणार नाहीं. बेळगांवास (?) ६ तारखेस महात्माजींशीं माझें बोलणें झालें. आपल्या मतांचें सारांश रूपाने टिपण लिहून त्यांनी मला दिलें होतें. त्याची एक प्रत मी तुमच्याकडे धाडीत आहें. दिल्लीस आपणा सर्वांना चर्चेसाठीं माझ्या खालीलप्रमाणे सूचना मी सादर करीत आहें.

१ सविनय कायदेभंगाची चळवळ थांबविणें.

१ विधायक कार्यक्रमाची जास्त कार्यक्षम रूपरेखा आंखणें.

३ वाढत्या जातिनिष्ठतेस आळा घालणें, आणि जातीय ऐक्याच्या तत्त्वाचा पुरस्कार करणें.

४ श्वेतपत्रिका आणि सुधारणा यांचा फोलपणा उघडकीस आणून राष्ट्रीय भावनेला मारक असणाऱ्या त्यांतील गोष्टी विशद करणें.

५ प्रातिनिधिक संस्था व कौन्सिलें यांमध्ये प्रवेश होण्यास निवडणुकी लढविण्याची परवानगी काँग्रेसच्या अनुयायांस देणें.

## ८९२

### ८ एप्रिल १९३४—बाळासाहेब पंतप्रतिनिधि, संस्थान औंध

औंध संस्थानच्या प्रातिनिधिक सभेची त्रैवार्षिक निवडणूक लवकरच होणार आहे. या सभेस सरकारनियुक्त प्रतिनिधि म्हणून आपली नेमणूक करण्याची आमची इच्छा आहे. आपण संमति द्याल काय?

## ८९३

### ४ मे १९३४—राजम् आय्यंगार, मुंबई

तुमचें 'मराठे व इंग्रज' हें पुस्तक तुम्ही मला दिलें त्यामुळे फार उपकार वाटले. मला मराठी नीटसें येत नाही. तथापि आमच्या तामीळमध्ये अशी गोष्ट सांगतात कीं, मंत्रविद्येचें मर्म समजण्याकरिता एक शिष्य गुरूकडे गेला असतां गुरूने त्याच्या हातावर यज्ञकुंडांतील चिमूटभर राख प्रसाद म्हणून ठेवली, आणि त्याला 'जा' म्हटलें. प्रथम शिष्याला त्याचा अर्थ कळेना, पण नंतर मंत्रविद्येचें सामर्थ्य त्याच्या अंगीं आपोआप स्फुरूं लागलें असें त्याला आढळलें. तुमच्या पुस्तकाचा मी याच भावनेने स्वीकार केला, आणि इतिहासाचा प्रोफेसर या दृष्टीने मी इतर संशोधकांवर ताण न केली तरी मराठ्यांच्या इतिहासाचे रहस्य मला तुमच्या प्रसादाने नीट समजून येईल असें वाटतें.

## ८९४

### ८ जून १९३४—एस्. ए. डांगे, सेशन कोर्ट, कानपूर

आमच्यावरील खटल्याबद्दल, तसेंच व्यक्तिशः माझ्याविषयी, तुम्ही जी आस्थेने विचारपूस केलीत त्याबद्दल फार आभारी आहें. 'केसरी'चें वजन सुशिक्षितांप्रमाणे अशिक्षितांतहि फार आहे. तथापि मजूरांचे संप वगैरे नैमित्तिक प्रसंगांखेरीज मजूरांच्या गाऱ्हाण्यांविषयी 'केसरींत' फारशी हकिकत येत नाही. कम्युनिझम् किंवा सोशालिझमबद्दल तुमचे आमचे मतभेद असतील. पण बुद्धिजीवी वर्गाप्रमाणेच मजूर हाहि राष्ट्राचा एक आवश्यक भाग आहे, असें समजून तुमची त्यांना याहून अधिक सहानुभूति मिळावी अशी अपेक्षा आहे.

८९५

## १२ जून १९३४—वामन रा. नाईक, बेगमपेठ (निजाम स्टेट)

क्षेत्र जांब येथे अंतर्व्यवस्थेंत हात घालण्यास न मिळाल्याने, आबासाहेब महाराज 'समर्थ-मंदिरा'च्या बाबतींत नाना तऱ्हेने त्रास देत आहेत. जांबची जहागीर जप्तच व्हावयाची, पण माझ्या मुलांकरवी केलेल्या प्रयत्नांनी ती वाचली. तें लक्षांत न घेतां, महाराज आम्हांवर व गांवकऱ्यांवर कृष्णबुवाकरवीं अन्याय करीत असतात. गांव महाराजांच्या ताब्यांत मिळण्याची शिफारस केली गेलेली आहे. तसें झाल्यास आम्हा गांवकऱ्यांवर फार जुलूम होईल. म्हणून गांव महाराजांच्या ताब्यांत जाऊं नये अशी खटपट करावी असें आता वाटूं लागलें आहे, व त्यास श्री. नानसाहेब देवांची संमति आहे. परंतु आपण महाराजांना सदुपदेश करावा. त्यानेहि त्यांच्या वागण्यांत फरक न पडल्यास आम्ही काय करावें तें आम्हांस कळवावें.

८९६

## २ जुलै १९३४—म. गांधी

आपल्या २२ जूनच्या पत्रास, कामाच्या गर्दीमुळे, उत्तर धाडण्यास वेळ लागला. माझें हिंदी संस्थानांसंबंधाने धोरण पुढीलप्रमाणे आहे. संस्थानांच्या बाबतींत ढवळाढवळ न करण्याचें काँग्रेसने स्वीकारलेलें धोरण शहाणपणाचें व रास्त आहे. ब्रिटिश कायद्याने संस्थानांना स्वतंत्र अस्तित्व असल्याने, आम्हाला अफगाणिस्थान अथवा सीलोन यांच्याप्रमाणेच त्यांच्याहि कामांत हात घालण्याचा अधिकार नाही. भौगोलिकदृष्ट्या संस्थानी मुलुख हा जरी हिंदुस्थानचा मुलूख असला, तरी तो फ्रेंच अथवा पोर्तुगीझ हिंदुस्थानाप्रमाणेच परका असल्याने त्यांत आम्हाला हात घालतां येत नाही. संस्थानी मुलुखांतून असलेल्या काँग्रेसच्या सभासदांकडून आम्हाला मदत मिळते ती आम्ही घेतों. त्याची किंमत आम्हाला कळत नाही, किंवा संस्थानां-बाबत काम करण्याची आमची इच्छा नाही म्हणून नव्हे, तर आमचा इलाज चालत नाही म्हणून, हें वरील धोरण आम्ही स्वीकारलें आहे. आम्ही ढवळाढवळ केल्यास उलट त्यामुळे संस्थानी प्रजाजनांना तोशीस मात्र पोंचेल. तरीहि संस्थानांना अमुक करा असें आग्रहानें सांगण्यास हरकत नाही. आम्ही हिंदुस्थानांत जें यश मिळवूं, त्याचा संस्थानावर परिणाम झाल्याशिवाय राहणार नाही.

संस्थानिकांनी प्रजाजनांच्या हवाली राज्यकारभार सोंपवावा आणि स्वतः विश्वस्ताप्रमाणे अल्प वेतन घेऊन राहावें. संस्थानांचें निर्मूलन करावें असें मला वाटत नाहीं; व्यक्तींचें आणि संस्थांचें रूपांतर करावें असें वाटतें. राउंड टेबल परिषदेंत मी संस्थानिकांना जें बोललों तें सल्ला देण्याच्या दृष्टीनें. तो सल्ला त्यांनी घेण्या न घेण्यावर कॉंग्रेसचें फेडरेशन स्वीकारणें अवलंबून नाहीं. तें अनेक इतर गोष्टींवरहि अवलंबून आहे. फेडरेशनचा स्वीकार जरी यदाकदाचित् केला तरी तो परस्पर समेटानेंच शक्य होईल.

८९७

५ जुलै १९३४—ना. गो. चापेकर, बदलापूर

आपली तार पोंचली. आपल्या आग्रहास्तव मी ( बडोदें साहित्य संमेलनाचें ) अध्यक्षपद स्वीकारण्यास कबूल झालों आहें. आपण अध्यक्ष व्हावें अशी माझी इच्छा असल्यानें मी नकार देत होतों. स्वागतसभेच्या अध्यक्षाच्या जादा मताचा फायदा घेणें मला प्रशस्त वाटलें नाहीं. आणि मी नाहीं म्हणाल्यावर बडोदेकरांनी (पूर्वीं त्यांचें ठरल्याप्रमाणें) आपणास विचारण्यास हवें होतें. परंतु सर्वांनी मला आग्रह केल्यानें, व तशीच आपली तार आल्यानें, मी हो म्हणत आहें. प्रो. पोतदारांना सविस्तर लिहिलें आहे, त्यावरून जास्त कळेल.

८९८

१५ जुलै १९३४—वि. दा. ऋषि, मुंबई

'रा. ऋषि व परलोकविद्या' हा केसरींतील लेख पाहिला. आपल्या प्रश्नांचीं उत्तरें चुकलीं यावरून त्या वेळीं टिळकांचा आत्मा प्लँचेटवर! आला नव्हता हें उघड आहे. हुकमी हव्या त्या माणसाच्या आत्म्याला बोलाविण्याची शक्ति माझ्यांत नाहीं. जे लोक येतात ते आपल्या प्रेमांतील गत माणसांच्या आत्म्यांना बोलावितात, व प्लँचेटवर लिहून तसें कळवितात. 'टेबल टर्निंग' व 'ऑटोमॅटिक राइटिंग' या गोष्टी शक्य आहेत. हें आपण आमच्याकडे येऊन प्रयोग पाहिल्यास आपल्या ध्यानांत येईल. अनुभवानें व अभ्यासानें या गोष्टी मृतात्म्यांकडून होतात अशी माझी श्रद्धा आहे. आपण लिहिल्याप्रमाणें प्रयोग खात्रीनें होईलच असें मला सांगतां येणार नाहीं. तरीहि आपण आमच्याकडे येऊन हे प्रयोग समक्ष पाहावें.

८९९

११ ऑगस्ट १९३४—ना. गो. चापेकर

आपली कादंबरी वाचली. श्री. अणे म्हणतात कीं, "कादंबरीलेखनाकडे आपले इतिहासज्ञ लोक क्वचितच वळतात. पाळीव जनावरें जंगलाकडे निष्क्रिय कौतुकाने पाहातात तद्वत् त्यांची वृत्ति असते." अण्यांच्या इच्छेनुरूप कादंबरी-लेखनांत निर्भयतेने आपण पदार्पण केलेंतच. आता दुसऱ्या उडीने त्या राखीव जंगलांतील वृक्ष नेस्तनाबूद होऊन रक्षकांचीं धाबीं दणाणतील यांत काय संशय !

९००

१ ऑगस्ट १९३४—वामनशास्त्री किंजवडेकर, पुणें

आपण भेट म्हणून पाठविलेला भारतीय तत्त्वज्ञान हा ग्रंथ पोंचला. आपण जी अखंड सरस्वतीसेवा चालविली आहे तिचें हें फल आहे. आमच्याशीं विचारविनिमय करण्यापासून विशेष सामान्य कोणताहि फायदा आपणास न होतां, आपल्या प्रस्तावनेंत आमचा उल्लेख आपण केलांत हें आपलें सौजन्य आहे. असो; मोठ्या विद्वान् लोकांचा स्वभावच असा आहे कीं, ते लहानाला नेहमी मोठा करून आपणाकडे लहानपणा घेतात. म्हणूनच आपली कीर्ति मल्लीनाथाच्या उक्तीप्रमाणे "सौजन्यजन्यं यशः" झाली आहे. आणि याहूनहि ती पुढे वाढत जावो. इतकेंच नव्हे, तर ही सरस्वतीची सेवा निसर्गभिन्नास्पदत्व नैसर्गिक स्वभाव उभयतांकडून टाकून देववून "अस्मिन् द्वयं श्रीश्च सरस्वती च" असा योग याहिपेक्षा उज्ज्वल होईल अशी उत्कट इच्छा आहे.

९०१

२२ ऑगस्ट १९३४—वालचंद हिराचंद, मुंबई

मध्यविभागातर्फे असेंब्लीच्या जागेसाठी मी निवडणुकीस स्वतंत्र उमेदवार म्हणून उभा आहें. देशाच्या औद्योगिक व आर्थिक बाबींकडे लक्ष ठेवणें फार अगत्याचें आहे. हें काम काँग्रेसने उभे केलेल्या उमेदवारापेक्षा, माझ्या-सारख्या त्याच प्रश्नांशीं हरघडी संबंध येणाऱ्याला करणें जास्त शक्य आहे. इतर राजकीय बाबतींत माझीं मतें काँग्रेसशीं फारशीं विसंगत नाहीत. तरी आपण माझी बाजू न्यायाची वाटल्यास निवडणुकीसाठी मलाच आपला पाठिंबा द्यावा.

१०२

५ सप्टेंबर १९३४—सर प्रभाशंकर पट्टणी, मुंबई

'कृषिवल-कर्ज-निवारणा'चा जो प्रयोग भावनगर संस्थानांत आम्ही केला आहे त्यासंबंधी एक पत्रक आपल्या अवलोकनार्थ धाडीत आहें. याच विषयासंबंधी ब्रिटिश हिंदुस्थानांत काय करणें शक्य आहे यावर आपणाशीं बोलावयाचें आहे. आपणास सोमवारीं मी भेटण्यास पुण्यास आल्यास आपणास वेळ होईल का ते कृपा करून कळवावें.

१०३

१३ सप्टेंबर १९३४—श्री. त्र्यं. केतकर, पुणें

आपण निवडणुकीस उमेदवार म्हणून उभे आहांत की नाही हें मला ठाऊक नाही. आपण जर आमच्या संघाचें तत्त्व ( ब्रिटिश पार्लमेंटचा अधिकार अजीबात नाकारणें ) हें स्वीकारीत असाल तर, पूर्वीच्या सर्व गोष्टी मी विसरेन आणि आमचे उमेदवार (!!) म्हणून मी आपणांस अंतःकरणपूर्वक मदत करीन.

१०४

२ ऑक्टोबर १९३४—सर गंगासिंग, अधिपति, बिकानेर संस्थान

माझ्या मागील पत्रांतील मुंबई येथील आपल्या भेटीसंबंधीच मी लिहीत आहें. व्हाइसरॉयसाहेब ८ नोव्हेंबरला येऊन गेल्यावर आपण माझ्याकडे येण्यास उत्तम संधि आहे. आपल्या इकडील निवडणूक व काँग्रेसचें मुंबईचें अधिवेशन संपलेलें असेल. आपण माझे पाहुणे म्हणून आपली सर्व बरदास्त राहील व राजवाड्यांत आपली उतरण्याची सोय होईल. आपणांसह "गंगा कॅनल एरिआ" तून मी दौरा काढीन. ज्याबद्दल अनेक टीकाकार हवीतशी टीका करितात त्या जागीं प्रत्यक्ष वस्तुस्थिति काय आहे हें आपण समक्ष पाहा. प्रजा, राजा व सरकार यांचे काय संबंध आहेत ते आपण अवलोकन करा. त्यानंतर संस्थानांत कुठेहि आपण सांगितल्यानंतर थोड्या तासांत आपण अवचित भेट देऊन पाहा. माझी स्पेशल ट्रेन आपणांसाठी तयार आहेच. त्यानंतर खुद्द बिकानेरमधील संस्था नि ऐतिहासिक स्थळें आपण पाहाल.

शक्य तर १० दिवस, निदान एक आठवडा तरी, आपण यासाठी ठेवावा.

आपण माझ्या संस्थानास भेट द्यावी अशी माझी फार फार इच्छा आहे. आपणांस येणें शक्य होईल काय व केव्हा तें कृपा करून कळवावें.

९०५

**१२ ऑक्टोबर १९३४—सर गंगासिंग, अधिपति, बिकानेर संस्थान**

आपलें ७ चें पत्र पोंचलें. आपल्या अगोदरच ठरलेल्या कार्यक्रमामुळे आपणाला नोव्हेंबरांत आमच्याकडे येणें अशक्य आहे, याबद्दल दिलगीर आहे. तरी पुन्हा केव्हा आपणास येणें शक्य होईल तें जरूर कळविल्याशिवाय राहूं नये. मी वाट पाहात आहे.

९०६

**६ नोव्हेंबर १९३४—न. वि. गाडगीळ, मोहोळ**

'त्रिकाळ'मधील नाशिकच्यां माझ्या भाषणाचा रिपोर्ट अतिशय विपर्यस्त आहे. त्याचा इन्कार मी 'केसरी'कडे व इतर वर्तमानपत्रांकडे तारा पाठवून केला. पण तो खुलासा केसरींत आलेला नाहीं हें पाहून दुःख होतें. कदाचित् आपल्या गैरहजेरींत तें होऊन गेलें असेल. 'केसरीने पैसे खाल्ले' वगैरे विधानें खोटीं आहेत. मी तीं केलीं नाहींत व करणें अशक्य आहे. आपलें माझें बोलणें २९ ऑक्टोबरला झालें त्या वेळीं मी जें बोललों त्याखेरीज कांहीं अधिक मी म्हणालों नाहीं. माझा शब्द, माझी खात्री, आपण विश्वासार्ह मानाल. वर्तमान-पत्रांतून खुलासा केलाच आहे, शिवाय हें पत्र लिहून करीत आहें.

९०७

**१७ नोव्हेंबर १९३४—रघुवीर, लाहोर, इंटर नॅशनल ॲकडेमी ऑफ इंडियन कल्चर**

आपण माझ्या संस्थेबद्दल जी आस्था बाळगतां ती मी विसरलों नाहीं. काश्मीरांत आमच्या वाढत्या संस्थेसाठी वूलनर (?) सरोवरावर कांहीं जागा आम्ही घेत आहों. तेथे आपण पुढच्या वर्षी आमचे सन्मान्य पाहुणे म्हणून यावें. पुढील महिन्यांत आमचें शास्त्रीय मासिक आपल्या आशीर्वादाने सुरू होईल. मी या बाजूला संस्कृतीचें एक लहान केंद्र उघडणार आहें. त्याबद्दल तुमचें माझें बोलणें झालें तें मी विसरलों नाहीं. माझा विचार आहे कीं, काश्मिर

प्रांतांत पुढच्या उन्हाळ्यांत इतर चार मंडळीबरोबर तुम्हांला तेथे बोलवावें. आमच्या जर्नलचें काम तुमच्या आशीर्वादाने पुढच्या महिन्यांत नांवारूपाला येईल असें वाटतें.

९०८

**४ जानेवारी १९३५—कवि गिरीश ( प्रो. शंकरराव कानेटकर ), पुणें**

परमपूज्य श्री. तात्यासोहब यांचे सेवेसी, शि. सा. न. वि. वि. आपणांस मी हें प्रथमच पत्र लिहीत आहें व त्यामुळे माझ्या मनाचा बुजरेपणा जात नाही. शिवाय आपल्यासारख्या थोर, विद्वान, व्यासंगी व अधिकारी विभूतींना मी अभिनंदनाचें पत्र लिहावयाचें म्हणजे तर मी लहान तोंडीं मोठा घास घेत असल्याचा प्रमादहि करीत आहें. परंतु आपणाविषयी मनांत वसत असलेल्या पूज्य भावनेने व केवळ वाङ्मयप्रेमाने प्रेरित होऊन मी हें पत्र लिहीत आहें. तरी आपण क्षमा करावी, ही विनंति आहे.

गेल्या ‘ सह्याद्री ’चा अंक मी वाचला. वाङ्मयदृष्ट्या व कलादृष्ट्या तर तो भारदस्त व मार्गदर्शक होईल हें वाटतेंच; परंतु त्याच्या रूपरेखेवरून त्याचे पुढील अंकहि महाराष्ट्र वाचकांस सह्याद्रीप्रमाणेच प्रेरणा देतील ही खात्री वाटते

मी आज हें पत्र आपल्या ‘ हिरकणीच्या पोवाड्या ’बाबत म्हणून लिहीत आहें. आपला पोवाडा इतका उत्कृष्ट साधला आहे कीं, त्या बाबतींत आपणांस पुरेपूर यश आलेलें आहे. भाषा, विचार, रचना व विशेषतः पोवाड्याचा प्राण, म्हणजे त्यांत असावी लागणारी प्रेरकशक्ति, या गुणामुळे आपला हा पोवाडा मराठी भाषेचें कायमचें भूषण होऊन राहील अशी मला खात्री वाटते. मला तो पोवाडा अत्यंत आवडला व मी तो माझ्या कांही स्नेह्यांस वाचूनहि दाखविला. आपण या बाबतींत तरुण कवींनाहि लाजविलें आहे हें लिहितांना मला साभिमान आनंद होत आहें. हा आनंद व्यक्त करण्यासाठीच मी हें पत्राचें धाडस करीत आहें, तरी आपली पुन्हा एकदा क्षमा मागून पत्र पुरें करतों.

९०९

**४ जानेवारी १९३५—पंडित आत्माराम बेदी, मुंबई**

माझी ३६ वर्षें वयाची विधवा मुलगी व ३३ वर्षें वयाची स्नुषा यांना

शिक्षण द्यावें व उद्योगधंदा मिळवून द्यावा अशी माझी इच्छा आहे. याबाबत मी काय करावें हें आपण सुचवाल काय ? त्याचप्रमाणे माझ्या मुलांमुलींचीं लग्नें जुळवून द्याल काय ?

९१०

**३१ जानेवारी १९३५—वि. पां. करमरकर, मूर्तिकार, मुंबई**

आपण १९२२-२३ सालीं कलकत्त्यास आला होता त्या वेळीं मला लेखन करण्याचा उपदेश केला; व पुढे केसरींत माझे लेख छापून मला प्रोत्साहन दिलेत.

विचारांची खळबळ उडाली कीं, मन शांत होण्यासाठी मी लिहूं लागतों. अशाच रीतीने मी हें नाटक लिहिलें आहे तें आपणाकडे धाडीत आहें. आपला मार्गदर्शक अभिप्राय पाठवावा.

९११

**११ मार्च १९३५—डॉ. ना. वि. जोशी, मिरज**

मी मिरजेस १०,००० रु. किंमतीची इमारत "तत्त्वज्ञानमंदिरा"साठी बांधविली आहे. पौर्वात्य व पाश्चात्य तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचा संग्रह तेथे करणार आहे. त्याने अभ्यासूंची सोय होईल. दरवर्षी शंभर रुपये किंमतीची ग्रंथ खरेदी करणार आहे. तरी तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांची एक यादी पाठविल्यास काम सोपें होईल. येथे विद्वान् लोकांचीं व्याख्यानें करण्याचाहि इरादा आहे.

फक्त तत्त्वज्ञान विषयास वाहिलेलें एखादें मासिक अगर त्रैमासिक काढल्यास तें कितपत चालेल व त्याला खर्च किती येईल ?

मी पोटाच्या कॅन्सरने आजारी असल्याने माझा केव्हा अंत होईल हें सांगवत नाही. म्हणून लौकर पत्र आल्यास व्यवस्था करणें शक्य होईल.

९१२

**२३ मार्च १९३५—मा. श्री. अणे, न्यू दिल्ली**

आपल्या तारा पोचल्या. माझ्या ताराहि आपणांस पोचल्या असतील.

विलायतेस शिष्टमंडळ पाठविण्याची मूळची कल्पना पंडित मालवीयजींची. तेव्हा शिष्टमंडळावर नेमावयाच्या सभासदांची निवड त्यांनीच करावी असा ठराव जातीयनिर्णय विरोधी परिषदेच्या कार्यवाही मंडळाने केला. पंडितजींनी अगोदरच

आपल्या परिचयाची व ज्यांचीं राजकारणांतील मतें आपल्याला संमत आहेत अशा लोकांची, निवड करून ठेविली होती. मी आपल्या सूचनेप्रमाणे रा. लेले, गोडबोले वगैरेंचीं नांवें सुचविलीं. पण मालवीयजींनी असें सांगितलें की, महाराष्ट्रातर्फे असे दोनच लोक पुरेत व ते म्हणजे श्री. अणे व भोपटकर. रा. जम्नादास मेथांच्या कार्य करण्याच्या पद्धतीबद्दल पंडितजी साशंक आहेत. अशा स्थितींत मी आग्रह धरणें अशिष्टपणाचें झालें असतें.

आता दुसरा प्रश्न आपली परिषद भरविण्याच्या कल्पनेला पसंती आहे. ती मुंबई किंवा पुणें कोठेहि भरली तरी माझी हरकत नाही. लोकशाही पक्ष, प्रति-सहकारपक्ष व वऱ्हाडांतला राष्ट्रीय पक्ष आज महाराष्ट्रांत एकाच कल्पनेने व कार्य-पद्धतीने चालत आहेत.

लोकशाही पक्ष चालू ठेवावा असें तुमच्याप्रमाणे मलाहि वाटतें. पण खरं बोलायचें तर वऱ्हाडांत राष्ट्रीयपक्षाने लोकशाहीपक्षाच्या नांवाने कांहीच काम केलें नाही, किंवा पुढेहि त्याच्या हातून तें होणार नाही. रा. ओगले या पक्षाचे चिटणीस होणार एवढीच एक नोंद कागदोपत्रीं नमूद आहे. त्याखेरीज या पक्षाच्या नागपूर प्रांतांतल्या अस्तित्वाची दुसरी खूण मला दिसत नाही.

कॉंग्रेस नॅशनॅलिस्ट पक्ष नवीन स्थापन होऊन त्याने निवडणुकी लढवून कांही सभासद असेंब्लींत पाठविले आहेत. दोन प्रांतांत तरी त्या पक्षाचें बरेंच प्राबल्य आहे. मद्रासला त्याच्या शाखा काढण्यासाठी वरदराजलु नायडूसारखे कार्यकर्ते सुचवीत आहेत. जातीय निर्णय–विरोधी चळवळ नेटाने चालू ठेवण्याचा कार्यक्रम पक्षाचा सध्या आहे. वऱ्हाड, नागपूर, महाराष्ट्रांत या पक्षाला बरीच सहानुभूति आहे. याच गोष्टींचा विचार सर्व–भारत पक्ष निर्माण करण्यासाठी करावयास हवा. प्रांतिक दृष्टीपेक्षा कार्यक्षेत्र विस्ताराची दृष्टि प्रबल असेल तर, कोणत्या नांवाखाली संघटण सुकर व शीघ्र होईल त्याचा विचार करायलाच हवा. राजकीय पक्षाला सर्व–भारत स्वरूप आणल्याशिवाय त्याच्या कर्तबगारीचा परिणाम प्रत्यक्ष दृग्गोचर व्हावयाचा नाही.

आपण स्वतः जर परिषदेस हजर राहणार नसलांत तर परिषदेच्या हातून कांही उपयुक्त कार्य घडेल की नाही याची मला शंकाच वाटते.

या सर्व गोष्टींकडे आपण त्रासलेल्या वृत्तीने पाहांत आहां. स्वतः यांतुन

मोकळे होऊन इतर काय करतील तें पाहावें अशी आपली वृत्ति मला सदोष वाटते. ज्या लोकांनी गेलीं १२ वर्षें तुम्हाला आपला नेता मानले, ज्यांनी आपल्या ६० व्या वाढदिवसाच्या वेळीं एवढा आदर प्रकट केला, त्यांतील कांहींचा तुमच्याशीं मतभेद झाला तरी आपण वैतागून जाऊं नये. जेथे तेथे विरोधक दिसतात म्हणून आपण त्यांचा संबंधच नको म्हणून दूर राहतां हें महाराष्ट्राचें दुर्दैव होय. शिष्टमंडळावरचें मालवीयांचें आमंत्रण आपण नाकारलें. खेरीज केसरींत त्याच्या खुलाशासाठीं जें लिहिलेंत तें वाचून मी हतबुद्ध झालों आहे. आपली ही मनःस्थिति मला चिंताजनक वाटते. मनमोकळेपणाने मी लिहिलें आहे. पण आपण रागावणार नाहीं असा विश्वास आहे.

शिष्टमंडळाच्या प्रयाणाची तारीख अजून नक्की ठरली नाहीं. पण एप्रिलच्या दुसऱ्या आठवड्यांत तें जावयाचें असलें, तर मला परिषदेस हजर राहता यावयाचें नाहीं.

## ९१३

### ८ फेब्रुवारी १९३५—सर एम्. विश्वेश्वर अय्या, मुंबई

आपली ६ ता. ची तार व ता. ७ चें पत्र पोंचलें. २५ तारखेनंतर मला बंगलोरला काम आहे. पण आपण दोष देऊं नये म्हणूनच मी पैसाफंड ज्युबिली समारंभाचें आमंत्रण स्वीकारिलें, व त्यांत भाग घेण्याचें ठरविलें. कर्वे युनिव्हर्सिटीच्या कामांत आपण लक्ष घालणार आहांत हें वाचून आनंद झाला.

## ९१४

### (?) १९३५—सर विश्वेश्वर अय्या, मुंबई

मुंबईस श्री. पाटकरांच्यासह प्रो. कर्वे व आपणांस भेटून इं. वु. युनिव्हर्सिटीच्या वादाचा निकाल करण्यास लेडी ठाकरसी कबूल आहेत. या महिन्यामध्ये आपण एखादी तारीख यासाठीं ठरवाल काय ? पण माझी सूचना अशी आहे की, लेडी ठाकरसी व आपण स्वतः अशा दोघां सूज्ञ माणसांनी जर या प्रश्नाची प्रत्यक्ष भेटून चर्चा केली तर त्याचा निर्णय चटकन् लागल्याशिवाय राहणार नाहीं. आपण लेडी ठाकरसींच्याशीं या बाबतींत कृपा करून जरूर बोलावें. पत्रोत्तर लवकर यावें.

९१५

२३ फेब्रुवारी १९३५—धों. के. कर्वे, पुणें

ठाकरसी ट्रस्टींच्याशीं समेट घडविण्याचा आणखी निष्फळ प्रयत्न करण्याच्या भरीस सर विश्वेश्वर अय्या पडत आहेत. त्यांत मला अर्थ दिसत नाही. म्हणून त्यांना मी खुलासेवार पत्र धाडलें आहे त्याची कॉपी आपल्या अवलोकनार्थ धाडीत आहे. तें पत्र असें आहे—

" केळकरांच्याशीं आपल्या झालेल्या पत्रव्यवहारासंबंधी मला पुढील कांही गोष्टीचा खुलासा करावयाचा आहे.

लेडी ठाकरसी यांनी युनिव्हर्सिटीच्या प्रतिनिधींबरोबर कांही अटी मान्य केल्या होत्या. याविषयीचा निर्णय सेनेटने सिंडिकेटकडे सोंपविला. सिंडिकेटमध्ये कांही सभासदांनी असा आग्रह धरला की, ग्रँटची उरलेली बाकी कायमनिधीकडे जमा केली जावी. आणि मुंबईस ऑफिस करण्यासाठी नवीन इमारत विकत अगर भाड्याने, त्यांच्या इच्छेबरहुकूम, घ्यावयाची असल्यास लेडी ठाकरसींनी कबूल केलेल्या ५०,००० रु. खेरीज आणखी ५०,००० रु. ची रक्कम द्यावी. मगच युनिव्हर्सिटीचें केंद्र पुण्याहून मुंबईस लागलीच हालविणें शक्य होईल. या मुद्द्यावरचा निर्णय ॲडव्होकेट जनरलांकडे सोंपवावा व बाकीचे मुद्दे आम्हाला मान्य आहेत असें सिंडिकेटने ठरविलें.

निर्णय ॲडव्होकेट जनरलकडे सोंपविण्यास लेडी ठाकरसी कबूल नव्हत्या, असें पाहून सिंडिकेटने तत्पूर्वी लेडी ठाकरसी व युनिव्हर्सिटीचे प्रतिनिधि यांच्यामध्ये झालेल्या कराराप्रमाणे वागण्याचें ठरविलें.

परतु लेडी ठाकरसींनी आता दोन महत्त्वाच्या बाबी नाकारल्या. त्या अशा-
(१) श्री. गाडगीळ कामत प्रभृतींसह चार्टर्ड अकौंटंट्सनी हिशेबतपासणी करणें.
(२) ७॥ लाखांच्या इस्टेटीवर अधिकार युनिव्हर्सिटीला देणें.

सिंडिकेट यासाठी तीन वर्षांची मुदत द्यावयास तयार होती. पण लेडी ठाकरसींनी १ वर्षांतच त्या इस्टेटीचा ताबा देण्याचें ठरविलें होतें.

आता समेट फिसकटला त्याचें कारण कराराप्रमाणे वागण्यास सिंडिकेटची हरकत हें नसून लेडी ठाकरसींनी अटी मोडण्यास प्रारंभ केला हें होय.

चॅन्सेलर व मी याच्या वचनामुळे सिंडिकेट या कराराप्रमाणे वागण्यास कबूल होती. परंतु लेडी ठाकरसींनी हा करार फिसकटविल्याने आता त्याच अटींवरें पुन्हा समेट करण्यास सेनेट किंवा सिंडिकेट तयार होईलसें वाटत नाही.

यामुळे समेटाचा मार्ग अधिकच बिकट होऊन बसला आहे.

९१६

(?) १९३५—सर एम्. विश्वेश्वर अय्या, म्हैसूर

आपली दुपारची भेट समेट करण्याच्या दृष्टीने अयशस्वी झाली. गेल्या महिन्याच्या २० तारखेला न्या. पाटकरांच्या घरीं प्रो. काजी व इतर लोकांनी या विषयाबद्दल उहापोह केला होता. पण लेडी ठाकरसींच्या अटी युनिव्हर्सिटीला मान्य न झाल्याने निर्णय झाला नाही. आता पुन्हा जर या कामीं वाटाघाट करण्याचा विचार निघाला तर युनिव्हर्सिटीच्या काय अटी आहेत तें त्यांनी लेडी ठाकरसींना कळवावें. या बाबतींत आणखी कांही घडल्यास आपण लेडी ठाकरसींना कळवाल काय ?

९१७

६ जून १९३५—वि. पां. करमरकर, मूर्तिकार, मुंबई

आपण कुलाबा जिल्ह्यांत याल तेव्हा सासवन्यास माझ्या घरीं यावें असें आमंत्रण पूर्वी दिलें होतें, त्याची आठवण करतों. सासवनें ही माझी जन्मभूमि आहे. येथे घर बांधून मी एक स्टूडिओहि केला आहे. तो व्यापारी उद्देशाने नाही. मला माझी कला स्वतःच्या आनंदाकडे लावता यावी या उद्देशाने तो केला आहे. माझ्या आनंदाचा एक प्रकार असा आहे कीं, विद्वान व थोर विभूतींची माझ्या गांवकऱ्यांना ओळख करून देऊन, त्या विभूती त्यांच्या नजरेस पाडाव्या व त्यांचे चेहेरे माझ्या स्टूडिओंत राहावे. सासवन्यास माझ्या स्टूडिओंत आपण मला एक सिटिंग द्यावें. त्या सिटिंगवरून आपला चेहरा करून तो तेथे ठेवावा अशी माझी इच्छा आहे. तरी आपल्या सवडीचा वेळ कळवावा. घरत यांना २३ तारखेस ८० वर्षे पुरी होतात त्या सुवर्णमहोत्सवाच्या वेळींच हा योग आला तर फार चांगलें होईल.

९१८

### ७ जून १९३५—काका कालेलकर, वर्धा

आपलें ता. ३–६ चें कार्ड पोहोचलें. आमच्या येथे केसरी येत नाही. त्यामुळे आपण केसरींत कांही लिहिलें असल्यास तें पहावयास मिळालें नाही. मी सध्या वर्ध्याहून दीड मैल दक्षिणेस एका खेडेगांवांत राहूं लागलों आहें. तरी कृपा-करून आपला 'केसरी' माझ्या नांवें, लिपि समिति कार्यालय, मगनवाडी, वर्धा या पत्त्यावर चालू करावा.

आमच्या लिपि समितीची पहिली बैठक वर्धा येथे ता. २५ जूनला ठेवली आहे. त्या दिवशीं नागरी लिपीच्या सुधारणेविषयीच्या निरनिराळ्या कल्पनांची चर्चा होईल. महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या देवनागरी उपसमितीच्या प्रतिनिधींना मी आमंत्रण दिलें आहेच. याखेरीज या विषयांचा ज्यांनी अभ्यास केला आहे अशा इतर मंडळींनादेखील प्रेक्षक म्हणून हजर राहण्यास आमंत्रण देणार आहें. अशा लोकांना आगाऊ कळविणार आहे.

माझा विचार हिन्दी, मराठी, आणि गुजराती या तीन भाषांच्या साहित्य परिषदांनी मिळून विचार करावा, आणि एक समयावच्छेदें करून सुधारणा अमलांत आणावी अशी सूचना करण्याचा आहे. या विचाराला आपला स्वदस्तुरचा टेका मला हवा आहे. ता. २५ जूनच्या पूर्वी केसरींत आणि मराठ्यांत (कारण ही चळवळ सर्व प्रान्तांतून चालवावयाची आहे) आपला लेख आल्यास त्याचा परिणाम चांगला होईल. आमच्या लिपि परिषदेच्या बैठकी आम्ही निरनिराळ्या वेळी निरनिराळ्या ठिकाणीं ठेऊन प्रचार वाढविणार आहोत. या बाबतींत आपल्या स्वतःच्या ज्या कांही सूचना किंवा योजना असतील त्या मला आपण अवश्य पाठवून द्याव्यात. अनुच्चारित अनुस्वाराचें बंड तिन्ही भाषांमधून आहे. एकाच भाषें-तून बंड मोडणें कठीण होईल. तिन्ही भाषांनी मिळून जोर केला तर कदाचित् काम साधेलहि. सरसहा सगळेच अनुच्चारित अनुस्वार न काढतां, निर्जीव आणि भाषा-शास्त्रदृष्ट्या कमी महत्त्वाचे असे अनुस्वार प्रथम पिटाळल्यास कदाचित् सोपें जाईल. हा प्रश्न लिपि सुधारणेचा नसून "जोडणी" चा आहे. (गुजरार्थीमधील हा शब्द शुद्धलेखनापेक्षा जास्ती अन्वर्थक आहे असें मला वाटते.) पण छाप-ण्याच्या सोयीच्या दृष्टीने कदाचित् याचाहि विचार उरकून घेतल्यास वाईट नाही.

९१९

**? ऑक्टोबर १९३५—सी. विजयराघवाचारियर, सालेम (मद्रास)**

तुमचें हिंदुमहासभेचें निमंत्रण पोंचलें. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणे मला येता येईलसें वाटत नाही. आणि १५ तारखेच्या आंत कांही लिहून पाठविता येईल असेंहि दिसत नाही. धोरण थोडेंसें बदलावें लागलें तरी राष्ट्रीय सभेंत ऐक्य घडून यावें ही गोष्ट अधिक महत्त्वाची आहे असें मी समजतों. सुरतेच्या राष्ट्रीय सभेनंतर जो कोणी भेटेल त्याला टिळकांच्या बाजूला ओढण्याचा प्रयत्न मी करीत होतों, आणि शेवटी सर विल्यम वेडरबर्न यांचें मन वळवून अध्यक्षाकडून टिळकांच्या मुटकेसंबंधांचा ठराव मी करवून घेतला. राष्ट्रीय सभेंत इतर ठरावांप्रमाणे हा ठराव मांडून पास करून घ्यावा असें मला वाटत होतें. परंतु गोखले त्या गोष्टीला अनुकूल होईनात. तेव्हा मला वाटलें की, अध्यक्षांकडूनच तो ठराव मांडला म्हणजे मतभेदाचा प्रसंगच टळला. माझी युक्ति साधली असें पाहून गोखले यांनी माझें व्याजोक्तीने अभिनंदन केलें! तेव्हा मीहि म्हटलें की, मी तुमच्यावर खंडा केला! हल्ली राष्ट्रीय सभेशी ऐक्य कसें घडून येईल याची मला चिंता वाटते, पण मार्ग सुचत नाही. फॅसिझमचा राजकारणांत प्रवेश होऊं लागला आहे. आणि मी तर आता राजकारणांत कोणीच नाही अशी स्थिति झाली आहे!

९२०

**२४ ऑक्टोबर १९३५—सर पुरुषोत्तमदास ठाकुरदास, मुंबई**

रिझर्व बँक लोकल बोर्डाकरिता उमेदवार म्हणून मी उभा आहे. तरी तुम्ही मला पाठिंबा याल अशी मला आशा आहे. ललुभाई दामोदरदास व माझे एक प्रतिनिधि हें पत्र तुम्हास देतील तरी त्यांना प्रॉक्सी मिळवून देण्यास मदत करावी. तुमच्या मदतीची मला फार आवश्यकता आहे.

९२१

**२२ डिसेंबर १९३५—गोविंदलाल शिवलाल, मुंबई**

परमेश्वर कृपेने आणि तुमच्या पाठबळामुळे सर्वांत ज्यास्त मतें मिळून माझी निवडणूक झाली. (तार)

## ९२२

### २९ डिसेंबर १९३५—सी. विजयराघवाचारियर, सालेम ( मद्रास )

गेल्या शुक्रवारीं येथे जी परिषद झाली त्याला तुम्ही संदेश पाठविल्याबद्दल फार आभारी आहें. माझ्याबद्दल जें अंतःकरणपूर्वक प्रेम तुम्ही दाखवितां त्याबद्दल कोणत्या शब्दांनी आभार व्यक्त करूं ? मातृभूमीची सेवा करणाऱ्या सर्वच देशभक्तांना लोकांकडून कृतज्ञता व आभाराचे शब्द ऐकावयास मिळतातच असें नाही. कित्येकांच्या श्रमसायासांची लोकांना दादहि नसते ! मी या बाबतींत भाग्यवान् आहे असें मला वाटतें. हिंदुमहासभेला मला प्रत्यक्ष हजर राहणें शक्य नाही. पण मनाने मी त्या ठिकाणीं आहेंच. हिंदूंच्या दृष्टीने सध्याची वेळ आणी-बाणीची आहे. त्यांतून निभावण्यास बुद्धि आणि धैर्य हीं त्यांना ईश्वर देवो.

## ९२३

### ३० डिसेंबर १९३५—शेट घनश्यामदास बिर्ला, न्यू दिल्ली

तुम्ही कांहीहि लिहिलें अगर कोठेहि भाषण केलें तरी तें मी लक्षपूर्वक वाचतों. पुण्यास हिंदुमहासभेचे स्वागताध्यक्ष म्हणून जें भाषण तुम्ही केलें त्यांत वस्तु-स्थितीचें वर्णन निदान शंभर टक्के बरोबर होतें. पण तें घालविण्यास उपाय काय ! मला वाटतें, लोक परधर्मांत जातात त्याला जास्त कारण आपलीच समाज-व्यवस्था आहे. जातिभेद व अस्पृश्यता आपण नष्ट करूं शकलों तर धर्मांतर थांबेल इतकेंच नव्हे तर इतर लोक या धर्मांत येतील. पं. मालवीय यांच्या भाषणाने मात्र कांहीशी निराशा झाली. नुसत्या मंत्रदीक्षेने काय होणार ? हिंदूंनी शरीरसामर्थ्य वाढविणें हाहि एक महत्त्वाचा मुद्दा आहे. महाराष्ट्राने या बाबतींत पुढाकार घेतला आहे असें तुम्ही आपल्या भाषणांत म्हटलेंच आहे.

## ९२४

### ४ फेब्रुवारी १९३६—लेफटेनंट दामोदर नरहर ठकार, पाटणा

इंडियन सँढर्स्टकरिता मी प्रयत्न केला तेव्हा आपण मजवर अनंत उपकार केलेत व वेळेवर पैशाची मदत केलीत. १९३५ सालीं मी पास होऊन बाहेर पडलों. नवीन हिंदीकरण करण्यास काढलेल्या फील्ड आर्टिलरीमध्ये मी पहिलाच महाराष्ट्रीय लेफ्टनंट आहे. विमान चालविण्याचा लायसेन्सहि मी कायम ठेवला

आहे. डॉ. मुंजे लष्करी शाळा काढीत आहेत तो उपक्रम स्तुत्य आहे. तुम्ही मला मिलिटरी एज्युकेशन फंडांतून मदत देवविली म्हणून तुम्ही माझें प्रतिपालन-कर्तेच ठरत आहां. ते उपकार मी कधींहि विसरणार नाही.

९२५

६ फेब्रुवारी १९३६—प्रो. दिवाणचंद शर्मा, लाहोर

हिंदी ग्रंथ कॉंफरन्सच्या अध्यक्षपदासंबंधाने आम्ही अडचणींत सांपडलों आहों. तरी अध्यक्ष होण्याचें मान्य करून ती दूर करा. आपण यावें असा आग्रहच आम्ही धरणार.

९२६

१२ मे १९३६—सतीश कालेलकर, ऑक्सफर्ड

मी गुजराथ विद्यापीठांतून निघून जाऊन सरकारी शिक्षण घेण्याचें ठरविलें म्हणून मला घरून मदत मिळणें शक्य नाही. सर्वांना सरांस उद्योग करा-वयास लावण्याचें महात्मा गांधींचें तत्त्व मला मान्य नव्हतें. मी स्कॉलरशिपा मिळवून आजपर्यंत अभ्यास केला. हल्ली मी हार्टफर्ड कॉलेजांत आहें. तत्त्वज्ञान, राजकारण, अर्थशास्त्र हे विषय घेतले आहेत. येथे यापुढे मला पैशाची मदत तिकडून न झाली तर अभ्यासक्रम सोडावा लागेल. तरी आपण कोण-त्याहि एखाद्या शिक्षण फंडांतून मदत देण्याची कृपा करवाल काय ?

९२७

२७ मे १९३६—व्ही. व्ही. नारळीकर, रँगलर, प्रो. बनारस युनिव्हर्सिटी

बनारस युनिव्हर्सिटींत महाराष्ट्रीयांकरिता संशोधनाच्या अभ्यासासाठी एक दोन स्कॉलरशिपा ठेवण्यासंबंधाने मी पुण्यास आपणांशीं बोललों होतों. तरी पुस्तकें, शिष्यवृत्ति अशांकरिता तिकडून कांही द्रव्यसाहाय्य आपण मिळवूं शकाल काय ? मजकडे आपलें इतर रीतींनें लक्ष आहे म्हणून ही गोष्टहि सुचवितों.

९२८

३० मे १९३६—प्रल्हाद केशव अत्रे, पुणें

आपलें पत्र पोंहोचलें. आपल्या ज्ञानासंबंधी, चारित्र्यासंबंधी, अधिकारा-

संबंधी, व वाङ्मयासंबंधी मला स्वतःला इतका गाढ आदर आहे कीं, त्या बाबतींत मी कोणासहि हार जाणार नाहीं. आपल्यासंबंधीचा हा आदर मी वेळोवेळीं व्याख्यानांत, लेखनांत, व आपल्याशीं वागतांना नेहमीच दर्शविण्याचा प्रयत्न केलेला आहे. म्हणून आपल्या मनाला दुःख होईल किंवा आपल्या कर्तबगारीला उणेपणा येईल असें मी कधींहि लिहिणार नाही किंवा बोलणार नाही.

गद्रे यांच्या व्याख्यानाच्या वेळीं मी 'अच्युतराव रोज वर्तमानपत्रें काढीत व रोज बुडवीत. ते दुसऱ्यांनी काढलेल्या वर्तमानपत्राच्या आयत्या बिळावरील नागोबा नव्हते.' असें मी म्हणालों. पण यामध्ये आपल्यासंबंधी कांही ध्वनित करण्याची माझी मुळींच मनोवृत्ति नव्हती, हें मी आपणाला प्रामाणिकपणे सांगूं शकतों. माझ्या सबंध व्याख्यानांत मी गद्रे यांनी उपस्थित केलेल्या वादासंबंधी एक अक्षरहि बोललों नाही. गद्रे यांची 'मौज' खरेदी करून स्वतःच्या नांवावर चालविणें, किंवा दुसऱ्यांनी काढलेलीं पत्रें आपण खरेदी करून मारून मुटकून संपादक बनणाऱ्या गृहस्थावर ही टीका होती. यांचें नांव सांगण्याची आपल्याला आवश्यकता नसेलच. आपल्या संबंधी सुतराम् विचारहि माझ्या मनांत त्या वेळीं नव्हता. पण त्या पुढे 'पत्र कर्त्यांच्या स्फुट सूचना' 'लि. आ. म.' असले जुनाट मथळे अच्युतराव देत नसत असेहि मी म्हणालों यामध्ये ध्वनित झालेल्या टीकेवरून कदाचित् पूर्वीची टीकाहि 'केसरी'संबंधी अतएव आपल्या संबंधी असावी असा दूरान्वय कोणी तरी केल्यासारखा दिसतो. 'आयत्या बिळावरील नागोबा' असा आपला उल्लेख करण्याइतकी अधम मनोवृत्ति माझी नाही असे आपण निश्चित समजावें.

आपल्या संस्थेबद्दल व आपल्या संचालकीय कामगिरीबद्दल मी कधींहि विरुद्ध बोलणे शक्य नाही. तथापि आपला तसा समज होण्यासारखी थोडीशी परिस्थिति निर्माण झाली हें मला मान्य आहे. म्हणून मी एवढा खुलासा केला. आपल्या मनाला त्यामुळे उद्विग्नता उत्पन्न झाली असेल तर त्याबद्दल मी अत्यंत दुःखी आहे. आपली क्षमा मागण्यांत मला केव्हाहि कमीपणा वाटणार नाही.

:९२९

### ३० जून १९३६—डॉ. बा. शि. मुंजे, नवी दिल्ली

मुंबईस तारीख १८ ला गेलों. तीन दिवसपर्यंत डॉ. अंबेडकर यांच्याशीं संभाषण झालें. त्यांनी सलोख्याने धर्मांतरांतून पाय मागे घ्यावा याविषयी चर्चा

होऊन मसुदा ठरला तो यासोबत पाठविला आहे. मुंबईहून दिल्लीस आलों. पंडीत मालवीय व पतियाळाचे महाराज यांना भेटणार आहे. आपणा सर्वांचा एक विचार झाला म्हणजे तो मसुदा हिंदुमहासभेपुढे ठेवीन.

९३०

३० जून १९३६—प्रो. श्री. म. माटे, पुणें

मराठ्यांतील जवाहरलाल नेहरूंना दिलेलें आपलें उत्तर वाचलें. जोराने तुटून पडलां हें फार चांगलें झालें. सात्त्विक राग, सद्भाव, वडिलपणाचें गांभीर्य, आत्मसमर्थनाच्या वेळीं येणारी बौद्धिक व मानसिक चपलता, जुना मुद्दा उकलून सांगावयास लागणारें स्मरण, ओरखडणाऱ्या पोराला दूरूनच धमकावण्याचें कसब, भाषेची युक्तता व सदाभिरुचि या गुणांमुळे प्रस्तुत लेख फारच सरस उतरला आहे. ही चपराक चांगली झणझणेल. लेख दोनदा वाचला. लेखांत आपण माधवरावजी रानडे यांना संभाळून नेलें आहे. पण माझा मतभेद आहे.

९३१

३० जून १९३६—जमालउद्दीन मखनूर, शंकरकुटी, बियावर

पंडित जवाहरलाल यांना आपण दिलेलें उत्तर वाचलें. तें ठणठणीत, धिटाईचें आहे. त्या पत्रांत आपण एका जर्मन बालकथेचा उपयोगहि करावयास हवा होता. त्या गोष्टींत मांजराच्या गळ्यांत घाट बांधू पाहणाऱ्या उंदरांच्या सभेची हकीगत होती. राजशाही आनंद-भुवनांतील इंग्रजी शिक्षणाने तयार झालेल्या कम्युनिस्टाला बराच बोध झाला असता.

९३२

२ जुलै १९३६—मुखी गोविंदराम, एम्. एल्. सी., हैद्राबाद

सिंध हैद्राबादची हिंदुसभा आपणांस या तारेने निमंत्रण देत आहे. दोन दिवस तरी मुक्काम व्हावा. सोयीच्या तारखा कळवा.

९३३

७ जुलै १९३७—जवाहरलाल नेहरू, अलाहाबाद

येथे आल्यावर तुमच्या उत्तराचा लेख वाचला. मला व्यक्तिविषयक वाद करण्याचा फार कंटाळा आहे. म्हणून तुमच्या माझ्या वादांत जाहीर रीतीने न लिहितां हें खाजगी पत्र तुम्हांला लिहितों. तुमच्या आमच्या विचाराच्या दिशा

वेगळ्या असल्यामुळे त्याच गोष्टींवरून आपण वेगवेगळीं अनुमानें काढतों हें उघड झालें आहे. यापुढे उगीच एकमेकांची खात्री करून देण्यांत अधिक गैरसमज मात्र होऊन चित्तक्षोभ वाढावयाचा. माझ्या लिहिण्यानें तुम्हांला दुःख झालें, आणि तुमच्याशीं वागण्यांत मी संभावितपणा किंवा दाक्षिण्यबुद्धि सोडली, असें तुम्हांला माझ्या लिहिण्यावरून वाटलें असें पाहून फार खेद होतो. खरी गोष्ट तशी नाही असें कितीहि आश्वासन मी दिलें तरी त्याचा फारसा उपयोग नाही. परंतु तुम्हांला तसें कळविणें हें माझें कर्तव्य आहे. मी लिहिलें त्यांत मतभेदावर जोर होता, व्यक्तिविषयक लिहिण्याचा उद्देश नव्हता. चांगल्या चांगल्या श्रेष्ठ बुद्धिमान् लोकांतहि असे गैरसमज होतात तें कां कळत नाही. कसेंहि असो. हें पत्र लिहिण्याचा हेतु इतकाच कीं, तुमच्या मनाला त्रास होण्याला व दुःख देण्याला मी कारणीभूत झालों याचें मला वाईट वाटतें. तुमच्या समजुतीप्रमाणें माझी मनोवृत्ति कितीहि विपरीत झाली असली तरी, तुमच्याशीं वागतांना असभ्यपणाचें वर्तन करावें इतकी ती अजून तरी खास विपरीत झाली नाही.

९३४

ता. ८ जुलै १९३६—ईश्वरदत्त, संपादक, ट्वेन्टिएथ सेन्चरी, अलाहाबाद

पं. जवाहरलाल नेहरूंना तुम्ही दिलेलें उत्तर वाचल्यापासून तुम्हांला पत्र लिहावें असें मनानें घेतलें. राजकीय वादविवादांमध्ये अलीकडील कित्येक वर्षांत तुमच्या या उत्तरासारखें समर्पक आणि खोचदार असें उत्तर माझ्या पाहण्यांत आलें नाही. अशा प्रकारें तिरकमठा हातीं घेण्याला तुम्हांला पंडितजींनीच चेतविलें यांत शंका नाही. पण तो तिरकमठा घेऊन जो बाण तुम्ही मारला, तसा तुम्हीच माराल. दुसरा कोणीहि मारू शकणार नाही. तुमचें उत्तर मला इतकें चांगलें वाटलें की, मी तें त्वरित रार तेजबहादुर सप्रु यांना दाखविलें, आणि तें वाचून त्यांना इतका आनंद वाटला कीं, त्यांनी लगेच उत्साहानें तुमचा लेख 'लीडर' पत्राच्या संपादकाकडे पाठवून तो प्रसिद्ध करावा असें मुद्दाम सुचविलें.

९३५

१७ जुलै १९३६—एम. आर. लेले, इस्लामिया कॉलेज, अंधेरी

आपण मला लिमये स्कॉलरशिप मिळवून दिली, याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

९३६

**३१ जुलै १९३६—द. वा. कठाळे, एल्. एल्. एम्., अॅड., नागपूर**

नागपूर 'डेली न्यूज' पत्रांत डॉ. देशमुखांच्या स्त्रियांच्या इस्टेटीसंबंधाचा लेख प्रसिद्ध झाला तो तुम्हाला पहाण्याला पाठवीत आहे. तो लेख माझा थोरला मुलगा नागपुरास वकिली करतो त्याने लिहिला आहे. दिल्लीच्या विद्यापीठाची एम्. एल्. डिग्री मिळविण्याकरिता या एकंदर विषयावर तो एक मोठा निबंधच लिहीत आहे. त्या बुकाच्या प्रसिद्धीच्या कामीं कोणी प्रकाशक मिळण्याविषयीं तुम्ही कांही सहाय्य देऊं शकाल काय?

९३७

**८ ऑगस्ट १९३६—प्रभाकर श्रीपाद कोल्हटकर, संपादक, 'संजीवनी', मुंबई**

आपलें प्रांजल मनाने लिहिलेलें पत्र पोचलें. संजीवनी मासिकाच्या पहिल्या पहिल्या दिवसांत मी तुमच्याविरुद्ध त्या मासिकांत लिहिलें. परंतु फार दिवसांपूर्वी पुण्यांत आलों होतों तों तुमची माफी मागण्याकरिताच, पण गांठ पडली नाही. 'आकाशवाणीं'त लिहिण्याचें काम मजकडे आलें तेव्हापासून मी तुम्हाविरुद्ध कांही लिहिलें नाही. तुमच्यासंबंधाने निंदात्मक असें कांही लिहूं नये अशी माझ्या वडिलांनीच मला शपथ घातली होती. अखेरच्या दिवसांपर्यंत माझ्या वडिलांच्या अंतःकरणांत तुमच्याविषयी विशेष प्रकारचा जिव्हाळा होता हें मी सांगितलें तर त्यावर तुम्ही विश्वास ठेवणार नाही काय? त्यांच्या तुमच्यांतहि शेवटीं शेवटीं कांही गैरसमज झाला होता हें मला माहित आहे. तो गैरसमज तुम्ही त्यांच्या लेखसंग्रहाला जी अत्युत्कृष्ट प्रस्तावना लिहिली त्यासंबंधानेच होता हेंहि मला माहित आहे. पण तो कांही स्वार्थसाधु लोकांनी करून दिला होता. मग तो कां याचीं कारणें त्यांनाच माहित. पुढील भेटींत त्याविषयीं मी तुम्हांला सांगेन. तुम्ही आपल्या प्रस्तावनेचीं प्रुफें त्यांजकडे पाठवून त्यांतला वाटेल तो भाग काढून टाका अशी परवानगीहि तुम्ही दिल्याचें मी त्यांना सांगितलें. पण कोणाच्या तरी चुकीने, किंवा स्वतः त्यांच्या चुकीने, न आवडणारा असा एखादा भाग कदाचित् राहून गेला असावा. हें मी तुमचें खरें समाधान व्हावें म्हणून लिहितों; तुमच्याकडून मासिकांकरिता लेख मिळवावा म्हणून नव्हे. प्रारंभापासून तुमच्याविषयी असलेली माझी आ[illegible] बुद्धि कायम आहे. मी माझ्या मित्रांना म्हणतच असतों कीं, केळकरांच्या [illegible]

त्यांच्या खऱ्या योग्यतेची जाणीव तुम्हाला अधिक होईल. असो; झाल्याबद्दल क्षमा मागून पुरें करतों. तरी पत्रोत्तर लिहावें.

९३८

**१३ ऑगस्ट १९३६—के. एन्. लिमये, पेन्शनर, अमरावती**

आपलें पत्र व तार पोंचली. प्रो. दामले व आ. रा. भट यांनी केलेला मसुदा आम्ही वाचला व अखेर मसुदा तयार केला व आता तें काम पुरें झालें. तुम्ही यांत लक्ष घातलें म्हणूनच हें काम लवकर निकालांत निघालें. मजजवळ उरलेल्या पैशांतून लोन्स-स्कॉलर्सशिप फंड करून ठेवावा याविषयी मी या माझ्या अखेरच्या दिवसांत ध्यास घेतला होता, तो तुमच्या मदतीनें पुरा झाला याबद्दल आभारी आहें.

९३९

**६ ऑगस्ट १९३६—म. गांधी, शेगांव ( वर्धा)**

तुम्ही परवा खालीलप्रमाणे बोलल्याचे मी ऐकतों— "स्वतः गांधीच जर उघड म्हणतात की, आपला हेतु राजकारणांतील टिळक सम्प्रदाय टीका करून व इतर मार्गांनी वाईट ठरविण्याचा किंवा बुडविण्याचा ( रन डाऊन ) आहे." इ. इ. तुम्ही असें खरोखरच म्हणाली कीं काय ! आणि म्हणालां असाल तर मी असें केव्हा कोठे म्हणालों तें कृपा करून कळवाल काय ? असें केव्हा कोठे बोलल्याचें मला स्मरत नाही. शिवाय मी असें म्हटलें असें तुम्हाला कसें वाटावें किंवा म्हणेन ? कारण तुम्हीच पुढे म्हणाला आहां—आणि तेंच बरोबर आहे की—मी ( गांधीने ) टिळकांचें कार्य पुढे चालविलें आहे."

९४०

**१३ ऑगस्ट १९३६—केळकरांचें म. गांधींना उत्तर**

ता. ६ चें पत्र पावलें त्याबद्दल आभारी आहें, आपण विचारलें त्याचा खुलासा खालीलप्रमाणे आहे.

आपण टिळकांचें म्हणून जें कार्य पुढे चालविलें आहे तें राजकीय चळवळ जनतेंत खोल नेऊन भिडविण्याचें. परंतु 'टिळकांचा सम्प्रदाय' या शब्दांचा माझा अर्थ 'टिळकांचें राजकीय तत्त्वज्ञान आणि साधनमार्ग' या दोनाहि बाबतींत तुम-

च्यांत व टिळकांत फारच फरक आहे. तुम्ही अहिंसा सत्य व असहकार यांवर जोर देतां तो उघड व प्रामाणिकपणें देतां हें खरें. पण त्यांतूनच असा ध्वनि निघतो कीं, तुमच्या सम्प्रदायाने जो पूर्वीचा सम्प्रदाय मागे टाकला तो टिळक संप्रदाय याच्या उलट असणाऱ्या तीनहि गोष्टी—म्हणजे हिंसा ( अत्याचार ) असत्य व सहकारिता यांचा पुरस्कार व समर्थन करणारा होता.

आता 'रन डाऊन' म्हणजे निंदा करकरून बुडविणें हे जे शब्द मी उच्चारले असे तुमच्या कानीं आलेले दिसते तें मात्र खरोखर तसें नव्हतें. तथापि तुम्ही, हल्ली केव्हा नव्हे पण प्रथम, असहकारितेचा कार्यक्रम प्रकट व प्रसृत केलांत त्या वेळीं, मला वाटतें, तुम्ही म्हणाला होतां की, विद्यमान राजकीय तत्त्वज्ञान हें बुडविलें पाहिजे. अर्थात् हें तत्त्वज्ञान टिळकांचें नव्हे तर दुसऱ्या कोणाचें ? तुम्ही तें निंदा करकरून बुडविलें असें म्हणणें किंवा तसें करणेंहि योग्य होणार नाही, परंतु तें तत्त्वज्ञान मागे पडून त्या जागीं तुमचें नव तत्त्वज्ञान यावें अशी महत्त्वाकांक्षा तुम्ही धरली तर ती तुमच्या दृष्टीने रास्तच होती. आता यांत प्रत्यक्ष टिळकांच्या नांवाचा जो संबंध येतो त्याविषयीं माझें म्हणणें असें की, बार्डोली येथे स्वामी सत्यदेव यांनी आम्हांला ती गोष्ट सांगितली. ते म्हणाले कीं " टिळक हे सहकारिता अत्याचार व असत्य यांकडे कानाडोळा करतात; व हें त्यांचें राजकीय तत्त्वज्ञान बुडविलें, नाहीसें केलें पाहिजे असें खुद्द म. गांधी यांनी म्हणतांना मी ऐकलें आहे. "

शिवाय तुम्ही व रा. ग. वि. केतकर यांच्या दरम्यान नुकताच पत्रव्यवहार झाला, त्यांत तुम्ही टिळकांना ईश्वराला न मानणारे किंवा त्याची पर्वा न करणारे असें म्हटल्याचा मुद्दा निघाला नव्हता काय ? अर्थात् आता तुम्ही त्याविषयीं खुलासा केला आहे. तसेंच तुमच्या हल्लीच्या पत्रावरूनहि मी असें समजतों कीं, मी जें व्याख्यानांत तुमच्याविषयीं म्हणालों तें बरोबर नाही असें तुमचें म्हणणें आहे. म्हणून तुम्ही तसें खरोखर म्हटल्याचा समज कोणाचा असेल तर तोहि तुमच्या या अधिकृत खुलाशाने दूर व्हावा. या वादग्रस्त मुद्द्यासंबंधाने पुनः केव्हा बोलण्याचा प्रसंग येईल तेव्हा मी तुमचा हा खुलासा लक्षांत ठेवीन.

वास्तविक केव्हा केव्हा होतें काय कीं, तुमचे अनुयायी असें म्हणत सुटतात कीं, गांधी व टिळक यांचें राजकीय तत्त्वज्ञान व साधनमार्ग हे तंतोतंत

एकच आहेत; त्यांत सर्वस्वी अभेद आहे. पण मग हें म्हणणें खरें नाही हेंहि दाखवावेंच लागतें. यांत दुर्दैवानें मौज आहे ती ही कीं, ज्याविषयी स्वतः गुरु एकमेकांत भांडले नसते तेथे त्यांचे शिष्य पुढे येऊन भांडतात ! त्यांना वाटतें कीं, असें भांडलेंच पाहिजे. आणि याचें खरें कारण असें कीं त्यांना आपल्या अंगच्या गुणांनी गुरूंच्या उच्च पदवीला पोचतां येत नाही. म्हणून हीं असलीं भांडणें काढावयाचीं.

खरें पाहिलें तर राजकारणाची चळवळ करण्याची बुद्धि ही राष्ट्राला ईश्वराची एक प्रकारची देणगीच आहे. पण कोणत्याहि देशांत राजकारणांतील सम्प्रदाय, त्या सम्प्रदायाचे गणवेष, त्यांचे ते बिल्ले, आणि त्यांचे ते विशिष्ट पोषाक, इत्यादि गोष्टी बेसुमार त्रासदायक होतात असें मजप्रमाणे तुम्हालाहि वाटत नाही काय !

या पत्रासोबत ता. २ डिसेंबर १९२४ रोजीं दिल्ली येथील 'अर्जुन' पत्राच्या 'शिवाजी' खास अंकांतील एक उतारा तुमच्या अवलोकनार्थ पाठविला आहे. हा उतारा या खास अंकांत स्वामी सत्यदेव यांनी लिहिलेल्या लेखांतील आहे. या लेखांत स्वामी सत्यदेव यांनी खालीलप्रमाणे लिहिलें आहे.

## हिंदी उतारा

"सन १९१७ के सेप्टेम्बर मास में एक बार मैं महात्मा गांधीजीके पास बम्बई में सेठ रेवाशंकरजीके मकान पर बैठा हुआ था. तो सर्वेण्टस् ऑफ सोसायटीके मेम्बर स्वर्गीय डॉक्टर देव अपने एक साथीके साथ महात्मा गांधीजीसे मिलनेके लिए आये, और वार्तालापमें उन्होंने बहुत सी बातें लोकमान्य और उनकी पार्टीके विरुद्ध कहीं. महात्मा गांधीजी ने उनसे कहा के जबतक तिलक की पार्टी का जहरीला असर भारतवर्ष में रहेगा तबतक उनका प्रोग्राम नहीं चल सकता. इस कारण सबसे पहिला काम उनके लिये यह है कि वे इस पार्टीके जहरीले प्रभाव को जनताके हृदयसे निकाल दे। मै बैठा यह सब बातें सुना रहा था। जब डॉक्टर देव और उनके साथी चले गये तो मैं महात्मा गांधीजीपर बहुत बिघडा।"

## मराठी भाषांतर

"सन १९१७ च्या सप्टेंबर महिन्यांत एक दिवस मुंबई येथे शेठ रेवाशंकर जगजीवन याच्या घरीं म. गांधींशी मी (सत्यदेव) गोष्टी करीत बसलों

होतों. इतक्यांत सर्व्हंट ऑफ इंडिया सोसायटीचे सभासद कै. डॉ. देव दुसऱ्या एका गृहस्थाबरोबर तेथे आले. त्यांनी आपल्या भाषणांत लो. टिळक व त्यांचा पक्ष यांच्याविरुद्ध पुष्कळ तक्रारी केल्या. तेव्हा म. गांधी त्यांना म्हणाले, "जो-पर्यंत टिळक पक्षाचें घातक वर्चस्व या देशावर राहील तोंपर्यंत हें असेंच होणार. तोंपर्यंत माझा कार्यक्रम होणार नाही. म्हणून मी आता निश्चितः केलें आहे कीं, जनतेच्या अंतःकरणावरून हें घातक वर्चस्व आधी नाहींसें करावयाचें, मग दुसरी गोष्ट." मी बसल्या ठिकाणीं हें सर्व संभाषण ऐकत होतों. पण जेव्हा देव व त्यांचे मित्र निघून गेले तेव्हा मी म. गांधींवर पुष्कळच रागावलों.

९४१

२४ ऑगस्ट १९३६—महात्मा गांधी, शेगांव (वर्धा)

तुम्ही केलेलें विधान डळमळीत पायावर उभें आहे असें तुम्हास वाटत नाही काय? स्वामी सत्यदेव यांचा लेख तुम्ही मजकडे तेव्हाच पाठविला असता तर बरें झालें असतें. मला वेळ असता तर मी स्वामी सत्यदेव यांच्याशीं पत्रव्यवहार केला असता, आणि मी कोणाशीं काय बोललों याचा पक्का तलास लाविला असता. पण आता तें संपलें. म्हणून या गोष्टीची अधिक चर्चा न करावी असें मी ठरविलें आहे.

९४२

१८ सप्टेंबर १९३६—बी. सेनगुप्त, मुंबई

'युनायटेड प्रेस' संस्थेला तुम्ही जें साहाय्य केलें त्याबद्दल आभार मानण्या-करिता हें पत्र लिहीत आहें. तुमच्या मदतीशिवाय आम्हांला पुण्यास संस्थेचें काम आत्मविश्वासाने करतां आलें नसतें या म्हणण्यांत अतिशयोक्ति नाही.

९४३

१८ सप्टेंबर १९३६—शं. द. देव, म. प्रां. कॉं. कमिटीतर्फे

परत आल्याबरोबर आपल्याला हे पत्र पाठवीत आहे. कारण आपल्या येथून उठल्यानंतर जी गोष्ट त्या वेळेला विसरलो, ती आपल्याला तावडतोब कळ-वीत आहो. आपण निरनिराळ्या जिल्ह्यांतील आपल्यातर्फे कॉंग्रेस तिकिटावर कोण उभे राहतील व कोण उभे राहिल्यास आम्ही त्यांना पूर्णपणे मान्यता देऊं शकूं याची अेक यादी तयार केली. त्यांत पुणें जिल्ह्याचा प्रश्न निघाला असतां

एक गोष्ट मी आपल्याला सांगावयाला हवी होती, परंतु ती विसरलों. ती पत्रद्वारा कळवीत आहे. पुणें जिल्ह्यातर्फे कौन्सिलासाठी आपण स्वतः, श्री. अण्णासाहेब भोपटकर, किंवा आपल्याला योग्य वाटेल ते अन्य कोणीहि गृहस्थ (उभयतांना मान्य होण्यासारखे) हे त्या यादींत आपण घालूं शकता.

काँग्रेस अधिवेशनाचे बाबतींत आपल्याला विनंति करण्याकरिता आलो असतांना कौन्सिलचा प्रश्न निघाला, व आपण साधारणतः त्याची चर्चाहि केली. मी या पत्रद्वारें पुनः आपल्याला असे कळवूं इच्छितों कीं, काँग्रेसच्या तिकिटावर महाराष्ट्रांतील निवडणुकी लढविण्याला आपण, आपल्या चर्चेत दिग्दर्शित झालेल्या दिशेने व त्या संख्येच्या प्रमाणांत, तयारी दर्शविली तर आनंदच होईल. मात्र विलंब या गोष्टी अधिक कठीण करील हें लिहावयास नकोच. सध्या हें पत्र खाजगीच समजावे.

आपण कौन्सिलच्या बाबतींत कोणतेंहि धोरण ठरविलें तरी, कौन्सिल व काँग्रेसचें अधिवेशन ही दोन अलग कार्यें आहेत असें समजून, काँग्रेसच्या अधिवेशनाच्या कार्याला स्वतः यथाशक्ति स्वागत मंडळाचे सभासद होऊन साहाय्य करण्याचें आश्वासन दिलें याबद्दल मी आपला आभारी आहे. मी आज आपलें नांव प्रसिद्ध करणार आहे.

### ९४४

### २३ सप्टेंबर १९३६—सी. विजयराघवाचारीयर, सेलम (मद्रास)

तुम्ही काँग्रेसच्या राजकारणांत व कामकाजांत लक्ष घालणार हें वाचून आनंद झाला. हिंदुस्थानांत हल्ली तरी सगळा गोंधळ माजून राहिला आहे हें दुर्दैव आहे. आणि त्यांतून आपणाला वर डोकें काढावयाचें आहे. राजकीय व आर्थिक स्वातंत्र्य शक्य तितक्या लवकर मिळविणें हें आपलें ध्येय आहे. त्याकरिता राष्ट्रीय वृत्तीच्या अशा सर्व पुढाऱ्यांत ऐक्यभाव असणें अवश्य ठरतें. लोक हेच एकटे असे आहेत की, इंग्रजापूर्वी या देशांत त्यांचेंच स्वराज्य होतें. म्हणून या कामीं पुढारीपण घेण्यास तेच योग्य ठरतात.

### ९४५

### २६ सप्टेंबर १९३६—शकुंतला–स्लेप्टसॉफ परांजपे, पुणें

आपल्या अभिप्रायामुळे ‘सोयरिक’ व ‘चढाओढ’ या माझ्या दोन्ही नाटिकांना

अत्यंत शोभा आली आहे; व त्या जर लोकप्रिय झाल्या तर त्यांचें सर्व श्रेय आपणांकडे लागू होईल.

९४६

**४ ऑक्टोबर १९३६—प्रो. एडवर्ड थॉम्सन ( ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी ), पुणें**

तुम्ही मजकरिता तजवीज करण्याचे श्रम घेतले त्याबद्दल मी फार आभारी आहे. मी रम्य असा पुष्कळ मुलुख पाहिला. काल साताऱ्याच्या अजिमतारा किल्ल्यावर चढून गेलो. तेथे आयत्या वेळी वादळ झालें; पण त्यामुळे निसर्गाची शोभा अधिकच वाढली. मी लंडनला परत जातांच ऑक्सफर्ड प्रेसचे मुख्याधिकारी हम्फ्रे मिल्फर्ड यांना भेटतो. आणि त्या प्रेसकडून मराठी गीतांचें पुस्तक काढविण्याची खटपट करतो. या छापखान्याने बंगाली कवितांचें पुस्तक छापलें होतें पण तें फारसें यशस्वी झालें नाही.

९४७

**७ ऑक्टोबर १९३६—शेठ गोविंदलाल शिवलाल**

काल गुजराथेहून परत आलों. तुम्ही आपल्या सहीने शिफारस पत्र लिहून मला माझ्या कौन्सिल ऑफ स्टेटच्या निवडणुकींत त्याचा उपयोग करण्याची परवानगी दिली या बद्दल आभारी आहे.

९४८

**१४ ऑक्टोबर १९३६— सत्यार्थी, चिटणीस, आर्यस्वराज्य सभा, लाहोर**

येथे कम्युनल अवॉर्डचा निषेध करण्याकरिता राष्ट्रीय हिंदु परिषद ता. २४ रोजी भरवीत आहोत, तरी त्याचे अध्यक्षपद स्विकारावें अशी विनंति आहे.

९४९

**१८ ऑक्टोबर १९३६—नारायणदत्त, बारखंबा, दिल्ली**

येथे शुद्धिकरणाची परिषद भरविण्याचा विचार आहे. तरी तिचें अध्यक्षपद स्वीकारावें अशी विनंति आहे.

९५०

**२१ ऑक्टोबर १९३६—माधव श्रीहरि अणे, यवतमाळ**

नागपूर गोरक्षण प्रचार कार्यालयाची इच्छा २२ नोव्हेंबरपासून गोसप्ताहाचा

वार्षिक उत्सव करण्याची आहे. ही गोरक्षणसभा हिंदुस्थानांत जुन्यांतली जुनी व अखिल भारतीय स्वरूपाचें काम करणारी आहे. तिचे पहिले चालक कै. गोपाळराव भिडे हे होते हें तुम्हास माहीत आहेच. सभेची इच्छा अशी आहे की, तुमच्या-सारख्या दर्जाच्या सुप्रसिद्ध गृहस्थाला अध्यक्षपद देऊन तुमचा सल्ला घ्यावा. हल्लीचे नवे व्हाईसरॉय गोरक्षणाच्या कामीं लक्ष घालणारे आहेत. म्हणून जुन्या गाऱ्हा-ण्यांची तड लावून घेण्याची नवी चळवळ करण्याला ही वेळ बरी दिसते. तरी आपण संमति द्यावी.

९५१

२५ ऑक्टोबर १९३६—हरि विष्णु कोल्हटकर, वकील, जळगांव

आपली प्रकृति सुधारत आहे हें वाचून आनंद झाला. जळगांव येथे संमे-लनाचा योग येण्यास आपली किती मदत झाली हें आम्ही विसरणें शक्य नाही. आम्हांस प्रोत्साहन दिल्याप्रमाणे शेवटपर्यंत संमेलनाचें कार्य आपल्या सल्ल्याने पार पडेल असें वाटतें. नियोजित अध्यक्ष प्रो. पटवर्धन यांच्याबद्दल झालेल्या टीकेला उत्तर म्हणून पुण्यास साहित्य परिषदेने त्यांचा जो गौरव केला त्याचा वृत्तान्त कालच्या 'ज्ञानप्रकाशांत' वाचला. त्यावरून चांगले लोक आमच्या बाजूला आहेत अशी खात्री झाली. या बाबतींत आमच्या दृष्टीने जास्त समाधानकारक गोष्ट म्हणजे तुम्ही त्या समारंभाला हजर होतां.

९५२

११ नोव्हेंबर १९३६—सर प्रभाशंकर पट्टणी, मुंबई

माझ्या निवडणुकीला साहाय्य होण्याकरिता आपण उत्साहाने व तत्परतेने शिफारसपत्र दिले याबद्दल आपला आभारी आहे. तुम्ही आपल्या दोघांहि स्नेह्यांना सारख्या न्यायबुद्धीनेच वागविलें.

९५३

५ जानेवारी १९३७—शंकर गणेश दवणे, नागपूर

आपल्या 'फ्रेंच राज्यक्रांतीच्या इतिहासाचें' पुस्तक झाल्यास फार चांगलें असें येथील एका कॉलेजांतील चांगल्यापैकी इतिहासाचे प्रोफेसर बोलतांना बोलले. त्याचप्रमाणे मित्रमंडळींतहि असेंच बोलणें निघालें होतें. कांही तर त्यासाठी 'सह्याद्री'चे अंक गोळा करण्याच्या उद्योगांत आहेत! म्हणून लिहिलें.

१५४

**३० जानेवारी १९३७—भा. ब. ढवळे, एम्. ए., महाराष्ट्र निवास, कलकत्ता**

या संस्थेच्या कामाकरिता ट्रस्टी म्हणून आपणांस इकडे येण्याविषयी लिहिलें. पण आपल्या वयोमानाने व तेथील दगदगीने आपण येण्यास कचरतां हे ठीकच आहे. असो. दि. ब. कुळकर्णी येत आहेत. या संस्थेचें १९ हजारांचें कर्ज बरेंचसें दिलें. आता सुमारे ६ हजार देणें आहे. वाटतें कीं, थोडे कर्ज असलें म्हणजे काम नीट करण्याची आस्था राहते ! प्रतिपक्षाची चिकाटी अजून संपली नाही पण भीति वाटत नाही. दि. ब. कुळकर्णी हे कै. माडगांवकरासंबंधाने ठराव पाठवितील तो आपल्या संमतिकरिता पाठवूं. नवीन सल्लागार मंडळांत निवडलेले लोक बरे आहेत. कांही झालें तरी प्रो. आघारकर व मी येथे आहे तोपर्यंत आपणांस या संस्थेचे ट्रस्टी झाल्याबद्दल वाईट वाटण्याजोगें कांहीहि होणार नाही असें आश्वासन देतो.

१५५

**५ फेब्रुवारी १९३७—बाबू पद्मराज जैन, सेक्रेटरी, हिन्दुमहासभा, बंगाल**

माझी प्रकृति सुधारत आहे पण अजून नेहमीसारखी झाली नाही. इकडील मंडळींमध्ये 'हिंदु पोलीटिकल पार्टी' काढून तिच्या द्वारें कायदेमंडळाच्या आंत व बाहेर चळवळ करण्याविषयी चर्चा झाली. तरी याविषयी आपण सल्ला देऊन आपल्या संघटना-चातुर्याने योजना यशस्वी कराल अशी आशा बाळगून आहे.

१५६

**९ फेब्रुवारी १९३७—चिं. गो. आगाशे, बृ. म. शु. सिंडिकेट, मुंबई**

नवीन यंत्रें आणण्यास १ लक्ष ६५ हजार रुपये प्रथमच रोख पाहिजेत. त्याकरिता क्रप व मार्टिन कंपनी यांच्या अेजंटांना भेटलों. ही यंत्रसामुग्री हप्त्याने येईल तसतशी रक्कम घेण्याचें त्यांनी कबूल केलें आहे. मात्र हप्त्याबद्दल बँकेचा हवाला ते मागतात. भांडवल जमविण्याबद्दल आटोकाट प्रयत्न झाला असा समज झालेला दिसतो. आपण सह्या करून दिलेलीं शिफारसपत्रें रा. न. अभ्यंकर व जी. एन्. आपटे यांच्याजवळच आहेत. तीं घेऊन लोकांना समक्षच भेटावें असें ठरविलें. अभ्यंकर यांना त्यांजकडे दिलेल्या पत्रांचा खुलासा विचारला तेव्हा ते म्हणाले,

'मी तात्यासाहेब केळकरांना ऑक्टोबरअखेर साखरकंपनीला पांच लक्ष रुपये मिळवून देतों असें सांगितलें व त्याजकडून पत्रें घेतलीं. पण काम केलें नाही. म्हणून तात्यासाहेब मला बोलतील. म्हणून तूर्त मी तात्यासाहेबांना कांही सांगणार नाही.' आपल्या सहीचीं पत्रें अद्यापि या दोघांजवळच आहेत. पैकी आपटे हे पुण्याबाहेर गेलेच नाहीत. पाण्याचा करार झाला आहे व मशिनरीची मागणी केली आहे, असे जाहीर झाल्यानंतर चार लक्ष रुपयांचे आणखी शेअर खपतील अशी जी खात्री वाटते, त्याचें कारण सर्वांना आपलीं पत्रें घेऊन भेटावयाचें राहिलेंच आहे. बॅ. जयकर यांची गांठ घेतली. आपल्या आधारावर आजपर्यंत माझ्या शक्तिप्रमाणे महाराष्ट्राची सेवा मी करीत आहें व पुढेहि करण्याचा निश्चय आहे. आपण मॅनेजिंग एजंटाची जागा मला दिली म्हणून जबाबदारीची जाणीव मला आहे, आणि प्रगति होत असल्यामुळे विरोध कमी होऊं लागला आहे.

९५७

## २१ फेब्रुवारी १९३७—डॉ. वाड, एम्. डी., मुंबई

विद्यापीठाच्या निवडणुकींत आपण मला बहुमोलाची मदत करून उपकृत केलें याबद्दल मी आपला फार आभारी आहें.

९५८

## २७ फेब्रुवारी १९३७—ॲ. दत्तोपंत तुळजापूरकर, मुंबई

'माझी आगबोट' कंपनीबाबत कंपनीचा चेअरमन म्हणून मी एक जाहीर-पत्रक काढीत आहे. कंपनी मोठ्या दिव्यांतून पार पडली. ती शेठ वालचंद हिराचंद यांच्या तडफदार व्यक्तिमत्वामुळे व योग्य वेळी दिलेल्या साहाय्यामुळेच. हें पत्रक केसरींत छापावें. तें माझ्या माणसाबरोबर मुद्दाम पाठवीत आहें.

९५९

## १ एप्रिल १९३७—दा. वि. गोखले, पुणें

आजच्या 'आत्मनिवेदनां'तील मजकूर पाहून फार वाईट वाटलें. मला सकाळपर्यंत त्या गोष्टीची वार्ता नसल्यामुळे मनाची तयारीहि नव्हती. त्यामुळे अधिक ताण बसला. मी १९१५ च्या जूनमध्ये आलों. गेलीं बावीस वर्षें कमी ज्यास्त प्रमाणांत पण अत्यंत निकटचा संबंध आला. या अवधींत

आपण केलेल्या अनेक उपकारांबद्दल मी ऋणी राहीन. प्रथमपासून आपल्याच हाताखालीं काम केलें त्याची स्मृति कायम आहे व राहील. एकेचाळीस वर्षांनंतर आपल्याला विश्रांतीची जरुरी आहे हें योग्यच आहे. हा विश्रांतीचा काळ अत्यंत सुखाचा जावो, व या काळांतहि देशसेवा करण्याचें सामर्थ्य आपल्यास ईश्वर देवो, अशी प्रार्थना आहे.

९६०

२ एप्रिल १९३७—पी. एल. ओगले, एलएल्. बी., वकील, बेळगांव

आजच्या केसरींतील आपला 'आत्मनिवेदनाचे दोन शब्द' हा लेख वाचला. व्यक्तिदृष्ट्या आपल्यास विश्रान्तीची जरुरी निःसंशय आहे व ती ओळखून महाराष्ट्रानें आपले शब्द पत्करले पाहिजेत हें खरें आहे. तथापि सार्वजनिक कार्यकर्त्यांना आपली सल्लामसलतच नव्हे तर बिकट प्रसंगीं मदतहि दीर्घकालपर्यंत लाभत राहील अशी आशा आहे.

९६१

२ एप्रिल १९३७—न. का. बापट, पुणें

केसरीमध्ये 'आत्मनिवेदनाचे दोन शब्द' म्हणून आपण जो लेख लिहिलात तो वाचून मला आपल्याबद्दल—आपल्या कर्तृत्वाबद्दल—निरलसपणाबद्दल—कौतुक वाटून गहिंवर आला. तात्यासाहेब, आपला हिंदुस्थान जर स्वतंत्र असता तर आपला गुणगौरण फार थोर पुरुष म्हणून करण्यांत आला असता यांत शंका नाही.

९६२

३ एप्रिल १९३७—ल. का. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी (जिल्हा सातारा)

आजच्या केसरींतील आपलें निवेदन वाचलें. आपण आजपर्यंत बजावलेल्या कामगिरीचा व ती बजावतांना केलेल्या परिश्रमाचा विचार करतां आपणांस शारीरिक व मानसिक विश्रांतीची अत्यंत आवश्यकता आहे व तशी विश्रांति घेण्याचा आपणांस अधिकारहि आहे. वयपरत्वें अशा मोकळेपणाची जरुरी तीव्रतेने भासू लागते हें मी स्वानुभवाने जाणतों, आणि म्हणूनच सेवानिवृत्त होण्याचा आपला विचार मला सर्वस्वीं योग्य वाटतो.

आपल्या सेवानिवृत्तीमुळें आपला संबंध असलेल्या संस्थांना तर एक मोठा आधार कमी झाल्यासारखें तरं वाटेलच, पण महाराष्ट्ररूपी महत्तर संस्थेस आपलें साहाय्य दुर्लभ झाल्यामुळे त्याची उणीव जाणवल्यावाचून राहणार नाही. किर्लोस्कर बंधुपुरतें बोलावयाचें झाल्यास, तात्यासाहेब केळकर म्हणजे आमच्या संस्थेचे चाहाते व एक कळकळीचे साहाय्यक वाटत असत. आपणहि किर्लोस्कर बंधु ही आपलीच संस्था असें मानून वेळोवेळीं शक्य तें उत्तेजन देत आला आहां याबद्दल मला धन्यता आणि कृतज्ञता वाटते. आपण सर्व संस्थांचा संबंध सोडून मोकळे झाला असला तरी महाराष्ट्राच्या सेवेत आपण इतके तद्रूप झाला आहांत की, त्यास अवश्य तेव्हा हवें तें साहाय्य करण्यास सज्ज व्हाल, असा कोणासहि विश्वास वाटेल.

सार्वजनिक कार्य करतांना लोकांच्या लोभाप्रमाणे रागाचेंहि वांटेकरी व्हावे लागतें हें आपलें म्हणणें खरें आहे. तरी पण वैचारिक मतभेदासाठीं आपलें कर्तृत्व कोणासहि दृष्टीआड करिता येण्यासारखें नाही.

९६३

## ४ एप्रिल १९३७—नारायणशर्मा गद्दमनं, अंकोला, कर्नाटक

ता. २-४-१९३७ चें केसरी पत्र आजच मिळालें. त्यांतील आपलें "आत्मनिवेदनाचे दोन शब्द" वाचून माझ्या मनाला फार फार वाईट वाटलें. त्याप्रमाणे केसरीच्या हजारों नव्हे लाखो वाचकांना वाईट वाटलें असेलच! माझ्या वयाच्या १६ व्या वर्षापासून आजपर्यंत मी 'केसरी'चा वर्गणीदार आहे. हें केवळ श्री. लोकमान्यावरील भक्तिमुळे व केसरी मराठा संस्थेशीं आपला संबंध असल्यामुळेच होय. आता आपल्या "आत्मनिवेदनांत" केसरी मराठा संस्थेचा राजीनामा देण्याचा विचार केल्याबद्दल लिहिलेलें पाहून यापुढे केसरी पत्राचा वर्गणीदार होण्याबद्दल माझी मनोदेवता खरोखर मला प्रेरणा करीत नाही. करिता आपल्या चरणांपाशीं माझी अत्यंत नम्रतापूर्वक प्रार्थना आहे की, आपल्या मनाच्या विश्रांतिकरिता बाकीच्या सर्व संस्थांस राजीनामे दिले तरी, "केसरी मराठा" संस्थेचा आपण राजीनामा सर्वथा देऊं नये. आपल्या हयातीपर्यंत आपलें नांव केसरी पत्रावर असलेंच पाहिजे.

९६४

**४ एप्रिल १९३७—न. वि. गाडगीळ, दिल्ली**

व्यक्तिशः राजकारणांत मतभेद असून, आणि तेः प्रसंगविशेषीं सभ्य पण तीव्र भाषेंत दर्शविलें गेलें असतांनासुद्धा, आपल्या मनांत माझ्याबद्दल जें प्रेम व आपलेपणा आहे, व जो आपण अनेक वेळा दाखविला आहे, त्याबद्दल मी आपला आभारी आहे. याप्रसंगीं मी एवढेंच सुचवूं इच्छितों कीं मतभेदाच्या मामुली प्रसंगाव्यतिरिक्त जें जें आहे त्यासंबंधी आपल्याबद्दलचा माझा आदर कमी झालेला नाहीं व होणें शक्य नाहीं. ह्या सर्व दृष्टींनी आपल्या वानप्रस्थाश्रमांत आपणास पूर्ण आरोग्य व आनंद लाभो अशी मी आशा प्रदर्शित करतों.

९६५

**५ एप्रिल १९३७—रा. ना. केळकर, मांद्रें (गोवा)**

आपणांस, आपल्या वयास ६५ वर्षें पूर्ण होत असल्याने, विश्रांतीची आवश्यकता आहे, यासाठी आपण कार्यनिवृत्त झाला हें वाचून, आमचा महाराष्ट्र आपल्या पुढारीपणास पारखा होऊन तो आज पोरका झाला याबद्दल वाईट वाटलें. पण निसर्ग नियमानुरूप प्रत्येक गोष्ट घडणें योग्य असल्याने, अशा वेळींहि निसर्ग-नियमापुढे मान नमविणें जरुरीचें असतें ह्या विचार मनांत आणून समाधान मानून घेतल्याशिवाय गत्यंतर नाहीं.

आपणांस ६० वर्षें पूर्ण झाल्यावरहि आपण वेळोवेळ धकाधकीच्या वेळीं महाराष्ट्राचें नेतृत्व पत्करून महाराष्ट्रास योग्य मार्ग दाखविलात याबद्दल प्रत्येक महाराष्ट्रीय सदैव आपला ऋणी राहील यांत शंका नाहीं.

आपण स्वतःच्या कर्तबगारीने आमच्या 'केळकर' घराण्याचें नांव अजरामर केलेंत याबद्दल आम्हांस फार अभिमान वाटतो; व यापुढे आपण सुमारे निरनिराळ्या ४७ संस्थांतून अंग काढून घेतलें असलें तरी आपण वेळप्रसंगीं आमच्या केळकर घराण्याचा इतिहास लिहावयाचा आहे त्या वेळीं आपला कृपाशीर्वाद द्याल अशी आशा आहे.

९६६

**५ एप्रिल १९३७—केशव बाळकृष्ण जोशी, मुंबई**

आपण १ एप्रिलपासून सार्वजनिक कामांतून निवृत्त झालांत हें वाचून

खरोखरच वाईट वाटलें : त्र कै. लोकमान्यांच्या नंतर जो एक धीराचा धागा आपण चालू ठेवला होता, तो यापुढे नाही हें मनांत येऊन जरा भांबावल्यासारखें झालें आहे. शिवाय आपण लोकमान्यांची शिकवण व परंपरा चालू ठेवण्यांत जें वेळोवेळीं मनोधैर्य दाखविलेंत व चिकाटीने त्यांचें ध्येय हरएक प्रकारें आम्हांपुढे मांडीत गेलांत त्याची किंमत बहुमोल आहे यांत शंकाच नाही. महाराष्ट्राचा " गांधीझम " पासून बचाव केलात त्याचें श्रेय आपल्याच बुद्धीमत्तेला, मुत्सद्दी-पणाला व धैर्याला आहे हें मी महाराष्ट्राचेंच " आंतील गुपित मत " सांगत आहे असें समजावें.

## ९६७

### ५ एप्रिल १९३७—द. वा. पोतदार, पुणें

प्रथम पासून आज कैक वर्षें आपणावरील हक्क व पाठिंबा हा मजला व्यक्तिशः जितक्या प्रमाणांत विश्वासपूर्वक लाभला तितक्या प्रमाणांत कोणाहि पुढाऱ्याचा लाभला नाही. त्यामुळे पदाधिकारीत्वाचा आपण त्याग करण्याचा निश्चय केला तर तोहि मला आधार तुटल्याप्रमाणे होणार आहे. पण आपण विश्रांतिच घेता, व ती आपणास मिळावी हेहि एका दृष्टीने योग्य वाटते.

## ९६८

### ६ एप्रिल १९३७—माधव श्रीहरि अणे

तीन दिवसांपूर्वी वर्तमानपत्रांतून आपण सेवानिवृत्त झाल्याचें वृत्त वाचलें. ही बातमी वाचून मनांत अनेक विचार उत्पन्न झाले. आपण गेल्या ४० वर्षांत निरनिराळ्या क्षेत्रांत जी कामगिरी केली तिचें स्मरण होऊन कृतज्ञतेने अंतःकरण भरून येतें. आपली सर्व विषयव्यापिनी बुद्धि व हृदय हलवून सोडणारी लेखणी, या जोडीने जें कार्य केलें त्याचें यथार्थ मापन करण्याची अजून वेळ आली नाही. परंतु वादविवादाच्या झंजावाताने उठलेले धुळीचे लोट दूर निघून जातील व वातावरण निवळेल, तेव्हा आपल्या कर्तृत्वाचा व बुद्धिमत्तेचा छाप केवढ्या मोठ्या प्रमाणांत सर्व महाराष्ट्रीय चळवळीवर व विचारसरणीवर उमटलेला आहे हें पाहावयास मिळेल.

जरी दुर्दैवाने कांही क्षुल्लक बाबींत माझा व आपला मतभेद झालेला दिसत असला, तरी आपल्या साहचर्यात व नेतृत्वाखाली सार्वजनिक कार्य करण्याचा योग

मला दीर्घकाळ लाभला ही एक माझ्या आयुष्यांतील अत्यंत महत्त्वाची व मौल्यवान् गोष्ट घडली असेंच मला वाटतें.

आपण ४० वर्षे आपला देह एक सारखा देशकार्यात झिजविल्यानंतर विश्रांति घेण्याचा आपला हक्क आहे. 'वार्धक्ये मुनिवृत्तीनाम् योगेनांते तनुत्यजाम्', हा व खऱ्या आर्यसंस्कृतीच्या अभिमान्यांच्या अथवा अनुयायांचा, शेवटल्या काळांतील धर्म म्हणून मन्वादिक स्मृतिकारांनी व कविकुलगुरुसारख्या साहित्याचार्योनी वर्णिलेला मार्ग आहे. परंतु आपल्या व्यासंगी व लेखनाभिलाषी बुद्धीला या विश्रांतीच्या काळांतदेखील खरोखर वाचनलेखनाचा नाद सोडून देऊन केवळ आराम करीत स्वस्थ बसणें शक्य होईल की नाही याची जबरदस्त शंका वाटते. अनेक तऱ्हेच्या प्रश्नांच्या विचारांत व विशदीकरणांतच तिला आराम वाटेल, तदितर स्थितीचा तिला खात्रीने कंटाळा येईल. यामुळे ही आपली विश्रांति महाराष्ट्रीय साहित्यांत कांही भरीव व बहुमोल भर घातल्याशिवाय राहणार नाही, अशी ही एक अपेक्षा आपल्या असंख्य प्रशंसकांच्या हृदयांत उत्पन्न झाली आहे. सार्वजनिक कार्यांतील आपल्या साहचर्याचा लाभ इत्युत्तर मिळावयाचा नाही, हा विचार एकप्रकारचा मानसिक उद्वेग उत्पन्न करतो. तथापि आपण जन्मभर कष्टविलेल्या देहास विश्रांतीची अत्यंत आवश्यकता आहे याचीहि जाणीव मनास होत असल्यामुळे, परमेश्वराने हा आपला विश्रांतीचा काळ सर्वतोपरी सुखाचा, समाधनाचा, आणि आल्हादपूर्ण असा दीर्घकाळपर्यंत ठेवावा अशी त्या जगन्नियंत्याजवळ माझी अनन्य भावाने प्रार्थना आहे.

१६९

### ६ एप्रिल १९३७—दिवेकर बंधु, सॉलिसिटर, मुंबई

आपली सेवानिवृत्ति केवळ शरीरस्वास्थाच्या अपेक्षेमुळे आहे. यामुळे ती नाइलाजाने स्वीकारलीच पाहिजे. तथापि आपण जाग्यावर उभे आहांत इतकी गोष्टहि अनेक कार्यकर्ते व संस्था यांना स्फूर्ति देऊन मार्गदर्शन करीत राहील याविषयीं शंका नाही.

१७०

### ६ एप्रिल १९३७—पांडुरंग वामन काणे, आंग्रेवाडी, मुंबई

आपण सर्व बाजूंनी माझ्यापेक्षा वडील आहां. आपण गेल्या केसरींत सर्व

सार्वजनिक व्यापांतून मोकळे झाल्याची घोषणा केली त्यामुळे वाईट वाटलें. अनेक वृत्तपत्रांनीहि त्याबद्दल लिहिलें आहे. तेव्हा मी जास्त काय लिहिणार ! लोकमान्यांच्या पाठीमागे आपल्या योग्यतेचा पुरुष महाराष्ट्रांत नाही. अर्थात् आपलीं सर्वच मतं किंवा कार्य आणि त्याची दिशा मला सर्वस्वी पसंत आहेत असं नाहीं. परंतु वर्तमानपत्रकार, लेखक, राजकारणी पुरुष इत्यादि नात्यांनी आपण ४१ वर्षें जी अनेकविध सेवा केली तिचें मूल्य ठरविणें आज तरी अशक्य आहे. आपण सर्व संस्थांशीं संबंध न तोडतां कांही निवडक संस्थांशीं ठेविला असता तर बरं झालें असतें असे वाटतें. परंतु इतकी वर्षे सेवा केल्यावर आपल्याला 'सोडूं नका' असेंहि म्हणण्याचा कोणालाच अधिकार आहे असं दिसत नाही. आपण सोडल्यामुळे अनेक संस्था कांही काळ तरी निराधार होतील. आता आपण सर्व जन्मभर सारखें काम करण्यांत वेळ घालविल्यामुळे आपल्यालाहि प्रथम जड जाईल. 'नहि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्'. आपण परिणतप्रज्ञ व सर्वानुभवी आहां. आता लेखनव्यवसाय आपल्या मनाप्रमाणे स्वतन्त्रतेने व निस्पृहपणाने आपल्याला करतां येईल व अनेक गहन पण सद्यःस्थितीत निकडीचे प्रश्न आहेत त्यांचा शान्तपणाने व with detachmant विचार करून आपण आपली बुद्धि ज्ञान व अनुभव यांचा फायदा पाठीमागच्या पिढीला द्याल अशी मी आशा करतों व या दृष्टीने दोन कृति हातीं घेण्याविषयीं विनंति करितों. एक टिळकांच्या निधनानंतरचें भारतवर्षाचें स्थित्यंतर व त्याचें पुढील दहावीस वर्षांत वाटणारे भवितव्य. दुसरी कृति H. G. Wells वगैरे लोक आत्मचरित्रे लिहितात तशी आपल्या चरित्राची जर आपल्याला योजना करता आली तर ती मार्गदर्शक व वाचनीय होईल. अर्थात् तें आत्म-चरित्र आपल्या ह्यातीतच प्रसिद्ध केल्यास पुनः वादविवादाची रणधुमाळी माजेल हेंहि खरं आहे. पण आत्मचरित्राचें तटस्थ वृत्तीने (detached) निरीक्षण करणारा महाराष्ट्रीय प्रसिद्ध पुरुषांत आपणाइतका क्वचितच कोणी मला दिसतो म्हणून विनंति केली आहे. अर्थात हा लहान तोंडी मोठा घास घेतला असं आपण मानूं नये. आपल्या कार्यसंन्यासामुळे जें सुचतें तें एकदम लिहिलें आहे याची क्षमा करावी.

### ९७१

### ६ एप्रिल १९३७—वालूलाल नानचंद मोतीवाले, पुणें

आपल्यासारखा थोर अन्तःकरणाचा कार्यकर्ता यापुढे कित्येक वर्षे महा-

राष्ट्रास लाभेल असे वाटत नाही. आपली सार्वजनिक कार्यनिवृत्ति जाहीर करितांना, आपण आपल्या साहाय्यकांच्या व विरोधकांच्याबद्दल जी उदार मनोवृत्ति व्यक्त केली आहे ती वाचून तर माझे हृदय भरून आलें. श्री. वालचंद हिराचंद यांच्या निवडणूकीच्या वेळीं ज्ञानप्रकाशांतून तुमच्याविरुद्ध स्वसमर्थनार्थ दोन शब्द लिहून तुमच्या अन्तःकरणाला दुखविल्याचें मला पूर्णपणें स्मरते. कदाचित ही गोष्ट आपल्या स्मरणांतहि नसेल. पण आपल्या परिचयाच्या वेळेपासून मी ज्यांना अत्यंत मोठे समजतो त्या तुमच्याबद्दल मी दोन कठोर शब्द लिहिले ही गोष्ट माझ्या मनाला सारखी डाचत आहे, व त्याबद्दल आपली मनःपूर्वक क्षमा मागितल्याशिवाय राहवत नसल्यामुळे, या पत्राने मी ती मागत आहे.

१७२

७ एप्रिल १९३७—माधव दामोदर अळतेकर, व्हिलेपार्ले

आपण बहुतेक संस्थांतून निवृत्त झालांत हें वाचलें. त्याचप्रमाणे राजकारणांतून निवृत्त होण्याचा विचार नाही हेंहि आज "टाईम्स"मध्ये पाहिलें! महाराष्ट्र साहित्य परिषदेंत आपण अध्यक्ष निवडून आलांत न आलांत तोंच त्या संस्थेवर निवृत्तिरूप बहिष्कार आपण घालूं नये असें वाटते. कारण जसें राजकारण तसें साहित्यकार्य आपण आमरण राखिले पाहिजे.

१७३

७ एप्रिल १९३७—र. पु. परांजपे व्हा. चान्सेलर युनि. लखनौ

सार्वजनिक बाबतींत तुमचा माझा मतभेद कांही वेळ झाला. तथापि तुमची बहुमानास्पद अशी सार्वजनिक कर्तव्य बुद्धि, प्रतिपक्षाचीहि बाजू समजून घेण्याची तत्परता, सर्व बाबतींत न्याय बुद्धीने वागण्याची तयारी, आणि तुमचा उच्च दर्जाच्या वाङ्मयनिर्मितीचा गुण, या विषयीं मला नेहमीच मनांतून फार आदर वाटत असे. तुम्ही आता कार्य निवृत्त झाला आहा तरी, त्रयस्थाच्या भूमिकेवरून, अजूनहि तुम्ही सार्वजनिक प्रश्नांवर मधून मधून मत प्रगटीकरण करीत रहाल अशी अपेक्षा मी करितों, नव्हे तशी आशा मी बाळगतों. कांही झाले तरी तुमच्या विश्रांतीच्या काळांतहि तुम्ही आपल्या लेखणीचा मराठी वाङ्मयाला लाभ करून द्याल अशीहि आशा मी बाळगतों. तुमच्या मनोरचनेवरून पाहतां एकंदरीने

तुम्ही टिळकांपेक्षा रानडे व गोखले यांच्या मतसांप्रदायाशीं अधिक जवळचे होतां अशी माझी समजूत आहे. आणि परिस्थितीमुळे तुम्ही जरी वेगळ्या सांप्रदायांत वावरलां, तरी तुम्ही मर्यादशीलता व नेमस्त मनोवृत्ती संभाळण्याकडेच आपल्या स्थानाचा उपयोग केला आणि विरोधी पक्षांमध्ये मध्यस्थी केली. तुमची कार्य-निवृत्ति केव्हा तरी व्हावयाचीच होती. तरी पण तुमच्यासारखा वजनदार सार्वजनिक कार्यकर्ता दुरावतो याविषयीं सर्वांसच वाईट वाटत आहे. पुष्कळ वर्षांपूर्वी 'सार्वजनिक कार्य संन्यास' या विषयावर मी एक लेख लिहिला होता. सार्वजनिक कार्यांतून अंग काढून घेणें हेंच ज्यांना योग्य होईल असेंहि कांही लोक तें कार्य तसेंच पुढे चालू ठेवतात अशांना तुम्ही चांगलें उदाहरण घालून दिलें आहे. तुम्ही स्वतः अजूनहि पांच वर्षे उपयुक्त सार्वजनिक कार्य करूं शकला असतां असेंच कोणा-लाहि वाटेल. तथापि याविषयीं निर्णय करण्याला तुमचा तुम्हालाच अधिकार आहे. तुमच्या इतकें प्रमुख स्थान मला लाभलें नाही. तथापि तुमची कार्यनिवृत्ति पाहून मला वाटतें कीं मीहि आतां तोच मार्ग लवकरच अनुसरावा.

## १७४

### (?) १९३७—रंगाचार्य रड्डी, वाओ

निरलसपणे व प्रामाणिकपणे विविध कार्यभाग वाहणारा सद्गृहस्थ महा-राष्ट्रांत तुमच्यासारखा मला तरी दुसरा कोणी दिसत नाही. त्यामुळे तुमच्या निवृत्तीने महाराष्ट्रीय सार्वजनिक कार्यभागास गौणत्व येणार आहे.

## १७५

### १० एप्रिल १९३७—रा. ल. घरत, सासवनें

केसरींतील आपले आत्मनिवेदनाचे दोन शब्द वाचून माझ्या अतःकरणांत अनेक तरंग उद्भवले. आपण माझ्यापेक्षा सुमारे १७ वर्षांनी लहान आहां. माझ्या अंगीं महत्त्वाची लोकसेवा करण्यासारखें कांहीच गुण नसूनहि मी आणखी कांही काल वाचून अल्पस्वल्प लोकसेवा करावी अशी अनेकांची इच्छा दिसते. म्हणून आपल्यासारख्या अनेक गुणसंपन्न विद्वानांस इतक्या लवकर सार्वजानिक कामांतून निवृत्त होण्याचा हक्क कसा प्राप्त होतो, ह्याचा मला नीटसा उलगडा होत नाही. आणखी किती तरी वर्षे आपल्या हातून सार्वजनिक सेवा घडावी असेंच

प्रत्येकास वाटते. आपले अद्यापि बरेंच आयुष्य शिल्लक आहे. थोड्या वर्षांमागे इकडे अलिबाग वेशवी येथे कुलाबा जिल्हा सभेच्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान आपण मंडित केलें होतें. त्या वेळीं माझ्या भाषणांत आपण पूर्णशतायु होणार असें मी म्हटलें होतें ते आपणांस स्मरत असेलच.

राजकारणांतून कारणपरत्वें आपण अंग काढून घेतलें तरी गरजूंना सर्व प्रकारचे साहाय्य व विद्वानांना, तरुणांना आणि विद्यार्थ्यांना वाङ्मयरूपी खाद्य आपणांकडून सतत मिळत जाईल अशी आशा आहे. आपण अनेकांना उपकृत करून ठेविलें आहे. आवासचे श्री. कृ. ल. दातार यांस आपलें वारंवार स्मरण होतें. त्यांच्या चिरंजीवांस आपण फार मोठी मदत केली आहे. आपली गुणग्राहकता सर्वविश्रुत आहे. माझ्या शिरावर तर आपल्या ऋणाचा मोठाच बोजा आहे. परमेश्वरानें कृपाळू होऊन आपल्यामार्फत माझ्या योगक्षेमाची चांगली सोय लाविली आहे. अनेक संस्थांवरहि आपले फार मोठे उपकार झालेले आहेत.

आपण ज्या हेतूने विश्रांति घेण्याचें ठरविलें आहे तो सिद्धीस जावो, आणि परमेश्वर आपणांस दीर्घ आयुरारोग्य आणि सर्व प्रकारचें सुख देवो अशी त्यापाशीं प्रार्थना आहे.

१७६

१० एप्रिल १९३७—मि. पूनावाला, बॅरिस्टर, कँप, पुना

आपल्या सेवानिवृत्तीबद्दल भोपटकरांनी सांगितलें त्यामुळें वाईट वाटलें. महाराष्ट्रांत निवडणुकी होणार त्याच वेळीं ही गोष्ट घडत आहे याचें विशेष वाईट वाटतें. तुमच्यासारखा अनुभवी पुढारी पाहिजे आहे हे म्हणण्यांत मी तुमची तोंडदेखली स्तुति करीत नाहीं. कसेंहि असो, तुम्ही आपल्या राजकीय पक्षाचा संबंध तोडणार नाही येवढें तरी आश्वासन द्यावें. कारण तसें झाल्यास पक्षाचें फार नुकसान होईल.

१७७

१२ एप्रिल १९३७—डॅ. सच्चितानंद सिंह, पाटणा

तुम्ही सेवानिवृत्त झाल्याचें वाचलें. तें खरेंच काय? गतवर्षी पुण्यास तुमची गांठ पडली त्या वेळीं तुमची प्रकृति उत्तम होती म्हणून या सेवानिवृत्तीचें

आश्चर्य वाटलें. माझ्याहून तुम्ही २।३ वर्षांनी लहान आहां, आणि मी तर अंजून एकाकी कां होईना पण आपलें काम थोडेबहुत करीत आहेच. मग कदाचित् तुम्ही स्वतंत्र बुद्धीने काम करण्यास अधिक सवड मिळावी म्हणूनच सेवानिवृत्त झाला असाल. गेल्या ४० वर्षांत तुम्ही आपल्या देशाकरिता खूपच खूप काम केलें व विविध प्रकारच्या सार्वजनिक कार्यांत पडून खूप मेहनत केली. असो. तुमचा जुना स्नेही व एक चहाता या दृष्टीने तुम्हाला आयुरारोग्य, सौख्य, व सार्वजनिक कार्य करण्यास शक्ति या पुढेहि दीर्घकाल लाभो अशी माझी प्रार्थना आहे.

## १७८

### १२ एप्रिल १९३७—बी. ई. कुलकर्णी, शिरहट्टी

आपली व माझी व्यक्तिशः ओळख नसतांना केवळ आपल्यावर भक्ति म्हणून पत्र पाठवीत आहें. आपलें नांव महाराष्ट्रांतच काय पण सर्व हिंदुस्थानांत सुशिक्षित मनुष्याला माहीत आहे.

आपल्या "आत्मनिवेदनाने" थोडा खेद वाटला. पण त्यांत गैरवाजवी कांहीच नाही. असेल तर आमचाच हव्यास. मला थोडा वाचण्याचा नाद; त्या योगाने अलीकडे म्हणजे २।४ वर्षांत विशेषतः आपलीं पुस्तकें, आपली भाषा, आपले लेख याशिवाय दुसरें कांही दिसूच शकत नाही. माझे मित्र मला म्हणतात, 'कुलकर्णी, तूं किती एकांगी ? तुला तात्यासाहेबांच्याशिवाय दुसरें कांही दिसतें का ?' मी म्हणतो, 'दिसत नाही हें खरें, पण एकांगित्व हें खोटें. कारण तात्यासाहेब हे एकांगी नाहीतच. ते कधीहि शृंगापत्ति स्वीकारीतच नाहीत. ते फॅसिस्टहि नाहीत, ते सोशालिस्टहि नाहीत, ते सनातनीहि नाहीत, ते सुधारकहि नाहीत. परवाच्या भाषणांत (न्यू स्कूल समारंभ) 'तदेकं वद निश्चित्य' या अर्जुनाच्या वाक्याला त्यांनी नांवें ठेवलीच ! मी जर, तात्यासाहेब, पुण्यास असतों तर आपल्या घराजवळच कोठे तरी राहिलों असतों; व मी माझ्या मित्रांना सांगतों त्याप्रमाणे तुमच्याशीं डोक्यास डोकें घासण्याची भाबडी कल्पना, न जाणो, सांगितलीहि असती. मग ती कोणास किती का हास्यास्पद वाटेना. डोक्यावर हात ठेवून बुद्धि, विद्या देता येते अशी जर जुनी पुराणी कल्पना ग्राह्य, तर मग डोकें घासण्याच्या कल्पनेंत तरी चूक काय दाखवितां येईल ! मला असें

वाटतें कीं, 'तात्यासाहेब आपण भरपूर लिहावेत, सह्याद्रि साप्ताहिक सुद्धा करावा व आम्ही अतृप्त मनाने वाचावें'. शिवाय, दुसरें असें वाटतें की, तात्यासाहेब, आपल्या-संबंधी माझी जी एक प्रकारची निर्गुण निराकार उपासनेची पद्धत आहे त्यांत सगुण, साकार, प्रेमाची भर कशी घालावी याबद्दल आपण कांहीं सल्ला द्याल का?

१७९

१८ एप्रिल १९३७—**नारायण बाळकृष्ण केळकर, धुळें**

उतरत्या वयोमानाकडे पाहून आपण सार्वजनिक कार्यांतून व अनेक संस्थांच्या जबाबदारींतून निवृत्त होत आहां ही गोष्ट क्रमप्राप्तच आहे. सार्वजनिक कार्यांत ४१ वर्षांची अविरत स्पृहणीय व एकनिष्ठपणें सेवा केलेली व्यक्ति आपल्या देशांत क्वचितच आढळेल.

प्रतिपक्षीयांकडून निंदेचा व अपशब्दांचा वर्षाव होत असतांनाहि, आपल्या तत्त्वांस आपण चिकटून राहिला व समत्व ढळूं दिलें नाहीं, याबद्दल कोणीहि आपलें कौतुकच करील. कोणत्याहि परिस्थितींत मनाची शांति ढळूं न देतां एखाद्या प्रश्नाचा व्यापक दृष्टीने विचार करून आपण नेहमी योग्य तोच मार्ग दर्शवित आला आहां. अलौकिक स्थिर व चिकित्सक बुद्धिमत्ता असल्याशिवाय ही गोष्ट साधणें शक्य नाहीं. ४१ वर्षांच्या तपश्चर्येनें या बुद्धिमत्तेस अधिक तेज चढलें असल्यास नवल काय!

**ता. क.**—आपण नेमलेल्या नवीन ट्रस्टींना आपल्याच ठिकाणीं मानून त्यांना आमचा सदैव पाठिंबा व सहानुभूतिच मिळेल.

१८०

१९ एप्रिल १९३७—**अ. के. एन्. धारप, एल्. एल्. बी., मुंबई**

तुमचें आत्मनिवेदन वाचून मनांत कल्लोळ उसळला. लोकमान्य दिवंगत झाल्यानंतर जी विषण्णता प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या मनांत उत्पन्न झाली, तसलाच प्रकार आपण कार्यनिवृत्त होणार हें समजून झाला असला पाहिजे. टिळकानंतर राजकारणाची धुरा वाहण्यास सर्वथा समर्थ असे आपण दृष्टीला प्रत्यक्ष दिसत होतां. ज्याच्याबद्दल सर्वांना विश्वास वाटे, सर्वांना प्रेमादर आहे व ज्याचें म्हणणें प्रत्येकजण ऐकेल असा आता कोण आहे? स्वतःशींच बोलावें असें आपणाजवळ बिनदिक्कत

बोलतां येत असे. आपण ४१ वर्षें कर्तव्यबुद्धीने सार्वजनिक सेवा केली ती बिनमोल आहे. तथापि थकलेल्या, शिणलेल्या मनाला व शरीराला विश्रांति देण्याचा आपणांस पूर्ण हक्क आहे. आपण म. गांधींशीं, म्हणजे त्यांच्या राजकारणाशीं, अलौकिक झगडा केला व कॉंग्रेसच्या चळवळीचें तोंड केवळ ध्येयवादाकडून ध्येयमिश्रित व्यवहार मार्गाकडे वळविलें. आता जगाचें रहाटगाडगें चालूच आहे म्हणा! परंतु तो वेदान्त दुःखित मनाचें समाधान करण्यापुरताच असतो.

९८१

१९ एप्रिल १९३७—दत्तात्रय गणेश दिवेकर, बेळगांव

आपले तारीख २ एप्रिल ३७ च्या केसरींतील "आत्मनिवेदनाचे दोन शब्द" वाचून मनास अत्यंत वाईट वाटलें. मी मागे आपणाकडे एकदोन वेळा आलों होतों. मी एक सामान्य केसरीचा वर्गणीदार आहें. तथापि आपणांस हें पत्र लिहिण्यांत मी लहान तोंडीं मोठा घास घेत आहें असें कृपा करून आपण समजूं नये. आपलें आत्मनिवेदन वाचल्यापासून आपणांस पत्र लिहिण्यासंबंधाने मनांत सारखी धरसोड चालू होती व शेवटीं, आपणांस पत्र न पाठविल्यास मी आपल्या कर्तव्यास चुकेन अशी मनाची पक्की खात्री झाल्यामुळे, आपणांस पुढील चार शब्द लिहीत आहें.

२ अलीकडील लो. स्व. पक्षाचें कौन्सिल निवडणुकींतील अपयश व त्यानंतर आपली सार्वजनिक कार्यांतून कायमची सुटका करून घेण्याची मनीषा—या गोष्टी लागोपाठ घडून याव्या हें खरोखर देशाचें दुर्दैव होय. वरील गोष्टी घडल्यामुळे मन अतिशय उद्विग्न झालें.

३ एकेचाळीस वर्षें देशाची नोकरी आनंदाने व निरलसपणें केल्यानंतर केवळ शारीरिक स्वास्थ्याकरिता आपण विश्रांति घेत आहां व ती विश्रांति आपण जनतेकडे मागणें हा आपला सनदशीर हक्क आहे. तो आपला हक्क आपणांस पूर्णपणें गाजवूं देण्यास जनता केव्हाहि कांकूं करणार नाही.

४ आपण जन्मास येऊन सार्थक केलेंत! यापुढे आपणासारखा पुढारी आम्हांस मिळणें अतिशय दुर्लभ आहे. लोकमान्यांच्या पश्चात् राजकारणाच्या बाबतींत आम्ही आपल्याकडे मोठ्या आशापूर्ण उत्कंठेने पहात असूं व केसरींत आपल्या लेखणींतून उतरलेले विचार वाचल्याबरोबर आम्हास आनंद होत असे.

५ आपण लिहिलेला लोकमान्यांचा मृत्युलेख वाचून मी केसरीचा वर्गणीदार झालों व मी मरेपर्यंत केसरीचा कायमचा वर्गणीदार राहीनच राहीन. तथापि यापुढे केसरीपत्र आपल्या मातृरूपी प्रेमास पारखें होऊन पोरकें दिसणार ही गोष्ट मनांत अत्यन्त जाचत आहे.

६ तो दयाघन प्रभु आपणांस उदंड आयुष्य देऊन आपणांस पूर्ण मनःस्वास्थ्य देवो अशी त्याची अंतःकरणपूर्वक प्रार्थना करून हें पत्र संपवितों.

९८२

२० एप्रिल १९३७—विनायक गणेश बापट, बोरखळ, सातारा

आत्मनिवेदन वाचून मन अतिशय अस्वस्थ झालें व मनास धक्का बसला. आर्य संस्कृतीप्रमाणे वयोमान जाणून आपण हा विचार मनांत आणलात व आपणांस सुधारक म्हणणाऱ्या सनातनीयांवर मात केलीत म्हणून अभिनंदन करतों

१९०८ नंतर आपण केसरीचे संपादक व १९२० नंतर ट्रस्टी झाला नसतां तर काय काय झालें असतें हें किती सांगूं ! ट्रस्टीच्या बाबतींतील आपली योजना उत्तम आहे.

९८३

२० एप्रिल १९३७—भगवंत हंसराज कुळकर्णी, पांढरकवडा, यवतमाळ

आपण जवळ जवळ पन्नास मोठाल्या संस्थांचा, त्यांतून प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष जें काम करीत होतां त्या कामाचा निरोप मनाने व संस्था-नियमानुसार घेतला असें मी ता. २-४-३७ च्या केसरी अंकांतून वाचल्यानंतर, मला अत्यंत वाईट वाटलें. आणि थोड्या वेळाने जेव्हा आपल्या कार्याचा व्याप, वयोमान आणि शरीरसामर्थ्य याला लागणारी विश्रांति ध्यानीं आली, तेव्हा होत आहे तें बरें होत आहे असें त्या वेळेपुरतें तरी वाटलें. आणि हेंच कारण पत्र लिहिण्यासहि झालें.

वास्तविक माझा व आपला पत्र लिहिण्याइतका परिचय अगर नातेसंबंध नाही. पण ज्याला मराठी भाषा येते त्याचा व तुमचा संबंध तोडतो म्हटलें तरी तुटत नाही, एवढी गोष्टसुद्धा आपल्याशीं नातें जुळविण्यास व ठेवण्यास पुरेशी आहे असें मी समजतों.

केसरींत लिहिल्याप्रमाणे आपण इतक्या संस्थांचा निरोप घेतल्यानंतर त्या

त्या संस्थांचे प्राण तर कासावीस होत असतीलच. परंतु पुढील सर्व पिढ्यांसमोर आपली हालतीबोलती आकृति आपला आवडता वर्तमानपत्रकार आणि अष्टपैलू साहित्यिक म्हणून आपुलकीच्या भावनेने पाहिजे तेव्हा डोळ्यांसमोर आणून पारणें फेडण्याकरिता कायमची व्यवस्था आपण केल्यास त्यामुळे उभ्या महाराष्ट्राला आपण उपकृत केल्यासारखें होईल.

## ९८४

### २१ एप्रिल १९३७—दामोदर सावळाराम यंदे, मुंबई

आपण आरंभापासून मंडळीचे पुरस्कर्ते असून आज ४१ वर्षें मंडळीने शिरावर घेतलेल्या ग्रंथप्रकाशनाच्या व साहित्यसेवेच्या कार्यास अनेक मार्गांनी साहाय्य केलें आहे. हल्ली आपण सेवानिवृत्त झालां आहां. आपण ४१ वर्षेंत समाज, राष्ट्र व साहित्य इ. क्षेत्रांत जी सेवा केली आहे ती अनेक दृष्टींनी प्रशंसनीय व अभिनंदनीय आहे.

आपण आतापर्यंत केलेल्या साहित्यसेवेच्या, विशेषतः मंडळीने शिरावर घेतलेल्या ग्रंथप्रकाशनाच्या; कार्यांत जें साहाय्य केलें आहे त्याच्या अभिनंदनार्थ सार्थ-महाभारताचा आठवा भाग-भीष्मपर्व पूर्वार्ध, जो चालू चैत्र मासांतच पूर्ण व्हावयाचा आहे, तो आपणांस अर्पण करण्याचें मंडळीने ठरविलें आहे. मंडळीची ही विनंति आपण मान्य करावी अशी खास आग्रहाची पण नम्र विनंति आहे.

## ९८५

### २४ एप्रिल १९३७—वासुदेव कृष्ण माईणकर, नैनीताल

३५ वर्षें आपल्या सार्वजनिक कार्याकडे मी सहानुभूतीने पहाणारा असा एक इसम आहें. आपण केलेल्या प्रत्येक कामाबद्दल मला आनंद व अभिमान वाटत आहे. आपल्या पत्रांत लेख व व्याख्यानें ऐकण्याचें भाग्य मला देशीं असतां लाभलें आहे. दुर्दैवाची गोष्ट अशी की, प्रत्यक्ष बोलण्याचा सुयोग अद्याप आला नाही. व्यवसायभिन्नत्व हेंच त्यास कारण होय.

आपलें 'भारतीय तत्वज्ञान' हें पुस्तक मी हल्ली वाचीत आहें. तीन वेळ वाचलें तरी आणखी वाचावें असेंच वाटत आहे. तें वाचीत असतां आपली मूर्ति डोळ्यांपुढे कायम असते. आपल्याबद्दल गौरवपर लिहितां येण्यासारखें पुष्कळ आहे. परंतु माझ्या

अल्पमतीस असें वाटतें. एकच शब्दांत आपल्याबद्दल आदर दाखवावयाचा तर आपण व्यवहाराच्या बाबतींत "कृतार्थ" झालां आहां. हें भाग्य महाराष्ट्रांतच नव्हे तर हिंदुस्थानांत फार थोड्यांना लाभलें आहे. सक्तीने पेन्शन दिलेले ब्रिटिश पेन्शनर्स दुसरीकडे नोकऱ्या करून उदरंभरण करीत असल्याचें दिसतें. आपण स्वेच्छेने निवृत्त होऊन पुढील आयुष्य परार्थांत वेचण्याचें ठरविलें यावरून आपल्याबद्दल भक्तिपूर्ण आदर वाटत आहे. यापेक्षा ज्यास्त काय लिहावें !

९८६

**१ मे १९३७—डॉ. व्ही. डी. निमकर, मद्रास**

मि. रंगराव नांवाचे पूर्व महाराष्ट्रीय असे एक गृहस्थ व त्यांच्या घरची मंडळी आपला जुना स्वदेश म्हणजे महाराष्ट्र पाहण्याकरिता तिकडे जात आहेत या कामीं आपण त्यांना सर्वस्वी मदत करावी अशी विनंति आहे.

९८७

**१६ मे १९३७—भास्करराव ढवळे, एम्. ए., कलकत्ता**

आपण येथील 'महाराष्ट्र भुवन' संस्थेच्या ट्रस्टीचा राजिनामा दिला तो सकारण असल्याने आम्हांस मंजूर करावा लागला. आपल्या जागीं रा. बापूजी अणे यांना ट्रस्टी होण्याबद्दल विनंति केली व ती त्यांनी मान्य केली आहे. मला स्वतःला फार आनंद वाटतो कीं, माझ्या शब्दाला मान देऊन आपण प्रथम या संस्थेचें ट्रस्टीपण पत्करलें व अनुभवाचा फायदा दिला. त्यायोगें संस्थेस बळकटी आली. पुण्यास येईन तेव्हा भेटेन. आपणांस विश्रान्ति मिळो व आपल्या अनुभवी सल्ल्याचा फायदा सर्वांना मिळो अशी आशा आहे.

९८८

**२२ मे १९३७—भास्कर बहिरो महाबळ, एलएल्. बी. न्यायमंत्री, जमखंडी**

आपण आपल्या प्रकृतीसाठी सार्वजनिक कार्याच्या व्यापापासून आपणांस मोकळें करून घेतलें ही गोष्ट कितीहि अप्रिय—अर्थातच सार्वजनिक कार्याच्या दृष्टीने—असली तरी आपल्या प्रकृतीकडे लक्ष देऊन महाराष्ट्राने स्वीकारलीच पाहिजे. राजकारणाच्या दृष्टीने अशा ऐन आणीबाणीच्या वेळीं—विशेषेंकरून काँग्रेसने राजकारणाचे धिंडवडे चालविले असतांना—आपल्यासारख्या मोहऱ्यास

महाराष्ट्राला मुकावें लागावें हा एक योगायोगच म्हणावयाचा. आणि आपल्या पराक्रमाने राजकारणाच्या क्षेत्रांत चांगलेंच यश मिळविलें आहे ही गोष्ट आपल्या शत्रूंसदेखील कबूल करावी लागेल. आपल्या मार्गांत आपल्या पुण्याचेंच मत्सरग्रस्त भाऊबंद जर आडवे आले नसते तर आपल्या राजकारणाची प्रभा अधिकच फाकली असती. पण आपल्या जन्मकुंडलीचे ग्रहच असे विलक्षण आहेत की, आपल्या यशाबरोबरच आपले पाय ओढून आपल्या पदरीं अपयश बांधणारे सज्जन टपलेलेच आहेत ! 'टिळकांचा महाराष्ट्र केळकरांनी बुडविला' अशी घोषणा आज पंधरा वर्षें चालू आहे. पण मौज अशी कीं, हा महाराष्ट्र सतत पंधरा वर्षें बुडण्याच्या क्रमांत राहलो कसा ! आणि त्याला तारणारा इतर कोणी नाहीच की काय ! असो, माझी विनंति येवढीच की, राजकारणाच्या भानगडींत आपण पडण्याचें नाही असें ठरविलें तरी आपला वाङ्मयविलास सतत चालू असावा. वाङ्मयाच्या प्रांतांत लीलेने वावरणाऱ्या आपल्या आकर्षक लेखणीस राजकारणाच्या विषयासंबंधानेदेखील आपण विश्रांति देऊं नये. आपला लेख वाचणें ही अत्यंत आनंदाची गोष्ट असते. महाराष्ट्रीयांची ही हौस आपण शक्यतोंवर चौफेर पुरवावी येवढीच आपणास विनंति आहे. परमेश्वरकृपेने आपणांस पूर्ण आयुरारोग्य प्राप्त होवो असें प्रार्थून हें पत्र पुरें करतों.

* * *

[ '**पत्रव्यवहार**' छापण्यास १९३८ सालीं प्रारंभ केला तेव्हा त्याचीं पानें किती होतील याचा नक्की अंदाज नव्हता. प्रथम फक्त अडीचशें पानांत हा सर्व विषय शक्य तर बसवावयाचा, व 'गतगोष्टी' या आत्मचरित्रग्रंथांतच पुरवणीदाखल शेवटची पानें म्हणून ती घालावयाचीं असा विचार होता. परंतु तो मूळ ग्रंथच एक हजार पानांचा झाला, यामुळे त्यांतलीच दोनतीन प्रकरणें काढून ठेवावीं लागलीं. मग या पुरवणीला जागा कशी मिळणार !

नंतर तीन वर्षांनी हें उरलेलें काम हातीं घेऊन संपवावें असा विचार सुचला तेव्हा, ही 'गतगोष्टी'चीच पुरवणी पण स्वतंत्रपणें छापली जात असल्याने, पत्रांचा समावेश अधिक सढळपणाने करूं लागलों. तथापि पत्रें द्यावयाचीं तीं १९३७ सालांतील ती. तात्यांच्या कार्यनिवृत्तीच्या काळापर्यंतच द्यावयाचीं असें ठरविलें. पण त्यांचा आंकडा ९८८ पर्यंत गेला !

मग असें वाटलें की, आणखी अवघीं बारातेरा पत्रें दिलीं म्हणजे पुरीं एक हजार पत्रें होतात !

'शंभर', 'हजार' अशा ढोबळ आंकड्यांचा मोह सर्वांनाच पडतो. क्रिकेटच्या मैदानावर कोणा एखाद्याच्या धांवा नव्वदांवर गेल्या म्हणजे सर्वांनाच (प्रतिपक्षीयांनाहि) वाटूं लागतें की, हा आंकडा शंभरापर्यंत जावा. ही अेक खेळकरपणाची (वाटल्यास 'बालिश'हि म्हणतां येईल) वृत्ति आहे. तिला अनुसरून भरतीचीं बारातेरा पत्रें घातलीं. मात्र तीं दप्तराच्या गांथळ्यांतून सांपडतील तशीं घातल्याने सर्व ग्रंथभर कालक्रमाचें जे तत्त्व स्वीकारलें होतें तें सहजच सुटलें. तीं भरतीचीं पत्रें याखाली दिलीं आहेत.—काशिनाथ नरसिंह केळकर.]

* * *

९८९

३ मे १९००—चिंतो लक्ष्मण केळकर, साकरी, खानदेश

आम्ही चैत्र शुद्ध चतुर्थी दिवशीं श्रीकाशीक्षेत्र सोडून अयोध्येस दुसऱ्या दिवशीं पोंचलों. तो दिवस रामनवमीचा होता. त्या दिवशीं वेदपठन घडवून आणतां आलें नाहीं. पण एकादशीस म्हणणें केलें. द्वादशी दिवशीं ब्राह्मणभोजन झालें. शरयूचें पात्र आणि ठिकठिकाणच्या श्रीरामाच्या मूर्ति पाहून संतोष झाला. त्रयोदशीला हरिद्वारास आलों. तेथील गंगेचें उदक व नदीजवळची वस्ती पाहून संतोष झाला. कुरुक्षेत्रास गेलों. तें उदासन्न आहे. दिल्लीस किल्ल्यांतील तक्त वगैरे पाहिलें. आग्र्यास ताजमहाल पाहिला. नंतर धुळ्यावरून साकरीस आलों. येथे येतांच केसुकाकाच्या मृत्यूची वार्ता कळली म्हणून तीन दिवस बाहेर रामाच्या देवळांत राहून काल सुतक फिटल्यावर श्रीगंगा घेऊन समारंभाने घरीं आलों. काय हो यात्रेचा जोर! जे प्रसंग आले इतक्यांतून बाजूला काढून यात्रा मनोगताप्रमाणे झाली श्रीरामाची कृपा म्हणणें भाग आहे. देव आणि तीर्थ पाहून आनंद होतो. पण तेथील भक्तांच्या जाचामुळे मन खिन्नतेस पावतें. आम्हीं हयात असेपर्यंत तुम्ही सर्वत्र यात्रा करून आम्यास जाचगार नाही. गयेस जाऊन आमची मुक्तता करण्याच्या वाटेस तुम्ही पडूं नका हें अनुभवाने सांगतों. तेथील पंड्यास हात जोडावे हेंच खरें. दिल्लीस व आग्र्यास गेलों हें टिळकांस कळवावें.

९९०

२१ सप्टेंबर १९००—नारायण चिंतामण केळकर, सातारा

सायकल विकत घेण्यासंबंधाने तुमचें पत्र पोंचलें. पण सर्व बाजूंनी विचार

करतां ती घेऊं नये असें माझें व वडिलांचें मत आहे. हिंडण्याफिरण्यास उपयोगी पडेल हें खरें; पण अशीं कांही ठिकाणें असणारच की, तेथे तुम्हाला टांग्यांतूनच जाणें बरें दिसेल. शिवाय तुमचा स्वभाव फार भिडस्त आहे, यामुळे ओळखींच्या लोकांनी सायकल मागितल्यास ती त्याला द्याल आणि नुकसान झाल्यास तें भरून मागण्याची भीड धराल. तसेंच सायकलगाडी धुवूनपुसून स्वच्छ ठेवावी लागते. तें करण्यास तुम्हाला वेळ नाही व घरीं गडी नाही. सायकलवर बसण्यांत केव्हा तुम्हा स्वतःला धोका तर केव्हा परक्या माणसास इजा होण्याचा संभव. तुमच्या स्वभावामुळे व कामामुळे सायकल तुम्हाला निरुपयोगी.

९९१

६ जून १९३७—गजानन कृष्ण दावके, ठाणें

आपण सेवानिवृत्त झालां तरी आपल्या मागचा व्याप सुटणें अशक्य आहे. निदान वाङ्मयाचा व्याप तरी. मराठी वाङ्मय झपाट्याने वाढण्यास मराठी लघुलेखनपद्धति आवश्यक ठरत आहे. मानकर, बेन्द्रे, नाफड, आगाशे यांचें लघुलेखन मी पाहिलें आहे. परंतु मराठी भाषेचें वैशिष्ट्य लक्षांत घेऊनच मराठी लघुलेखनपद्धति ठरविली पाहिजे. मी माझी लघुलिपि या दृष्टीने तयार केली आहे. माझी गति हल्ली दर मिनिटाला १२५ शब्द इतकी आहे. एकच मनुष्य मराठी लघुलेखकाचें व मोनोटाईप ऑपरेटरचें काम करूं शकेल तर सुमारें २५० पानाचें पुस्तक सुरुवातीपासून अवघ्या ८।१० दिवसांत छापूनहि होईल. याविषयी आपणांशीं विचारविनिमय करण्यास येणार आहें.

९९२

१७ जून १९३७—पां. के. शिराळकर, कऱ्हाड

गेल्या सालीं जो "शिराळकरट्रस्ट" झाला त्यांतील एक ट्रस्टी आपण आहांत. तेव्हा आपणांस कळविण्याची परवानगी घेतों कीं, आजपर्यंत अनेक अडचणींमुळे सदर ट्रस्टप्रमाणे कामास सुरुवात करतां आली नाही, तरी ती आता येत्या जून ता. २१ सोमवारपासून शिवराज्याभिषेकोत्सवाच्या मुहूर्ताने करावयाची आहे. सदर काम रा. पुरुषोत्तम पांडुरंग गोखले हे त्या दिवशीं सुरू करतील.

कामाचें स्वरूप थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, खेडेगांवीं हिंडून लोकांची

प्रत्यक्ष गाऱ्हाणीं काय आहेत व निकडीच्या गरजा कोणत्या आहेत यांची चौकशी व नोंद करावी. आणि त्यासंबंधांत करतां येणें शक्य असेल ते सर्व उपाय करावेत. त्याचप्रमाणे सरकारी पत्रकें वा राजकीय आर्थिक आणि सामाजिक प्रश्नांवरील पुस्तकें, खेडेगांवीं उपयोग होईल या दृष्टीने, अभ्यासून त्यांतील तत्त्वांचा प्रसार करावा. अशा तऱ्हेने काम करीत असतां उत्क्रांतितत्त्वाने भरीव कार्य होईल अशी अपेक्षा आहे.

## ९९३

### १४ सप्टेंबर १९३७—बी. एन्. दातार, वकील, बेळगांव

अनंतराव चिकोडी यांनी तुम्ही त्यांना दिलेली मुलाखत वाचावयास पाठविली. तींत कर्नाटकाच्या एकीकरणाविषयी तुम्हीं जें धोरण प्रकट केलें तें पाहून मला फार बरें वाटलें. महाराष्ट्राचे इतर पुढारी हेंच धोरण ठेवतील तर बरें होईल. एऱ्हवी उगाच एकमेकांविषयी गैरसमज वाढतात. कर्नाटकांतील संस्थानिकांनी आपलें धोरण कसें ठेवावें याविषयी तुम्ही प्रकट केलेल्या धोरणाला फारच महत्त्व आहे. कर्नाटक संघाला तुम्ही पुढेहि अशीच मदत कराल अशी आशा आहे.

## ९९४

### २२ जानेवारी १९३९—विष्णु भास्कर गोवंडे, पुणें

महाराष्ट्रांतील एक सुप्रसिद्ध साहित्यसेवक, केसरीचे संपादक, आणि महात्मा गांधीना कांही बाबतींत जोराने विरोध करणारे गृहस्थ, म्हणून आपणांस असंख्य लोक ओळखतात. नागपूरचे श्री. चिंतामणराव मराठे यांनी आपली व माझी कांही वर्षांपूर्वी ओळख करून दिली. गेल्या सहा महिन्यांत आमच्या 'आमोद कुटी'वरून जातांना येतांना मला आपल्या दर्शनाचा लाभ अनेक वेळा झाला. आपला आनंदी चेहरा पाहून मला कौतुक वाटतें. आपल्या आनंदाचें कारण मागच्या केसरींतील 'हृद्गतांत' मला सांपडलें. आपल्या चरित्रांतील उतारे माझ्या वृद्ध मातोश्रींनी आणि मी एकाग्रचित्ताने वाचले. केसरींतील उताऱ्याच्या शेवटचें वाक्य मला फारच आवडलें. आपण समाधानांत असून "हाके"ची वाट पहात आहां. जंगलांत गेल्यावर अथवा योगाभ्यास केल्यावर कांहींना प्राप्त होणारी ही समाधानाची अवस्था, आपणांस रोजचें कार्य व्यवस्थितपणें करीत असतांना, प्राप्त झाली ही फार आनंदाची गोष्ट आहे. कर्तव्य करा

म्हणजे आनंद आपोआप मिळेल ही गोष्ट आपल्या चारित्र्यावरून कोणालाहि दिसेल.

९९५

२४ जानेवारी १९३९—प्रो. कृ. पां. कुलकर्णी, एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई

परवाच्या केसरींत आलेलें आपल्या आत्मचरित्रांतील 'हद्दत' वाचलें. फार उत्तम साधलें आहे. साधलें म्हणण्याच्याऐवजी आत्मभावनांचा आविष्कार इतका बेमालूम रीतीने आपोआप बाहेर आला आहे की, वाचणाऱ्या मनुष्याला चटका लावतो. विशेषतः शेवटच्या साडेतीन ओळी वाचतांना आसवें आपोआप गळतात. 'प्रतिभें'तील सावरकर—परांजपे ह्या लेखानंतर आपला उत्तम लेख हाच वाचला. परवा पुण्यास आलों त्या वेळीं समक्ष भेट घेऊन हेंच सांगणार होतों. परंतु माझ्या गर्दीमुळे गांठ घेतां आली नाही. ज्यांच्या ज्यांच्याशीं गांठ पडली त्या सर्वांचें मत हेंच पडलें, की, हात जोडा, परंतुः हाकेची वाट इतक्यांतच कां पाहतां ? त्याने हाक देऊं नये हीच त्याला प्रार्थना !

९९६

८ फेब्रुवारी १९३९—बॅ. मुकुंदराव जयकर, मुंबई

तुम्ही 'गतगोष्टी 'नामक आत्मचरित्राचें आपलें पुस्तक पाठविलें. त्याबद्दल आभारी आहें. तुम्ही आपलीं पुस्तकें एकामागून एक इतक्या थोड्या अवधींत कशीं लिहून प्रकाशित करतां याचें मला आश्चर्य वाटतें. आज सकाळीं पुस्तक हातीं आलें तें, मी आजारीपणामुळे निजून असतांहि, मधून मधून वाचलेंच. तेवढ्या-वरून वाटतें कीं, तुमच्या माझ्या समकालीन इतिहासांत या पुस्तकाने स्मरणीय अशी भर घातली जाईल.

९९७

११ फेब्रुवारी १९३९—मा. ना. भिडे, बागायतदार, मुंडाजें, द० कानडा

आपलें आत्मचरित्राचें पुस्तक वाचलें. असल्या कलात्मक वाङ्मयग्रंथाचें योग्य ते गुणग्रहण करण्याची माझी पात्रता नाही. पण इतकेंच सांगतों कीं, त्यांतील कांही भाग वाचतांना मला जो आनंद झाला तसा क्वचित्च अनुभवा-वयाला मिळतो. तुमचा ग्रंथ वाचून तुमच्या व्यक्तिमत्वाचा पूर्वी केव्हा नव्हता इतका निकट परिचय मला झाला. तुम्हाविषयी व इतरहि अनेक प्रश्न बसल्या जागीं

माझ्या डोक्यांत केव्हा केव्हा येत असत. त्यांतील पुष्कळांचीं उत्तरें तुमच्या ग्रंथाने मला मिळालीं. मोठ्या माणसांचीं चरित्रें आणि त्यांच्या आयुष्यांतील झगडे यांचें योग्य रीतीने निरीक्षण करण्याची दृष्टि मला लाभली. मी मोठासा वाङ्मयाभ्यासी नाही. पण दिसेल तेथे कलाविलासाचा आनंद सेवण्याची पात्रता मजमध्ये आहेसें मला वाटतें. आणि असे कांही कलाविलासाचे भाग तुमच्या ग्रंथांत वाचून मला अतिशय आनंद झाला. विशेष आनंद हा झाला की, तुम्ही सहकुटुंब आमच्या गांवीं आलां असतां आपला सर्वांचा एकत्र फोटो काढला तो या ग्रंथांत तुम्ही घातला. यापूर्वी मी तुमच्याशीं संकोचाने वागत होतों. वाटे कीं, कार्याने भारावलेल्या तुमच्यासारख्याला माझ्या सहवासाने उपाधि न पोचावी. परतु मला आता तुम्ही इतकें ऋणी करून ठेवलें आहे, व आनंद लाभविला आहे कीं, यापुढे मी मनांतील हें बंधन न ठेवतां तुमच्याशीं वागेन. या दूरच्या गांवीं असलेल्या चित्पावन ब्राह्मण समाजाला तुमची भेट चिरस्मरणीय वाटते.

११८

२ मार्च १९३९—प्रो. ना. बनहट्टी, कॉंग्रेसनगर, नागपूर

आपलें बहुधा कोणतेंहि पुस्तक प्रसिद्ध झालें म्हणजे तें मी घेऊन वाचतोंच. त्याप्रमाणे 'गतगोष्टी' हेंहि पुस्तक घेऊन सध्या वाचीत आहें. पुस्तकाच्या वाचनाने इतका मनमुराद आनंद लुटावयास मिळत आहे कीं, त्या आनंदाचे उद्गार आपणाला ऐकविल्याखेरीज मला राहवेना म्हणून हें पत्र लिहून आपणांस तसदी देत आहें. बरेच दिवसपर्यंत कोणच्याहि पुस्तकाने मला इतकें गुंगविलें नव्हतें. 'गतगोष्टी'मध्ये वर्णनाच्या ओघांत आलेल्या विषयांची विविधता जितकी चमत्कृतिजनक आहे, तितकाच त्यांत व्यक्त झालेला मनाचा प्रांजळपणा हृदयंगम आहे. आपल्या उत्तरायुष्यापर्यंत माझें वाचन अद्याप आलेलें नाही. परंतु आपल्या पूर्वायुष्यांतील हकीकत व विशेषतः मिरजेतील जीवनाचें वर्णन—मी मिरजेचा असल्यामुळे—मला विशेषच चित्तवेधक व उद्बोधक वाटलें. हे धन्योद्गार आपणांस ऐकविण्याखेरीज दुसरा कोणताहि हेतु पत्र लिहिण्यांत नव्हता म्हणून येथेच पुरें करतों.

९९९

### ८ जुलै १९३९—वेजवुड बेन, पार्लमेंट हाउस, लंडन

ता. २८ जूनच्या तुमच्या पत्राबद्दल आभारी आहें. त्याबरोबर तुम्ही माहितीपत्रकं पाठविलें तें पोचलें. तुम्ही लिहिलेलें प्रकरण पार्लमेंटमध्ये यापूर्वी अेकदा चर्चेला निघालें होतें. तथापि तुम्ही माहिती पाठविली तिचाहि उपयोग तें प्रकरण पुनः निघेल तेव्हा होअील, म्हणून त्याबद्दल पुनः अेकवार आभार मानतों.

१०००

### ३१ जुलै १९३९—गणेश हरि कुलकर्णी वकील, कागल

आपलें "भारतीय तत्त्वज्ञान" हें पुस्तक सर्वांगसुंदर आहे यांत शंका नाही. पण आपण त्याच्या प्रस्तावनेंत लिहिल्याप्रमाणे "आधीचे तें आधी" झालें पण नंतरचें तें केव्हा? "पाश्चात्य तत्त्वज्ञान" या नांवाचा ग्रंथहि आपण भा. त. च्या पद्धतीवर लिहून प्रसिद्ध करावा अशी मी आपणांस आग्रहाची विनंति करतों.

संतवाङ्मय हें जरी स्वतंत्र दर्शन नसलें तरी त्यावर एक प्रकरण भा. त. पुस्तकांत घातलें असतें तर बरें झालें असतें असें मला वाटतें. ही सूचना जर आपल्यास ग्राह्य वाटली तर द्वितीयावृत्तींत अगर पूरणिका म्हणून पुस्तक लिहून तिचा विचार करावा. "नवोपक्रम विद्यार्थ्यांचीं टिपणें" असें जरी आपल्या ग्रंथास आपण नम्रतेने उल्लेखिलेलें असलें, तरी अशा तऱ्हेचा एकत्र माहिती देणारा ग्रंथ मराठींत तर नाहीच पण संस्कृतमध्येहि नाही हें मी स्वानुभवाने सांगतों. असो. भा. त. च्या पान १९ वर आपण "पंधराव्या शतकांत गंगेशोपाध्याय यांनी तत्त्वचिंतामणि ग्रंथ लिहिला" असें लिहिलें आहे. असें कोणत्या आधुनिक पंडिताने कोणत्या पुस्तकांत लिहिलें आहे तें पत्रोत्तरीं कळविण्याची कृपा व्हावी. मला तें मूळ वाचावयाचें आहे. नैयायिकाबद्दल ( नव्य ) आपलीं विधानें खरीं आहेत.

१००१

### २० ऑगस्ट १९३९—महाराज तुकोजीराव होळकर, इंदोर

आपलें पत्र आणि सोबत पाठविलेला रुपये २०० दोनशेंचा चेक पोहो-चला. घुणे याने केलेली फसवेगिरी उजेडांत यावी, आणि फसवेगिरीचा उपद्व्याप

दुसऱ्या कोणास करतां येवूं नये, ह्याच हेतूने घुणेविरुद्ध केस करण्यास आम्ही आपणांस सल्ला दिल्याचे मागील पत्रांत स्पष्ट केलेंच आहे. त्यांत पैसे परत मिळावे हा हेतु मुळींच नव्हता. तथापि वसूल झालेले २०० रुपये आपण पाठविले त्याबद्दल आभारी आहों. आणि ती रक्कम या पत्रासोबत आपल्याकडे परत पाठवीत आहोंत. आपल्यास योग्य वाटेल त्या संस्थेस ही रक्कम धर्मार्थ म्हणून द्यावी. आमची प्रकृति बरी आहे. आपलें स्वस्तिक्षेम असेल अशी आशा आहे.

१००२

**सौ. क्षमाबाई राव, मुंबई**

तुम्ही माझ्या वडिलांच्या ( शंकर पाण्डुरंग पंडित ) संस्कृत चरित्रग्रंथाला जी श्लोकबद्ध संस्कृत प्रस्तावना लिहून पाठविली तिचें मला खरोखर किती कौतुक व आश्चर्य वाटलें हें कसें सांगूं ! तुमच्या प्रस्तावनेविषयी माझी कांहीं आधीची अपेक्षा होतीच. तथापि तिच्याहि पलीकडे जाऊन तुम्ही उत्कृष्ट प्रस्तावना लिहिलींत. तुमची स्वभावसुंदर संस्कृतभाषापद्धति वाचली म्हणजे संस्कृत भाषेला मृतभाषा म्हणणारांचा मूर्खपणा सहज कळून येतो. ही प्रस्तावना कोणत्याहि संस्कृत साहित्यिकाला शोभेल अशीच झाली आहे. आणि ती पाहून मला वाटतें कीं, 'प्रस्तावना लिहिण्याची मजवर कृपा करा ' अशी विनंति जेव्हा मी तुम्हांला केली, तेव्हा माझ्या मेंदूंतून एक अकल्पित स्फूर्तीची लाट निघाली असली पाहिजे ! आणि त्याबद्दल मी स्वतःचेंच अभिनंदन करतें. तुम्ही इतकी चांगली संस्कृत भाषा लिहिलेली पाहून तुम्ही इतकें चांगलें मराठी लिहूं शकतां याचें कुणालाहि आश्चर्य वाटणार नाहीं. मलाहि इच्छा होते की, मला माझ्या मराठी मातृभाषेंत चांगलें लिहितां यावें. पण त्याऐवजी संस्कृतमात्र चांगलें लिहितां येतें; कारण संस्कृतांतच लिहिण्याचा सराव होण्याचा योग आला. मौजेची गोष्ट ही कीं, मी ज्या परिस्थितींत राहतें तींत मराठी बोलण्याचाहि प्रसंग मला क्वचित्च येतो. कारण जो, महाराष्ट्रीयहि, मजकडे येतो त्याला मजशीं इंग्रजींत बोलावेंसें वाटतें. कोण हें दैवविलसित ! मी राजकोटाहून परत आल्यावर तुमच्या सोयीप्रमाणे ता. २७ किंवा २८ ही धरून त्या दिवशीं माझ्या पुस्तकप्रकाशनाचा समारंभ करीन म्हणतें, व त्या वेळीं तुम्ही येणार आहां याविषयी आनंद वाटतो. तरी उत्तरीं कळवावें.

---

१००३

२० मार्च १९१४—भार्गवराम वेरेरकर, रत्नागिरी

एका अज्ञात व्यक्तीची विनंती ऐकून आपण त्या व्यक्तीसाठी जे एवढे श्रम घेत आहांत ते पाहून त्या व्यक्तीला किती धन्यता वाटली आहे तीं पत्रीं लिहितां येत नाही. मी या वेळीं मुद्दाम पुनः भेटावयास आले पाहिजे होतें खरें. पण सरकारी नोकरीमुळे वाटेल तेव्हा वाटेल तिकडे जाणें अगदीं अशक्य झालें आहे. पाल्हाळाने आपणास कंटाळा मात्र येईल म्हणून यापेक्षा अधिक कांही लिहीत नाही. सर्व हकीकत हें पत्र घेऊन जाणारे माधवराव दळी सांगतीलच. प्रत्यक्ष भेटीचा योग पुनः केव्हा येईल तो खरा. मी तर असा बांधून पडलों आहे.

पुनः एकवार आपण मजकरिता दाखविलेल्या कळकळीबद्दल आपणांस धन्यवाद देत आहे. अशीच आपली कृपादृष्टी असावी अशी नम्र विनंति आहे. कळावे, लोभ असावा हे विज्ञापना.



# सूची



( नांवांपुढील आंकडे पत्रांचे लेखांक आहेत. )

ख



ग

### ध



### न

# न. चिं. केळकर यांची ग्रंथ-निर्मिति

१८९४ नवरदेवाची जोडगोळी नाटक.

१८९५ सरोजिनी नाटक.

१९०० गॅरिबाल्डीचें चरित्र.

१९०४ सुभाषित आणि विनोद निबंध.

१९०९-१० आयर्लंडाचा इतिहास.

१९१२ तोतयाचें बंड नाटक.

१९१३ चंद्रगुप्त नाटक.

१९१४ कृष्णार्जुनयुद्ध नाटक.

१९१५ अमात्य माधव नाटक.

१९१६ वीरविडंबन नाटक.

१९१७ The Case for Indian Home Rule राजकारणी निबंध.

१९१७ संत भानुदास नाटक.

१९१८ मराठे व इंग्रज ऐतिहासिक निबंध.

१९२३ लो. टिळकांचें चरित्र भाग १ ला.

१९२८ „ „ भाग २ रा व ३ रा.

१९३२ तरुण हिंदु नागरिक.

१९३३ राज्यशास्त्र.

१९३४ नवलपूरचा संस्थानिक कादंबरी.

१९३५ भारतीय तत्त्वज्ञान संकलन ग्रंथ.

१९३६ फ्रान्सची राज्यक्रांति, इतिहास.

**१९३६ बलिदान कादंबरी; तिरंगी नवमतवाद चिकित्सा ग्रंथ.**

**१९३७ हास्यविनोदमीमांसा संशोधन ग्रंथ.**

**१९३८ गतगोष्टी—आत्मचरित्र.**

**१९३९ कावळा व ढापी कादंबरी.**

**१९४० फ्रान्सची झाशीवाली, चरित्र.**

[ यांत कविता, लघुकथा, विनोदी लेख, प्रस्तावना, टीकालेख, राजकारणी निबंध, अध्यक्षीय भाषणरूप निबंध, वर्तमानपत्री लेख यांचा समावेश नाही. ]

केळकरांच्या **कादंबऱ्या** कांही अर्धप्रकाशित, कांही अर्धलिखित अशा आहेत त्या—

**१ कोंकणचा पोर.**

**२ अंधारवड.**

**३ जगाची रीत.**

**४ प्रमिला—नवमहिला.**

**५ दिवाण झिप्री.**

